# प्रस्तावना

१. प्रस्तुत ग्रंथामध्यें शिवकालीन अस्सल पत्रांच्या सारांशांचा संग्रह केला आहे. अभ्यासाच्या सोईसाठीं शक १६०२ ही शिवकालाची अंतिम मर्यादा ठरवून तेथपर्यंतचीं उपलब्ध झालेलीं शिवाजीसंबंधीं मराठी, इंग्रजी, पोर्तुगीज, डच, कानडी, फारसी व संस्कृत ह्या ७ भाषांतील अस्सल पत्रें व समकालीन उल्लेख यांचा समावेश केला आहे. आदिम मर्यादा तितकी निश्चित न ठरविता, विशेषतः मराठी पत्रांच्या बाबतींत, ती बरीच ढिली ठेविली आहे. उपलब्ध असलेल्या जुन्यात जुन्या सर्व शिवचरित्रोपयोगी पत्रांना या ग्रंथांत स्थान देण्याचें ठरविल्यामुळें जरी शक १४८८ तील लेखाला अग्रमान मिळाला आहे तथापि तो यदृच्छाप्राप्त आहे, सहेतुक नाहीं, हें अभ्यासकांच्या सहज ध्यानांत येईल.

२. भारत इतिहास संशोधक मंडळांतील ग्रंथसंग्रह, इंडिया ऑफिस (लंडन) व हेग मधून मंडळानें पुष्कळ खर्च करून आणविलेले शिवकालीन पत्रांचे उतारे यांचा या ग्रंथासाठीं मुख्यतः उपयोग केला आहे. याखेरीज प्रो. पिसुर्लेकर यांचा पोर्तुगीज ग्रंथ, 'फरामीन सलातीन' आदिकरून फारशी ग्रंथ, एपिग्राफिया कर्नाटिका सारखे संशोधनात्मक ग्रंथ, अशासारख्या ग्रंथांचाहि उपयोग झाला आहे हें पत्रांच्या माथ्यावरील संदर्भनिर्देश पाहून सहज लक्षांत येण्यासारखें आहे. या ग्रंथांतून निवडलेले असे एकंदर २३४० उतारे यांत संग्रहित झाले असून ते ज्या ग्रंथांतून घेतले आहेत त्यांची विशेवारी एकत्र दिली आहे त्यावरून या ग्रंथाच्या व्याप्तीची कांहीं कल्पना येईल.

३. शिवकालीन वाङ्मय, म्हणजे शिवचरित्रोपयोगी विश्वसनीय वाङ्मय, अत्यंत अल्प आहे अशीच सामान्यतः संशोधकांची समजूत होती व अजूनहि आहे. फार कशाला, प्रस्तुत ग्रंथ हातांत घेताना येथील मंडळींचीहि तशीच समजूत होती. परंतु आरंभीं थोडी अस्पष्ट असलेली कल्पना, प्रत्यक्ष काम जसजसें हातांतून जाऊं लागलें त्याप्रमाणें, अधिक स्पष्ट होत गेली. आणि शेवटीं कल्पनेच्या बाहेर असा हा ग्रंथ वाढून सातशेंपर्यंत वाढत गेलेली पृष्ठसंख्या, पूर्वी कल्पिलेल्या एका खंडाऐवजीं, तेवढ्याच पृष्ठांच्या दोन खंडांत विभागावी लागत आहे. मात्र शिवचरित्रविषयक विविध प्रश्नांवर या संग्रहामुळें जो कांहीं प्रकाश पडेल त्या योगानें अज्ञात स्थानें स्पष्ट दिसूं लागून अभ्यासकांची जिज्ञासा अधिकच वाढणार यांत शंका नाहीं. तेव्हां इतकीं छापून एकत्र करूनहि अजून पुष्कळ

साधनें मिळालीं पाहिजेत अशी कै. राजवाडे यांनी अगदीं पहिल्यानें मारलेली हांक अजूनहि तशीच दूरवर पोंचविली पाहिजे असाच मह या ग्रंथाच्या अभ्यासानें झाल्यास नवल नाहीं.

४. हा ग्रंथ अनेकांच्या परिश्रमांचें फळ आहे हें आभारपूर्वक सांगणें अवश्य आहे. श्री. रंगनाथ दत्तात्रय दांडेकर, एम्. ए., यांनी अत्यावधींत जुन्या डच भाषेचा अभ्यास करून त्या भाषेंतील उताऱ्याचें सार तयार केलें. पोर्तुगीज उताऱ्यांचा सारांश प्रो. पिसुर्लेंकर यांनीं पाठविला. इंग्रजी उताऱ्यांचा सारांश श्री. दिनकर विनायक काळे, एम्. ए. यांनीं काढला, मराठी पत्रांचा सारांश काढण्याचें काम श्री. शंकर नारायण जोशी व श्री. गणेश हरी खरे या उभयतांनीं केलें आणि फारसी पत्रांचा मतलब प्रो. भगवद्दयाल वर्मा यांनीं दिला.

५. हीं सर्व पत्रें कालानुक्रमानें लाविलीं असल्यामुळें, कोणत्याहि एका प्रसंगाबद्दलचे उल्लेख एकत्र सांपडणें शक्य झालें नसलें तरी, ह्या व्यवस्थेंतहि एकप्रकारची सोय झाली आहे हें कोणाचेहि ध्यानांत येईल. कोणत्याहि भाषेंतील सर्व प्रसंगांवरचे उल्लेख, आणि तेहि इतिहासासारख्या विषयांतील, सुसूत्र लावण्याची एकच पद्धति म्हटली म्हणजे कालानुक्रमानें केलेली विल्हेवारी हीच होय ह्याबद्दल दुमत होण्याचें कारण नाहीं. शिवाय या लेखसंग्रहाला विषय-सूचीहि जोडली असल्यामुळे मुख्य व्यवस्थेवरुन कालाचें, व सूचीवरून व्यक्ति व स्थलांचें दिग्दर्शन झाल्यानें, कोणताहि ऐतिहासिक प्रसंग अभ्यासकांना हस्तगत होण्यास हें साधन योग्य झालें आहे असेंच सर्वांचें मत होईल अशी आशा आहे.

६. एवढ्या अवाढव्य आणि त्वरेनें संपवाव्या लागलेल्या प्रयत्नामध्यें कांहीं कालविपर्यास, अनुक्ति, पुनरुक्ति, सारांश-विच्छेद किंवा अन्य कांहीं दोष झाले असण्याचा संभव आहे. भूल करणाऱ्या प्रसंगाचा निर्देश शक्य तोंपर्यंत शुद्धिपत्रांत केलाच आहे. इतर चुका कोणाच्या नजरेस आल्यास त्या त्यांनीं कृपा करून कळवाव्या.

७ ग्रंथाचे देणगीदार व आगाऊ ग्राहक यांचीं नांवें ग्रंथामध्यें छापलीं आहेत. तीं त्यांचें जाहीर रीतीनें आभार-प्रदर्शन करण्याकरितांच आहेत. पण, रप. बरोबरच या ग्रंथाला पूर्वसाहाय्य प्रत्यक्ष ग्राहकांकडून किती कमी झालें आहे ह्याचीहि कल्पना अशा उपकर्त्यांच्या अल्पसंख्येवरुन दिसून येईल. अशा परिस्थितींत रायगड-स्मारक मंडळाच्या सभासदांनीं ह्या शिवचरित्र–कार्याकरतां

अडीच हजारांची देणगी मंजूर केली नसती तर छपाईपर्यंतच्या कामाची आंखणी व उभारणी करणेंच अशक्य झालें असतें. पूर्वतयारी झाल्यावरहि छापणें व प्रकाशन ह्या गोष्टीदेखील पुष्कळ खर्चाच्याच आहेत. त्यांपैकीं प्रस्तुत ग्रंथाच्या प्रथम खंडाला बरीच मोठी देणगी देऊन इंदूरच्या **'महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक मंडळानें'** कांहीं भार हलका केला त्याबद्दल त्यांचे जाहीर आभार मानले पाहिजेत. त्यांच्या मदतीचें निदर्शक म्हणूनच हें पुस्तक **'होळकर सरकार पुस्तक माले'** मध्यें समाविष्ट केलें आहे.

८. ह्याशिवाय **डॉ. सुरेंद्रनाथ सेन** (कलकत्ता), **श्री. स. म. दिवेकर** (कल्याण), **श्री. स. तात्यासाहेब मेहेंदळे, श्री. द. वा. पोतदार, श्री. कृ. वि. आठल्ये** (शिपोशी) व **फादर हेरास** (सेंट् झेविअर कॉलेज) ह्यांनीं आपल्या खाजगी संग्रहांचा ह्या ग्रंथाचे कामीं निस्वार्थ बुद्धीनें उपयोग करूं दिला ही त्यांची मदत केवळ अमूल्य आहे. इंग्लंडमधून इंग्रजी व हॉलंडमधून डच साधनें मिळविण्याच्या कामीं **बॅ. ब. ग. परांजपे** ह्यांनीं आपलेपणानें केलेले परिश्रम अत्यंत उपकारक झाले आहेत. आर्यसंस्कृति-मुद्रणालयाचे विद्वान् चालक **डॉ. वा. गो. परांजपे** आणि त्यांचे सुहृद खिळारी यांच्या उत्साहानें व आस्थेमुळें ह्या ग्रंथाच्या मुद्रणाचें काम इतकें निर्दोष झालें म्हणून आम्हांला त्याकरितां फारशी जिकीर करावी लागली नाहीं हें सांगणें अवश्य आहे. अशा तऱ्हेनें नानाविध प्रकारांनीं, आपआपल्या परी, प्रत्येकानें ह्या राष्ट्रीय ग्रंथप्रकाशनाला उत्तम साहाय्य दिल्याबद्दल ह्या सर्वांचे आम्ही अत्यंत आभारी आहों. ह्याशिवायहि कित्येकांचा हातभार कित्येक महत्त्वाचे गोष्टींमध्यें ह्या कामीं लागला आहे. परंतु ह्या ग्रंथांची निर्दोष-पूर्ती हेंच त्यांचें समाधान असल्यामुळें लौकिक दृष्ट्या त्यांचे आभार मानणें आम्हांला व त्यांनाहि प्रशस्त वाटत नाहीं.

९. हें पुस्तक व त्रिशत सांवत्सरिक शिवस्मारक ग्रंथावलीतील इतर पुस्तकें यांची योजना करून ती पार पाडणें व एकंदरींत श्री शिवचरित्रकार्यालयाच्या नानाविध कार्यांचा व्याप संभाळणें या कामीं नवीन श्री समर्थ विद्यालयाचे **श्री. दिनकर विनायक काळे** व भा. इ. सं. मंडळांतील **श्री. शंकर नारायण जोशी** (याईकर) यांचें अत्यंत साहाय्य झालें हें आभारपूर्वक नमूद केलें पाहिजे. या दोन सहकाऱ्यांची जोड दिल्याबद्दल वरील उभय संस्थांचे शिवचरित्र-कार्यालय अत्यंत आभारी आहे.

पुणें
शिवाजी जयंती १८५१

नरसिंह चिंतामण केळकर
दत्तात्रय विष्णु आपटे

# शिव-कालीन-पत्र-सार-संग्रहांत
## उपयोगांत आणिलेल्या संक्षेपांचा खुलासा

१ एकूण ७१८ पृष्ठांमध्यें, या संग्रहांत सत्याहत्तर पुस्तकांचा म्हणजे १८१ ग्रंथांचा ( सुमारें पस्तीस हजार पृष्ठें ) उपयोग करून २३४० मितवार गोषवारारूपानें दिले आहेत. कित्येक लेखांकांत दुबार संदर्भ दर्शविला आहे. एकदोन लेख नजरचुकीनें दुबार छापले गेले आहेत. मिळून सुमारें २५०० उतारे यांत आले आहेत. इतका मजकूर थोडक्यांत मांडतांना व त्याबद्दल संदर्भ दर्शवितांना अर्थातच अनेक संक्षेपांचा उपयोग करावा लागला. हे सर्व संक्षेप शिवकालाचा किंवा मराठी इतिहासाचा अभ्यास करणाऱ्यांना म्हणजे यांत उल्लेखिलेल्या पुस्तकांशीं व त्यांतील मजकुराशीं परिचित असलेल्यांना सहज समजण्यासारखे आहेत. यांतील कित्येक तर कोणालाहि अनायासानेंच उलगडतील इतके साधे आहेत. तथापि ते एकत्र करतांना सर्वांना मान्य होण्यासारखा विवेक करण्याची अशक्यता लक्षांत घेऊन येथें ते सर्वच छापण्याचें ठरविलें आहे.

२ विशेष अडचण संदर्भसारणींतील ग्रंथनामांची भासावयाची. त्यांचीहि नेटक यादी दिली आहे.

३. संदर्भ सारणीची सामान्य योजना सहज लक्षांत येण्यासारखी आहे. लेखांकाच्या उजव्या बाजूला शक, मिती व सन, तारीख यांचा निर्देश ठरवितां आला तितका संपूर्ण दिला असून डाव्या बाजूला मूळ ग्रंथांतील संदर्भ दिला आहे. त्यापैकीं वरच्या ओळींत बहुधा स्थल म्हणजे ग्रंथनाम, लेखांक किंवा पृष्ठांक व दुसऱ्या ओळींत मुळांत असलेला मितिनिर्देश (ज्याच्यावरून उजवीकडील मिती किंवा तारीख काढिली तो) दिला आहे. मूळ मितिनिर्देश शकांत किंवा इसवी सनांतच असल्यास तेथें तो संपूर्ण देऊन द्विरुक्ति करण्याऐवजीं तेथें केवळ श. व इ. लिहूनच काम भागविलें आहे. मध्यभागीं लेखांकाचें छोटें कांहीं वर्णन देण्याचा प्रयत्न केला आहे.

४ मितींचें गणित अर्थात् 'खरे जंत्री' वरून केलें आहे. डच व पोर्तु॰ कागदांत इ. स. ची न्यू स्टाईल वापरलेली असते. तेथें मूळ तारखेंत दहा दिवस वजा करून चालू ( ओल्ड स्टाईल ) तारीख मांडली आहे हें उघड दिसून येईल.

५ या संग्रहांत केवळ उपलब्ध साधनांतील पत्रांचा व उल्लेखांचा समावेश करण्याचेंच ध्येय पुढें ठेविल्यामुळें त्यांतील प्रत्येक उल्लेखाबद्दल विचिकित्सा करून संपादनाचें महत्त्वाचें काम करण्यास सवड झालेली नाहीं. आज आधार म्हणून मानलीं जाणारीं सर्वच साधनें यांत घेतलीं आहेत. कित्येक तर अन्यांच्या माहितगारीवरूनच घेतलीं आहेत. सर यदुनाथ सरकार यांनीं मूळ फारशीवरून इंग्रजींत भाषांतरें केलीं आहेत किंवा श्री. रियासतकार सरदेसाई यांनीं आपल्या रियासतींत रॉ. ए. सोसायटींतील फारशी हस्तलिखितांचीं भाषांतरें दिलीं आहेत; तीं या लेखकांच्या पुस्तकांतून उद्धृत करून घेतलीं आहेत. तात्पर्य, अभ्यासकाला सर्वच पत्रें एकत्र उपलब्ध व्हावीत असा प्रयत्न करून त्याच्यावर कोणताहि विशिष्ट मताचा भार घालण्याची इच्छा

धरलेली नाहीं. या साधनांची छाननी करण्याचें काम झालें पाहिजे यांत शंका नाहीं. परंतु अशा तऱ्हेनें संकलन त्याचे आधीं झालें पाहिजे होतें तें येथें केलें आहे.

## १. ग्रंथनामेतर संक्षेपांची स्पष्टता

अ. = अदिलशहा; अधिक महिना.
अखं. ल. = अखंडित लक्ष्मी अलंकृत.
अजर. = अज रस्तखाना म्द. कचेरींतून
अधिका. = अधिकारी
अष्टाधि. = अष्टाधिकारी
अक्टो. = अक्टोबर
आश्वी. = आश्वीन
आषा. = आषाढ
इ. = इत्यादि; इसवीसन
इा = इस्तकबिल (पासून)
ई. इं. कं. = ईस्ट इंडिया कंपनी
ओ. स्टा. = ओल्ड स्टाईल
क., का = कसबे; कर्यात
कॅ. = कॅप्टन
का. = कार्तीक
कार., कारकू. = कारकून
खा = खान; खास
खुा, खुर्द. = खुर्दखत
खं. = खंड
ग., गव्ह. = गव्हर्नर
मा. = मार्गशीर्ष
गु. म. प. = गुरुमक्तिपरायण
गो. = गोसावी
गोवळ. = गोवळकोंडें
म. = माघ
चिट. = चिटणीस
चिर. = चिरंजीव
चै. = चैत्र
चौ. = चौकोनी
चौगु. = चौगुले
छ = चंद्र; (मुसलमानी तारीख)
ज. = जनरल
जखर. = जमादिलाखर
जवल. = जमादिलावल
जहा. = जहागिरदार
जाने. = जानेवारी
जु. = जुलूस
ज्ये. = ज्येष्ठ
ड. = डवीर
डिसें. = डिसेंबर
ता; ता. = तपे; तर्फ; तागायत; तालीक (नकल) ताहा (-कडे)
तागा. = तागायत
तीं. स्व. = तीर्थस्वरूप
दा = दस्तखत; दसखत
दि. दिा = दिवाण; दिमत
दो = देखील
दोक = देशलेखक
दोख; देश; देमु. = देशमुख
दोधि = देशाधिकारी
दे. कु.; दोणी = देशकुलकर्णी
देपा; दोडे = देशपांडे
धर्माधि. = धर्माधिकारी
न., ना. = नकल; नजीक; नख्त; नाक, नाईक
निा = निसबत
नोव्हें., नोवें. = नोवेंबर
न्यू. = न्यू स्टाईल
पा. पर. = परगणे; परवानगी; पाटील; पाठविले; पातशाही
परो. = परोपकार मूर्ति

पें. = पॅगोडा (होन; ५ गिल्डर्स)
पाऊ. = पाऊलोक (पायदल)
पौ. = पौष
पृ. = पृष्ठ
पे. = पेशवे
पैा = पैवस्ती (पोचल्याची तारीख)
पोर्तु. = पोर्तुगीज
प्रो = प्रगणे; प्रांत; प्रमाणें
प्रति; प्रतिप.; प्रतिपच्चंद्र० = 'प्रतिपच्चंद्रलेखेव वर्धिष्णुर्विश्ववंदिता। शाहसूनोः शिवस्यैषा मुद्रा भद्राय राजते' शिवाजी राजे यांची मुद्रा
प्रेसि. = प्रेसिडेन्ट
फ. = फसली सन
फा. = फाल्गुन महिना
फार; फा. = फारसी
फेब्रु. = फेब्रुवारी
बा = बदल; बेरमी (नांवाचा); बरहुकूम (हुकमाप्रमाणें)
बाासुा = बरहुकूम सुर्देखत
बजा = बजानीब (प्रति, कडे)
बाद. = बादशहा
बिा = बितपसील (तपसिलाप्रमाणें)
बुा = बुदुक (बुनें)
बो = बेरम (नांवानें)
भाद्र. = भाद्रपद
मार्ग. = मार्गशिर
भ्र. = भ्रतार
म. म. = ममलकत मदारि
म. श. म. = मलिक शर्क मलिक अंबर
म; मा = मलिक, (१४५९?)
म. = मराठी; महाराज
मज. माा; मार = मजकूर
म. ह. = मसहुरल हजरती
मज्मू. = मजमूदार, मुजुमदार
मति = 'श्री शिव नरपति हर्षनिधान सामराज मतिमत्प्रधान' (शिवाजीराजांच्या पेशव्यांची मुद्रा.)
मर्या = मर्यादेयं विराजते
मह. = महजर
महा. = महाजन
मार्ग. = मार्गशीर्ष
मि. = मिस्तर
मिा = मिनहू
मु. = मुद्रा
मुा = मुक्काम; मुद्दद (मुराया, जुना)
मुता = मुतालीक
मोक. = मोकदम
मोका. = मोकासेदार
मोर्त. = मोर्तब (पत्राच्या शेवटी समाप्तीच्या खुणेची मुद्रा)
मोहर = मोहरम
मौ = मौजे
यो = येकूण
रा = रवाना
रखर = रबिलाखर
रम, रमजा = रमजान
रवल = रबिलावल
रा. राा = राजश्री; राहणार
रु. = रुस्तुमजमा
रुा = रुके, रुपये
रेसि. = रेसिडेंट
लिा = लिहिले
ले. = लेखांक

व. वा = वद्य पक्ष
वा. = वाटोळा
वि. विजा. = विजापूर
वि. काय. = विठल कायदेऊ
वे., वेद. = वेदमूर्ति
वै. वैशा. = वैशाख
श. = शके
शि. = शिक्का
शिला. = शिलालेख
शिव. = 'शिव नरपती हर्षनिधान । महादेव मतिमत्प्रधान' (शिवाजीराजांच्या पेशव्यांची मुद्रा)
शु. शुा = शुद्ध
श्राव, श्रा. = श्रावण
श्रीशिव = 'श्रीशिव चरणी तत्पर त्र्यंबकसुत मोरेश्वर.' मोरो त्रिमल पिंगळे यांची मुद्रा.
श्री. = आश्विन
षा. = आषाढ
सा. सर. = सरकार
स. नो. = सरनौबत
स. सब. = सर सबनिवीस
सप्टें. = सप्टेंबर
सरदे. = सरदेसाई
सा = साहेब
साम; सामरा. = 'श्रीशिवनरपती हर्षनिधान सामराज मतिमत्प्रधान'
साल शुा = साल गुदस्ता
सी. = सीमा (पत्राच्या अखेरीस समाप्तीदर्शक असलेली मुद्रा.)
सु. = सुहूर
सु. प्रे. = सुरत प्रेसिडेंट
सुर. = सुरनीस
सा = सेकीन (राहणार)
सेटि. = सेटिये
सुा = सुदा
सं. = संमत
ह. = हजार
हवा. = हवालदार
हि. = हिजरी सन
हुा = हुजती
हुदे. = हुदेदार
हुमा. = हुमायून(दयाळू)
हे. = हेन्री
हे. के. = हेन्री केन्द्री.

## २. ग्रंथ-संदर्भ-संक्षेप

श्री. वि. वि.—श्री सांप्रदायिक विविध विषय, (श. १८३९), सत्कार्योत्तेजक सभा धुळें.

श्री. सं.—श्री संप्रदायाची कागदपत्रें, (श. १८३७) स. सभा, धुळें.

* अब. हमीद—अबदुल हमीदचा पादशाहनामा. हा व इतर कांहीं ग्रंथांचे संदर्भ

* साधनग्रंथेतर अशा ग्रंथांवरून घेतलेले संदर्भ.

सर यदुनाथ सरकार ह्यांच्या ग्रंथांवरून मांडले असून अशा ठिकाणीं सर सरकार यांच्या इंग्रजी पुस्तकांचा जोड आधार दिला आहे.

आठल्ये सं.—श्री. कृ. वि. आठल्ये, बी. ए. ( शिपोशी ) ह्या व्यासंगी गृहस्थांचा खासगी संग्रह.

* आदब. औ.—आदब-इ-अलमगिरी, औरंगजेबाचीं पत्रें ( अब. हमीद पद्दा. )

§ ऑर्मे—*Orme Mss*, Historical fragments चा कर्ता रॉबर्ट ऑर्मे यानें अनेक ठिकाणचे उतारे संग्रहित केले ते इंडिया ऑफिसमध्यें ठेविले आहेत. त्यानें नकलून घेतलेल्या कित्येक कागदांच्या असल प्रती आज उपलब्ध नसल्यामुळें ह्या संग्रहाचें महत्व विशेष आहे.

इ. ऐ.—इतिहास आणि ऐतिहासिक, मासिक पुस्तक, स. स. धुळे, अथवा शि. च., खंड २१.

इ. डॉ.—*History of India as told by its Own historians*, by Elliot and Dawson, Trubner & Co, London.

इ. वृ.—भारत इ. सं. मंडळाचीं इतिवृत्तें, पुढील आंकडा इतिवृत्ताच्या शकाचा आहे.

इ. सं.—इतिहास संग्रह, मासिक, संपादक रा. ब. पारसनीस.

छ. गोष्टी—इ. सं. मधील जुन्या गोष्टी हें प्रकरण.

इंडियन ॲंटिक्वेरी—*Indian Antiquary*, a journal of Oriental Research, London.

इं. फॅ.—English Factories in India, by Sir William Foster. Vols. 1-13.

एपि. इंडोमॉस्लेमिका – Epigraphia Indomoslemica ( 1907-08 )

एपि. कर्ना.—Epigraphia Karnatika, part X( 1905 ), edited by Mr. Rice.

§ओ. कॉ.–*Original Correspondence*, letters received from India. ई. इ कंपनी व हिंदुस्तानांतील वखारी यांमधील पत्रव्यवहार.

§ओरि. रिस.–Orientalische Reise-beschreibung. व्हॉल्कार्ड इव्हर्सेन यानें प्रत्यक्ष पाहून लिहिलेली सुरतेच्या लुटीची हकीकत या ग्रंथांत आहे.

का. प्र. इ. साधनें – कायस्थप्रभूंच्या इतिहासाचीं साधनें.

कोर्ट मिनिटस् – A calendar of the Court Minutes etc. of the East India Company, 1668-70 ; by E. B. Sains-

§ अशा खुणा केलेले हस्तलिखितांचे संग्रह लंडन येथील इंडिया ऑफिसमधील व हेग येथील असून, भा. इ. सं. मंडळ, पुणें या संस्थेनें पुष्कळ खर्च करून त्यांतील शिवचरित्रोपयोगी भागाच्या टाइपरिटन् किंवा हस्तलिखित नकला आणविल्या आहेत.

bury, with Intro. and notes by Sir W. Foster, C. I. E., Clarendon Press, 1929.

कों. इ. सा.—कोंकणच्या इतिहासाचीं साधनें, श्री. वा. अ. बांबर्डेकर यांनीं 'आयगौड ब्राह्मण' त्रैमासिकांत प्रसिद्ध केलेलें प्रकरण.

खं.—मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें, श्री. वि. का. राजवाडे, खंड ८, १५, १६, १७, १८, २० व २१.

गो. इ. सा.—गोमांतकाच्यां इतिहासाचीं साधनें, इ. सं. मासिकांत श्री. गोवे प्रांतीय सरज्योतिषी यांनीं प्रसिद्ध केलेलें प्रकरण (श. १८३५–३६.)

/ चिट.—चिटणीस घराण्याची संक्षिप्त माहिती व सनदा पत्रें (इ. १९१५) श्री. बाळकृष्ण सखाराम कुळकर्णी.

§ डच रेकॉर्डस—*Dutch Records*, Letters from the East Series.

डॅन—*The Portuguese in India by Danverse* (London 1884) Vol. II.

† डाग रजिस्टर—बटेव्हियाच्या डच अधिकाऱ्यांनीं पूर्वेकडील कारभाराची रोजनिशी वजा ठेविलेली नोंद. (इ. १६३६–१६८१) डचमधून जरुरीपुरतें भाषांतर करवून घेतलें आहे.

डायरी—*Fort St. George Diary.*

§ डेलन—'*A Voyage to the East Indies*' by Mr. M. D. Dellon.

जर्नेल बॉम्बे. रॉ. ए. सो.—Journal of the Bombay Branch of the Royal Asiatic Society (1917).

त्रै., त्रै. व.—भा. इ. सं. मंडळाचें त्रैमासिक, पुढील अंक वर्षाचा आहे.

दि.—दिवेकर संग्रह, श्री. स. म. दिवेकर यांनीं संकलित केलेला इंग्रजी पत्रव्यवहार.

नागरी प्रचारिणी—नागरी प्रचारिणी सभेचें त्रैमासिक.

§ निकोलस—*Voyages de Nicolas de Graaf aux Indes Orientales.*

§ प. रे. ऑ. मॅन्यु. सी. ओ.—Public Records Office Mss C. O.

† पिसुर्लेकर—प्रो. पिसुर्लेकर (गोवा) यांचा संग्रह, अप्रसिद्ध पोर्तु. कागद.

† पिसुर्लें. शिवा.—प्रो. पिसुर्लेकर यांचें 'शिवाजी' हें पोर्तुगीज पुस्तक.

पेद्रो डी. ल्हे. प्र. वृ.—पेद्रो डीला व्हॅल्ले या इटालिअन गृहस्थाचें प्रवासवृत्त (इ. १६२४.)

प्रभात, दिल्ली प.—प्रभात मासिकांत छापलेला 'दिल्लीपतीशीं झालेला शिवाजी महाराजांचा पत्रव्यवहार.' यामध्यें छापतांना झालेला मिती चा घोटाळा मंडळाच्या संग्रहांतील अस्सल फर्मानांच्या नकलांवरून शुद्ध केला आहे.

† इंग्रजीशिवाय अन्य पर—भाषेंतून येट मूळावरून भाषांतर करून घेतलेले उतारे.

फरा. सलातीन—फरामीन उस सलातीन = सुलतानांचीं फर्मानें (इ. १९२६), बशीरउद्दीन अहमद देहलवी, दिल्ली. यांत सुमारें २०० अस्सल फर्मानें व कांहींचीं छाया–चित्रें आहेत.

फॅ. रे.—Factory Records, ई. इं. कंपनीच्या वखारींचें कारभार विषयक दप्तर व पत्रव्यवहार. यांत सभांचे अहवाल ' कन्सल्टेशन ' म्हणून दिले आहेत. हीं फोर्टसेंट जॉर्ज, मच्छलीपट्टण, मुंबई, राजापूर, सुरत, आणि धरणगांव अशा स्थलवार गठ्ठांनीं उल्लेखिलीं आहेत. संकीर्ण म्हणूनहि यांचा एक गठ्ठा आहे. ह्यांतील प्रकाशितांचा उल्लेख इं.फॅ. असा देऊन अप्रकाशितांनाच फॅ. रे. म्हणून दर्शविलें आहे.

फॉरेस्ट होम—Selections from the Letters, Despatches and other State papers, preserved in the Bombay Secretariat, Home Series, Edited by G. W. Forrest ( Bombay 1887 ).

§ फिंच. मॅन्यु.—Report on *Finch Mss.*

फ्रायर—A new account of East India and Persia by Dr. John Fryer ed. Sir Wm Crooke ( Hak. Soc. ).

विजा. आर्कि.—Bijapur and its Architectural remains by Henry Cousens, ( Bombay 1916 ). यांतून कांहीं फर्मानें व थडग्यांवरील स्मारकलेख घेतले आहेत.

* ब्रि. म्यू. फार. हस्त—British Musem, Persian Mss. ( Modern Review ).

भाटे सज्जनगड—सज्जनगड व समर्थ रामदास, श्री. गो. चि. भाटे (१९१८).

* भांडार. कॉमे. व्हॉ.—' Bhandarkar Commemoration Volume ' यांतील सर य० सरकारच्या लेखावरून जयसिंगाच्या पत्रांचें भाषांतर करून घेतलें आहे.

मठ. शिला.—मठगांवचा शिलालेख, (श.१८४७,मुंबई.) रा. सा. वा. अ. भोंवडेकर.

§ मास्टर पेपर्स व डायरी—सुरतेच्या लुटींच्या वेळीं सुरतेचें रक्षण करणारा मास्टर याचे कागदपत्र.

* मॉ. रि.—*Modern Review* इंग्रजी मासिक; यांतील सर यदुनाथ सरकार यांचे लेखांवरून कांहीं फारसी पत्रांचीं भाषांतरें केलीं आहेत.

मो.—विजापूरच्या आदिलशाही घराण्याचा इतिहास—प्रो. बाळाजी प्रभाकर मोडक, कोल्हापूर.

## ग्रंथ-संदर्भ-संक्षेप

रत्नाकर--रत्नाकर मासिक पुणें. (इ. १९२७).

राम.--रामदास आणि रामदासी, मासिक धुळें. अनुक्रमांक अंकांचा आहे.

रिया., म. रि.--'मराठी रियासत', श्री. गो. स. सरदेसाई रियासतकार. यामध्ये काहीं पत्रें स्वतंत्रपणें प्रसिद्ध झालीं असून काहीं मॉडर्न रिव्यूवरून व लंडन रॉ. ए. सोसायटींतील फारसी संग्रहांतून ह्यांनीं घेतलीं आहेत. तसा जोड-संदर्भ दिला आहे.

✓ ६. ३ – मराठी दप्तर-रुमाल ३ (इ.१९२८), श्री. लक्ष्मण विनायक भावे ठाणें

" लं. रॉ. ए. सो. फारसी—London Royal Asiatic Society, Persian Mss., रियासतकारांनीं दिलेलीं भाषांतरें.

§ लेटर बुक—*East India Company's Letter Books.*

व., वत. पत्रें--वतनपत्रें (इ. १९०९ पुणें), संपादक रा.ब.वाड व श्री.पारसनीस.

शि. घ.—शिवकालीन घराणीं. (इ. ऐ., खं. २१)

शि. प्र., प्रदीप—शिवचरित्रप्रदीप (श. १८४० पुणें), संपादक श्री. द. वि. आपटे व श्री. म. म. दिवेकर.

स.--सनदापत्रें—(इ. १९१३), संपादक—श्री. पुरुषोत्तम विश्राम मावजी व रा. ब. द. ब. पारसनीस.

सर.—सरदेसाई घराण्याचा इतिहास, भा.२,श्री.गो.स.सरदेसाई,(कोल्हापूर.)

सर. औ.—'History of Aurangzeb' by Prof. Jadunath Sarkar.

सर. मंदीर—सरस्वतीमंदिर, मासिक.

सा.—शिवचरित्रसाहित्य खं. १ व २ (पुणें श. १८४८ व १८५१) भा. इ. सं. मंडळ, स्वीयमाला.

साधन चिकित्सा—ले. वासुदेव सीताराम बेंद्रे, (इ. १९२८) भा. इ. स. मं. पुरस्कृत ग्रंथमाला, अनु. ७.

सा. इ. सा.—सावंतवाडी संस्थानचा इतिहास, (इ. १९११), श्री. वि. पु. पिंगुळकर, पुस्तकाचें परिशिष्ट.

सं.—भा. इ. सं. मंडळाचीं संमेलनवृत्तें, अंक वृत्तांच्या अनुक्रमाचा आहे.

से.—डॉ. सुरेन्द्रनाथसेन यांनीं विलायतेंतून स्वतः पाहून नकलून आणलेला संग्रह. याचें पुस्तक मंडळसंग्रहांत ठेविलें आहे.

* सेन–गोवा—A preliminary Report on the Historical Records at Goa, by Dr. S. N. Sen, (1925, Calcutta Uni. Press.)

से. रे. कॅट—Catalogue of the Secretariat Records, Bombay, 1630-1760 (Bby 1887).

* हफ्त अंजुमान—जयसिंगाचीं पत्रें, सर यदु. सरकारांच्या लेखांवरून.

हि (दे) रास सं.—सेंट झेविअर कॉलेजचे विद्वान प्रोफेसर फादर हिरास यांच्या संग्रहांतील अप्रकाशित कागद.

हिस्टॉ-मिसेलनी—*Historical Miscellany*, (1928 Poona), B. I. S. Mandala Sweeya Mala No. 31.

हि. रे. क.—Indian Historical Records Commission, Proceedings of meetings. अनुक्रमांक अहवालाचा आहे.

§ हेग संग्रह—Archives of the East India (*Dutch*) *Company*, letters and papers received from India, year 1661 Colonial archive No. 1123 ). हेगहून आणविलेले मूळ डच उतारे.

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ८ | २ | घोनस्केड | दरौज रुके ८ |
| ९ | २१ | हक मालोजी | हक मारहम मालोजी |
| २० | २१ | सा. ले. १४ | सा. ले. १३ |
| २३ | १२ | तिचा | तिसा |
| २५ | १८ | सु. | हि. |
| ४२ | २३ | फारसी शिलालेख | उल्लेख |
| ५९ | २ | इं. फॅ. मा. २ | इं. फॅ. मा. ३ |
| ,, | २० | वाा | वा |
| ६२ | १४ | वि. पृ. १७५ | विजा. आर्कि. पृ. १७५ |
| ६७ | २० | ९३ | १३ |
| ७० | १६ | ले. | पृ. |
| ८४ | ८ | येथें | थल |
| ९० | १ | १५५३ | १५५८ |
| ९१ | १ | १५५२ | १५५८ |
| १०४ | २२ | पर. | मौजे |

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १०६ | ११ | श. १५६५ | श. १५४६ |
| ,, | १२ | इ. स. १६४३ | इ. १६२४ |
| ११० | २१ | सा. ले. २३९ | सा. ले. २३९ पृ. २४० |
| १२३ | २५ | सुपे खुप | सुपे खुर्द |
| १२४ | ४ | मान | समान |
| ,, | १३ | मार्गशीर्ष | कार्तीक |
| ,, | १४ | नोव्हेंबर ३० | आक्टोबर ३१ |
| १३२ | १९ | (६१६) | (६१६=४८५ अ) |
| १३४ | ५ | पदाजी | दादाजी |
| १५९ | ३ | एप्रील ३ | एप्रील २३ |
| ,, | ३ | फेब्रु. १४ | फेब्रु. २४ |
| १६३ | २५ | मार्च २७ | फेब्र. २७ |
| १७२ | ७ | ले. | ले. ७ |
| ,, | १९ | ई. फॅ. १२ | ई. फॅ. १० |
| १७४ | १२ | कार्तीक शु. ४ | कार्तीक व. १२ |
| ,, | १३ | आक्टो. ९ | नोव्हेंबर १ |
| १७६ | ३३ | पुष्कळ | कांहीं |
| १७९ | ९ | येथें आल्यावर | गलबतें येथें आल्यावर |
| ,, | १३ | राजापुराहून पन्हाळ्याकडे | पन्हाळ्याकडे |
| १८७ | ५ | १५ | १२ |
| १८८ | २८ | खा(शा)मीर | शहामीर |
| १९४ | १५ | थोड्याच दिवसांत | थोड्याच वेळांत. |
| २२७ | ९ | वी ओळ अशी वाचणें— | आटायडे नांवाचा पोर्तु॰ च्या अधिकारी उत्तरेकडे नेमला गेला तेव्हां त्याच्या हातीं दिलेल्या हुकूम— |
| २३४ | ११ | जुलै | जून |
| २५७ | २ | त्यानें | त्यानें उध्वस्त |
| २६७ | १५ | जकाती अशाबद्दल | हा दोन शब्दामध्यें १६ व्या ओळींतील इंग्रजी मज. घेणें. |
| ,, | १६ | coanting | counting |
| २७८ | ३० | मा. | मा. ३ अं. २ |

श्री

# शिवकालीन-पत्र-सार-संग्रह

| | | |
|---|---|---|
| सा. ले. १७७<br>सु. ९६७ रखर २५ | (१)<br>खुर्दखत फा. मु. व मज. | श. १४८८ कार्तीक व. ११<br>इ. १५६६ नोवें. १० |

अजर. महाल हजरती मिया स्याहा बुऱ्हानसाहेब बा सनद मोकरम खास ता हुदेदारानी व मोकदमानी का वोतूर सा जुनर बिदानद

बा केदाच चइतन महानभाव यासि इनाम बा रोखा बाबा बंदे बितेरीख २५ रबिलाखर बिनाम बिरसो पंडित व कृस्णाजी केशव चइतन मानभाव तुला येक चावर इनाम दिला. मठानजीक मसाहती करून बाबा महसुलेसी दुबाला कीजे.

| | | |
|---|---|---|
| सा. ले. १७८<br>सु. ९८० खल १६ | (२)<br>खुर्दखत फा. मु. व मज. | श. १५०१ वैशाख वद्य ३<br>इ. १५७९ मे १३ |

अज महाल खर्च खासा हजरती दिवाण आला

ता महमद मियाजी ठाणदार व हुदेदारानि व मोकदमानि को वोतूर सा जुनर

मालुम दानद नरसिहभट बिन बिस्वनाथभट व केशवभट बिन नरसिहभट वियार्थी केशाव चैतन्य मानभाव यास सा सन सबा ( श. १४९८ ) चालिले आहे तैसे एक चावर जमीन इनाम चालविणे.

| | | |
|---|---|---|
| कों. इ. सा. ले. ८०<br>सु. ९८३ | (३)<br>यादी | श. १५०४<br>इ. १५८२ |

तेरीज बोवल (?) तैनाती (प्रा कुडाळचे देसाई, मतकरी इ. च्या नेमणुकाविषयी.

| | | |
|---|---|---|
| कों. इ. सा.<br>ले. ८१ | (४)<br>यादी | श. १५०६<br>इ. १५८४ (?) |

तर्फ पेडने महाल गांव असामी ३० व त्या गांवांतील लोक आणि देव यांची यादी.

सा. ले. १७९
गु. ९९० सफर १२

(५)
खुर्दखत फा. मु. व मज.

श. १५११ मार्ग. शु. १५
इ. १५८९ डिसें. ११

अजर. जमालखान

बजानेबू हुदेदारानी व मोकदमानी का उतोर सा जुनर

नरसिंहभट बिन विश्वनाथभट आणि केशवभट बिन नरसिंहभट विद्यार्थी केशव चैतन्य मानभाऊ यांची इनाम जमीन चावर १ ता सन तिसा (श. १५१०) यांकडे होती. सन तिसामधें सेख फरीदखान रुस्तुमखानास मुकासा जाला होता. त्याची हुजती घेणे तव लष्कर गैबती नगरासी आलें तव त्याचा मुकासा वरतर्फ होऊन साहेबास मुकासा जाहाला खुर्दखत होये. तरी त्यांची जमीन त्यांजकडे चालविणे. रस्तुमखान याचे खुर्द खताचा उजूर न कीजे.

गो. इ. सा. ले. २५
सु. ९९० रबल १५ हि. ९९८

(६)
फर्मान

श. १५११ पौष व. २
इ. १५९० जाने. १२

फर्मान हुमा०

बजा० खान अजम बहादरखान नायब नौबत व कारकून मामले गोवा

नारायण जोसी यास सरजोईसीची मिरास ७५ होन, दरमहा २ होन मुशाहिरा, गावखंडाच्या वसुलातून १२ होन व जकातीतून १०१ होन देण्याचा रिवाज आहे. तरी ते देत जावे. परवानगी दिलावरखान वजीर (फर्मानाचें भाषांतर)

खं. १५ ले. ३६६
सु. ९९३ रबल ७

(७)
खुर्दखत फा. मु. व मज.

श. १५१४ मार्ग. शु. ९
इ. १५९२ डिसें. २

अजर. फराहादखान— कारकुनानी व देशमुखानी प्रा पुणे

रामेस्वरभट बिन नारायणभट धर्माधिकरणी सो आरवी-मुदगल यास दर मौजे वडगाऊ जमीन पोलीन रुके १२ दोा कुलबाब इनाम आहे. ता खा दस्तुरखा चालिले आहे हली परगणे मजकूर साहेबास मुकासा अर्जानी जाला खुर्दखत होये. तर रामेस्वरभट यास सदरहू इनाम तसरुफाती करून दुमाला कीजे.

चै. व. ७ पृ. ४९
सु. ९९३

(८)
खुर्दखत फा. मु. व मज.

श. १५१४
इ. १५९२

अज दिवाण

बजानेबु कारकुनान परगणे पुना व हुदेदारान व मौजे राजुरी परगणे मजकूर जमीन चावर २ देखील कडवा था अमानत दर बाबत अत जोसी बिन गोविंद

जोसी यांजपाशी ( हुजती ) होती ते गुम जाली तरी जमीन चावर २ सन ता इहिदे तिसैन (श. १५१२) चालत असेली तेणेप्रमाणे चालविणें.

चौ. इ. सा. ८२ }
फ. १००४ }

(९)

कौलनामा

{ श. १५१६
{ इ. १५९५

मलिक अलीशान मलिकत्तरीक उल्‌मुल्कगाझी तळकोंकण
बालंभट हरभट बिन लखंभट मौजे मारसोल पा कुडाळ
देसाई पा मजकूर याचे अर्जाचा विचार करून कुलकर्णगिरीची मिरास त्याला

दिली आहे.

प. सं. पृ. ८८ }
सु. ९९७ }

(१०)

खुर्दखत प्रारंभीं २ फा. मु. व सीमा

{ श. १५१८
{ इ. १५९६

अजर. राजश्री मालोजी राजे

हुदेदारानी व मोकदमानी कसबे पेडीगाऊ

आकोबा गोसावी बिन गोदोबा गोसावी बडवे पुजारी श्रीविठलदेऊ का मा मालुम केले जे 'आपणास हक इनाम बदल सदकोबाची जमीन चावर १८ प्रज बाबाजी चिखलठाणा नामजी चिखलठाणा दो हक ता सन सीत चालिले आहे. सन सीतामधें घणगोऊ (निंबाळकर) याचा पुंडावामधे आपल्या कदीम हुजती गेले आहेती साहेबी इनाम चालवावेया खुर्दखत होये.' चालिले असेली प्रमाणें चालवीजे.

सं. १५ ले. ३६७ }
सु. ९९८ जवल २५ }

(११)

खुर्दखत फा. वा. सीमा

{ श. १५१९ मार्ग व. ११
{ इ. १५९७ डिसें. २४

अज. रा. बाबाजी भोसले

फारसून व मोकदम कसबे पेडगाऊ पा पाडेपडेगाऊ.

दरवज इनाम बदल धर्मादाऊ रामेश्वरभट बिन नारायणभट, चिंतामनीभट बिन बाळंभट सो आरवी मुदगल......जमीन चावर ११ देवील हक दिधले असे.

इ. पु. २४ पृ. ६ }
सं. १६५६ }

(१२)

{ श. १५२१ ज्येष्ठ शु. १२
{ इ. १५९९ मे २७

श्रीमदाशीवम बाबिर (सुभास) दुर्गवाडी अकलकुवा हा गाव इनाम दिला आहे.

प. सं. पृ. ९० } (१३) { श. १५२१ मार्ग. व. ७
सु. १००० जवल २१ } खुर्दखत फा. मु. { इ. १५९९ नोवें. २९

अज. रा. परसोजी राजे—— हुदेदारानी कसबे पेडगाँ

देवस्थाने विठोजी व नरसीह जे असतील तेथील दीपवाते व विठोजीचा भक्त अकोबा गोसावी त्याची अडसेरी चालवीजे व दीपवार्तास तेल दरोज ८८४ (टाक) देत जाईजे.

चै. व. ५ पृ. २३ } (१४) { श. १५२१
सु. १००० } शिलालेख { इ. १५९९

दरजमाने हजरती बुऱ्हन निजमस्या वाट साळवड डावि व नाचणगाउ

सा. ले. ३४० } (१५) { श. १५२२
सु. १००१ } निवाडपत्र व आज्ञापत्र मराठी मु. { इ. १६००

कान्होजी राजे प्रमानवर्लीकर

रा. दामोदर, राघो व पनो पाध्ये गोलवलीकर को संगमेश्वर

तुम्ही आम्हापासी विदित केले, आपले वतन ज्योतीष व धर्माधिरण व देशोपाध्येपण अस्टाधिकार अज मौजे देवघर तर्फ तुजारपूर तहद मौजे देवघर मामले इमजाबाद व मौजे सिरबाव चालिले. यामध्ये का संगमेश्वर येथील ज्योतीष व ग्रामोपाध्येपण सरदेशमुखाचे घर खेरीजकरून जोशी का मजकूर यांचे चालत असे. वे. विस्वनायमट व हरीभट व वासुदेवभट राजपुरोहीत यांनी शृंगारपुरी व तर्फ संगमेश्वर येथें कारकून चाकरमाने यांचेथे आमचे उपाध्यायपणाचे मानाविसी जोरावारीनें कलह आरंभिला आहे.... अशास आपण राजे धर्मपरायेण असता वृत्तीलोप होतो हा धर्म नव्हे. (जमलेले मले, शिष्ट व खोत मंडळींचीं नांवें) यापासी हकीकत मनास आणतां व तुम्हाजवळील सत्येस्वर, वियानगरचे रामराजे याचे ताम्रपटें, कागदपत्र, विजापुरचे फर्मान व आमचे वडील याचीं खुर्दखतें पाहतां वतन तुमचे चालत आलें आहे. देवरखे बोलिले जे आमच्या घरीं आनुष्टान करून अन्यत्र भोजनास जातात; घरीं स्वयंपाक करून भोजन करीत नाहींत; याकरता आम्हीं खेदी. परतु ते प्रमाण नाहीं. वतन गोलवलकर उपाध्ये याचे खरे चालत आले आहे. तरीं वंशपरंपरा उपभोग करुन सुखे असिजे.

खं. २० ले. ६४ } (१६) { श. १५२३ आषाढ शु॥ ९
श. } मान्यता पत्र { इ. १६०१ जून २८

नरसिमट्टास (चिखाव) नरा + + टी लेहून दिले की आमचा बाप एकनाथभटे तुमचा बाप रंगमट यास पसरणीच्या इनामपैकीं बिघे १५ दिल्हे आहे. ते आपणहि दिल्हे.

खं. १५ ले. ४३० } (१७) { श. १५२३ मार्ग. शु॥ १३
श. } महजर { इ. १६०१ नोव्हें. २७

मुद्गलभट पुंडे व समस्त ब्राह्मणीं समापत्र केलें जे ब्रह्मीयाचे उत्पन्न इतकें ब्रहुत्याचे. याउपरी आम्ही ब्रह्मी म्हणिके हे सदरहु सकलहि आपले. याउपरी सभा केली. यांचया माथियावरी देवाचा पाला घालुनू घाऊ नये तैस्या आणा घालुनू पुसिलेया उपरी ते बोलिले जे सकल कर्म ब्रह्मीयाची.

ख. १८ ले. २ अ. } (१८) { श. १५२४ आषा. शु. ३
मु. १००३ मोहर २ } खुर्द खत { इ. १६०२ जून १२

अजर. हैबतखान — कारकुनानि पा। पुणें

बो। ताताजी राम देसकुलकर्णी पा। मार ( यांस ) जमीन एक चावर दरसवाद मौजे परवती दौ। हक दिल्हे आहे.

स. पृ. ९ ले. ४ } (१९) { श. १५२६ ज्येष्ठ शु. १०
सु. १००५ मोहर ८ } खुर्दखत { इ. १६०४ मे. २७

अजर. मलिकशर्के मलिक अंबर

कारकूनानि व मुकालिकानि मोकाशी व मोकदम कौ। ओनूर प्रां। पुणें

( ले. ५ प्रमाणें नरसिंहभट चैतन्य इ. ) यांचा इनाम कौ। मजकुरी चालिला आहे. हली कौ। मार साहेबास अर्जानी आले. खुर्दखत होणे. तरी चालवीजे.

राघं. पृ. ३४ } (२०) { श. १५२६ आषाढ शु. १०
श. } फा. मु. { इ. १६०४ जून २६

मलिक सरीफन मलिक गाजी

हारा देवांचे देउली बैसिलो श्रीमतु तथा ग्रामे मलिले ग्रामपुरम बिता ( झापुर्डे नांवें २० असून खालीं कानडी-मराठी सह्या आहेत ).

स. २० ले. २२५ } (२१) { श. १५२६ श्रावण व. ५
सु. १००५ रबल १९ } खुर्दखत फा. ४ मु. व मज. { इ. १६०४ आगष्ट ५

अज दिवाण पा। पुणें —— मोकदम

मल्हारभट बिन कृष्णभट भगत मौजे मोकाम मोरेस्वर पांन मोरेस्वर येथें जमीन इनाम चावर नीम होती. हाली खुर्दखत येणे तरी पुढां करितां भागीक भोगवटा केले. तरी दुंबाला कीजे.

खं. २० ले. ६५
मु. १००५ रबिवल २७
(२२)
खुर्दखत फा. वा.
श. १५२६ श्रावण व ।२
इ. १६०४ आगष्ट १३

अजर. हेवतखान — आतामलिक नेब गैदार व कारकू. पा वाई

नीम चावर जमीन दर सवाद मौजे मालगाऊ बदल इनाम को अबदुल चरमकोर ( यास ) दिल्हे असे दुंबाला कीजे.

खं. २० ले. २२६
मु. १००५ रवल २९
(२३)
खुर्दखत फा मु.
श. १५२६ श्रावण व. ३०
इ. १६०४ आगष्ट २५

अजर हेवतखान—— कारकुन पा पुणें

इनाम जमीन चावर ।॥। मल्हारभट बिन कृष्णभट यांस पूर्वीपासून आहे ती चालविणें.

सा. ले. २८७
मु. १००६ सफर २९
(२४)
खुर्दखत फा. ८ मु. व सी.
श. १५२७ श्रावण शु. १
इ. १६०५ जुलै ७

अजर. मलिक शर्क मलिक अंबर

कारकून मामले गुलशनाबाद ( नाशीक )

बालंभट बिन महादभट जोशी साकिन को नाशीक. आपणासी को मारीं तेल, सबजी, हरदाके मीट इनाम आहे. कागद गूम जाले. हाली परगणे मजकूर साहेबासी अर्जानी जाले खुर्दखत होय. दिल्हे असे.

स. पू. १० ले. ५
मु. १००६ जखर १०
(२५)
खुर्दखत
श. १५२७ कार्तिक शु. १२
इ. १६०५ आक्टो. १३

अजर. मलिक शर्क मलिक अंबर

कारकून, देशक, हुद्देदार, मोकासी को पेडगाऊ पा पांडेपेडगाऊ.

अंतोबा बिन गोदाबा गोसावी वडवे पुजारी श्रीविठ्ठल को मजकूर यास इनाम चावर १ का मारी वजिरानी चालविले आहे हाली परगणे मार साहेबासी अर्जानी जाले. खुर्दखत होये. चालवीजे

खं. १५ ले. ३६८
मु. १००७ रखर २
(२६)
खुर्दखत फा. मु. सी. व मज.
श. १५२८ श्रावण शु. ४
इ. १६०६ जुलै २८

(?)— कारकून मामले अहमदाबाद व बाजेमहाल संमत जाफराबाद

मालोजी व धिठोजी सरगुन्हो यासी गुन्होयलयास मुकासा दिघले असे. यल बा मजरे गौडगी कसबे महमदापुर.

सं. १५ ले. ३६९ } (२७) } श. १५२८ श्रावण शु. ४
सु. १००७ रबर २ } खुर्दखत फा. शि. मर्यादा } इ. १६०६ जुलै २८

(?)— कारकून दौलताबाद

मालोजी व विठोजी भोसले सरगुन्होयाती यास मौजे कोरले परगणे खांडाले मुकासा दिधले असे.

सं. १५ ले. ३७० } (२८) { श. १५२८ श्रावण शु. ४
सु. १००७ रबर २ } खुर्दखत फा. मु. सी. व मज { इ. १६०६ जुलै २८

(?)— कारकून समत दौलताबाद परगणे कनरड

मालोजी व विठोजी भोसले सरगुन्होयाती यास दरवज मुकासा परगणे कनरड दो किले व मुकासा नफती व जातगौ व वाकडी दिला असे.

सं. १५ ले. ३७१ } (२९) { श. १५२८ श्रावण वद्य २
सु. १००७ रबर १५ } खुर्दखत शि. ८ कोनी { इ. १६०६ आगष्ट १०

मलिकशर्क मलिकअंबर

कारकून महालोमहालीचे

मालोजी व विठोजी भोसले यास पठूर, देन्हाडी, व कनरड हे तीन परगणे दो जातेगाव आणि लासूर आधारखूल, पोरले पिंपळ-वाडी, गोडगौ हीं गांवें बाबा महसुलेसी हवाला कीजे

इ. ऐ. ले. ३६२ } (३०) { श. १५२८ भाद्र. शु. ५
सु. १००७ जयल ४ } खुर्दखत-फा. मुद्रा व सी. { इ. १६०६ आगष्ट २८

अजर. मलिकसर्क मलिकअंबर

कारकुनानी व देशमुखानी व हुदेदारानी व मोकाशाचे मुतालीक पा संगमनेर

शिवदासभट व कालेस्वरभट बिन करणभट सो नेवासे मालुम केले 'आपणास जमीन दोन चावर इनाम आहे. या ह्या चांदबिबी व वजिरानी. मोगलाचे फितरतीमधे कागद गूम जाले. खुर्दखत होये.' चालवीजे.

सं. २० ले २५४ } (३१) { श. १५२८ पौष व. १
सु. १००७ रम १५ } खुर्दखत फा. सी. { इ. १६०७ जाने. ४

अजर. खास

हुदेदार व सोत व मोक० की पुणतांबे पा संगमनेर बादी

बो मानिक जोसी बिन रतन जोसी सा कसबे मार. मालुम केले जे 'आपणासी

कसबे मारचे जकातीपैकी घोनस्केह ६ इनाम मुन्हानस्या व वजीर व मुकासाई यांचे फर्मानाप्रमाणे ता सीत अलफ चालिले आहे. ते (फर्माने) मोगलाचे फितवेयामध्ये गूम जाले. त्यापैकी ममलकत मलिकअंबर मोगवटा आहे.' तरी पूर्वीप्रो इनाम चालवणें.

आठल्ये संग्रह २ } (३२) { श. १५२८ पौष व. ३०
सु. १००७ (?) रम २८ } अस्पष्ट मुद्रा[१] { इ. १६०७ जाने. १७

अज दिवाण ठाणे पा आटपाडी — मोकदमानी मौजे पिंपरी ग्रुद्द पा मजकूर. मौजे मार वरी बाकी रु॥ ३० तीस ते पेसजी वराता दिल्हा होत्या त्यास ते मना करून हाली देसमुख देसपांडे यास देविले आहेती आदा करून पावलेचे कबज घेणे (वे)णेप्रा मजरा आस जाणीजे रा छ २८ रमजान सदरहू छेत्रपती रा १५ व लिगापा होल्या १० व खड ना ३ व हरी राम २ येकूण तीस मना केले आस जाणा (अस्पष्ट सीमा)

त्रै. व. २ पृ. १३१ } (३३) { श. १५२८ माघ शु. १४
सु. १००७ सवाल १२ } हुकूमनामा फा. मुद्रा ५ व मज. { इ. १६०७ जाने. ३१

अज दिवाण खास

कारकून व देसाई, अधिकारी मामले मुर्तजावाद ऊर्फ चेऊल.

कोळी दादर व कोळी चुनाट्ट यानी मालूम केले. 'आपणियासी वेठवेगारी माफ करुनू तीचदल कीरे सीरमारी मस्ला घेत असेती. आणि वेगारींचे तसवीम देताती. याकरितां जरांत्रा [ खराब ] जाला आहे. यावरी फिरंगीयाची फितरती जाली. येणेकरतां जरीत्रा मुसलम खराब जाले. कीरे सीरमारी दिघली न वचे. तरी आपणासी माफ करणे. वेठवेगार चालवीत जाऊ.' यावर हुकूम कीरे सीरमारींचा मत्ता घेत जाणे. 'रहीसाची वानगी आपणावरी नाहीं. रहीस तसवीस देऊन वानगी घेतो घेऊ नेदणे.' 'कोळी आपणामधे झगडा करितात. त्यासी हाजीलनाल माफ करणें.' 'निपुत्रिक व सीनलकी व वन्हाडटका व वोखाटका आपणासी माफ आहे.' यावर हुकूम पूर्वीप्रो चालवणे. 'अष्टागराचे कोळी खुटे दरियामध्ये दारे खात नसती सिरजोरी करून खाताती. आपणासी काही देत नाही आपली खुटे ताकीद करुनू दुमाला करणे. अगर दर खुंटास लारी पाच देववणे.' तरी मागणीप्रमाणें देणें. 'चेउलींचे लोकास इतपटे पानी कौलू आहे. कीं, सी साला उगवणी करणे.' तरी कौलूप्रमाणें चालवणें.

---

१ यास 'मालोजी' असें असल्याचें श्री. आठल्ये म्हणतात.

२ पत्राचें अक्षर शिवकालीन नसून पेशवेकालीन आहे असें वाटतें. सनाचा आंकडा चुकला असावा.

खं. २० ले. २५५ } (३४) { श. १५२८ फाल्गुन वा ८
सु. १००७ जिल्काद २२ } खुर्दखत मु. व मज. सी. { इ. १६०७ मार्च ११

अजर. खास

कारकु० हुदेदार मोकदम वगैरे (ले. ३१ प्रों)

(ले. ३१ प्रमाणें) जे 'आपणियास इनाम जमीन बिघे १५ ता। हजरती बुन्हान निजामशाहा व वजीर चालत आहे. यावरी मजकुरास मोगल आले ते चल्ती (कागद) गूम जाले. नवीन फर्मान पाहिजे.' तरी पूर्वीप्रमाणें चालविणें.

स. पु. १०१ } (३५) { श. १५२८ (?)
(?) } उल्लेख { इ. १६०६

शंकरभारती गोदड धारतव्य शिंगणापूर यांणी स्वामी (शाहम.) सन्निध येऊन निवेदन केले जे 'पूर्वी रा. मालोजी राजे भोसले यांणीं शिंगणापुरीं तळें बांधिले ते समयीं तळ्याचे पाळीसमीप आपल्या वडिलास मठास जागा दिल्ही. आणि प्रतिदिवशी पाव अतीताचा उल्फा सालिना होन पा ५ मोईन करून दिली.'

खं. १५ ले. ३७२ } (३६) { श. १५२९ श्रावण शु. ८
सु. १००८ रखर ७ } खुर्दखत फा. मुद्रा व मर्यादा { इ. १६०७ जुलै २२

अज० मलिकाने मलिक अंबर मुखलिसान

कारकून पांडियापेडगाऊ व हुदेदार (मोकाशाचे) व मोक. कसबे चांभारगोंदे पर० मज०

दामोदरभट बिन नारायणभट (व) रामेश्वरभट बिन नारायणभट ता। आरबी मुद्दल मालूम केले जे, 'आपणासी इनाम जमीन चावर १० देश हक मालोजी व विठोजी भोसले (यांचे हुजतीप्रमाणें) चालिले आहे. साहिबाचे खुर्दखत होय.' तरी पूर्वीप्रमाणें चालविणें.

प. सं. पृ. ९५ } (३७) { श. १५२९ श्रावण शु. ८
सु. १००८ रखर ७ } खुर्दखत फा. मु. ३ व मर्यादा { इ. १६०७ जुलै २२

मलिक सर्फ मलिक अंबर

कारकून सं. जुनेर व मोकाशाचे हुदेदार व मोक. मौजे आर्वी.

दामोदरभट फर्जंद नारायेणभट (व) गोविंदभट व अलंभट बिरादर, मालूम केले; 'आपणासी इनाम धर्मादाऊ जमीन चावर १ दर सवाद मौजे मजार देश हक बरहुकम हुजती खास व वजिरानी व मोकासाई चालू आहे. साहेबाचे खुर्दखत होये.' तरी चालवीजे.

श्रै. व. २ पृ. १५६　　(३८)　　श. १५२९
सु. १००८　　खुर्दखत फा. मु. व मज.　　इ. १६०७

अजर. खास

कारकूनं व देशरा जुन्नर हुदेदार, मोकाद्माचे मुता. व मोक. कौ ओतुर.

कासीमट बिन केशवमट यानी मालूम केले, 'आपणासी जमीन चावर १ वा हुजती सुन्हान निजामस्या व बहादुर निजामस्याहा ता सन सबा अलफ चालिले आहे. हुजती मरहामत होये.' तरी त्याप्रमाणें चालविणे.

ख. १८ ले. ३　　(३९)　　श. १५३० श्रावण शु. २
सु. १००९ रखर १　　महजर　　इ. १६०८ जुलै ५

अग्रवादी तान पाटील बिन अचल पाटील पश्चमवादी जाव पा बिन बाद पा वणपुरी प्रा पुणें. दिव्य करून निवाडा जाला.

खं. २० ले. ५१　　(४०)　　श. १५३० आश्विन शु. ६
सु. १००९ रजब ५　　महजर　　इ. १६०८ आक्टोबर ५

मोक्दमी सावळगांवची कोंडजी कमाजीनें साऊजी अटोले यांस खुपखरेदी दिली.

स. पृ. ११ ले. ६　　(४१)　　श. १५३० कार्तिक व. ११
सु. १००९　　निवाडपत्र-महजर　　इ. १६०८ नोवें. २३

मौजे घाटण तपे करकंब व मौजे मोसर तपे उंबरगाव या गांवांतील सिवेचा तंटा.. ऐरणदिव्य झालें आहे.

खं १५ ले. ३७३　　(४२)　　श. १५३० पौष शु. ७
सु. १००९ सवाल ५　　इनामपत्र मुद्रा व सीमा　　इ. १६०९ जाने. २

लखमोर्जा राजे सो

हुदे० व मोक० मौ बार्डेगौ. पा पांडियापेडगौ.

दामोदरमट व रामेस्वरमट सो आर्वी यास बदल धर्मदाऊ चावर १ इनाम दिधला असे.

स. पृ. १३ ले. ७　　(४३)　　श. १५३०
सु. १००९　　खुर्दखत　　इ. १६०८

अजर० मलिक्मर्क मलिक अंबर ——　　कारकून सर. जुन्नर

मंगो नरसिंह, चिटणीस सर. माार, मालूम केले 'आपली चिटणविसी मिरासी आहे. मोगलाईचे फिरतीकरता परागंदा जालो. सर. मारचे ठाणे साहेबाकडे आले तेपासून चाकरी करीत असो. तैनात आदा होत नाहीं. तरी आदा करणें.' करीत आणें.

इ. वृ. १८३५ } (४४) { श. १५३०
पृ. २७१ } शिलालेख { इ. १६०८

लवथलेश्वर देवालय बांधणीचा उल्लेख-जेजुरी

खं. १५ ले. ४३१ } (४५) { श. १५३१ आषाढ शु. ६
सु. १०१० रजब ४ } खुर्दखत फा. मु. २ व मर्यादा { इ. १६०९ जून २७

अजर. मलिक सर्क मलिक अंबर

कारकून व हुदे. मोकाशाचे व मोक. का चाकण व कडूस

मुरारीभट बिन गंगाधरभट म्हे मालूम केले 'आपणास इनाम कसबे चाकण व कडूस येथील जमीन, जकात, पेंडी वा हुजती वजीर व खान दिलावरखान चालत आहे.' त्याप्रमाणे चालवणें.

सा. ले. ९ } (४६) { श. १५३२ श्रावण व. १३
सु. १०११ जवल २६ } महजर { इ. १६१० आगष्ट ६

अग्रवादी-विसाजी बिन नारोबा मसवडा (जोशी) मोगवली

पश्चिमवादी-नागोजी बिन कोंडभट पटवर्धन मोगवली.

कुलकर्णपणाबदल तटा- अग्रवादीची तकरीर अशी- आपलिया वडिलाची मिरासी (कुलकर्ण) आपण खात होतो. वणगोजी निंबालकर पुढे परगणे मजकूर मोकासा खात होते. त्यावरी नामजादी जालिया ते फितरतीमधे देशख मोकाशी गाव सोडून गेले. आपण गेलो. मागे पटवर्धन कुलकर्ण चालवूं लागला. तरी मौ मारवे कुलकर्ण आपले मिरासी. पश्चमवादीची तकरीर की, कुलकर्ण मिरासी आपली. मसवडा आपलिया वडिलाचा ठेवणाईत. पुढे दिव्य होऊन अग्रवादी खरा निघाला.

सा. ले. ६ } (४७) { श. १५३२ भाद्रपद व. २
सु. १०११ जखर १५ } कौलनामा { इ. १६१० आगष्ट २५

आपाजी मल्हारजी देशख व तुकाईजी देशखीण व मोक. पा शिरवल

विठल कायदेऊ देसकुलकर्णी पा मार

सेत नजीक + + खालील विठोबाची मिरासी आहे. विठोबा कटकास गेला. मागे कीर्दीबदल गोमाजी ढमाल त्याचे हवाला केले होते. आता ते (विठोबा) गांवास आले आहेती. आपणच (आपले सेत) करीन म्हणताती. यावर अर्जी इ. मोकदम लोक म्हणाले, आता पेरणीचा हगाम आला आहे पेरणी करून देणे. सन इसनेचे पीक घेउनु दिवाळीपासून तुमचे सेत तुम्ही करणे. विठोबे कबूल करून निरोप दिल्हा.

खं २० ले. २२४ }
सु. १०११ रम ६ }

(४८)

खुर्दखत फा. मु.

{ श. १५३२ मार्ग. शु. ७
{ इ. १६१० नोव्हें. १२

अजदिवाण पा पुणें—— मोकदम मो मोरगौऊ पा मार

मल्हारीभट बिन कृस्णभट भगत मोरया. 'आपणासी जमीन चावर नीम इनाम आहे. ती चालविणे.' तरी चालविणें.

खं. २० ले. ६६ }
सु. १०११ सवाल १० }

(४९)

हुजती फा. चौ. मु. व मज.

{ श. १५३२ पौष शु. ११
{ इ. १६१० डिसें. १६

अजदिवाण पा वांई—— मोक. व रया मौ येंकद

अकण्णा बिन दामोदरभट जुनारदार सो वांई याम जमीन नीम चावर दो हक दिली आहे. दुवाला कीजे.

खं. १५ ले. ६ }
श. }

(५०)

न. महजर—स्थल प्रतिष्ठान = पैठण

{ श. १५३२ माघ शु. १०
{ इ. १६११ जाने. १४

अग्रवादी — नरसोजी कुमाजी जगदळे देशास तपे मसूर पाटील को मसूर.

पश्चमवादी—वापाजी बिन याकूबजी मुसलमान

तकरीर — आपला आजा बाबाजी व चुलता विटोजी वतनावरी होते. को मसूर येथें पीर जलालुद्दीन आहे. याचा किताब 'मुसलमानांचा पीर आणि हिंदूंचा वीर' तेथें उजवे बाजूस हिंदूंनीं व डावे बाजूस मुसलमानांनीं खैरात करून मिळकत सारखी वाटून घेऊन अतीत अभ्यागत व फकीरफकराना यांस खर्च करावी. ही पद्धत तपाचे मुसलमानानीं मुजावरास बळ देऊन मोडली. त्यावर आजानें ताकीद दिली असता आजा व चुलता यास मुजावरानें मारले. आजीनें आपला बाप कुमाजी माहेरी नेऊन वाढविले. पुढें आपल्या बापानें मुजावरास मारून सूड घेतला. वापाजी मुसलमान याचा बाप याकूब हा रयतीस पेंके लावून गैर-हंगामी वसूल करू लागला. आपल्या बापानें त्यास ताकीद केली. तेव्हां बोलाबोली होऊन कन्हाडीचा नायब यानें आपल्या बापास धरून नेले. आपले घरदार लुटलें. देशकी व पटेलगी अमानत करून तिचे कमाविस याकुबाचे हवाली केली. यावरी पटेलगी हुमाला करून घेतली. बाप मरून गेला. आपण जगद्गुरु पातशापासीं गेलो. त्यानें अंबर-

तकरीर — आपले वडे पूर्वज सावगिरी करीत होते. आपला बाप याकूबजी कर्ज मागे. म्हणून त्यास मसुरहून हाकलून दिलें. व मसूरचे पीर जादे यास कुमाजीनें जिवें मारिले. पुढें त्यास कन्हाडकर अबदुलहुसेन नायब यानें कुमाजीस धरून नेले. जमान देऊन कुमाजी पळून गेला. आपल्या बापानें अफलादीचे खून जाले म्हणून अमानत असलेली पटेलगी सोडविली. आपले देणे रास्तीक व गुनहि रास्तीक आहे. हिंदु अगर मुसलमान

खानाकरवी निवाडा केला कीं, खंडाचे पैसे ४॥ ह० होन न म्हणतां धर्मतः निर्वाह करावा म्हणून हे स्थल मागून देऊन परेलगी सोडवावी. त्यावर हुजूरच्या लोकांनीं आपणा- वरी जुलूम केला. मग कन्हाडास दिव्य होऊन मुसलमान घेतले. खोटा जाला. त्यावरी बापाजी बोलला. आपणास कबूल नाहीं. दूर स्थल द्यावें. म्हणून येथें आलों.

याउपरी धर्माधिकारी यांनीं कागदपत्र पाहून परेलगी जगदळे याची असें सांगितलें. बापाजी बोलला, पीर जलालद्दीन हा पहिलें हिंदु होता त्याचेच आपण होतो. जगदले यानीं मुजावर तिथे कां मारिले. आपला एक खून द्यावा. आणि आपले देणे द्यावे. यावरी धर्माधिकारी बोलले. जगदळे याचे निरपराधी दोन खून केले. **एका एका खुनास आकरा आकरा खून द्यावे. जगदळे तीन(च) खून घेतले.** पुढे कागदपत्र पाहतां जगदळेच खरा. जगदळे यास बापाजीनें कष्टी केले वतनास विक्षेप केला ऐसा तूं गुन्हेगार. **तुज देहान्त प्रायश्चित्त द्यावे. परंतु, मुसलमानाची पातशाही आणि तूंहि मुसलमान याकरिता क्षमा जाली.**

| | | |
|---|---|---|
| जें. व. ६ पृ. ६७<br>सु. १०११ | (५१)<br>महजर फा. सी. | श. १५३२<br>इ. १६१० |

गोपालभट बिन विठलभट पुजारी सप्तशृंगी येथे लखमण रावताजवळून केल्हाईची तकसीम पैकी रुके ६ होन १२० स विकत घेतली. यावर मोपे गुरवांनीं कांहीं पैके देऊन रावतापासून ती गहाण म्हणून लिहून आणले. म्हणून तंटा. पुढें कागद पत्र गोही सदी पाहतां गोपालभट खरा जाहला. त्याचा महजर किले मोरेरी ( मुल्हेरी ) च्या प्रतापशहापाशीं जाला.

| | | |
|---|---|---|
| सा. ले. ९३<br>सु. १०११ न. | (५२)<br>महजर न. | श. १५३२<br>इ. १६१० |

केडगाव व पारगाव पा पुणे यांतील शिवेचा तंटा. कडेगांवकराकडे कोड असलेल जोगी होता. म्हणून कडेगांवकरास दिव्य करूं दिलें नाहीं. पारगांवकरांनीं दिव्य करून ते खोटे जाले. पण पारगांवकरांनीं तो निवाडा मानिला नाहीं. म्हणून किले कोंढाण्याचे हवालदार मीर अजम मीर सैद इसीफ नायब गैबती यांनीं येऊन हदमहदूद घालून निकालाची अमलबजावणी केली.

| | | |
|---|---|---|
| खं. १५ ले. ३७७<br>सु. १०१२ रम २३ | (५३)<br>खुर्दखत फा. मु. | श. १५३३ कार्तिक व. १०<br>इ. १६११ नोव्हेंबर १९ |

अजर. ईमतखान ——— कारकून व देसाई को मालेवाडी

विठोजी भोसले यास पेठ सिंगणापूरची मोकदमी दिली. दुंबाला कीजे

खं. १५ ले. ३७८
सु. १०१२ सवाल २५
(५४)
खुर्दखत फा. मु. दोन
श. १५३३ मार्ग. व. १३
इ. १६११ डिसें. २१

अज दिवाण ———— चौगुले, कुलकर्णी इ. समस्त सिंगणापूरकर

मोकदम पूर्व फदीम + + विठोजी भोसला आहे त्याचा फरजद बरहुकूम फर्मान हुमायून + + दुंबाला कीजे.

ख. १५ ले. ३७५-७६
हि. १०२०
(५५)
खुर्दखत फा. मु.
श. १५३३
इ. १६११

हैबतखान याने विठोजी भोसले यास शिखरशिंगणापूरची मोकदमी दिली. (पत्र फारसी)

खं. १५ ले. ३७९
सु. १०१३ जखर १
(५६)
खुर्दखत फा. मु. व मज. सी.
श. १५३४ श्रावण शु. ३
इ. १६१२ जुलै २०

अजर० मलिक शर्क म. अंबर

कारकुन, दोख पाा संगमनेर व मुजेरी व प्रजा को वावी.

पेदाजी बाउजी बिन + मोकदम होता. तेणें राघोजी टॉवरा यासी मारा करून मारिला; तेरा खून केले व परागंदा जाला. त्यावरी हुजरून गर्दन मारिली. हाली को मारची मोकदमी संभाजी बिन विठोजी भोसले यासी मिरासी करून दिधली असे. चालविणें.

खं. १५ ले. ३८०
सु.१०१३ जखर १५
(५७)
खुर्दखत फा. ३ मु
श. १५३४ श्रावण व. २
इ. १६१२ आगष्ट २

अजर० हैबतखान — आतामलिक नायब गैवत व कारकून पा वाई

मौजे बोरीखल व मौजे किन्हई येथील दीड चावर जमीन गोपीनाथभट बिन रामेस्वरभट जुनारदार यास पूर्वीपासून इनाम आहे. चालवणें

सा. ले. १४
श.
(५८)
श. १५३४ मार्ग. शु. ५
इ. १६१२ नोव्हें. १७

मल्हारजी आपाजी निगडे मोकदम मौजे किकवी पा पुणें

सोमाजी बिन गोमाजी राऊत वस्ती वगजवडी

तुम्हास मौ मारी सेत पाळ म्हणून कुणवाव्याचे मिरास करून दिल्हे कारण, तुम्ही पांढरीच्या कामास आलां आहां.

| | | |
|---|---|---|
| कौं. इ. सा. ले. ८३. पृ. ९६ | (५९) | श. १५३४ इ. १६१२ |

माजी हवालदार मिर्जा यानीं १३७१ होन दिले ते जमा केले. बाकीचा वसूल जाला नाहीं. मुदत २५ वर्षांची केली पाहिजे. बाबाजी देसाई यास किल्यांत बंदोबस्तात ठेवलें आहे.

| | | |
|---|---|---|
| शि. व १ (अं २१३) पृ ३४ सु. १०१४ जखर २० | (६०) खुर्दखत फा. मु. ३ | श. १५३५ श्रावण वद्य ६ इ. १६१३ जुलै २८ |

अजर० हैबतखान कारकून पा पुणा

सेत पाचूद मौजे वेद्रवडे पा मार (येथील) गणो गबाजी तबीब सो वेद्रेवडे यास इनाम वंशपरंपरेनें आहे. तरी ते त्याजकडे व वंशजाकडे चालविणे.

| | | |
|---|---|---|
| सा. ले. ७ सु. १०१४ रम १ | (६१) कौलनामा न. | श. १५३५ कार्तिक शुद्ध २ इ. १६१३ आक्टो. ५ |

अजर० हैबतखान — विठ्ठल कांरदेऊ कुलकर्णी पा शिरूवल

तुझे मिरासीवरी दरीवस्त रुद्राजी दामोधर लंबा उमा राहिला. तुझे व त्याचे वरहक सुनसिफी खातिरेसी आणता व हमशाही महाल पुणे, पा वाई, का सासवड व गुंजण-मावळ (यांच्या) गोंही (पाहता) दवो मजकूर खोटा. तरी तुझे मिरासी तू चाळऊनु सुखे असिजे.

| | | |
|---|---|---|
| खं. १५ ले. ३८५ सु. १०१४ सवाल २० | (६२) उहेरा | श. १५३५ मार्ग. वद्य ६ इ. १६१३ नोव्हें. २३ |

यांत नारायणभट विन दामोदरभट व प्रभाकरभट विन रामेश्वरभट सो आरवी मुद्दल (सांगताव कीं) आपणास इनाम चावर येक दोहक या हुजती विठोजी राजे भोसले अर्वा असर व अरफ छ २० माहे सवालू आहे.

| | | |
|---|---|---|
| सा. ले. २८८ श. | (६३) कबूल कतबा | श. १५३५ माघ वद्य १३ इ. १६१४ जाने. २७ |

सोनभट विन हेम जोसी मुळे मौजे पासुली मामले गुलशनाबाद (नाशिक)

फुलाई श्र. गंगाजी सोनभट जोशी...

तू आपली सून, तुझा भतार निवर्तला; तू कासीयानेहुनु आलियावरी आपणासी अमवस्त्र मागो लागलीस. आपण नेटूव. यावरी ठाणियासी कारकुनी व बहुती नेम केला जे प्रतिवरसी तुज नख्त लुगडियाकारणे प्रताप चवल व गला मण चारा देणें.

सा. ले. २१ }
सु. १०१४ }

(६४)

{ श. १५३५
{ इ. १६१३

रामाजी विठल देशपांडे व गणो रुद्र लंबे पा शिरवल यांचे देशपांड्याच्या वतनाविषयीं तंटा – दरीवस्त हैवतखान धाकुटा याचे कारकीर्दीस लस्कर मोकाम खडकी नजीक दौलताबाद दरसाल सन आरबा असर अलफ यासी लंबे पैदा होऊन उभे राहिले...यावरी पा मजकूर खान मशारनुलेचे बजावर्दे होऊन अमानत होऊन मलिक अजम ममलकत मदारांचे हवालदार काजी हुसेन व कारकून महालासी आले. त्यापासी निवाडा होऊन फर्मान व खुर्दखत घेऊन महालासी विठल कायदेऊ येत होता तव पा मार मुकासा सैद आमजदन मुलकासी सादर जाहला. यावरी पा मार बजावर्दे होऊन हजरती शाहा आलम्पन्हा येदलशाह त्यासी मुलोखाली मुलुख दिल्हा. हजरतीन पा मार मुला महमदासी मुकासा सादर केला. त्याचे कारकून आगानुरा व रायेगऊ माहालासी आले. यावरी लंबे मार मुला साहेबाचे खुर्दखत घेऊन आले. माहाली आगानुरा व रायाराऊ होते त्यापासी देशक वगैरे तमाम बोलावून निवाडा केला. लंबे खोटे केले. यावर विठल काइदेऊ देसकुलकर्ण चालवीत असत त्यास सन १०२२ मधे जिवे मारले. इत्यादि.

प. सं. पृ. ८७ }
सु. १०१५ रजब १५ }

(६५)
खुर्दखत फा. मु. व सी.

{ श. १५३६ श्रावण व. २
{ इ. १६१४ आगष्ट ११

अज माहाल मा साहेब

कारकुन व मोक० कों पेडगौं पा पांडियापेडगौं

गोपाल विठल यासी जमीन चावर नीम ·॥· कों मजकूर पैकी इनाम दिली आहे. तरी ती त्याकडे चालविणें.

प. सं. पृ. १९७ }
सु. १०१५ सावान १० }

(६६)
फा. मु. खुर्दखत

{ श. १५३६ भाद्र. शु.१२
{ इ. १६१४ सप्टें. ५

(?)———— देसाई व देसक मामले तालिये

बालकंपंत वलद नरसींपंत कुलकरनी मामले तलेया (यांनीं) मिकाजी बिन आत्माजी व सिवाजी बिन आत्माजी परभू पालकर यास वतन कुलकरन हो पांचर्से दिल्हे सारे वतन याप्रमाणें खत तिसा समानीन व तिसामया मधे केलें. वगैरे.

खं. २० ले. ६७ }
सु. १०१५ जिल्हेज ४ }

(६७)
खुर्दखत फा. शि. मु.

{ श. १५३६ पौष शुद्ध ६
{ इ. १६१४ डिसें. २६

अजर० हैवतखान——अता मलिक नायब गैबत व कारकून पा वाई

जमीन नीम चावर ·॥· दर सवाद मौजे पसरणी स्थल वाकडेवाडी हरिभट बिन विस्णुभट देऊरकर सकीन पसर्णी यांस पूर्वीपासून इनाम आहे. तरी ती चालविणें.

सा. ले. १४६ } (६८) { श. १५३६ माघ शु. ८
सु. १०१५ मोहर ७ } मान्यतापत्र { इ. १६१५ जाने. २७

महादी लखमदेऊ देसकुल० पा सुपे

माहादावा गोसावी देवाचे पेसवे मौजे मोरगाव

आपला इनाम मौजे सिगापूर पा मा देह येक पैकी जो इनाम आहे तरी तो माहाराजे सुखे आपले सेवक ठेउनु खाणे.

स. पु. १४ ले. ८ } (६९) { श. १५३७ आश्वीन व. ३
सु. १०१६ रम २५ } खुर्दखत { इ. १६१५ सप्टें. २८

अजर० संभाजी राजे मोहिते————कारकु० देशमुख मौ उडतरे पा कराड

कमल नयन गोसावी यासी इनाम जमीन चावर ·। कुलबाब कुलकानू व गला देविले असे. दुमाले करणे.

खं. १५ ले. ६५ } (७०) { श. १५३७ आश्विन वद्य ११
सु. १०१६ रम २५ } खुर्दखत { इ. १६१५ आक्टो. ८

अजर० हिरोजी राजे मोहिते — कारकु० व देशमु० इडमिडे पा कऱ्हाड

कमलनयन गोसावी यासि इनाम जमीन चावर ·। कुलबाब देविले असे. चालविणे.

खं. १५ ले. ६६ } (७१) { श. १५३७ मार्गशीर्ष शु. १
सु. १०१६ सवाल २९ } मिसली मु. न. { इ १६१५ नोवें. ११

अजदि० प्रा कऱ्हाड ———— हुदे० व मोकद० उडतरे

२५ रमजानच्या सनदेप्रमाणे कमळनयन गोसावी यास मौ उडतरे येथील जमीन अवल चावर ·। इनाम देणा हक देविले असे दुंबाला कीजे.

खं. १५ ले. २८१ } (७२) { श.१५३७ फाल्गुन शुद्ध ४
सु. १०१६ श. } समतीपत्र { इ. १६१६ फेब्रु. ११

: दत्तोजी बिन विठोजी भोसले

जानोजी बिन कनकोजी वेवगे मोकदम व चौगुले मौ कवडे पा पुणे

तुमचा बाप कनकोजी चौगुलकी खात होता व मोकदमीबदल रामोजी सिपोरकरासी भांडत होता: की, तू आपल्या वडिलाचा जेवणाईत. तुझी मोकदमी नव्हे. याबद्दल रामोजीनें कनकोजी वगैरेस मारिले. तू धाकटा होतास. तुझी पाठी राखे ऐसा कोणी नव्हता. तेव्हां पाठीराखणाबदल आम्हास आपली चौगुली निमी दो बाब दिधले आहे आम्ही ते खाऊन तुझी पाठी राखणे. (वादातील) मोकदमी आमचे हातास आलियावर तुवा आपुली चौगुलकी समुदी खाणे.

खं २० ले. १७४ } (७३) { श. १५३७
श. } यादी न. { इ. १६१५

हक व लाजिम निजामशाही कारकीर्दीतील फाजी शरा शरीऊ हकीम व धर्माधिकरणी

सा. ले. १० } (७४) { श. १५३८ चैत्र व. ९
सु. १०१६ रवल २३ श. } महजर { इ. १६१६ मार्च ३१

(हैबतखानाचे उपस्थितीत)

रुद्राजी दामोदर व बाबाजी भूपालराऊ लेंढे यांनीं झोंबाई लावून विटल काय-देऊ देसकुलकर्णी पा सिरवळ यांस आशियासह वाईत नेऊन मारा करविले. तेव्हा वाईचे देशमुख वगैरेनीं हैबतखानाकडे अर्दास गुदरली. हक मुनसिबी व गोही खातिरेसी आणता विटल काइदेऊ खरा निघाला.

स. पु. १४ ले. ९ } (७५) { श. १५३८ आश्विन व ३०
सु. १०१७ सवाल २९ } हुजतीपत्र { इ. १६१६ आक्टोबर ३०

अजर० महालदारखान

कारकून व देशमुख मामले जाफराबाद हुदेदार मुतालिक मोकाशी मोकदमान व रयान मौजे धारणगोवीर पा जाफराबाद

बाबा हाजी बुन्हाण मालूम केले कीं, आपण मकेस जाऊन आलो. आपला इनाम चावर १ धारणगोवीर येथें दोा बाबा बदल मशीद चाकरी आहे. आणि निझाडचे पयक जकातीचे कमावीस करतात त्यांस लगर देणें. तसेंच पांढरकरापासून पेठ मजकुरी दरसाल ३ होन सारा घेताती तो जमा देणें. तरी वरीलप्रमाणें चालविणें.

खंड १६ ले. ५ व २ पृ. ११ } (७६) { श. १५३८ मार्ग. शु.१२
सु. १०१७ जिल्हेज ११ } महजर { इ. १६१६ डिसें. १०

बाजी नाईक मरळ देशमूख तर्फ कानदखोरे याचा देशमुखीसंबंधानें हा महजर.

खं. २१ ले. ५५ } (७७) { श. १५३८ मार्ग. व. ११
सु. १०१७ जिल्हेज २५ } वहेख-फर्मान { इ. १६१६ डिसें. २४

हजरत सिलेमानी

आपदेभट विन कृष्णभट मौजे कोणेगाऊ दरसवाद जमीन चावर -॥- इनाम सदका-बदल दिली असे.

नै. व. २ पृ. ५६ } (७८) { श. १५३८
सु. १०१७ } वहेख { इ. १६१६

हैबतखान पा पुणे याणे मोरोबा गोसावी यास हुजती दिधली आहे.

खं. २० ले. २२७ } (७९) { श. १५३९ वैशाख शुद्ध ५
श. } वृत्तिपत्र { इ. १६१७ एप्रील २९

राघोजी राऊतराव (ढमाले) देशमुख पौंड. समस्त अधिकारी व प्रजा को पौंड.

माहादाजी गोसावी मोरगों पा पुणा.

स्वामीस पुरातनपासून चालिले प्रमाणें नक्त रुके दर गावास २४ व भात मण ८।॰ प्रतिवर्षी चालले आहे. ते आपल्या माणसाकरवी घेऊन जाणें.

खं. १६ ले. ६ } (८०) { श. १५३९ कार्तिक वद्य ८
सु. १०१८ जिल्काद २१ } कौलनामा { इ. १६१७ नोव्हें. १०

अज दि० मामले सं. तळकोकण बाजी याकुद

कानोजी झुंझारराऊ (मरळ) अधिकारी तपे कानदखोरे मामले रायरी

खलोजी मरळ यांनें सांगितल्यावरून तू समज की तू बेसक येईजे. तुमची दौलतखोई व सर्फराजी होईल. पेसजी कारकीर्दे येदिलसाही जो गुन्हा केला असेल तो माफ असे.

खं. १५ ले. ३८३ } (८१) { श. १५३९ माघ वद्य १०
सु. १०१८ सफर २४ } खुर्दखत फा.मु. व सी. { इ. १६१८ फेब्रु. १०

अजर. आगी अजम आगी सुमरास

हुदेदार व मोकदम, देऊळगाव पा पुणे

दामोदरभट व रामेस्वरभट बिन नारायणभट सो आरवी यांनी मालुम केलें की 'आपणास सेत कदीम खासा मिरासी दोरी ११ आहे. हैवतखानानें चालविले होते. हल्ली साहेबास मुकासा अर्जानी जाला. तरी चालविजे.' चालविणे.

खं. १५ ले. ३८४ } (८२) { श. १५३९ फाल्गुन शु. ४
सु. १०१८ रबल ३ } खुर्दखत फा. मु. व सी. { इ. १६१८ फेब्रु. १८

अजर. सर्जाराऊ राजे

हुदेदार व मोकदम मौजे वडिगाव का पारस पा पुणें

रामेस्वरभट बिन नारायणभट सा आर्वीमुद्दल मालुम केले जे 'आपणास इनाम जमीन चावर रुके ॥॰ दर सवाद मौजे वडिगो ना येडिगो आहे. हाली साहेबास मुकासा अर्जानी जाला आहे. खुर्दखत सरंजाम होये' तरी चालविणे.

सं. २० ले. २१७ }  (८३)  { श. १५३९
सु. १०१७ श. }  उल्लेख  { इ. १६१७

(महजर) रखमाजी पंताची कारकीर्द. पंढरपूरचा मोकदम

सं. व. २ पृ. ५७,५८ }  (८४)  { श. १५३९
सु. १०१८ }  उल्लेख  { इ. १६१७

मोरोबा गोसावी याचे इनाम चालविण्याबद्दल याकुददखान याची हुजती.

स. पृ. १५ ले. १० }  (८५)  { श. १५३९
सु. १०१८ }  खुर्दखत  { इ. १६१७

अजर. खास ———  कारकून व देशमूख पुणें

काजी मुंतजीब बिन काजी फतहूला व काजी महमद बिन काजी हुसेन यानी मालुम केले जे 'पूर्वी हरयेक परगणा एकेक काजी; सुलतान फेरोजशहा बहामनी यानें दोनदोन केले. त्या ता आपले वडिलास काजीपणा दिला. कुलात जो कोणी विद्यावंत त्यासच काजीची मिरासी लाभे. ऐमियास इस्माइल बिन दुलबावन यास नवे काजीपणा दिघला असे. त्याला फर्मान देणे. या काजीजवळचे फर्मान फिरंगोजीचे फितरातीमधी गहाळ जाले आहेत.' देणें.

त्रै. व. २ पृ. ५८ ले. २ }  (८६)  { श. १५३९
सु. १०१८ }  उल्लेख  { इ. १६१७

याकुदखान———  मोरोबा गोसावी

कुमारवळण पा सुपे येथील जमीन चावर १ इनाम हक वगैरेसह दिलें आहे.

सा. ले. १४ पृ. २४ }  (८७)  { श. १५४० ज्येष्ठ वा १२
सु. १०१९ जखर २५ }  पोटपत्र  { इ. १६१८ जून ९

अजर. म. मलीक अंबर

कारकून देशक व मोकदम व रया पा शिरवळ

विठल काइदेऊ देसकुलकर्णी व लंबे देसकुलकर्णीयाबद्दल भांडत हुजूर आले. हुजरून खुर्दखते ४ पाठविले होते. पैकी पा पुणें, सासवड सुपे यांजकडून खडी आलिया की, विठल काइदेऊ पिढीया तीन देसकुलकर्ण करतो. लंबे यानें कधीं केलें नाहीं. व खेडेबाराचा महजर की, विठल काइदेऊ तीन पिढीया खातो परि मिरासी लंब्याची होये. लंबे दूरी केले.

| | | |
|---|---|---|
| खं १६ ले. ७<br>सु. १०१९ रजब २२ | (८८)<br>कौलनामा ता. | श. १५४० आषाढ व. ८<br>इ. १६१८ जुलै ५ |

अजर. रा. पतंगराऊ

कान्होजी झुंझारराऊ देशख तपे कानदखोरे मामले राइरी

तुम्ही मालुम केले जे 'खान दैवतखान आदिलशाही तेंही तर्फ मजकूर घाला घालून लुटिले व काबीज केले. मग कौल देऊन वसाहाती करूं लागले. त्यावरी साल्गुा हजरती साहेबास ते तरफ मुकासा अर्जानी जाला. हजरती साहेबी अवघी खोरी आगा वाजी याकुत हवालदार समत तळकोकण याचे हवाला केली. त्यानें आपलें खुर्दखत लेहोन दिधलें. यावरी सर्वेच साहेबांची काचजाती आली. कारकुनासी खुर्दखत व सेरीकरास कौल मन्हामत केला पाहिजे. ए तरफेस इनामती म्हणोनु म्हणतात. आपले देसाकडे इनामती व इसावती म्हणौनु म्हणताती. सदरहू खाऊनु लाठी बल घेउनु तपां तमाम मामूर करणे.

| | | |
|---|---|---|
| खं. १६ ले. ८<br>सु. १०१९ सवाल ५ | (८९)<br>ताकीदपत्र | श. १५४० आश्विन शु. ६<br>इ. १६१८ सप्टेंबर १५ |

अजर. रा. पतंगराऊ

कृष्णाजी गोविंद हवालदार व कारकून तपे कानदखोरे मामले रायरी.

झुंझारराऊ देशख यांनी अर्दास पाठविली की आपले इनामतीबद्दल सिरणी टके १७०० साहेबास कबूल जाले सालमजारी तपेची इजारत आहे. दोहींची उगवणी करतो. कारकून आपले इनामतीची कसावसि करून घेताती. आपणास कांहीं देत नाहीं. तरी आपण काय खावे. आपण अर्ज करतो तो मनास आणीत नाहीत. हुर्मती राखत नाहींत. तरी सर्व बरोबर करावे. सालगुापैकी ६६०॥८॥ जमा नाहींत, हा कैसा अमल आहे ते लिहिणें.

| | | |
|---|---|---|
| ऐ. २ पु. ५८ ले. २<br>सु. १०१९ सवाल २० | (९०)<br>उल्लेख | श. १५४० आश्विन व. ७<br>इ. १६१८ सप्टें. ३० |

मलिक अंबर याचा एकंदर इनामदारांना रोखा की मोरोंग गोमाजी यांची इनामती त्यांचे दुमाला करणें.

| | | |
|---|---|---|
| खं. १५ ले. १८५<br>सु. १०१९ सवाल २० | (९१)<br>उल्लेख | श. १५४० आश्विन व॥ ७<br>इ. १६१८ सप्टेंबर ३० |

मलिक अंबरचा एकंदर इनामदारास रोखा की ज्यांचीं त्यांचीं इनामें चालविणें (हा उल्लेख बऱ्याच पत्रांतून आहे.)

खं. १५ ले. ४०० }
मु. १०१९ सफर २७ } (९२) खुर्दखत फा. २ मुद्रा प. { श. १५४० आश्विन व. १४
{ इ. १६१८ आक्टोबर. ७

अज दिवाण रखखाना खास

कारकून देशख पा पांडियापेडिगी व मोकाशी व मोकाशाचे हुदेदार व मोकदम मौजे जलालपुर

दामोदरभट व रामेस्वरभट सा आर्वी मुद्रल मालुम केले की 'आपणासी इनाम जमीन चावर १ दर मौजे जलालपूर दो हक बा हुजती मालोजी व विठोजी भोसले असर अलफ (श. १५३१) आहे. दरी बाब रोखा मलिक अंबर आहे. फर्मान होये. तरी चालविणें.

खं. १५ ले. ४०१ }
मु. १०१९ सफर २७ हि. } (९३) खुर्दखत फा. ४ मुद्रा. { श. १५४० आश्विन व.१४
{ इ. १६१८ आक्टो. ७

अज दिवाण र. खास

कारकून दोख परगणे पुणें व मोकाशी आणि त्याचे हुद्देदार व मोकदम मौजे वडिगौ, कर्याती पाटस

रामेस्वरभट मौ आर्वीमुद्रल मालूम केले जे आपणासी इनाम जमीन रुके १२ दर मौजे वडिगाऊ बा हुजती ईवतखान हदिदे असर अलफ (श. १५३२) आहे. रोखा मलिक अं. याचा तिसा असर अलफ (श. १५४०) २० सवालचा आहे. फर्मान होये. चालविजे.

खं. १५ ले. ४०२ }
मु. १०१९ सफर २७ हि. } (९४) खुर्दखत फा. ४ मुद्रा. { श. १५४० आश्वीन व. १४
{ इ. १६१८ आक्टो. ७

अजदिवाण र. खास

कारकून देशमूख पा पुणे व मोकाशी, मोकाशाचे हुदेदार व मोक. मौजे देउळगौ कर्याती पाटस

दामोदरभट व रामेस्वरभट मालूम केले जे आपणियासी इनाम जमीन खुद खासा दोरी सवा, दर मौजे देउळगाऊ बा हुजती ईवतखान सलास अलफ आहे रोखा मलिक अं. आहे. फर्मान होये. रुके ७ देवविले. चालवीजे.

ख. १५ ले. ३८५ }
मु. १०१९ जिल्काद १७ } (९५) फर्मान फा. मु. व सी. { श. १५४० कार्तिक व. ३
{ इ. १६१८ आक्टो. २६

अज दिवाण र. खास

कारकून व दोख सरकार दौलताबाद व मोकाशी व हुदे. व मोक. मौजे चांभारवाडी पा येळूर

नारायणभट बिन दामोदरभट व प्रभाकरभट बिन रामेस्वरभट सा। आर्वीमुद्गल मालुम केले 'आपणास इनाम जमीन चावर यक मौजे चांभारवाडी येथें बा। हुजती **विठोजी राजे भोसले** ( छ २० सवाल अबा असर अलफ १५३५ श. ) अहि-चालविली पाहिजे.' चालवणें.

खं. २० लें. २२८ } (९६) { श. १५४० कार्तीक व. १०
सु. १०१९ जिल्काद २३ } खुर्दखत फा. मज. मुद्रा ४ { इ. १६१८ नोवें. १

'अज. दिवाण र. खास

कारकून देशव पा। पुणें मोकाशी, मोकाशाचे हुदे. व मोक. मौजे मोरगौऊ

गणेशभट बिन मल्हारीभट भगवते मालुम केले. 'आपला वालीद भगत मोरया यासी इनाम जमीन चावर नीम दर मौजे मोरेस्वर आहे. हुजती **खान हैबतखान** खमस अलफची फर्मान करून देणे म्हणून रोखा म. म. **अंबर तिचा** असर ११ जिल्काद (१५४० कार्तिक शु. १२ता. २०।१०।१६१८) चा रोखा आहे.' तरी चालविजे.

खं. १५ लें. ३८६ } (९७) { श. १५४० मार्ग शु. १०
श. } मान्यतापत्र { इ. १६१८ नोव्हें. १७

मोक. बलुते. समस्त-मौ आरवी —— रामेस्वरभट गोसावी

देवाचिया फुटहाडाकारणे तुमचिया घरामागे नजीक गावकुंप जमीन खडसर, पडी बिघे २० ही मोंये श्रीमुद्गलार्पण दिधले. ह्या जमिनीचा महसूल अथवा नक्त बाब ता। ठाणे व ता। दहाये काही येत नाही. सुखे कांदी करवेल ते करनु सुखे घेणे.

सा. ले. ११ } (९८) { श. १५४० मार्ग. व. ३
सु. १०१९ जिल्हेज १६ } महजर { इ. १६१८ नोव्हें. २४

अग्रवादी—नागोजी बिन कोंडभट पटवर्धन जोशीकुलकर्णी, मोगवली.

पश्चमवादी— रामाजी विस्वनाथ म्हसवडा- जोसी कुल. मोगवली.

(कांहीं हकीकत सांगितल्यानंतर)

अग्रवादी म्हणतो— आपला आजा दादोबा पटवर्धन याचे कुलकर्ण मिरासी याने रामाजी विस्वनाथ याचा आजा कुलकर्ण चालवावया ठेविला होता.

पश्चमवादी म्हणतो— कुलकर्ण आपल्या आजियाची मिरासी. आपला आजा दादोबा याचा ठेवणाईत नव्हे.

नंतर दिव्य होऊन अग्रवादी खरा ठरला.

सा. ले. ३३६ } (९९) { श. १५४० मार्ग. व. ४
सु. १०१९ जिल्हेज १७ } फा. सी. { इ. १६१८ नोवें. २५

अजर. मलिकसर्के म. अंबर —— कारकून तर्फ रोहिडा

कान्होजी ना। जेधे यानी मालूम केले जे, मौजे कारी हा गाऊ आम्हाकडे वेशजी-

पासून चालत आहे. आमचे तर्फेचे इसम लोक यानी आमच्या वडिलाचे व आमचे उपयोगी पडून तपे मारीची दोखी मिळवूनु दिल्ही. यावदल इसम लोकांसी श्रीराईश्वर देवाजवळ क्रिया हिंदूधर्माची होउनु तपे माराची देशमुखीपैकी निमे हक तुम्हास देऊं असा करार जाला. निमे वतन घावे तरी वतनाचा बखेडा होतो. म्हणोन सारे लोकास जमा करोन त्यांची समजूत काढली कीं, सारे लोकास कारी हा गाव आमचे इसाफतीचा देतो. ते वेळीं अम्ही ठराविले जे आम्ही येक घर बाधुनु मौ मारी राहू. कारण, आमचे जिऊ इसम लोकानी पेसर्जा वाचविले तसे पुढेहि वाचिले पाहिजेत. आमची चाकरी इसम लोकानी सिरस्तेप्रमाणे तरवारेची करुनू अम्हास संबाळावे. आम्ही सेते करणार नाहीं. करू तरी सेफत असे. जदीद असामदार कायम करणे वा बेहडा कायम .राखणे ही मालकी इसमांची. आम्हाकडे मालकी चाकरी घेण्याची. याप्रमाणे व अमचे देसमुखीचा हकलाजिमा यकंदर यक कारी मारचा इसाफती अमलासहा दिल्हा. नरस प्रभु फरजंद दाद प्रभु देस व गांव कुलकर्णी यास आमचे वडिलासी व आम्हीं बल्लालजी प्रभु हे लढाईचे प्रसंगात ठार जाले ते वेळचे देणे ५॥ टके ते द्यावे. याप्रमाणे अमचे तर्फेनी दरोबस्त सदरहू गाऊ इसम लोकाकडे आहे.

खं. १८ ले. ४
श. मु.
(१००)
महजर
श. १५४० मार्ग. व. १२
इ. १६१८ डिसें. ३

कसबे सुपे आणि मौजे वढाणे पा पुणें ह्या दोहो गांवांस सिवेचा करकसा होता. दोही गांवचे लोक जमले. सुपेकरीं श. १४४६ मधील महजर दाखविला. पण तो रुजू न पडे. कारण, जे वरुनी दिवे होते ते वरुनी हरदो महालीचे कारकून, देशमुख, देशक, जवार, व कोनकुटे मेळऊन दिवाण होते, तेथें महजर. त्यांचीं नांवें निशाणें करितातीं. ए कागदी तैसा अमल नाहीं. पुढें उभय गांवचे मोकदम गोत, सांगतील ती सीव मानून त्यांनीं तंटा निटविला.

सा. ले. ३३७
सु. १०१९ मोहर १
(१०१)
खुर्दखत सी.
श. १५४० पौष शु. २
इ. १६१८ डिसें. १९

ले. ९९ प्रमाणें मजकूर असून शिवाय इसम लोकांची जमीन वाटणी आहे.

खं. १५ ले. ३८७
सु. १०१९ मोहर ८
(१०२)
खुर्दखत मु. सी.
श. १५४० पौष शु. १०
इ. १६१८ डिसें. १६

अजर. राा कृष्णाजीराजे —— हुदेदार व मोकदम मौजे वडिगो पा पुणे

रामेश्वरभट सा आर्वीमुद्गल मालुम केले की, आपणास इनाम जमीन बाहतिशाम चावर टके ·|·१२ दो हक बा मोगवटे वजिरानी चालिले आहे. हाली मौ मार साहेबास मुकासा अर्जानी जाला असे. खुर्दखत होये. तरी चालविणे.

ऐ. व. २ पृ. ५६ } (१०३) { श. १५४० फाल्गुन शु. ८
सु. १०१९ रवल ६ } फर्मान फा. २ मु. व सी. { इ. १६१९ फेब्रु. ११

अज दिवाण खास

कारकून व देशक पा पुणे मोकाशी व मोकाशाचे हुद्देदार व मोकदम मौजे चिंचोली पा पुणें

मोरोबा सुनारदार मालूम केले की, आपणासी इनाम बदल खिजमती देवस्थान मोरदेऊ जमीन चावर १ व नख्त दरोज रुके बारा मौजे चिंचोली येथें दो हक **या हुजती हैवतखान** सवा अशर अलफ आहे व तिसा अशर अलफचा २० सवालचा मलिक अंबरचा रोखा आहे. तरी फर्मान देणें. दिलें.

सा. ले. २४९ } (१०४) { श. १५४० फाल्गुन शु. ९
सु. १०१९ रवल ७ } खुर्दखत { इ. १६१९ फेब्रु. १२

अजर. मलिक अंबर — कारकून तर्फे रोहिडा

कान्होजी जेधे याणे मालूम केले की जे पोसजी फर्जंद **आर्जोजी कोढाळकर हा आमचे उपयोगी फार लढाईचे प्रसंगी आला** सबब पोसजीकडे इनाम दो हक चालत आले तसे चालविणें. तरी चालवीजे.

सं. २० ले. ६ } (१०५) { श. १५४१ वैशाख शु. ३
सु. १०२९ (१०१९) रम. १ } फा. मु. व सी. { इ. १६१९ एप्रिल ७

अजर. म. श. म. अंबर —— कारकून व देशक पा सुपे.

शरफ अली हेजीब याकुतखान मालूम केले महादो लखमदेऊ देसकुलकर्णी पा सुपे याच्या बढियानें (बापानें ?) थोरेदी ठेविला होता. त्यानें सल्लासिरी करून यासी इकलाजिमा नेदी. मग बाप यानें दस्तुरखानास मालूम करून थोरेदी यास सजा देऊन बाहेर घालविला. हाली थोरेदीचा फरजंद कोतोबा खानाचे मंदगीस उभा राहिला. पुनरापी करिता कोतोबा खोटा जाला दस्तुरखानाचें खुर्दखत पाहून महजर करून देण्याची आज्ञा केली.

इं. फॅ. भा. १ } (१०६) { १५४१ वैशाख
पृ. ८९ इ. } { १६१९ एप्रिल

बैरामखानाचा मुलगा–दक्षिण्यावर मोहीम करणाऱ्या मोंगली सैन्याचा मुख्य सेनापती.– बऱ्हाणपूरचे आसपास होता ?

मे. व. २ पृ. ५८
सु. १०२० जऊर १
(१०७)
हुजतीपत्र-उल्लेख
श. १५४१ ज्येष्ठ शु. ३
इ. १६१९ मे ६

मोरोबा गोसावी मालुम केले जे आपणियासी इनाम जमीन चावर १ का सुपे बा हुजती याउदखान चालू आहे.

खं. १५ ले. ४३२
श.
(१०८)
कबूल कतबा न.
श. १५४१ ज्येष्ठ वद्य ५.
इ. १६१९ मे २३

बरवाई बिन विठ पाठक सो कल्हेट
मुरारीभट मुल्ले सा चाकण.
बापाची वृत्ती जोर्शापण कल्हेट येथील अष्टाधिकारपूर्वक राक्षस संवच्छरीं ( श. १५३७ ) दिधली. कागद आतां लेहून दिधला. ठेकरीं खाणें.

खं. १५ ले. ३३०
सु. १०२० रजब १
(१०९)
फा. मु. व सी.
श. १५४१ आषाढ शु. ३
इ. १६१९ जून ४

अज दिवाण ठाणे तपे रोहिडा
दोख व मोक. सेटे महा. व रया व बाजे खुम व बलुते तपे मोर.
तर्फ मार गावगना नवी लावणी जाल्यास शाहामागे घ्यावयाचा हक.

सा. ले. १३
सु. १०२० रम ९
(११०)
उल्लेख
श. १५४१ श्रावण शु. १०
इ. १६१९ आगस्ट १०

अजर. म. अजम अमजदल मुल्क ( ममलकत मदारी ).
कार० दोख सेटे. मोक. वगैरे पा शिरवल
विठल काइदेऊ देसकुलकर्णी उभा राहिला जे, 'आपले देशांपण पा मारीचे मिरासी आहे. हाली दुसरा करतो. आपणास देववणें.' दिलें.

मे. व. २ पृ. ५८
सु. १०२० रम १०
(१११)
उल्लेख
श. १५४१ श्रावण शु॥ १२
इ. १६१९ आगष्ट ११

मोरोबा गोसावी यांचे को सुपे इनाम चालविण्याबद्दल मलिक अंबर याचा रोखा.

मे. व. २ पृ. ५७ ले. २
सु. १०२० जिल्काद ७ हि.
(११२)
फा. मु. सी. व मज.
श. १५४१ आश्विन शु॥ ८
इ. १६१९ आक्टो. ६

अज दिवान र. खास.
कारकून देनमूव पा. सुपे व मुकासेदार, व त्याचे हुदेदार व मोकदम मौ कुंभारवळण पा मजकूर.

मोरोबा गोसावी यास कुंमारवळणची जमीन १ चावर इकासइ इनाम आहे ती चालविणें. याकुदखान व मलिक अंबर यांचीहि हुजती व रोखा (श. १५३९ व १५४०) आहे. तरी चालविणें. ( हा ले. दुबार झाला )

मे. व. २ पृ. ५७ } (११३) { श. १५४१ आश्विन शु॥ ९.
सु. १०२० जिलकाद ७ } फा. मु. व सीसा { इ. १६१९ आक्टो. ७

अजार. खास ( इब्राहिम इब्न अफजलखान फा. मुद्रा )

कारकून व देशमुख पा। सुपे मोकाशी व त्याचे हुदे. व मोक. मौ कुंमारवळण पा मार.

मोरोबा गोसावी यास कुंमारवळण येथील जमीन चावर १ या हुजती याकुदखान सु. १०१८ ( श. १५३९ ) व रोखा म. अंबर (सु. १०१९ सवाल २०) दिधली आहे. चालविणें.

इ. वृ. ३४ पृ. ५ } (११४) { श. १५४१ कार्तीक व॥ १०
सं. १६७६ } मु. { इ. १६१९ नोव्हें. २०

जसवंताचे वडील व चिरंजीव विष्णुदास यांच्या नांवची पुणे गाव दिल्याची सनद.

खं. १६ ले. ९ } (११५) { श. १५४२ श्रावण शु. १
१०२१ रम ७ } खुर्दखत { इ. १६२० जुलै २७

(१) —— विठल गणपती हवाले ता कानदखोरे

ता मज॰ चे देशमुखानें सांगितल्यावरून आज्ञा करितों कीं, तर्फ मज. देशमुखाचा हलकाजिमा व इसाफती देशमुखाचे दुंबाला केलें असे. देणें.

खं. १५ ले. ४३३ } (११६) { श. १५४२ माघ. शु.११
श. } सलोखा पत्र { स. १६२० आगष्ट २८

वासुदेवभट बद्दे —— मुरारीभट बद्दे सो चाकण

आपणामध्यें पुस्तकांचा कलहो होता तो निवडला. अर्थाअर्थी संबंध नाही.

खं. १५ ले. ७ } (११७) { श. १५४२ भाद्र. व.१
सु. १०२१ सवाल १४ } कौलनामा फा. सी. { इ. १६२० सप्टें. २

अज. दि. तपे मसूर —— नरसोजी जगदाळे दोस व पटेल कसबे मज.

बाराजी मुसलमान हिमातीच्या बळें क. मसूरच्या पटेलगीस दखल झाला. यावर पुरा हक अदालतीचे गोहीसाक्षीनसी बापाजी दूर केला. तपे मज. देशमुख व क. मज. पटेलगी जगदळे याची त्याचे दुमाला केली असे पा जैदी महालदार.( प्रारंभीं जगदळे याचा शिक्का ?)

वै. व. २ पृ. १६१ }　　(११८)　　{ १५४२ कार्तिक शु. १
सु. १०२१ जिल्काद २९ ? }　　फर्मान फा. मु. व सी.　　{ १६२० आक्टो. १६

अज दि. र. खास ——　　　　कारकून व मोका. का उंबरे

मुला मजन विन मुला समन माहूम केले -'आपणास इनाम जमीन चावर १ बदल खिजमती मसीद का मंगरूर येथील सा लेहा होती ते सीत कसंबे उंबरे या खाली गेलें. वाजे मशिदीचे खिजमतीस रोजगार नाही भोगवटी व तसरुफाती उठली. तरी चावर एक व गेजमुरा दरोज सा देवविणे.) वा रोसा छ २८ जिलकादी पा अफजलखां

सा. ले. १०७ }　　(११९)　　{ श. १५४२ मार्ग. शुद्ध ६
सु. १०२१ जवल. ४ हि. }　　फर्मान व फा. मु. न.　　{ इ. १६२० नोव्हें. २०

अज दिवाण र. खास

कारकून देशमुख पा. पुणें, मोकाशी, मोकाशांचे हुदे. मोकदम वाजे कर्याती पा पुणें.

हुजती मलजी }
हुजती रणनवरा } श. १५३९;
हुजती जाधराऊ }
हुजती मुधुजी नाईक { श. १५४०
रोखा मलिक अंबर { श. १५४२ .

या ५ पत्रांप्रमाणें रामकृष्ण भट व विष्णुभट विन महादभट ठकार गोसावी यांस लेखांतील घेरपडी सुमेत, रोटी, नानगाव या गावांची जमीन इनाम दिली आहे. त्यांजकडे चालविणें.

इं. फॅ. भा. १ पृ. २१० }　　(१२०)　　{ श. १५४२ मार्ग. शु. ११
इ. }　　कन्सल्टेशन–सुरत　　{ इ. १६२० नोव्हें. २५

आमचाहून लमाणाचीं पत्रें आली. लमाण बऱ्हाणपुराहून येणार. परंतु बऱ्हाणपूरला दक्षिण्यांचा वेढा पडला असून आसपासचा मुलूख त्यांचे ताब्यांत आहे. लाहोरहून बादशाही सैन्य दक्षिण्यांचे पारिपत्याकरितां निघालें आहे. तेव्हां लमाणाला मांडूला थांबण्यास सांगावें. आवासच्या डोंगरांतून येऊं नये. कारण तेथेंहि एकदा काफिला लुटला गेला आहे.

इं. फॅ. भा. १ पृ. २१० }　　(१२१)　　{ श. १५४२ मार्ग. शुद्ध १५
इ. }　　सुरत–सभा　　{ इ. १६२० नोव्हें. २९

दक्षिण्यांबद्दल इंग्रजांचें प्रतिकूल मत. खानखानान हा मलिक अंबराविरुद्ध मोंगली सेनापती

आपल्या कंपनीचा माल दक्षिण्यांचे तळावरून नेणें अधिक सुरक्षित. कारण तेथील राजा समर्थ असून भरपाई करण्याबद्दल त्याला माग पाडतां येईल. कारण चौलपासून त्याचीं स्वतःचीं एकदोन गलवतें तरी व्यापारानिमित्त निघत असतात ... बऱ्हाणपूरला वेढा घालणाऱ्या दक्षिणी सेनापतीचा परवाना घ्यावा. परंतु तसें करतांना मोंगलांपासून धोका उद्भवूं नये म्हणून खानखानानलाहि कळवावें.

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ. मा १ पृ. २१० <br> इ. | (१२२) <br> सुरत—कन्सल्टेशन | श. १५४२ पौष वद्य ६ <br> इ. १६२१ जाने. ३ |

बऱ्हाणपुराहून हेनेसचें पत्र – मलिक अंबरच्या परवान्याशिवाय लमाण जाऊं शकत नाहीं. जमत नसेल. आवासच्या देशातून जाण्याकरितां परवाना मिळवावा.

| | | |
|---|---|---|
| सा. ले. १३ <br> सु. १०२१ जवल ११ | (१२३) <br> महजर | श. १५४२ माघ शु॥ १३ <br> इ. स. १६२१ जाने. २५ |

अग्रवादी– विठल काईदेऊ देसकु. परग. शिरवळ देसकु. आपली मिरासी. लवे बंद हैबतखान याचे फर्जंद हैबतखान याचे कारकीर्दीस श. १५३५ पासून पैदा होऊनु कुसूर व हरकती करिताती. हाली परगणे मज. साहेबास अर्जीनें जाला आहे. लवा यास बोलाऊन फर्माविलें पाहिजे. आपली मिरासी. रवा करीन.

पश्चमवादी–रुद्राजी दादो व दादाजी भूपालराऊ व रगोजी भूपालराऊ लवे. गणो रुद्र यानें सांगितलें कीं, पर. मज. देसकु. आपली मिरासी. आपले वडिली विठल काईदेऊ याचा आजा उखोबा ठेविला होता. त्यावरी आपले वडील व्यापार करावयासी गेले. ते तागाईत आपले कुलकर्ण विठल काइदेऊ कुलकर्णी खातो.

सिरवळ, वाई, सासवड, पुणा, गुजण मावळ या महालीचे देसमुख देसक वगैरे मडळींनीं गोहीं दिधली कीं, विठल काइदेऊ कदीम मिरासी लवे गैरमिरासी. तेव्हां महजर, कौल, लुगडीं यांप्रमाणें देऊन माहाली कुळकर्ण चालवूं लागलों. यावरी सीत असर अल्फमध्यें (श.१५३७) हैबतखानाची धरणी पाठवून आपणासी ( लिंबेंवाले व दोस्तमुहर्दां ) धरून वाईस नेऊन कोटांत राखिलें. रोज मार करीत व पैके मागत. मग वाईचे देशमुख वगैरेंनीं आपले बाबे हैबतखानास अर्दास लिहिली कीं विठल काईदेऊ व लवे याची मुनसफी केली पाहिजे. येथें मुनसफी होऊन आपण मिरासी कुलकर्ण चालवूं लागलो. यैसिया-मध्यें सन १०१८ ( श. १५३९ ) मध्यें मुलुख मुलो खालें हजरती साहेबास ( रायराऊ साहेब ) दिधला. दादी केली पाहिजे. यावरी ( उपस्थितांपैकीं ) काजी बोलिले. ममलकत मदारी साहेब विसा वर्षांचा मोगोटा मीडीत नाहींत. हुजूर जाऊन निवाडा करणें. मग आपण फत्तेनगरास ( दौलताबाद ) गेलों. मदारी साहेबानीं वादीस हुजुर बोलावुन हम-शाई महालीचे देशमुख यांच्या सह्या आणिल्या. व मुनसफी केली कीं विठल काई-

-देक लंबेपेक्षां खरा मिरासी होये. आपण आपला मुलगा परगणे मजकुरी पाठविला. लंबे याने ठाणेदार याचे आगे इरफती केली. त्यावरून मुलगा फत्तेनगरास आला. व मदारी -साहेबांकडून पुन्हा खुर्दखत घेतले. पुढे हर दोजण आगा अजम साहेबाकडे गेले. त्यांनीं चौकशी केली. त्यांत लंबा कोणी देखिला नाहीं ठरले. पुढें हाजीर मजालसी बोलिले "कोणापासी कागद कैसे आहेत." लंबा कागद न दाखवीच. विठल काइदेऊ याने सर्व कागद दाखविले. मुनसिफी मनास आणतां विठल काइदेऊ मिरासी खरा; लंबे खोटे; -तुवा कुलकर्ण खाऊन सुखे असिजे.

इं. फॅ. भा. १ पृ. २३१ } (१२४) { १५४२ माघ वद्य १२
इ. } सुरत—सभा { १६२१ फेब्रु. ८

कालरात्रीं मांडूचें पत्र आलें-**मलिकंबरचें शिक्याचे** लेखी फर्मान सर्व -सैन्यांतून व मुलखांतून सुरक्षितपणाबद्दलचें मिळालें. मोंगलांच्या मुलखावरील स्वारीचा दक्षिण्यांचा मुख्य सेनापति **याकुतखान** याच्या शिक्याचा दुसरा परवानाही मिळाला. -त्यानें मुलखांतून सुरक्षित चालविण्याकरितां आपलें २ लोक बरोबर दिले.

-सा. ले. ८ } (१२५) { श. १५४२
सु. १०२१ } कौलनामा ता. { इ. १६२०

आप्पाजी मल्हारजी व तुकाई देशमुख प. शिरवल

विठल काईदेऊ देसकु. पा सिरवल

हैबतखानाचे कारकीर्दीस पैकियाच्या बलें लंबे दर मुकाम लस्कर खडकी तुले देसकु. चे मिरासीवरी उभे राहिले होते. हैबतखाने लंबे यासी दुरी केले. त्यावरी तुम्ही फर्मान व मलिक अजमाच्या क्तिावती घेऊन आलेसी. त्यावरी तमाम देमक व मिरासी मेळवून बोलिले की, मिरासी विठल काईदेऊ याची. लंबे गैर मिरासी. तरी कुळकर्ण तूं चालवणें.

नै. व. २ पृ. ५८ ले. ३ } (१२६) { १५४३ चैत्र शु. ४
सु. १०२१ जवल ४ } फर्मान फा. सी. { १६२१ मार्च १७

अजर दिवाण र. खास

कारकून देसमुख पा सुपे मोकाशी व मोकाशाचे हुदेदार व मोक. कसबे सुपे.

मोराबा गोसावी याच्या सांगण्याप्रमाणें, वा हुजती याकूदखान सु. १०२० जखर १ व रोखा मलिक अंबर ( २९ जिल्हेज १०२१ ), मोराबा गोसावी यास इनाम १ चावर जमीन तेल वगैरे पूर्वीप्रमाणें चालवीत जाणें.

खं. १५ ले. ३८८ } (१२७) { श. १५४३ चैत्र शु. १२
सु. १०२१ जवल १२ } खुर्दखत फा. मु. व सी. { इ. १६२१ मार्च २५

अजर. रा. संभाजी राजे —— कारकून पा पांडियापेडगांव

रामेश्वरभट व चिंतामणभट उपाध्ये यासी मुकासा मौजे जातेगांव दो या खुर्दखत रा. थोरले राजे ( विठोजी राजे ) दिधले आहे. तरी चालविणे.

खं. २० ले. ६१ } (१२८) { श. १५४३ वैशाख वद्य ५
श. } { इ. १६२१ एप्रिल ३०

रामा चिंत्राव —— नारायण व रंगोत्रा व गोपिनाथ चिंत्राव वाईं

मौजे नवी किन्ही व बोरखळ यामध्यें गोपिनाथाचा अर्ध व तिघाचा अर्ध. यामध्यें २० वर्षे अमच्या पुत्रास व अम्हास संबंध नाहीं. त्याउपरि आपला विभाग नूतन साधिला असे..

सा. ले. ११४ } (१२९) { श. १५४३ आषाढ व. २
सु. १०२२ साबान १४ } खुर्दखत फा. मु. व सी. { स. १६२१ जून २४

रायाराऊ —— देसमुख व कारकून पा पुणा

महादेभट पुरंदरे अग्रहोत्री मालुम केले "आपणास बदल धर्मादाऊ इनाम जकाती पा मा पैकी रु. ३ आहे. मोगलटे गुम जाले. मलिक अजम सिदी याकूद याही खातिरेसी आणून रुके चालते केले. आपण त्याग मन्हामत केलें पाहिजे." तरी चालविणे.

स. पृ. १०१ ले. १ } (१३०) { श. १५४३ आश्विन शु. २
सु. १०२२ जिल्काद १ } खुर्दखत { इ. १६२१ सप्टें. ७

अजर. रा. येकोजी राजे — कार. मोक. को जिती पा पांडियापेडगांव

कानभट बिन राम पाठक का मार मालुम केले जे, 'आपणास चावर १ दो नस्त व बाबा बदल धर्मादाऊ अजरामऱ्हामती केला असे. खुर्दखत राजश्री आहे. चालवीजे.

इं. फॅ. भा. १ पृ. २६७ } (१३१) { श. १५४३ आश्विन शु. ३
इ. } आग्रा—सुरत { स. १६२१ सप्टें. ८

**मनसुरखान दक्षिण्यांकडून फुटून** बऱ्हाणपुरला शहाजाद्याकडे आला. त्याचा मोठया सन्मानानें सत्कार केला.

स. पृ. ४१ } (१३२) { श. १५४३ आश्विन व. ७
श. } महजर { इ. १६२१ सप्टें. २७

रामाजी बिन बापोजी मोकदम व कानोजी बिन धावजी विरतीकर मौ माळ-

शिरस पा सुपे यास मौ टेकवडी व मो पिसर्वे प्रा पुणें शिवेचा कर्कशा ७१८ वर्षे होता. कारकीर्द निजामशहा मलिक मदार महमद यापाशीं दो गावचे चौगलीयानी रवा काढिला दोघेहि खोटे जाले. मग माळशिरकराशी शावाजी अली महालदार राव मलिक यांनीं जमीन दो ठाई वाटून दिल्ही. **यावरी साहेबास ( रायाराव ) मुकासा अर्जानी जाला.** साहेबीं शिस्त दिली जे शिवेची माती आणून श्रीवटेश्वर ( सासवड ), ऐरणी दिव्य घेणें. काना बिन धोंडी वृत्तिकार मौजे माळशिरस दिव्यीं उतरला.

इ. वृ. ३४पृ.७ } (१३३) { श. १५४३ कार्तिक शु. १
सं. १६७८ } मुद्रा { इ. १६२१ आक्टोबर. ६

दिवान महाराजाधिराज महाराणा श्रीदुरंगवाजी यानी विस्पदाम यास मौ पाणीवारा कृपापूर्वक देश कुलवाब दिले.

सा. ले. १४ } (१३४) { श. १५४३ कार्तिक शु. ७
सु. १०२२ जिल्हेज ५ } खुर्दखत { इ. १६२१ आक्टोबर ११

रायाराव——— जनाव, ठाणदार, कारकून देशख पा शिरवल

पा मारच्या देशणींचा मुशाहिरा जो काही कारकीर्द हैवतखान चालिले तेणेप्रमाणे कुलकर्णी यास तात्कीद करून देववणें.

सा. ले. १५ } (१३५) { श. १५४३ मार्ग. व.१०
सु. १०२२ मोहर २३ } मिसेली फा. मु. व सी. { इ. १६२१ नोव्हें. २८

शिरवळ पाचे ठाणेदार व वरिष्ठ अधिकारी रायाराऊ ?

तुकाई व तान्हाजी निगडा देशस पा शिरवल

विठल कायेदेऊ देशणीं याचे बाबे लिहिले तरी तुम्हापासून व तुमचे वंसीं ब्राह्मणहत्या सात पिढिया जाली नाहीं पुढेहि घडेना ये बाबे आमचा खातिरजमा आहे. घायुगडे याचे ये बात्रे गुमान धरावे तरी त्यामधे सात पिढिया मैत्री आहे. त्यापासून ऐसा अमल घडेना. तुम्ही बिठोबावरी जैसी कृपा करीत होते तैसीच रामाजी विठलावरी करीत जाणे.

सा. ले. १७ } (१३६) { श. १५४३ मार्ग. व. १०
सु. १०२२ मोहर २४ } खुर्दखत फा. २ मु. व सी. { इ. १६२१ नोव्हें. २९

रायाराव पाशिरवल ——— ठाणदार व कारकून पा शिरवल

रामाजी त्रि. देशकुलर्णी मालूम केले जे, 'हली आपला बाप विठल कायदेऊ यासी आवसकोशीस करून गुमसुदपणें मारा करून जिवे मारिले. आपला बाप देशण चालवीत असतां हरयेक खरीदीफरोख्त जिनसाची जकाती माफ असे. हली तसी माफी असावी.' माफ केली असे.

पे. द. ४ पृ. ४८
सु. १०२१ रजब १०

(१३७ = ११४ अ)

श. १५४२ ज्येष्ठ शु.१२
इ. १६२० जून १

(१) ——— मोकाशाचे कारकून व देशमूख

उमाराने मालूम केले, आपला वालीद देसपांडेपण करीत होता. तो मयत जालियावरी ता इसरीन आपण करितो. दरम्यान कान्होजी करकसा करून चालवितो. साहेबी दुन्हाई दिधली. कान्होजी पळोन गेला. वालिदे उमाराने जैसे चालिले तेण्हेप्रमाणें चालविजे.

इं. फॅ. भा. १
पृ. २७५ इ.

(१३८)

वटेन्द्रिया संयुक्त रक्षण-मंडळाची सभा

१५४३ आश्विन व. ६
१६२१ सप्टें. २६

**इंग्रज व डच उभयतांनीं** मिळून एक आरमार तयार करून मलबार किनाऱ्यावरील **पोर्तुगीजांचा** व्यापार जबरदस्तीनें हस्तगत करण्याचा बेत केला आहे. त्यास तेथून झामोरीनची मदत मिळाली तर पहावें. शिवाय व्यापाराकडेही लक्ष ठेवून इराणचें आखात व मोझांबीक इकडेही जाऊन यावें इ. ठरलें.

इं. फॅ. भा. १
पृ. २८७ इ.

(१३९)

रॉबर्ट जेफ्रीज (चौलरोड)--ई. इं. क.

१५४३ आश्विन व. ३०
१६२१ आक्टो. ५

नुकत्याच आपल्या कपनीचे बाबतींत घडलेल्या एका विलक्षण अपघाताची बातमी सुरतेच्या कौन्सिलला मिळाली. लाहोर व आग्र्याहून माल घेऊन येणारा एक काफिला रॉबर्ट हचिसन याचे नेतृत्वाखालीं येत होता. **दख्खनच्या एका राजाचा संरक्षक मलीक अंबर** ( Protector to one of the kings of Decany ) यानें मोंगलांच्या मुलखावर स्वारी केली असल्यामुळें मलीक अंबरचा कौल घेणे भाग पडलें. तो घेतला असतांनाही विश्वासघातानें हचिसनचा काफिला लुटला गेला....दाभोळ, चौल आदिकरून बंदरें मलीकाच्या पक्षाचीं आहेत; त्यांवर सूड उगवावा असा बेत करून आम्हीं गलबतें पाठविलीं. परंतु तो बेत फसला. ...दाभोळमध्यें आम्हांला बऱ्या रीतीनें वागविलें व **अदिलशाही** सुभेदार **मलीक याकूत** यानें रसद व देणग्या पुष्कळ दिल्या. ....चौलला आम्ही २८ सप्टेंबरला आलों. केरिजच्या सांगण्यावरून **मलिकंबरानें** नुकसान भरपाई करण्याबद्दल पत्रानें अभिवचन दिलें असें समजतें.

इं. फॅ. भा. १
पृ. २९६ इ.

(१४०)

देवगड (चौलजवळ)--सुरत.

१५४३ कार्तिक शु. ६
१६२१ आक्टो. १०

आग्र्याकडील काफिला लुटल्याबद्दल रदबदली करण्याकरितां जाणारे इंग्रज लिहितात: इंग्रजांनीं एक गलबत पकडल्यामुळें **मलिकंबरला** वठणीवर आणणें थोडेंसें अधिक सुलभ होईल. सिद्दी अंबर, सिद्दी याकूत व सिद्दी रैहन हे सिद्दी सुरूर याला चांगले वागवावें असें सुचवितात.

इं. फॅ. मा. १ }
पृ. ३१५--१७इ. }　　(१४१)
मलीक अंबरकडील वकीली　　{ १५४३ कार्तिक व.५
{ १६२१ आक्टो. २५

मलीकंबरानें दौलताबादजवळील नोकरीच्या तळावर पोर्तुगीज दुभाष्यामार्फत बोलणें केलें. गलबत पकडलें तेंच द्यावें व काफिल्याची भरपाई मागूं नये. एका हातानें गलबत पकडतात आणि दुसरीकडे लमाणाबद्दल नुकसानीची भरपाई मागतात; तर इंग्रजांना कांहीं न्याय आणि सदसद्विवेकबुद्धि आहे कीं नाहीं ?'......विजापूरच्या इब्राहिम इदलशाहाचा-**मलिकंबरला** तब्यांत बुडवून मारण्याचा बेत (फमला.) मलिकानें वर्जांगाची मानखंडना करून कैदेंत टाकलें. ......नजराण्याचे गालिचे सुलतान व मलिक अंबर यांच्यांत वाटून घेतले......**मोंगल हे इंग्रजांचे दोस्त** असून दक्षिण्यांचे शत्रु आहेत.

इं. फॅ. मा. १ }
पृ. ३१७ इ. }　　(१४२)
जेफेज-सुरत　　{ १५४३ कार्तिक व. ५
{ १६२१ आक्टो. २५

आग्र्याकडील लमाणांच्या लुटीची जबाबदारी **मन्सूरखान** ( नांवाचा सरदार ) खडकीहून मोंगलांकडे फुटून मिळाला त्याचेवर घालितात.

इं. फॅ. मा. १ }
पृ. ३१८ इ. }　　(१४३)　　{ १५४३ कार्तिक व. १०
{ १६२१ आक्टो. ३०

**मलीकाच्या वजीरांपैकीं एकजण ( जाधवराव ) त्याला सोडून पळाला.**

इं. फॅ. मा. १ }
पृ. ३१८-३२३ इ. }　　(१४४)
बऱ्हाणपूर-सुरत　　{ १५४३ मार्ग. शु. ३
{ १६२१ नोव्हें. ६

शहाजाद्याच्या दरबारांत मुख्य सल्लागार **अफजलखान** व खोजा अबदला इसन; **रुस्तुमखान** गुजराथचा सुभेदार व **इसाकबेग** सुरतेचा ( बंदरचा ) सुभेदार व्हावयाचा आहे.

इं. फॅ. मा. १ }
पृ. ३२३-३२८ इ. }　　(१४५)
सुरत-कंपनी　　{ १५४३ मार्ग. शु. ४
{ १६२१ नोव्हें. ७

[३२४] आग्र्याच्या काफिल्याचा सूड उगविण्याकरितां आम्हीं दाभोळ व चौल येथील गलबतें पकडणार आहोंत हें ऐकून **मलिकंबर** सलोख्याचें बोलणें बोलूं लागला म्हणून जेफेज त्याच्याकडे गेला. [३२५] डच लोक सुरतेंत राहून दाभोळ, दीव, चौल उध्वस्त करण्याची कारवाई करितात. [३२८] **मलिकंबराकडून** रॉबर्ट जेफेज अपयश घेऊनच परत आला.

इं. फॅ. मा. १ }
पृ. ३३२ इ. } (१४६) बऱ्हाणपूर-सुरत { १५४३ मार्ग. शु. १४ { १६२१ नोवें. १८

.....इकडील बातमी अशी—शहाजादा इकडेच आणखी दीड वर्ष रहाणार आहे. दक्षिण्यांचा एक मोठा सेनापती जदूराय हा त्यांचे पक्षांतून फुटून शहाजाद्याला जाऊन मिळाला असून त्याचा मोठा सन्मान करण्यांत आला आहे. विजापूरच्या राजाला फर्मान गेलें आहे कीं 'शहाजाद्याच्या तुलेच्या वेळीं ( ५।१।१६२२ ) खंडणी पाठवावी व बादशाही वकील व सैनिक यांचे हातीं हिऱ्यांची खाण द्यावी. नाकबूल केल्यास युद्धास तयार व्हावें.' बऱ्हाणपूर जवळ दक्षिण्यांचा मोठा तळच पडला आहे. खानखानान आणि मलिकंबर या उभयतांनीं मिळून दख्खनचे सुलतान आणि सर्व मुलूख विश्वासघातानें जहांगीरचे हवालीं केला असा प्रवाद आहे. इराणचा राजा कंदाहारपर्यंत चालून आला आहे.

सा. ले. १६ }
सु. १०२२ मोहर २४ } (१४७) खुर्दखत { श. १५४३ मार्ग. व. ११ { इ. १६२१ नोवें. २९

रायाराऊ पा शिरवळ —— जनाब, ठाणेदार व कार. पा शिरवल

रामाजी विठल यास पा मा र्च्या देशीचा मुशाहिरा व हक चालिले असेल तेणेप्रो चालविजे.

सा. ले. १८ }
सु. १०२२ मोहर २४ } (१४८) { श. १५४३ मार्ग. व. ११ { इ. १६२१ नोवें. २९

पा शिरवळचे वरिष्ठ अधिकारी —— आपाजी मल्हारजी दोख पा शिरवल

वऱ्हाड (लग्न) करून येणें. पुढें ले. १२५ प्रो.

नै. व. ४ पृ. ४७ }
सु. १०२२ रबल १२ } (१४९) महजर फा. मज. व मु. { श. १५४३ माघ शु. १३ { इ. १६२२ जाने. १५

उमाराम व कान्होजी त्रिमल देसपांडियेपदाबदल मांडितात—

अग्रवादी—उमाराम आपला वालीद. रामाजी देशपांडियेपण करीत असतां भाऊ मारला गेला. यावरी रामाजींनें देसपांडेपन आपनासी दिधले, यावरी रामाजी मयत जाला ते वख्ती कारकीर्दा, मोगल मुकासा मिर्झा खां (आकडे होती). ते पासून कारकीर्दा मोगल या कारकीर्दी हजरती साहेबु चालत आहे. दरम्यान कान्होजीनें हिमातीनें चालविलें. त्या मागती मुलुख साहेबासी अर्जानी जाला. मालोजी राजे व मोगल (तर्फेचा) वीरसिंग देऊ यांचीं खुर्दखतें आहेत.

पश्चिमवादी कान्होजी तिमल- आपला +डील आपल्या वडिलाचा लेकु......

म्हणोन देसपांडेपण आपण चालवितों. रामाजी मेलियावर उमाजीस देसपांडेपण दिधलें. वगैरे......

सुदैसतें व न्याय मनासी आणितां देसपांडेपण उमाजींचें उमाजीस दिधलें आहे.

खं. १५ ले. ३८९ } (१५०) { श. १५४३ माघ व. १०
मु. १०२२ रबल २४ } मिसिली फा. मु. व सी. { इ. १६२२ जाने. २६

अज दिवाण पा। पुणा—— हुदे., मोक., रया, मो वडिगी पा पेडगी.

( रायाराऊ सो ) यांचा हुकूम कीं "रामेस्वरभट सा आर्वीमुद्गल यास इनाम जमीन वाहार्तीकास रुके १२ मौजे वडिगाऊ येथील, हैबतखान व मलिक अजम ह्यांचे कारकीर्दीपासून चालिलें आहे. हाली विलायती साहेबास अर्जानी जाली आहे." तरी चालविणें."

सा. ले. १९ } (१५१) { श. १५४३ फा। व. ३
मु. ? रसर १६ } महजर { इ. १६२२ फे. १८

( सद्याच फक्त असल्यामुळें सारांश दिला नाहीं. )

इं. फॅ. मा. १ } (१५२) { १५४३ फाल्गुन व. ३
पृ. ३१७ टीप १ इ. } { १६२२ फेब्रु. १८

गोवा गवर्नर—किंग फिलिफ.

'इब्राहिम अदिलशहाचे मनांत मलिकंबर बद्दल गैरविश्वास आहे' [लिस्बन ट्रॅन्स्क्रिप्ट्.]

इं. फॅ. मा. २ } (१५३) { श. १५४३ फा। व. १२
पृ. ७९ इ. } मच्छलीपटण—सुरत { इ. १६२२ फे. २६

'आम्ही ऐकतों कीं तुमच्याकडे पुष्कळ सुंदर घोडे आहेत. पूर्वी मागणी केल्या-वेळीं दख्खनमध्यें युद्धें चालू होतीं तीं आतां संपलीं आहेत. तरी एक घोडा पाठवा.'

सा. ले. २२ } (१५४) { श. १५४३
मु. १०२२ } उल्लेख { इ. १६२१

या लेखांकांत "सन इसने फारणे हाऊजी बिन साऊजी कामिया राऊ आजमापाही ( रायाराऊ ) फिर्यादी जाले" असा उल्लेख आहे.

खं. १५ ले. ३९० } (१५५) { श. १५४३
मु. १०२२ } कबूलकतबा { इ. १६२१

सुत्र व सोन मेहतरी व तेली कसबे वावी

कुमाजी पाटील, अजहती त्रिंबोजी राजे भोसले मोकदम कस. वावी पा. संगमनेर माजी मोकदम याउजी आपणापासून घानखुडी खात होता; त्याप्रमाणें तुम्ही घेणें.

| | | |
|---|---|---|
| सा. ले. ३२१<br>सु. १०२२ | (१५६) | श. १५४२<br>इ. १६२१ |

कामगार अजगाव पा कुडाल यास. मानजी देसाई याजकडे बाग चालवा.

| | | |
|---|---|---|
| ऐ. व. ४ पृ. ४९<br>सु. १०२२ | (१५७) | श. १५४२<br>इ. १६२१ |

ग. मालोजी राजे —— कारकून व दोख पा खेडले.

उमाराम देसपाडियाने मालुम केले जे 'आपले कुलकर्ण; दरम्यान कान्होजी हरकती करितो.' तरी कुलकर्ण याचे दुमाला कीजे.

| | | |
|---|---|---|
| सा. ले. १८८<br>सु. १०२३ जवल ५ | (१५८)<br>कौलनामा फा. मु. | श. १५४४ चैत्र शु. ६<br>इ. १६२२ मार्च ८ |

अज दिवाण पा शिरवल— रामाजी विठल देसकुलकर्णी.

तुमचे मिरासी सेत कसब्यात आहे. विठल कायदेव कटकास गेल्यावर मागे हे सेत हाउजी अर्जा अज दिवाणीच्या महसुलाबदल कीर्दी करून उगवणी करीत होते. हल्ली इहिदेस विठ. काय. गावास गाला. तेव्हां हाउजी बोलला 'आज पेरणीचा हंगाम आहे. अवंदा आपणास पेरूं देणें. दिवाळीपासून तुमचे सेत तुम्ही करणें.' त्याबरी विठल कायदेवास मारले. मग तुकाई देसमुखीण इनें तुमच्या तर्फे विनंती केल्यावरून हा कौल दिला आहे.

| | | |
|---|---|---|
| स. पृ. ६२ ले. ४५<br>सु. १०२२ जवल १५ | (१५९)<br>पोटपत्र | श. १५४४ चैत्र व. १<br>इ. १६२२ मार्च १८ |

अजर. अंबरखान

महादो त्रिमल हवाल० महमद अलिखान हुदेदार मौ. चिमणगांव

देवजी लक्ष्मण व चिंतो लक्ष्मण कुळकर्णी व ज्योतिषी मालूम केले जे "मौजे मज. कुलकर्ण वज्योतिष मिरास आपली, रामाजी नागनाथ सोनवडे उम्राणीकर लायनी गरगशा करू लागले. त्यावर हरदोजण मायणीस चंदखान साहेबाचे वदगीस जात होते. वाटेत म्हणाले फिर्याद न जाणे. वळुते मिरासदार सांगतील तसें करू. वळुत्यानीं मिरास देवजी व चिंतो यांची असें लिहून दिले. रामाजी नाकबूल गेला. त्यावर परस्थळ कोल्हे येथें रवा केला. आपण खरे जालों" तरी ज्योतिष कुलकर्ण वरील इसमाकडून घेणें.

खं. २० ले. ४ }
श. }

(१६०)

{ श. १५४४ वैशाख शु. ५
{ इ. १६२२ एप्रिल ६

पिराजी व अंताजी गोलटा — भवदेभट जोशी धर्मादिकारी क्षा टवे

आपन दुकळाकरितां तुटलों. खावयासी नाहीं आपला जीव रखीला पाहिजे म्हनउनु तुम्हास आपला घरवाडा विकत दीधला असे. तुम्हापासून घेतले होन अडीच, व गाहा डेरी, पुमीटी अर्ध छुनी इ. आपला घरींचा उमा राहिला त्यात गाली सर्व.

इं. फॅ. सा. २ }
पृ. ९४ इ. }

(१६१)
आग्रा-सुरत

{ श. १५४४ अ. आषाढ व. ७
{ इ. १६२२ जून २०

'आग्रा येथील दोन्ही सुभेदारांची मनसब प्रत्येकी एक हजार घोड्यांनी कमी केली आहे. याचें कारण, धोलपूर येथील जहागिरीबद्दल सुल्तान शहारिअर व खुर्रम यांचा वाद चालू असता त्यांत त्यांनी शहारिअरला खुर्रमविरुद्ध मदत केली नाहीं.'

स. पृ. ३१ ले. ३९ }
सु. १०२३ रम २७ }

(१६२)
महजर

{ श. १५४४ आषाढ व. १४
{ इ. १६२२ जुलै २७

हे (१३२) प्रमाणें छिन्न्या दादाचा महजर. शरीफ अली हेजीब याकूबखान याचा उल्लेख आहे.

इं. फॅ. सा. २ }
पृ. ११२ इ. }

(१६३)
बऱ्हाणपूर-सुरत फॅक्टरी

{ श. १५४४ श्रावण व. ६
{ इ. १६२२ ऑग. १७

'खुर्रम अजमीरकडे जात असतां जहांगीरनें त्याला बंदी केली. तो बऱ्हाणपूरला परत येईल अशी वदता आहे. आपला लहान मुलगा व दाराबखान (खानखानाचा दुसरा मुलगा) वगैरे सरदार यांना तो ठट्ठाचे संरक्षणार्थ पाठविणार...खानखाना सल्ला घेण्याकरितां सोहून्दा जाणार आहे. तेथें इराण्यांना मदत केल्याबद्दल आणि ठट्ठा मार्गे दारुगोळा आमच्या गलबतांतून (इंग्रजांच्या) पाठविल्याबद्दल आमच्यावर चहीन घेण्यांत येईल. तर तो आम्हीं नाकबूल करू

खं. २० ले. ६८ }
सु. १०२३ जिल्क ५ }

(१६४)
खुर्दखत

{ श. १५४४ भाद्र. शुद्ध ७
{ इ. १६२२ सप्टें. ९

अजर. हैबतखान —— आतामली नायब गैबत व कार. पर. वाई

मुदानसेठी बिन मोनसेठी पाटने पर. मज. यांस पूर्वीपासून वाई येथे वर्तन, इतर कांहीं गोष्टी इनाम आहेत त्या चालविणें.

सा. ले. २८९
सु. १०२३ जिल्काद १९ } (१६५) खुर्दखत ता. { श. १५४४ भाद्रपद व. ५
इ. १६२२ सप्टें. १५

अजर. म. रा. न. अंबर———कार. व देशक मामले गुलसनाबाद (नाशिक).

भट जुनारदार की नासीक मालुम केले जे 'आपण गोदातीरी स्नानसंध्या करुनु साहिवासी दुवा देउनु असतो. आपणास सिहस्त पटी दर सिहस्ती माफ आहे.' हाली सिहस्त येउनु गुदरला हे माफीचे खुर्दखत हाली पाहिजे. तरी पटी माफ असे.

खं. १५ ले. ३११
सु. १०२३ मोहर ७ } (१६६) खुर्दखत मु. व सी. { श. १५४४ कार्तिक शु. ९
इ. १६२२ नोव्हें. १

अजर. आवा सिद्दी अबदुल नबी व सिद्दी महमद

हुदे. व मोकदम मौजे वडगऊ ता पेडगांऊ का पाटस पा पुणे

रामेश्वरभट नारायणभट सो आरवीमुद्गल मालुम केले जे 'आपणासी इनाम जमीन चावर वाहतिकास देखील मळय रुके ५॥ वारा दर सवाद मौ मार आहे. हाली साहेवास सालमाराकारणे मुकासा अर्जानी जाला आहे. खत होये.' तरी दुमाला कीजे.

सा. ले. ११५
सु. १०२३ मोहर १० } (१६७) खुर्दखत मु. व सी. { श. १५४४ कार्तिक शु. १२
इ. १६२२ नोव्हें. ४

अजर० मुधोजी नाईक

कारकून पा पुणे व मोकाशाचे हुद्दे० मोक० मौजे पिपलेसौदागर

महादेभट बिन मुद्गलभट पुरंधरे सेकीन पुणे मालुम केले, "आपणास चावर १ इनाम दिधलिया तुम्हांस आशीर्वाद देऊन असो." तरी त्यास १ चावर जमीन कसबे मजकुरी दिली आहे. त्याचे ताम्यांत देणें.

सा. ले. ११७
सु. १०२३ मोहर १० } (१६८) उल्लेख { श. १५४४ कार्तिक शु. १२
इ. १६२२ नोव्हें. ४

मुधोजी नाईक —— महादभट बिन मुद्गलभट पुरंदरे सो पुणे.

पिंपळे सौदागर येथें एक चावर गजशरायणी कुलबाव दिला असे.

खं. १५ ले. ३१२
सु. १०२३ मोहर २९ } (१६९) खुर्दखत मु. व सी. { श. १५४४ मार्ग. शु. १
इ. १६२२ नोव्हें. २३

अजर० रा. संभाजीराजे—— कारकून देशक, पा पांडियापेडगाव तरफ करडे.

मुद्गल व कृष्णभट बिन बाबदेऊभट सो चाकण. यास बदल धर्मादाऊ इनाम

बदल दान सूर्यग्रहण जमीन काळाकीर्दी चावर एक मौ वेलवडी दो नस्तयाती व याबा कुल दिधले असे. जमीन मोजून हदमाहदूद घालून प्रज नेमून हुजूर खबर लिहिणे. चालवीत जाइजे.

खं. १५ ले. ३९३ }
सु. १०२३ सफर २६ }
(१७०)
मिसेली मु. व सी.
{ श. १५४४ मार्ग. व १२
{ इ. १६२२ डिसेंबर २०

अज दिवाण ठाणे देहाये पा पांडियपेडगी व तरफ कर्डई समत मार
हुदे. मोक. मौ वेलवडी
(ले. १६९ प्रमाणें सर्व मजकूर.)

इ. फॅ. मा २ }
पृ. १७२ इ. }
(१७१)
अहमदाबाद-सुरत
{ श. १५४४ पौष शु. ५
{ इ. १६२२ डिसें. २६

शहाजादा शहाजहान यांचें बंड सुरू झालें किंवा होणार असा सर्वांचाच समज आहे. क्लिक ठिकाणीं सुरवातहि झाली. तेव्हां आग्र्यापर्यंतचा रस्ता धोक्याचा आहे. राजाचा तळ लाहोरकडे फार लांबीवर आहे.

इं. फॅ. मा. २ }
पृ. १७६ इ. }
(१७२)
भडोच-सुरत
{ श. १५४४ पौष. शु. ७
{ इ. १६२२ डिसें. २९

येथील गव्हर्नरला **खुर्रमचें पत्र**- 'अहमदाबादचा राजा पंचहजारी केला व त्याला आमचेकरितां आग्र्याच्या संरक्षणार्थ पाठविलें.' रुस्तुमखान पंचहजारी केला. तसेंच इतरांना कांहीं दिलें. बरेच जण आग्रा व अजमीर रोखें रस्ते रोखून धरण्यास पाठविले. पेलखान नर्मादत्त काढून टाकून त्याची जागीर घेतली. गुजराथेंतील इतर बादशहाच्या पक्षाचे लोकानाहि व गुजराथचे सरदारांना असेच लुबाडले. काय होईल तें परमेश्वर जाणे.

सा. ले. ११७ }
सु. १०२३ रवल १५ }
(१७३)
उल्लेख
{ श. १५४४ पौष व. १
{ इ. १६२३ जाने. ७

खान सरफसखान ——　महादभट बिन मुद्गलभट पुरंदरे सो पुणें.
मौ पर्वतीमध्यें नस्त व दो बाबी चावर १ गजशरायिनी दिले असे.

इ. फॅ. मा. २ }
पृ. १८८ इ. }
(१७४)
अहमदाबाद-सुरत
{ श. १५४४ माघ शु. ६
{ इ. १६२३ जाने. २६

इकडे बातमी अशी आहे कीं, शहाजहानचा खजिना (cassanna) अहमदाबादला पुनः परत आला. युद्धाची सामुग्री शहाजादा शहाजहान याच्याकडे पाठवून देण्याबद्दल हुकूम आहे. महंमद हुसेन शहाजाद्याच्या वतीनें र्खंबायतचा सुभेदार झाला. बंडाची उभारणी अनेक ठिकाणीं व्हावयाची असून शहाजहान लवकरच येथून जाईल.

ई. फॅ. मा. २ }
पृ. १९६-९७ इ. }
(१७५)
आग्रा-सुरत
{ श. १५४४ माघ व. ६
{ इ. १६२३ फेब्रु. १०

इथें बातमी अनिष्ट आहे. **शहाजादा (खुर्रम)** फत्तेपूरसिक्रीस आला असून त्यानें आपलें सैन्य (१६००० घोडे) आग्र्यावर रवाना केलें. त्यांनीं मोठी लूट केली. जहांगीर खात्रीनें आग्र्याला येईल. असफखान लालाबीरसिंगाचे हातांत कैदी आहे.

ख. १५ ले. ३९४ }
सु. १०२३ रबर २८ }
(१७६)
सुर्दखत मु.
{ श. १५४४ माघ व. ३०
{ इ. १६२३ फे. १९

अजर. रा. संभाजीराजे सो
कारकून देहाये पा पांडिदेपेडगौ तरफ करडे.
(ले. १६९ प्रमाणें) प्रज वाबाजी मुलाणा हा नेमून दिधला. इनाम दुबाला कीजे.

ख. १५ ले. ३९५ }
रा. सु. १०२३ जवल ७ }
(१७७)
वाटप व पावती पत्र मु. व सी.
{ श. १५४४ फा शु. ८
{ इ. १६२३ फेब्रु. २७

रा. खेलोजी राजे, मंबाजी राजे, नागोजी राजे, परसोजी राजे, त्रिंबकजी राजे, ककाजी राजे ———रामेशभट व चिंतामणीभट गोसावी

तुम्हापासी रा. ताबाई आवानें ठेवणे ठेविले होते नख्त २१०० होन व सोने १०८ तोळे. हे तुम्ही आमचे आम्हासी खडकीस आणौन दिधले. पैकीं मालबा रायाचा वाटा मालबासी देउनु वांटे सा होन १८०० व तोळे ९० सोने आमचे आम्हासी पावले.

सं. ६ पृ. ९२ }
मु. १०२३ जवल ७ }
(१७८)
कबूल कतबा फा. मु व सी.
{ श. १५४४ फाल्गुन शु.८
{ इ. १६२३ फेब्रु. २७

**रा. मालोजी राजे** (शहाजीचा चुलतभाऊ) रामेशभट व चिंतामणीभट गोसावी. तुमचेपासी रा. ताबाई आवानें ठेवणें ठेविलें होतें. २१०० होन व १०८ तोळे सोने. ते तुम्ही अवधिया भावाचा वाटा दिधला. पैकीं आमची तकसेमेस दिधले होन ३०० सोने तोळ १५ ते पावले.

ख. १५ ले. ३९६ }
सु. १०२३ जवल २६ }
(१७९)
मिसेली मु. व सी.
{ श. १५४४ फा व. १३
{ इ. १६२३ मार्च १८

नरसो दामोदर हवालदार व कारकून देहाय पा पांडियापेडगौ.
हुदे. मौजे वेलवडी ता कर्डी

मुद्गलभट कृष्णभट सो पुणे यांचे वेलवडी येथील इनाम जमीनीस प्रज नेमून दिधला त्याच्या मंजुरीचें पत्र.

ई. फॅ. मा. २
पृ. २१४-१५
इ. •

(१८०)

श. १५४४ फाल्गुन-
१५४५ चैत्र शु. १२
इ. १६२३ मार्च-ए. २

गोवाबंदर, वॅंपटन् मायकेलमॉन——        सुरत प्रेसिडेंट.

इब्राहिम अदिलशहाकडून येथें अनेक पत्रें आलीं कीं 'इंग्रज व आपण यांमध्यें कायमचा तह व्हावा. मुख्य हेतु उभयतांनीं मिळून पोर्तुगीजांना गोवें वगैरे मुलखांतून हाकून लावावें. गोव्याला इंग्रजांनीं वेढा घातला आहे तो आणखी जारीनें चालवावा.' मुलखी पाठवून घोलपें केल्यास पोर्तुगीजांची जमिनीचे बाजूनें रसद मारण्याची हमी तो घेतो. इतका बंदोबस्त करावयाचा म्हणतो कीं, अल्पावधींत गोवें इंग्रजांचे हातीं यावें. आतां पावसाळा नजीक आला आहे व गोवेंकरांचीं गलबतें सज्ज आहेत. इ. सांगून आम्ही तो तहाचा प्रकार कालावधीवर टाकीत आहों.

सा. ले. ३२२
सु. १०२३

(१८१)
फा. मज.

श. १५४४

गणेसा देसाई परगणे कुडाल यानीं मालूम केले कीं, मानजीचे देसाईगिरी व बाग आपले दिमत केले आहे. दिवाणपैके + + तरी बाग तुम्ही व ते कांहीं करावी.

सा. ले. ३३३ कों. इ. सा. ८४
सु. १०२३

(१८२)
फा. मु.

श. १५४४
इ. १६२२

विठ शेणवी नाडकर्णी पा कुडाल यास फर्मान कीं,

तुमच्या विनंतिवरून भानजी प्रभू, बाये प्रभू यास मुकार केलें आहे. वसुलातीचा तालुक यांच्याशीं आहे.

जर्नल बॉं. रॉ. ए. सो. १९१७
पृ. १४२३ हि. १०३२

(१८३)
फारसी शिलालेख

श. १५४४
इ. १६२२-२३

**शहाजहान** आपली जिंदगी व परिवार असीरगडचे किल्लेदाराचे स्वाधीन करून पूर्वेकडे गेला. सुलतान पर्वीझ याचेशीं किल्लेदारानें दोन वर्षें लढाई दिली. [पहा १५८९ फाल्गुन शु. ६-शिलालेख]

नै. व. ४ पृ. ४९
सं. १६७९

(१८४)

श. १५४४
इ. १६२२

महाराजा वीरसिंगदेऊ ——        कान्होजी त्रिमल

बाखबरदार रही जो. देसपांडिये का काम तूही सूदो थो सो दया. है.

| | | |
|---|---|---|
| पे. डे. व्हॅ. पृ. ७२<br>इ. | (१८५) | श. १५४५ चैत्र शु. २<br>इ. १६२३ एप्रिल १ |

चौल हा गांव व तेथील एक टेकडी पोर्तुगीजांच्या ताब्यांत आहे. त्यावर त्यांनी किल्ला बांधला आहे. पूर्वी तो निजामशहाचा होता, परंतु त्याचें पोर्तुगीजांशीं युद्ध सुरू झालें तेव्हां त्यांनीं ही टेकडी काबीज केली. यामुळें आतां चौल गांव सुरक्षित झाला आहे. सभोंवारचा मुलूख मात्र निजामशहाचा आहे. (श. १५४५ चैत्र शु. १४) एप्रील ४ तारखेस चौल बंदरांतून निघून दंडाराजपुरी बंदराच्या जवळून गेलों. हें एवढेंच बंदर निजामशहाच्या ताब्यांत आहे. तेथून पुढें गेल्यावर निजामशहाची हद्द संपून आदिलशाही लागली.

एप्रील ५ (पृष्ठ ७७) आम्ही तिसरे प्रहरीं **दाभोळ** शहराजवळून गेलों; तें आदिलशाही राज्यांतलें आहे.

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ. भा. २<br>पृ. २१८ इ. | (१८६)<br>अहमदाबाद–सुरत | श. १५४५ चैत्र शु. १५<br>इ. १६२३ एप्रिल ५ |

काल अनेकांचीं पत्रें आलीं. त्यावरून **बादशहाचें लष्कर व शहाजादा ( शहाजहान ) यांचेंमध्यें युद्ध** बिलूचपुरला होऊन उभयतांकडील ५००० लोक मेले. विक्रमजित अहमदाबादचा राजा व रुस्तुमखान व त्याचा मुलगा इत्यादि कामास आले. शहाजहानला माघार खावी लागली. अबदलाखान व राजा सूरसिंग यांनीं त्याचा पाठलाग केला. जहांगीर खुद्द आग्र्याकडे गेला. येथें बातमी येईल त्याप्रमाणें राजपुत्राचा खजिना लुटून ताब्यांत घेण्यास मिर्झा मुकीम टपून बसला आहे.

| | | |
|---|---|---|
| खं. २० ले. ७०<br>श. | (१८७)<br>खंडपत्र | श. १५४५ चैत्र वद्य ७<br>इ. १६२३ एप्रिल ११ |

रामेश्वर, नारायण, व रंगभट चित्राव —— गोपिनाथभट रुद्रभट चित्राव

तुमचे वा आमचे वाडे दोनी ते वांटून घेतले... जमीन बोरीखल व कर्णदे येथील पाउणा चावर. स्थावराचे विभाग जाहाले. जंगम तरी वडिलानी वांटून दिल्हे होते.

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ. भा. २<br>पृ. २२२ इ. | (१८८)<br>आग्रा–सुरत | श. १५४५ चैत्र व. ११<br>इ. १६२३ एप्रिल १६ |

**जहांगीर** अजमीरचे पिराला जात आहे. पिराची आज्ञा होईल त्याप्रमाणे मुर्समचा बंदोबस्त करणार. हल्लीं युद्ध बंद आहे. परंतु शहाजहान व बादशहा जवळजवळच आहेत. बादशहा फत्तेपूर शिक्रीला व शहाजहान १५ कोसाच्या अंतरावर हिंदान येथें आहे.

इं. फॅ. मा. २ }
पृ. २२९ इ. }
(१८९)
मच्छलीपट्टण-सुरत
{ श. १५४५ वैशाख शु. १०
{ इ. १६२३ एप्रिल २९

आमची विक्री इतकी कमी होण्याचें मुख्य कारण **बादशहा व शहाजादा** यांची लढाई चालू आहे. फेब्रुवारी १८ चे सुमारास आमचे लोकांनीं दामोळ जाळलें व २ गलबतें पकडलीं अशी बातमी आली आहे.

सा. ले. २० }
सु. १०२३ रजब ११ }
(१९०)
{ श. १५४५ वैशाख शु. १२
{ इ. १६२३ मे १

रामाजी विठल देशार्णी म्हणतो, आपला बाप विठल काइदेऊ आपली मिरासी चालवीत होता. त्यास जाऊसकोरीस करून जिवे मारिला. यावरी आपण रायाराऊ यासी बोलिलो जे आपण जमीदार आहे. आपणासी देशार्णीचा हक पुरत नाही. आपणासी काही इनाम मन्हामती केला पाहिजे. यावर तीही आपणासी इनाम चावर येक रास दो दाव दिला आहे. येलियास पा। मजकूर साहेबास मुकासा अर्जानी जाला. ताजिया मुर्दखताचा उजूर करिताती. तरी हुजती रायाराऊ प्रमाणें चालवीजे.

सा. ले. २१ }
सु. १०२३ रजब २५ }
(१९१)
महजर
{ श. १५४५ वैशाख व. १२
{ इ. १६२३ मे १५

रामजी विठल काइदेऊ देशार्णी पार शिरवल व भूपालराऊ व गणोरुद्र लंबे यांचा देशार्णीविषयीं तटा. त्यांत सु. १०१४ व १०२२ ( श. १५३५ व १५४३ ) मध्यें झालेल्या ह्याच दोघांमधील देशार्णाबद्दलच्या महजरांचा उल्लेख आहे. शेवटीं लंबे मजकुरापासी मालुमातीची मुर्दखतें होतीं तीं फाडिलीं. लंबे मार खोटे केले. रामाजीस देसकुलकर्ण दिलें.

इं. फॅ मा. २ }
पृ. २३६ इ. }
(१९२)
अहमदाबाद-सुरत
{ श. १५४५ ज्येष्ठ शु. ६
{ इ. १६२३ मे. २५

काल रात्रीं सफीखानकडे २ फर्मानें आलीं. सुलतान बुलाखी, खुश्रूचा मुलगा येणार आहे. बादशहा येणार अशासारखी तयारी चालू आहे. येथें दरबार येऊन देशांत सुबत्ता होईल अशी लोकांना आशा वाटते. **सुलतान पर्वीज** ८० इ. सैन्यासह खुर्रमचा झपाट्यानें पाठलाग करीत आहे. तो आतां मांडूपासून २० मैलांवर आला आहे. बादशहा आतां अजमीरकडे आहे.

इं. फॅ. मा. २ }
पृ. २३७ इ. }
(१९३)
सलाड-सुरत फॅक्टरी
{ श. १५४५ ज्येष्ठ शु. ९
{ इ. १६२३ मे २८

**बादशाही सैन्य गुजराथेंत** येऊन त्यानें शहाजहानाला गुजराथेंतून (अहमदाबादेंतून) काढून लाविलें.

ई. फॅ. म. २<br>पृ. २३१-४० इ.

(१९४)

अहमदाबाद-सुरत फॅक्टरी

श. १५४५ ज्येष्ठ व. १०।१२।१४<br>इ. १६२३ जून १२।१४।१६

अहमदाबादला जहांगीरचें सैन्य जमून शहाजहानचे लोकांशीं त्यांची घनघोर लढाई झाली. शहाजहानचे बाजूनें अबदुल्लाखान लढला. त्याचा पराजय झाला. परंतु जाधवराय ४००० फौज व रसद घेऊन मांडूहून कुमकेस आला. (या वेळीं जाधवराय शहाजहानला मिळाला होता.)

खं. २० ले. ७६<br>सु. १०२३ साबान २५ हि.

(१९५)

फर्मान

श. १५४५ ज्येष्ठ व. १२<br>इ. १६२३ जून १४

[ बादशहा अदिलशहा ] —— याकूतखान हवालदार व कारकून हिसार जावली

नोन चावर जमीन दर मौजे वझरडा किले जावली नारायणभट बिन गोपीनाथ भट चिताराव यास दरवज्ञ इनाम चालू आहे. तरी ती पूर्वीप्रमाणें चालू ठेवणें.

खं. १६ ले. १०<br>सु. १०२४ जिल्हेज २४

(१९६)

मिसेली

श १५४५ आश्वीन व. १०<br>इ १६२३ आक्टोबर ९

अज जानीब मा अंबर

सिद्दी अंबर अबदुल वाहद हवालदार व सावाजी नारायण सबनिवीस किले कोंढाणा.

कान्होजी झुंझारराऊ देशक ता कानदखोरे सुा खमारतमाग पतंगराऊ राजे तो नफर साहेबाचा आहे. त्याचा हकलाजिमा राऊ अजमाचे कारकून तहसील करून नेतातो. तरी हुजरून मस्यारुनइलेचे हेजिबास फर्माविले असे.

ई. फॅ. मा. २<br>पृ. २८३ इ.

(१९७)

गलबतावरील कन्सल्टेशन

श. १५४५ कार्तिक शु. ५<br>इ. १६२३ आक्टो. १८

मलिकंबराशीं बोलण्याचे मुद्दे:—काफिला अचानक दक्षिणी सैन्यानें लुटला. त्याबद्दल बादशहाकडे मागणी करावी कारण, ( १ ) बादशहाच्या स्वतःच्या मुलुखांत लूट झाली; ( २ ) शहाजादा खुर्रम यानें, अपराध्यांचे विरुद्ध तक्रार करून न्याय मागितला असतां, मुख्य गुन्हेगारांना संरक्षण दिलें. ( ३ ) या गुन्हेगारांचे मालमत्तेवर छापा घालून आम्ही आमची भरपाई करून घ्यावी तर त्यांचे मालाला गलबतांतून सुरक्षित नेण्याआणण्याचें मोंगली सरकारच मनावर घेत आहे. ( ४ ) शेवटचा मुद्दा असा कीं, मलिकंबराच्या कौलामुळें आमचा काफिला अशा तऱ्हेनें त्याच्याचकडून लुटला गेला तो **मलिकंबर आतां जहांगिरचा ताबेदार झाला आहे.** ( is become a subject unto Jahangeer Paudshah ). म्हणून बादशहाला लुटीचा फायदा मिळाला असलाच पाहिजे. त्यांतून त्यानें आमची (महमूदी ९३६०६९.) नुकसानभरपाई करावी.

इं. फॅ. मा. २ }
पृ. २८२ इ. }

(१९८)

{ श. १५७५ कार्तिक शु.
{ इ. १६२३ आक्टो. १८

मोखाहून अबदुल मलिक या नांवाच्या मलिकंबराच्या गुलामानें मालकाची इरं ग्रस्त रीतीनें गलबतांतून हिंदुस्थानांत पाठविली.

इं. फॅ. मा. २ }
पृ. ३१३ इ. }

(१९९)
मच्छलीपटण–सुरत

{ श. १५७५ कार्तिक व. ३
{ इ. १६२३ नोव्हें. १२

शहाजहान या राज्याचे (गोवळकोंड्याचे) हद्दींत दुनारें १२ आक्टोबरला शिरला. त्यानें कोणालाही त्रास न देतांना १५१२० दिवसांत बंगालकडे जाण्याचें कबूल केलें. तो नोव्हें. ५ ला मच्छलीपटणला आला.

इं. फॅ. मा. २ }
पृ. ३१९ इ. }

(२००)
सुरत–प्रेसिडेंट रासेल

{ श. १५७५ मार्ग.शु. १
{ इ. १६२३ नोव्हें. १३

खुर्रमची बातमी दिवसेंदिवस अधिक कायम होत आहे. जहांगीरचें शरीर सुजलें असून तो बेशुद्ध असतो. खुर्रम व पर्वीज यांच्या भेटी होऊन एकी झाली. बापाच्या मृत्यूनंतर खुर्रमनें बादशहा व्हावें व पर्वीजनें वजीर व्हावें असें मान्य झालें. बाप जिवंत असे तोंपर्यंत संक्याचा इशारा खुर्रमला पर्वीजनें देण्याचें कबूल केलें. खुर्रमचें २५००० सैन्य आहे. त्यानें एका राजाच्या विधवेशीं लग्न केलें आहे. कांहीं मदत देण्याचें अभिवचन देऊन मालिक अंबरानें आपली काळी मुलगी त्याच्या गळ्यांत बांधली आहे. हें खरें असेल तर खुर्रमला आपण नजराणा केला पाहिजे. कारण त्याचें महत्त्व आतां पुनः वाढेल.

सा. ले. २९८ }
सु. १०२४ सफर २० }

(२०१)
उल्लेख फा. मु. नकल

{ श. १५७५ मार्ग. व. ६
{ इ. १६२३ डिसें. ३

हुजरून——— कारकून को नाशीक

गणेश प्रभु व हरवाजी प्रभु व कृष्णाजी देव धर्मातकारणी यांचे धर्मांतकरण व मुलेपण इत्यादि हक्क पूर्वीप्रमाणें चालविणें.

सा. ले. ११७ }
सु. १०२४ जखल १५ }

(२०२)
उल्लेख

{ श. १५७५ फा व. १
{ इ १६२४ फेब्रु २५

सरकमसान——— महादमट बिन मुद्दलमट पुरंधरे मौ पुणें
मौजे दिवरी दर्याल जमीन चावर १ इनाम दिली आहे.

खं. १५ ले. ८३ } (५०१) { श. १५६६
सु. १०४५ } म. मु. { इ. १६४४-४५

दत्ताजी नाईक देसाई—— सदानंद गोसावी मु. निंब
तुमचे निंब व गोत्रे येथील इनामावरील पेसकमी माफ केली आहे.

पै. व. ६ पृ. ७२ ले. ३ } (५०२) { श. १५६६
सु. १०४५ श. } मु. { इ. १६४४-४५

दत्ताजी राजे— गणेशभट दीक्षित सो वणी
श्री सप्तशृंगीचा जपपूजा आवर्तन करीत जाणें. एकंदर वरषासन १५८ देत जाऊं.

ख. १५ ले. २६७ } (५०३) { श. १५६७ चैत्र शु. १३
सु. १०४५ सफर ११ } न. फा. मु. मो. { इ. १६४५ मार्च ३०

इजत आसार दादाजी नरस प्रभु देशपांडे कुलकर्णी ता रोहिडखोरे व वेलवडखोरे यासी वजारतमाब सिवाजी राजे फरजंद शाहाजी राजे यांणे शहासी बेमानगी करून तुझे खोरियांत रोहिरेश्वराचे डोंगराचे असन्यानें पुंडावियानें मावळे वगैरे लोक जमाव केला आणि तेथून जाऊन पेशजी किल्यावरील ठाणें उठवून आपण किल्यांत सिरला. हाली राजगड किला नांव करून बळकावला व तोही वेलवड खोन्यालगत, त्यास लोकांचा वगैरे जमाव तूं सामील असून फिसात करून रसीद राजे मजकूरनिल्हेस देतोस व ठाणे सिरवली आमिनासी रुजू रहात नाहींस व जमाव बितरहुमा करीत नाहींस व तनखाही हरदू तपियाचा दिवाणात देत नाहींस; मगरूरीचे जबाब ठाणेचे व नाईकवाडी यासी देतोस हे जाहिरात आले. त्यास हे नामाकूल गोष्ट, तुझे जमेदारीचे इजतीस आहे. तरी ठाणे मजकुरी आमिनासी रुजू राहणें आणि तनखा साह करीन देणे. हे न जालियास खुदावंत शाहा तुजला विजापुरी नेऊन गरदन मारतील व जमेदारी हकवातू चालणार नाहीं. हे मनी समजणें आणि याउपरी दिवाणात रुजू राहणें.

खं. १५ ले. २६८ } (५०४) { श. १५६७ वैशाख शु. १
सु. १०४५ सफर२९ } न. व मु सो. { इ. १६४५ एप्रिल १७

सिवाजी राजे

रा॰ दादाजी नरसप्रभु देशपांडे व कुळ॰ ता रोहिरखोरे व वेलवंडखोरे यासी
तुम्हास मेहेरबान वजिराचा विजापुराहून हुकूम आला तो ठाणे सिरवलाहून अमिनानी तुम्हाकडे पाठविला. त्याजवरून तुमचे बाप नरसीबाबा हवालदिल जाले वगैरे कितेक बहुतेक लिहिले. त्यास शहासी बेमानगिरी तुम्ही व आम्ही करित नाहीं. श्री रोहिरेश्वर तुमचे खोरियातील आदिकुलदेव तुमचा डोंगरमाथा पठारावर शेंद्रीलगत स्वयंभू आहे. त्याणी आम्हास यश दिले व पुढे तो सर्व मनोरथ हिंदवी स्वराज्य करून पुर-

विणार आहे. त्यास बावास हवाल होऊ नये. सामखा सांगश आणि तुम्ही तो कागद घेऊन सिताव हुजूर येणे. राजश्री श्रीदादापंताचे विद्यमाने बावाचे व तुमचे व आमचे श्रीपाशी इमान जाले ते कायम वज्रप्राय आहे; त्यांत अंतर आम्ही व आमचे वंशज लेकराचे लेकरी वतन वगैरे चालविण्याविशीं कमतर करणार नाहीं. हें राज्य व्हावें हें श्रींचे मनांत फार आहे याप्रमाणें बावाचे मनाची खातरी करून तुम्ही येणें. बहुत काय लिहिणे.

खं. १५ ले. ८४ } (५०५) { श. १५६७–६८ ज्ये. व. १, २
सु. १०४६ रसर१५ } खुर्द० फा. मु. व मज. सी. { इ. १६४५ (–४६) मे ३१, २१

अजर० रुस्तुम जमा——————कार० व देसमु० पर० वाई

कमलनयनगिरीस नोंव येथें इनाम बडेखान (रणदुल्लाखान) चे पत्राप्रमाणें होता. त्याचे पश्चात् इनाम जोगिंद्र व गोविंदगिरी याकडे चालविणे.

खं. १५ ले. २६१ } (५०६) { श. १५६७–६८ ज्येष्ठ व. १, २
सु. १०४६ रखर १५ } न. फा. मु. सी. { इ. १६४५ (–४६) मे ३१, २१

किल्ले रोहिडा दादाजी नरसप्रभु देशकु० व गाऊकु० रोहिड व वेलवंडखोरे

छ ११ सफरचा खुदावंत शाहगाजी हुकमत पन्हा याचे हुकुमाने मेहेरबां वजिराचा हाकाम तुमचे नावें आला. त्यात मजमून अजरख्तखाने मेहेरबां सिवाजी राजे यासि पुंडावास तुम्ही मिळताव होऊन रोहिरेश्वराचे पाहाडी तुमचे खोरियात हाजार बारासे जमाव तुम्ही लोकी केला. ये बाबे राजे मारनिल्हे याणी तुम्हास सत पा त्यात इमान माक जाल्याचा किसाती मतलब छ २९ सफर कलमी केला आहे. हे खबर बांदल देशमुख व खोपडे व जेधे देशमुखी ठाणे सिरवली जाहीर केली. हे कळून फरारी जालास. हरदू सेरीची विलायत वैराण जाली. मोकदमे हाली हुजूरचे मेहेरबानगीवरून कौलनामा फर्मावला असे. तरी तुम्ही रयान व पट्वारी व बाजे वतनदार याजला कचेबचेनसी आपले मकानी हरदू तपियात येऊन हजर होणे; आणि दोहीं खोरीची विलायतची संचणी आबादानी करून दिवाण देणे व तुमची जमीदारी हकक़ानू इनामती इसाफतीसी हक बमोजिब घेणें. दरबार हरएक मतलब तकसीर केली ती तुम्हास मुबाहक याचे हुकुमावरून जाली असे. दरबाब हरगिज दिवाणातून इजा होणार नाहीं.

खं. १६ ले. २० } (५०७) { श. १५६७ पौष शु. २
सु. १०४६ जिल्काद २ } { इ. १६४५ डिसें. ११

अज दि. दादाजी कोंडदेऊ सुभेदार कोंडाणा

बाबाजी झुंझारराऊ देशमूख तर्फ वानदखोरे

तुम्हें अंतुरली येथील इनाम सरदेशमुखीत दिल्हे. त्याबदल तुला दापोडा येथें इनाम देण्याविषयी लिहिलें आहे.

रास. अं. ६५ ले. ६ } (५०८) { श. १५६७ माघ शु. ११
सु. १०४६ जिल्हेज १० } अभिषेक-वृत्ती ता { इ. १६४६ जाने. १७

अजर. शाहाजी राजे—— महादभट तिमणभट सेडगे येलूर

श्री[वृद्धेश्वर]चा अभिषेक वैकुंठवासी राजश्री मालोजी राजे व विठोजी राजे येही आपल्या वडिलास वृत्ती करून दिधली होती. तेणेंप्रमाणे आपले पिते तिमणभट व त्याचे धाकटेभाऊ विठलभट यानीं अभिषेक चालविला. तिमणभट वर्तमान आहेत. विठलभट निवर्तले; त्याचे पुत्र रघुनाथभट म्हणतात यीं अभिषेकाशीं तुमचा संबंध नाहीं. (अपूर्ण).

इं. फॅ. ८ } (५०९) { श. १५६७ माघ शु. १५
पृ. २५ इ. } { इ. १६४६ जाने. २१

फोर्ट सेंट जार्ज (मद्रास)—— सुरत येथील कौन्सिल.

विजयनगरचा राजा व डच यांमधील युद्ध चालूं आहे. गेल्या आगष्टच्या १२ तारखेस पुलिकतच्या वेढ्यास सुरवात झाली, तेव्हांपासून या राजाला विजापुरच्या बादशाहाशीं व (तंजावर, मदुरा आणि जिंजी येथील) तीन जबरदस्त नायकांशीं लढावें लागत आहे. यामुळें त्याला पुलकाटच्या वेढ्यास ४ हजारांपेक्षां अधिक सैन्य पाठवितां आलें नाहींत. आणि आतां तर गोवळकोंड्याच्या शहानें आपला सेनापती मीरझुमला सैन्यानिशीं या राजाविरुद्ध पाठविला आहे. यामुळें त्यास प्रतिबंध करण्यासाठीं राजा सैन्यानिशी चाळून गेला आहे.

सा. ले. २३९ ब. ३ ले. ११ } (५१०) { श. १५६७ माघ कृ. ७
सु. १०४६ जिल्हेज २० } खुर्दखत 'प्रतिपचंद्र' मु. { इ. १६४६ जाने. २८

अजरख्तखाने राजेश्री शिवाजी राजे दामदौलतहू ब्यानिब कारकुनानि हाल व इस्तकबाल देसमुखानि व देसकुलकर्णियानि तर्फ खेडेबारे बिदानद के सुहुर सन सीत अर्बेन अलफ बावाजी बिन भिकाजी गुजर मोकदम मौजे रांजे तर्फ मार हा मौजे मजकूरची मोकदमी करीत असतां याजपासून कांहीं बदअमल आला. हे हकीकत हुजूर साहेबासी विदित जाली. त्यावरून बदुकमी तलब करून साहेबी हुजूर आणून वाजपुस करितां खरे जाले. याजकरितां बावाजी मा याची वतनी मोकदमी हुजूर अमानत केली. बावाजींचे हातपाय तोडून दूर केला. ते वख्ती सोनजी बिन बना (जा) जी गुजर किल्ले पुरंधर हे जनात गोत म्हणून देऊन अर्ज केला जे आपले हाती देणें. बराये अर्ज खाति-

रेस आणून बावाजी मा याचे माथा गुन्हेगारी होन पा तीनसे करार केले ते सोनजी मा याने देऊन बावाजीस हाती घेतले. याचे पोटी संतान नाही. हे कुळीचे गुजर; म्हणून साहेबी मेहेरबान होऊन मौजे राजे ता मार्चा मोकदमी सोनजी बिन बजाजी गुजर याचे दुमाला करून राजपासून दिवाणात सेरणी होन पा दोनसे करार करून घेऊन मोकदमी यास दिधली असे. यास कोणी मुजहीम न होणे. असल पत्र फिरावून मोगवटियास देणे. उजूर न करणे. मोर्तब सुद. रुजु सुरु निवीस.

इं. फॅ. ८ पृ. २६ } (५११) { श. १५६७ फाल्गुन शु. ५
इ. } { इ. १६४६ फेब्रु. १०

फोर्टसेंट जार्ज (मद्रास)---- सुरत कौन्सिल व अध्यक्ष

या मुलखांत सर्व्या युद्धे व दंगेधोपे चालू आहेत. कारण येथील राजाचे (विजयानगरकर) मांडलीक तीन नायकांशी यादवी युद्ध सुरू असून त्याच्यावर एका बाजूनें विजापुरकर व दुसऱ्या बाजूनें गोवळकोंडेकर यांनीं हल्ला चढविला आहे. गोवळकोंडयाचा सेनापती मीरजुमला याने या राजाचे तीन किल्ले घेतले आहेत त्यापैकीं एक (उदयगिरी ?) या राज्यांतला अभेद्य किल्ला समजला जात असे. या किल्ल्याच्या संरक्षणार्थ राजानें मोठे या सेनापतीची रवानगी केली होती. पण मीरजुमलाशीं सलोखा करून तो सैन्यानिशीं किल्ल्यांतून बाहेर पडला.

डेरास स. } (५१२) { श. १५६७
इ. } { इ. १६४५

गोवळकोंडा व श्रीरंग यांचिमध्यें युद्ध सुरू झालें. मदुराच्या तिरुमल नायकानें विजापूरच्या सैन्यास बोलाविलें.

सा. ले. ८२ } (५१३) { श. १५६८ चैत्र व. १२
सु. १०४६ सफर २५ } पोटपत्र { इ. १६४६ एप्रिल २

दादाजी कोंडदेव---- विठल गिरमाजी हवालदार शिरवल.

रामाजी विठल देशकुळकर्णी शिरवल हा पुण्यास येऊन **सौ. मातुश्री जिजाबाऊसाहेब** यांच्या समक्ष बोलला कीं, आपला व तिमाजी पुरुषोत्तम यांच्या वतनाचा निवाडा गोत देऊन करावा. त्यावरून हें पत्र तुम्हास लिहिलें आहे. तरी परगण्याचे देशक, पाटील व वतनदार यांचे माथा घालून निवाडा गोतन्यायें करणें शिवापूरचे मुकामीं वाटणीचा महजर करून दिला आहे त्यावर जाऊं नये.

सा. ले. १५० } (५१४) { श. १५६८ ज्येष्ठ शु. ५
श. } { इ. १६४६ मे ९

शंकराजी मल्हार कोरटकर ---------- महादाजी गोसावी

आपले मौजे वगैरे ७ गांव (कुळकर्ण व ज्योतिष) तुम्हास दिधले.

सा. ले. २६६ द्य. } (५१५) { श. १५६८ ज्येष्ठ व. ५
सु. १०४६ फ. १०५६ } कबूल कतबा फा. सु. मज व सी { इ. १६४६ मे २४
शिवभट क्षेमकल्याणी } कस. नाशीक
दतदेव, सोनप्रभू, महादप्रभू, हरदेऊ }

मी व दतदेव वगैरेमध्यें नाशीक येथील मुलेपणाबद्दल भांडाभांडी जाली. निवाडयांत हमाचे सर्व हक दतदेव वगैरेस दिले.

सा. ले. २९७ द्य. } (५१६) { श. १५६८ ज्येष्ठ व. ५
फ. १०५६ सु. १०४७ } न. महजर फा. मु. व मज. { इ. १६४६ मे २४

दतदेउ, सोनप्रभू, महादप्रभू, हरदेऊ व सिउभट क्षेमकल्याणी यांमध्यें नाशीक येथील मुलेपणाबद्दल वाद लागला असतां निवाडा झाला कीं मुलेपण दतदेव वगैरेचें.

इ. वृ. ३८ पृ. ६ } (५१७) { श. १५६८ आषाढ शु. १५
सु. १०४७ जवल १४ } विनंति-पत्र फा. मु. सी. { इ. १६४६ जून १८

गोमाजी नरसिंह व रामाजी कृष्ण हवाले बावधान-रा. रा. चंदरराऊ राजे गोसावी.

पिलाजी मालोजी देसाई याने बावधनची वाडी मारिली. दोन कुणबी धरले. वस्तमाव, जमान व कतबे घेतले. कुणब्यास तगादा होतो. तरी वस्तमाव वगैरे देविली पाहिजे व तगादा तोडिला पाहिजे.

खं. २० ले. १० } (५१८) { श. १५६८ अधिक श्रावण
सु. १०४७ जखर } ता. खुर्दखत { इ. १६४६ जुलै

अजर. रा. शिवाजी राजे हुदे.-व मोक. मो टोणी बारकार्डयाची पा सुपे.

विदानदक्की मोरेस्वर गोसावी मोरेस्वर हुजूर एऊन इतिमास केली जे आपणास इनाम बा फर्मान हुमायून व बा खुर्दखत वजीरानि दर सवाद मौजे मजकुरी चावर गज घरायनी १ प्रज एमू भोगवट्य व तसरुफाती चालली आहे. ए बाबे पेशजी आपण हुजूर एऊन अर्ज केला की भोगवटि याची खुर्दखते आपणापासून फितरतीमध्यें गेली आहेती. साल गुा सन सीता कारणे मौजे मजकूर साहेबास अर्जानी जाला म्हणून हुदेदार ताजिया खुर्दखताचा उजूर करिताति. म्हणून अर्ज केलियावर हुजरून दुमाले खुर्दखत सादर झाले ते मौजे मजकुरास घेऊन गेलो. माहालीचे हुदेदार उजूर करिताती की खुर्दखत लिहिले आहे कीं भोगवटे व तसरुफाती चालिली असेल तेणे प्रमाणे दुमाले करणे; यावरून भोगवटियाची खुर्दखते पाहिजेत म्हणून उजूर करिताति. तरी दरीबाब याजबदल पेशजी अर्ज केला आहे की भोगवटियाची खुर्दखते फितरतीमध्ये आपणापासून गेली आहेत ए बाबे हाली मौजे मजकूरचे मोकदमी अर्जदास्त लिहिली आहे. एसियास नजर एनायत फर्माऊन हुदेदार उजूर न करीत ऐसें दुमाले खुर्दखत देविले पाहिजे म्हणून मालूम केले. तरी मोरेस्वर गोसावी यास इनाम चालविणें.

सं. २० ले. ११ } (५१९) { श. १५६८ आश्विन शु. ३
सु. १०४७ रम १ } मिसेली फा. मु. म. सी. { इ. १६४६ आक्टो. १

अज दि. पा. सुपे—— देसमु. पा. सुपे व मोक. मौ. आंबी

मंगळमूर्ती गोसावी याचा मौ. आंबी येथे जमीन चावर च ५ होन नख्त इनाम आहे. तो कादीम जात आहे व इनाम वायदे लक्ष्मीधर जोसी यास दिला आहे. तरी वरील इनाम जोसी याजकडे चालविणे.

सं. ४ पृ. ६८ } (५२०) { श. १५६८ कार्तिक शु. २
सु. १०४७ सवाल १ } खुर्देखत म. मु. सी. { इ. १६४६ आक्टो. ३०

अजर. राजश्री सीवाजी राजे — कारकुनानि पा इंदापूर; बा संभाजी मोसले देसमुख पा मजकूर हुजूर एऊन माल्म केले जे आपणासि इनाम बा मोकदमी मिरासी कसबे मजकूर जमीन चावर जिराती ४॥॥ पाउणे पाच दर सवाद कसबे मजकूर बा वछ नियजगा अज चावर पाचपैकी बा फर्मान बा सिके लाल देखील नख्तयाती ता ठाणे ता देहाये व बाजे पटिया व महसूल व उट व कडबा व बाजे बाबा व वेठ बेगारी फर्मासी कुलबाब कुलकानू रवा आहे. सालाबाद मोगवटे तसरुफाती चालत आले आहे. हाली साहेबाचा मुकासा अर्जानी जाला आहे. संभाजी मोसले देसमुख पा मा यासि इनाम बा मोकदमी......सालाबाद चालिले असेली तेणेप्रमाणे दिधले आहे दुमाले कीजे औलाद अफलाद चालविजे दरहरसाल... फिराऊन दीजे मोर्तब सूद (मोर्तब)

सं. ४ पृ. ७० } (५२१) { श. १५६८ कार्तिक शु. २
सु. १०४७ सवाल १ } खुर्देखत म. मु. व सी. { इ. १६४६ आक्टो. ३०

अजर. राजश्री सीवाजी राजे——— कार. व मोक. देहाये पा इंदापूर बाा संभाजी मोसले देसमुख पा मजकूर जमीन चावर २२८१५ता जिराती चावर २२८ बागाईत चावर ८१५ मौजे निरवांगी, आयदणे, कोरटी, मदनवाडी, अकोले, अवणी, गोतौंडी, वडकुटे सुर्द, राउफलेगांवे, नाझुलगौ, सादलगौ, कलब, सेलगौ, निरगुड, रई, कोळठण, मोडगो, काठी, वडकुटे बुग, सणसर, खोरवची, डाळीज प्रत्येकी चावर १८ सदरहू-प्रमाणे अजराह मन्हामती इनाम दिधले असे. देखील नख्तयाती ता ठाणे व ता देहाये व बाजे पटिया व महसूल व उट व कडबा व बाजे बाबा व वेठीबेगारी व फर्मासी कुलबाब कुलकानु दुमाले कीजे. औलादअफलाद...दरहरसाल...तालीक घेऊन...दीजे. मोर्तब सुद

सा. ले. २६० } (५२२) { श. १५६८ कार्तिक शु. २
सु. १०४७ सवाल १ } खुर्देखत म मु, व. सी. { इ. १६४६ ऑक्टो ३०

अजर... सिवाजी राजे ——कारकुनी पा इंदापूर...बदल इनाम बो संभाजी मोसले देशमूख पा मजकूर अजराह मन्हामती मुकासा मौजे

चोरी पा मा देहे १ देखील नख्तयासी......दिधले असे. दुमाले कीजे. औलाद अफलाद...दरहरसाल...तालीक...मोर्तब सूद ( मर्यादे यं इ० )

इं. फॅ. ८ पृ० ७१ }  इ. }      (५२३) स्वाली-कंपनी      { श. १५६८ पौष व. ३० { इ. १६४७ जाने. २५

रायबाग प्रांतांतील जकातींचा मक्ता मुस्ताफाखानाला मिळाला आहे.

सं. २० ले. ८६ }  सु. १०४७ सफर२४ }      (५२४) सुदखत फा. मज. व सी.      { श. १५६८ फाल्गुन व. ११ { इ. १६४७ मार्च २२

अज सर० फैज आसार आली हजरत – चांदोराम हवा० कार० देसमु० पर० वांई गोपीनाथ रामेश्वर तबीब यास बोरखल व किन्ही येथें इनाम जमीन आहे. हाली पर० मज० आली हजरत साहेबासी मोकासा अर्जानी जाहाले. तरी तो इनाम चालविणें.

सा. ले. १५१ }  सु. १०४७ }      (५२५) फा. मु.      { श. १५६८ { इ.१६४६-४७

सिदी अंबर हवालदार पर० पुणें————हुदे० व मोक. मौ० मोरगाऊ गणेश बिन मल्हारी भगत मोरया मालूम केले "आपणास इनाम" (अपूर्ण).

सं. २ पृ. ७२ }  सु. १०४७ }      (५२६) कौल. फा. मु. सी.      { श. १५६८ { इ. १६४६-४७

अजर० हुसेन अलीखान मोका० कस० पावस— विश्वनाथ जोसी कसबे पावस तुम्हा आगरवाडा कसबे मज० आहे. त्यासी जोइसी म्हणोन तकसीम माफ असें. पूर्वीप्रमाणें तुसे हक चालवूं.

हेरास स. }  इ. ? }      (५२७)      { श. १५६८ { इ. १६४६

मदुऱ्याच्या नायकानें गोंवळकोंड्याचें सैन्य बोलाविलें. या वेळीं विजापुरकरांशीं युद्ध सुरू नव्हतें.

इं. फॅ. ८ पृ. १२७ }  इ. }      (५२८) अहमदाबाद-सुरत      { श. १५६९ वैशाख शु. १० { इ. १६४७ मे ४

शाइस्तेखानाचा जुलूम—शाइस्तेखान (गुजराथचा सुभेदार) निरपराध्यांवर जुलूम व गरिबांची नागवण करितो. दरोडेखोरांना आश्रय मिळतो अशा सबबीवर बहुतें ओस पाडतो.

सा. ले. १२०; स. पृ. १११ } (५२९) { श. १५६९ आषाढ व. १२
सु. १०४८ जमार २६ } खुा म. मु. व सी. { इ. १६४७ जुलै ११

अजर० रा० सिवाजी राजे———कार० व देसमु० पर० पुणे

माहादेव मुद्गल पुरंदरे याचा, मलिक अंबर व महाराज साहेब (शहाजी) यांच्या पत्राप्रमाणें पर्वती, पिंपरी, पिंपळेसौदागर या गांवीं इनाम चालू आहे. हाली दादाजी कोंडदेव यास देवाज्ञा झाली म्हणून कारकून ताजा खुर्दखताचे उजूर करितात असें समजतें. तरी तसें न करितां पुरंदरे याचा इनाम त्याजकडे पूर्वीप्रमाणें चालविणें.

स. पृ. ७१ ले. १६ } (५३०) { श. १५६९ भाद्र. शु. ५
सु. १०४८ श. } इनामपत्र { इ. १६४७ आगष्ट २४

देसाई, देशपांडे, कृष्णापा——— मावीमट सिंहासनाधीश्वर चिक शांत देवरु

साल गुदस्त आमचे प्रांत दंडाराजपूर सिदी अंबर यास दिले. त्याजकडून सिद्दीसाद मुलुखाचे हवालदारीस आला. तुमचे गुरु हिरेसांत स्वामी यांस कपटानें धरून जिंदगी घेऊन मारहाण करितां मेले. सिद्दीसादानें मठ तुमचे हवालीं केला. मठाची डागडुजी करीत असतां प्रांत राजपुरी आदम सो॰ यास मोकरर जाहला. त्यांनीं ठिकठिकाणचे गुरु व पाटील आणवून लावणी वगैरेचा वाद तोडून पूर्वीचे वतन ठराव करून दिल्हे.

खं. २० ले. ८७ } (५३१) { श. १५६९ आश्विन शु. ६
सु. १०४८ रमण } कौलनामा फा. मु. मज. सी. { इ. १६४७ सप्टें० २४

अज० दि० पर० वाई——विठोजी सुदामजी पाटणा पर० मज०

विठोजी व सिवाजी पाटणा यांमध्यें पाटणेपणाचें भांडण लागले असतां निवाडा केला कीं, विठोजीच्या दोन तक्सीमा व सिवाजीची एक. तरी त्याप्रमाणें वागणें.

शि. प्र. पृ. ११ } (५३२) { श. १५६९ आश्विन व. १
सु. १०४८ रम १५ } ताकीदपत्र फा. मु. { इ. १६४७ आक्टो. ४

गोविंद नरसिंह बा देसमुख तर्फ वालवा——मोक० मौ० नागठाणे (वाळवे).
उपाधे यास अभिषेक बा १ होन दरसालप्राा आदा करणें.

सा. ले. २८ } (५३३) { श. १५६९ आश्विन व. १२
सु. १०४८ रम २६ } { इ. १६४७ आक्टो. १५

?———मोक० मौ० परवती पर० पुणें

विनायकभट ठकार सो॰ पुणें यास ११ गावांची ज्योतिष कुळकर्णाची मिरास आहे. ९ गांवें मुतालिक ठेऊन करतो. २ गांवें पुण्याचा देसकु० हरकत करून स्वतः करतो. दोहोंपैकी १ गांव त्याचे हवाला जाले. दुसरें होत नाहीं. तरी दुसरें परवती त्याचे हवाला करणें.

खं. २० ले. २३७ } (५३४) { श. १५६९ आश्विन व. १२
सु. १०४८ रम २६ } खुर्दखत शु. व सी. 'प्रतिपचंद्र' { इ. १६४७ आक्टो. १५

अजर. रा. सिवाजी राजे—— कार. ता कडेपटार पा पुणे......

दरीविले गणेशभट बिन मल्हारीभट भगत मोरया हुजूर......जे आपणास इनाम जमीन चावर निमे ॥ दरसवाद मौजे मोरगौ ता मा देखील नख्तयाती व महसूल बा फर्मान हुमायूनु व खुर्दखत वजीरानि कारकीर्दी दर कारकीर्दी व बा खुर्दखत माहाराज साहेबु व सनद सुभा ता सालगुदस्ता सन सबा चालिले आहे. साल मा कारणे दादाजी कोंडदेऊ सुभेदार यासी देवाम्ना जाली. म्हणउनु माहाली कारकुनु ताज्या खुर्दखताचा उजूर करिताति. दरींबाब सरंजाम होए मालूम जाले. गणेशभट बिन मल्हारीभट भगवत मोरया यासि इनाम जमीन......कारकीर्दी दरकारकीर्दी चालिले असेल तेणेप्रमाणे मनासि आणउनु दुमाले करणे. दरहरसाल..................ताकीद............मोर्तब सुद

सा. ले. ३० } (५३५) { श. १५६९ आश्विन व. १२
सु. १०४८ रम. २६ } { इ. १६४७ आक्टो. १५

सिवाजी राजे———— सिदी अंबर हवाल. व कार. पर. पुणें

हातरोख्याप्रमाणें ( ले. ५३३ ) वागणें.

सा. ले. ९७ } (५३६) { श. १५६९ कार्तिक शु. १
सु. १०४८ श. } { इ. १६४७ आक्टो. १८

सेटे, माहाजन व समस्त कसबे लोहगाऊ—— विष्णु सोनार

तूं म्हणो लागलास "कस. मज. घर बांधावयास मोर्ई नाहीं. देणे." तरी दिघली आहे.

सा. ले. २९ } (५३७) { श. १५६९ कार्तिक व. ५
सु. १०४८ सवाल १९ } चिठी फा. मु. व सी. { इ. १६४७ नोव्हें. ७

अज दि. पर. पुणा—— हुदे. व मोक. व रया मौ. परवती

हातरोखा क २६ रम. प्रमाणे अमल करणें. ( ले. ५३३ पहा. )

खं. १५ ले. ८५ } (५३८) { श. १५६९ पौष शु. १
सु. १०४८ जिल्काद २९ } खुर्दखत शु. व सी. { इ. १६४७ डिसें. १६

अजर. सिदी अजम सिदी मुखार———— कार. सा निंब पर. वाई

गोविंदगीर मुरीदे कमलनयन गोसावी याचा निंबमधील इनाम पूर्वीप्रमाणें चालविणें.

शि. म्यु. फार. हस्त ६६०० } (५३९) { श. १५६९ (?) पौष शु. ७ नंतर
पृ. २९ } { इ. १६४७ डिसें. २३

अब्दुल्ला कुतुबशहा (गोवळकोंडे)

हाजी नसीरा (कुतुबाचा विजापूरदरबारांतला वकील)

**शहाजी भोसल्याकडून** आम्हांस ६ जिल्हेज (२३ डिसें. १६४७) रोजीं "मला तुमच्या आश्रयाखालीं घ्या" अशा अर्थाचें पत्र आलें आहे. पण शहाजीची या वेळची व या पूर्वीचीही अनेक वेळची विनंति आम्हीं अमान्य केली व आदिलशहाच्या नोकरींत रहा असें त्याला कळविलें आहे. (मॉ. ४६ पृ. १२)

शि. ले. १२१ } (५४०) { श. १५६९ पौष व. ७
मु. १०४८ जिल्हेज २० } खुर्दखत म. मु. व सी. { इ. १६४८ जाने. ६

अजर. रा. **सिवाजी राजे** ----- कार. व देसमु. पर. पुणें

माहादभट मुद्गल पुरंदरे यांस महाराजसाहेबांचे खुर्दखताप्रमाणें परवती येथें इनाम चालत आहे. दरम्यान ते वाराणसीस गेले होते याकरितां सेत नाकीर्दी पडिले. हाली ते परत आले व कीर्दी जाले आहे. तरी त्यांचे सेत त्यांचे हुमाला करणें.

सा. ले. २१८ } (५४१) { श. १५६९
फ. १०५७ मु. १०४८ } कतबा म. फा. मु. सी. { इ. १६४७-४८

सोनप्रभू, दत्तदेव, गणेश प्रभू व त्रिंबकदेव लिहून दिधला ऐसाः--चिंतामणी शुक्र जुनारदार हा हवालदार निंबक जाऊन फिर्यादी जाला "कारकीर्दी **मलिक अंबर** गंगा अर्ध्य व गायमुख अमानत व जमा जाले. हाली धर्माधिकारणी कमाविस करतातां. तहकीक केले पाहिजे. तेव्हा माहाली कारकुनी आपणास बाजपुसी केली. तरी गंगाअर्ध्य व गायमुख हे आपला मिरासी. कारकीर्दी मलिक अंबर अमानत व जमा केलें. आपण वजीराचे बंदगीस उभे राहून महालास **ताजेखान** याजकडे खुर्दखत आणिलें. त्याप्रमाणें आपले हुमाला केले. त्याउपरि गेला सिंहस्त निमे कमावीस **स्वाहू भोसला** व **निमे अमल पातस्याही दिघले**. तरी मिरासी आपली आहे.

खं. २० ले. १७० व १७१ } (५४२=४८० अ) { श. १५६४?
? } { इ. १६४२?

सन समानामधें नरसीहभट ढोल यानें हुजूर मालूम केलें कीं, इनाम तजेगिरीनें करून घेतली आहेत ते असामत करणें. त्यावरून कारकुनानीं इनामतीचा महसूल अनामत केला. त्यावर आपण हुजूर येऊन अर्ज करावें तरी **साहेब मोहीमसीर होते.** यावयासी फुरसती नव्हेचि. पा वाई साहेबास मुकासा अर्जानी जाहल्यापासून १० सालें जाली. कांहीं इस्कील नाहीं. नरसीहभटामधें व आपणामधें महजराबदल भांडण आहे

त्यावरअकडे साहेबापाशी त्यायणी गैरयात बोलला. आम्ही आपलाल्या महजबे खुदाय तालाची बंदगी करून साहेबास दुवा देत असतो. मालूम जाले. चालवीजे पा हुजर खाने अजम अफजलखान.

सर. मंदीर
सु. १०४८

(५४३)

श. १५६९
इ. १६४७-४८

तेरीज रकमाला-कारकीर्द महाराज छत्रपती सीवाजी राजे तो हवेली तलब किले सरसगड येथील सुमारें १३ गांवच्या जमाबंदी प्रकरणीचा तखा.

खं. २० ले. ५५
सु. १०४९ रजब २२

(५४४)

श. १५७० श्रावण व. ९
इ. १६४८ आगष्ट २

इदलशाही कारकीर्दीत मिया रहीम महमद किलेदार ठाणे शिरवल यानें मौजे न्हावी व खंडाळे येथें मसाहाती करून वाजंट जमीन बाद करण्यावद्दल मोकदमाच्या नांवें कौल दिला.

सा. ले. ३१
सु. १०४९ साबान १५

(५४५)
इनामपत्र प्रतिप. मु. व म.

श. १५७० माद्र. व. २
इ. १६४८ आगष्ट २५

अजर. रा. सिवाजीराजे —बजा. कार. व देशमु. पा पुणें.

विनायक रामकृष्ण ठकार यास मौजे सूस कर्याती मावळ पा पुणें हा गांव कुळबाव खेरीज ठाणे इनाम दिला असे. मोर्त. (मर्या.) रुजुसुरु.

इं. फॅ ८ पृ. २१५
इ.

(५४६)
मद्रास-इंग्लंड

श. १५७० आश्विन व. २
इ. १६४८ सप्टें २३

ह्या मुलखाची अवस्था अत्यंत बिकट होत चालली आहे. गोवळकोंडेकर व विजापूरकर यांचीं सैन्यें परस्परांपासून २ दिवसांच्या मुक्कामावर राहून देश उध्वस्त करीत आहेत. एकमेकांचा पाडाव करण्याकरितां त्यांच्यांत चुरस असली तरी या भिकार आणि यादवीनें मरलेल्या देशाचे एकसारखे लचकेच तुटत आहेत. विजापुरी सैन्याबरोबर तर ८००० लुटारू नेहमीं सज्ज असतात. त्यांना पगार नसून ते आपली उपजीविका लुटीवरच करतात. सर्व मुलख त्यामुळें ओसाड पडत आहे. विशेषेंकरून टेंवेनापट्टण, पोर्टोनोव्हो व पॉंडेचरी यांची फारच दुर्दशा आहे. शेवटचीं दोन बहुतेक रसातळास गेलीं आहेत. टेंवेनापट्टण मात्र त्यांस नजर वगैरे देऊन थोडेसें जीव धरून राहिलें आहे.

इं. फॅ ८
पृ. २५१ इ.

(५४७)

श. १५७० पौष व. १२
इ. १६४९ जाने. ३१

खाली मरीन—— ?

राजापूर बंदर मुस्तफाखानाकडे होतें. तो मरण पावल्यामुळें त्याची जहागीर

( आदिलशहा ) राजाच्या ताब्यांत आली; या गडबडींत राजापूरचा सुभेदार **महमद कासम** यानें जबरदस्तीनें इंग्रजी व्यापाऱ्यांची वखार उघडून तेथील कापड राजाकडे नेलें. याबद्दल आमचा दलाल वेणिदास यास पाठवून व दरबारांतील वजनदार उमराव इखलासखान यास पत्र लिहून आम्ही आदिलशहाकडे दाद मागितली आहे. वेणिदासानें **बेगम**च्या कानावर आमचा मजकूर घातला आहे.

हेरासस्संग्रह }
इ. }
(५४८)
पोर्तुगीज
{ श. १५७०
{ इ. १६४८

विजापूरकर, (गोवळकोंडेकर व विजयनगरकर यांविरुद्ध) तिरुमलाची बाजू उचलून १७ हजार सैन्यानिशी युद्धांत सामील झाले. विजापूरचे सैन्यानें **जिंजी** घेतली. **खानखानान** या हबशी सेनापतीची नेमणूक विजापूरचे सैन्यावर ( मुरतफाखानाचे मृत्यूनंतर) झाली.

हेराससंग्रह }
इ. }
(५४९)
पोर्तुगीज
{ श. १५७०
{ इ. १६४८

खानखानाला परत बोलाविलें तेव्हां **औरंगानें** आपलें साम्राज्य दृढ करण्याचा प्रयत्न केला.

प्रभात ले. १ हि. १०५९ }
जुलूस २२ रबल १० }
(५५०)
फर्मान
{ श. १५७१ चैत्र शु. ११
{ इ. १६४९ मार्च १४

मुरादबक्ष—**शिवाजी भोसले.**

तुम्ही खातरजमेचें पत्र आल्यानंतर हुजूर येतो म्हणून लिहिलें. ऐसियास वकील अगोदर पाठवणें म्हणजे खातरजमेचें पत्र पंजासहित पाठविण्यात येईल. [ तुगरा मुरादबक्षाचा; निशाण अबदुल लतीफ याचें ] [दिल्लीपतीचा पत्रव्यवहार]

खं. १५ ले. ४३७ }
सु. १०५० जखर ६ }
(५५१)
खुर्दखत प्रतिप. मु. व सी.
{ श. १५७१ अ. आषाढ शु. ७
{ इ. १६४९ जून ७

अजर **सिवाजीराजे**—कार. व देश. प्रा चाकण

मुरारिभट ब्रह्मे सोम चाकण याचे नांवे इनाम व रोजमुरा व तेल चाकण व इंदोरी येथें चालत आहे. **हाली पर० चाकण साहेबा अर्जानी** जाला आहे. सन **तिसा तागायत** तश्रफाती व भोगवटा चालिला असे तेणेप्रमाणें कृष्णभट बिन मुरारिभट ब्रह्मे यास चालविणें. मर्या. रुजुसुरु. सुरुसूद.

खं. २० ले. ८८ }
विरोधी संव. }
(५५२)
मान्यतापत्र
{ श. १५७१ अ. आषाढ व. ५
{ इ. १६४९ जून १८ ?

अकोजी व येकोजी (वाई चित्राव)— — अऊभट व शंकरभट

पसरणीच्या इनामाच्या मांडणाबावत अहमदखान सांगतील तेथें निर्णयासाठीं जाऊं.

सं. २० ले. ८९ } (५५३) { श. १५७१ अ. आषाढ व. ५
सु. १०५० जखर१८ } दुमाला पत्र फा.मज. व मु.सी. { इ. १६४९ जून १९

अजर. अफझलखान महमदशाही——कार० व देशमुख पर० वाई

पर० वाई साहेबास मोकासा मिव्हाला. रंगभट चित्राव मेला त्याचे १० होन (धर्मादायाचे) मुलगा नरसिंह यास चालवावें.

सं. २० ले. ९० } (५५४) { श. १५७१ अ. आषाढ व.७
सु. १०५० जखर २० } खुर्दखत फा. मु. मज. सी. { इ. १६४९ जून २१

अजर. अफजलखान महमदशाही—— कार. व देस. पर. वाई

आमण क्षीरसागर यास देवके येथें इनाम आहे. तो चालविणें. हाली मुकासा अर्जानी जाला.

सं. २० ले. २४१ } (५५५) { श. १५७१ आषा. शु. ३
सु. १०५० रजब १ } खुर्दखत प्रतिप. मुद्रा. सी { इ. १६४९ जुलै २

अजर. सिवाजी राजे—— कारकून व देशमुख पा पुणे.

माहादाजी गोसावी सो मोरेश्वर याचा इनाम पूर्वीप्रमाणें चालविणें............

सा. ले. १५२ } (५५६) { श. १५७१ आषा. व. ८
सु. १०५० रजब २० } { इ. १६४९ जुलै २१

अजर. सिवाजी राजे—— कार. देशमु. व देशपां. प्रा सुपे

हाली पर. सुपे साहेबास मुकासा अर्जानी जाला आहे. गणो तिमाजीनें माहादाजी गोसावी यास दिल्हेले सुपे येथील इनाम माहादाजीकडे चालविणें...पा हुजूर

सा. ले. २३२ व ऋ.३ ले. १४ } (५५७) { श. १५७१ आषाढ शु.
(खं. १५ ले. ३३८) } तलब फा. सी. { इ. १६४९ जुलै

अफजलखान महमदशाही—— कानोजी जेधा

चंद्रराऊ कदीम मयत जालियावरि गैरी लोकी पैस करून बलकाविले आहे. याबदल त्यावरी नामजादी केली आहे. येसियास तुम्ही दौलतखाह. तुम्ही इसम लोक मेलउनु आपले तर्फेनें सुरू करणें. मुलाहिजा न करणे. याच कामावरून तुमची सरफराजी आहे. कागद पावताच सुरू करून खबर लिहिणें.

खं. १५ ले. ३३८ } (५५८) { श. १५७१ आषाढ व. ९
पै. छ २४ रजब } 'प्रतिपचंद्र' मु. व सी. { इ. १६४९ जुलै २२

राजश्री सिवाजी राजे———कान्होजी जेधे तपे भोर किले रोहिडा.

तुम्ही पत्रिका लिहिली की खान अलीशान खान अजम येही लिहिले आहे की आवली वरी सुरू केले आहे, तुम्ही आपले जमेतीसी सिताब येणे. तरी तुमचा व त्यांचा पहिलेपासून घरोबा आहे, गेले तरी पाहिजे. आमा खासा अगर पुत्र पाठवावयाचे आले तरी त्याचा बोलभाक बरवे रीती घेउनु मग जाणे. दगा होये ऐसे न करणे. एक भले माणूस दरम्यान देउनू मग जाणे. तुमचे नजरेसी पडत असिले की खासाच जावे जरी तुमचे मन वार देत नसिले तरी कौल बौल घेउनु पुत्रावरावरी लोक देउनु पाठविजे. हरयेक बहाणा करुनु तुम्ही राहणे. दोन्ही गोस्टी तुम्हास लिहिल्या आहेती. यात तुम्ही स्याहाणे असा बहुत लिहिणे नलगे (खं. १५ ले. ३२४, ३२५; सा. ले. २३२ -वरून काल अनुमानिला आहे.

सा. ले. १५३ } (५५९) { श. १५७१ आषाढ व. १४
सु. १०५० रजब २७ } फा. मु. सी. { इ. १६४९ जुलै २८

अज दि. पर. पुणा—— मोक. व रया. मौ. मोरगाऊ

माहादाजी गोसावी याचा इनाम पूर्वीप्रमाणे चालू ठेवणें.

खं. १५ ले. ३३४ } (५६०) { श. १५७१ श्रावण शु. १
सु. १०५०(खं. १५ले. ३३८) } कौल फा. मु. मज. सी. { इ. १६४९ जुलै ३०

अजर. अफजलखान महमदशाही—— कान्होजी जेधा

तुमचे बाबे तिमाजी व त्रिंबक पंडित यांनीं लिहिलें. तरी जे जमायत असेल ते घेऊन येणें. ५० घोडियाचे सरदारगी तुम्हासी दिधले असे. सरंजाम देऊं. पाईचे खलक आणाल त्यास चाकर ठेऊ व अहिसरी देऊ. शक अंदेशा न करणें.

खं. १५ ले. ३३६ } (५६१) { श. १५७१ श्रावण शु. ४
? रजब ३ } तलब फा. मु. सी. { इ. १६४९ आगस्ट २

त्रिंबक कान्हो हवालदार—— कान्होजी नाईक देसमुख

खान अजम साहेबाचा कौल पाठविला असे. तरी जमेत घेऊन सिताब येणें. येथे खर्चाचे सरंजामी होईल. आम्ही तायधायाहून स्वार होऊन गेलो.

सा. ले. ३२ } (५६२) { श. १५७१ श्रावण शु. १३
सु. १०५० ब श. } परवाना { इ. १६४९ आगस्ट १०

मल्हारजी आपाजी देसवंतराऊ देसमु. पर. सिरवल— अनाजी नामाजी

अनाजीनें सांगितलें कीं "आपण रामाजी विठल देसकु. पर. सिरवल यासी शरीरसंबंध केला. तेव्हा विजापूर सोडून शिरवळात रामाजीच्या जागेत घर बांधून राहिलो होतो. शहाजी राजे धरिले. त्याचा लेक सिवाजी पुरंधरी बैसोनु

दिवाण नामजादीसी झगडो लागले. सर सुमेदार फत्याखान तिही शिरवलास फाजीलखाशा व आशाफशा पाठविले. तिही कोट पर. मज. घलाविला. त्यावरी पुरंधरीहून सिवाजी राजे धाविनले. झगडा जाला. ते वस्ती आपले घर जळाले.' त्यावरून त्यास मध्यभागी घर बांधण्यास जागा दिली.

प्रभात- दिल्लीपत्र. ले. २ } (५६३) { श. १५७१ श्रावण व. २
हि. १०५९ जुलुस २२ साबान १५ } फर्मान { इ. १६४९ आगस्ट १४

मुरादबक्ष—— शिवाजी भोसले.

तुमचे वडिलांच्या गोष्टी मनास न आणिता तुम्हां सर्वांवर संतोष आहे. तुम्ही हुजूर यावें म्हणजे पांच हजारी मनसब व बहुत इनाम तुम्हास मिळेल व तुमचे भाऊबंदांपैकी जे समागमें येतील त्यास नोकरी देतां येईल यास्तव खातरजमेनें यावें. हें पंजाचें निशाण जाहालें आहे. [तुगरा शाहाजहानचा मुरादबक्षाचा. निशाण मुनशी अबदुल लतीफ.]

सा. ले. २३४ } (५६४) { श.१५७१ भाद्र.शु.११ नंतर
(सं. १५ ले. ३३४-३३८) } स्मरणचिठी फा. मु. सी. { इ. १६४९ सप्टें.

अफजलखान महमदशाही—— कान्होजी जेधा देशमुख

तुमचे हेजिब जोहर खोरियाची मिसेली घेऊन गेले. हनोज तुम्ही जोहर काबीज केले नाहीं. आम्हीही चांद जालियावरी वाईस येतो. तुम्ही सिताब जोहर काबीज करून हणमतरायास उठविणें.

सं. १५ ले. ३३५ } (५६५) { श. १५७१ भाद्र. शु. १२
सु. १०५० रम ९ } मिसेली फा. मु. मज. सी. { इ. १६४९ सप्टें. ७

अजर. अफजलखान महमदशाही— कार. पर. वाई

जोहरखोरे हणमतराऊ काबीज आहेत. हाली कान्होजी जेधे यास दिघले आहे. ते खासा काबीज करतील. त्यास मुकासा दिला आहे.

चै. व. २ पृ. ६० } (५६६) { श. १५७१ भाद्रपद शु. १२
सु. १०४९ हि.१०५९ रम ९ } फर्मान फा. मु. सी. { इ. १६४९ सप्टें. ७

बादशहा (विजापूरचा)—— अमलदार, देसाई पर० पुणें

मोरोबा गोसावी यांजकडील इनाम निजामशाही फर्मान व महाराज फर्जंद शाहाजी भोसले यांचे खुर्दखत यांत लिहिल्याप्रमाणें चालू ठेवणें.

सा. ले. २३३ } (५६७) { श. १५७१ भाद्रपद व. ७
(खं. १५ ले. ३३४-३३५) } कौल फा. मु. सी. { इ. १६४९ सप्टें. १८

अफजलखान माहामदशाही—कान्होजी जेधा

तुम्ही अरिजा पाठविला. तुमचे हेजीव आबाजीपंत येही मालूम केलें कीं "हणमंतरायें कार्बाज केलें, तें आपणास दिधलिया कार्बाज करून देईन; व जाऊ-ळींची मसलत करीन. तेथलि दोनिसे लोकाची नाइकी देविली पाहिजे. वेलग आपले पाटिलकीचा गाव; त्या गांवीचे लोक चाकरीस ठेवीन." येसियास जोहरची मिसेली पाठविली आहे. तेच जागा खासा राहणें. जाउलीची नाईकी दोशा लोकाची तुम्हास देऊं. वेलंगचे बावे वाईचे लोक चाकर ठेऊं. गुन्हा माफ आहे.

स. १०४ } (५६८) { श. १५७१ आश्विन शु. १२
मु. १०५० सवाल १० } सुदे खत { इ. १६४९ आक्टो. ७

अजर० महा० रा० शहाजी राजे—कार० व० देशमुख पर० राणेबेन्नूर
मुल्ला हुसेन याचा १ चावर इनाम चालविणें.

खं. २० ले. २४३ } (५६९) { श. १५७१ आश्विन शु. १४
मु. १०५० सवाल१२ } खुर्दखत म. मु. व सी. { इ. १६४९ आक्टो. ९

अजर. सिवाजी राजे — कार. व देसमु. पा पुणें
माहादाजी गोसावी मोरेश्वर इनामदार ( ले. ५५५ प्रमाणें )

खं. २० ले. २४२ } (५७०) { श. १५७१ आश्विन शु. १४
मु. १०५० सवाल १२ } खुर्दखत म. मु. व सी. { इ. १६४९ आक्टो. ९

अजर रा. सिवाजी राजे — कार. व देसमु. पा पुणे.
माहादाजी गोसावी याचा मौ. मोरगाव येथील इनाम हकाहुद्दा पूर्वीप्रमाणें चालविणें.

सा. ले. ४१ पृ. ७०-६१ } (५७१) { श. १५७१ आश्वीन व. ५
श. व मु. १०५० } पोटपत्र { इ. १६४९ आक्टो. १५

सुपे सुपचीं मोकदमी काटकर यांची [श. १५५१] दुकाळात त्यांनीं त्यातील निमी गोदगावडा धनगर यास दिली नंतर मंबाजीराजे मोकासदार जाले. काटकरांनीं गरिबी-मुळें आपल्या तक्सीमेपैकीं निमी निळकंठराव यास विकली. गोदवाड्याच्या हातूनही उगवणी होईना म्हणून तो पळाला. तेव्हां त्याचे जामीन शामराज काटे यांनीं त्याची मोकदमी चालविली. पुढें अतसखानास मुकासा मिळाला व गोदगावड्यानें आपली मोकदमी सोडविली. नंतर सर्जाराव सुपेकर मोकाशाचे काम करूं लागले. त्यावर २ वर्षांनीं कोंढाण्यावर नामजादी आली. त्यावेळीं गावाची लूट व जाळपोळ झाली. नंतर राजेश्री

-राजे यांहीं गाऊं कबजा केला. नंतर पाचा मुकाशा माहाराज माहादाजी राजे यांस मिळाला. त्यांनीं सुपे पाचा मुकाशा निळकंठराव यास दिला. शेट्यी सुपे पाचीं मोकदमी निळकंठराव काटकर व गोदगावढा यांनीं मान वांटून घेतली.

| | | |
|---|---|---|
| शि. प्र. वृ. १०० ले. २३<br>सु. १०५० जिल्काद १५ | (५७२)<br>सर्दस्त फा. मु. सी. | श. १५७१ कार्तिक व. १<br>इ. १६४९ नोवें. १० |

रा. संभोजी राजे घोरपडे — रा. नारो रुद्र हवाले तपे वालने

संमत उपाध्ये यांस नागनाथाचे अभिषेखाबदल १ होन पूर्वीप्रमाणें चालविणें.

| | | |
|---|---|---|
| सा. ले. ४१ पृ. ६० <br>श. व सु. १०५० | (५७३)<br>महजर | श. १५७१ मार्ग. शु. १<br>इ. १६४९ नोवें. २४ |

माहादाजी निळकंठराव काटकर व गोदगावढा यामध्यें सुपे पाच्या मोकदमीची सारखी वाटणी केली आहे. (पहा, ले. ५७१)

| | | |
|---|---|---|
| सं. ८ व प्रभात ले. ३<br>हि. १०५९ जिल्हेज ५ | (५७४)<br>फारसीचें भाषांतर | श. १५७१ मार्ग. शु. ७<br>इ. १६४९ नोव्हें. ३० |

मुरादबक्ष———— शाहाजी भोसले

तुमचे पुत्र शिवाजी यांनीं अर्जदास्त हुजूर येण्याविशीं पाठविली ती पावली. पेशजीच्या गोष्टी मनांत न आणितां तुमची मोकळीक करण्याविषयीं लिहिलें आहे. त्यास हालीं आम्ही दिल्लीकडे जात आहों. परंतु तुम्हास खुष खबर देतों कीं, तुम्ही सर्व प्रकारें खातरजमा ठेवावी. आम्ही हुजूर पावलियावरी तुमचे मजकुराविषयीं अर्ज करून बंदोबस्त करून देऊं. तुम्ही आपला एक वकील इतबारी पाठवून द्यावा. त्यासमागमें फर्मान पंजाचे पाठविण्यांत येईल. तुमचे चिरंजीव संभाजी वगैरे सरकारकृपेस पात्र होऊन पेसजीप्रों मनसबा व नूतन सर्फराज पावतील. इकडील स्नेहांत व लक्षांत वागणें हें आपलें सर्व मनोरथ पूर्ण करून घेण्यास कारण आहे. म्हणोन तसे वागोन खातरजमा ठेवावी. तुम्हाकरितां पोषाख पाठविला हा घेऊन आपणावर पूर्ण लोभ आहे असें मनांत आणावें.

| | | |
|---|---|---|
| सं. ८ प्रभात ले. ४<br>हि. १०५९ जिल्हेज५ | (५७५)<br>फारशीचें भाषांतर. | श. १५७१ मार्ग शु. ७<br>इ. १६४९ नोव्हें. ३० |

मुरादबक्ष— शिवाजी भोसले

तुमचें पत्र राघोपंत याजबरोबर पाठविलें तें पावलें. जुन्नर व अहमदनगर येथील देशमुखीविषयीं लिहिलें त्यास आम्ही हुजूर गेल्यानंतर हा मजकोर घडोन येईल. खातरजमा ठेवावी. आपणाकडील एक वकील पाठवून द्यावा. मजकूर समजून घेऊन अमलांत येईल. वकीलास जो मजकूर विचारूं त्याचें उत्तर द्यावें. म्हणजे काम होण्यास दिरंग लागणार नाहीं. जाणोन उद्योग करावा व लोभ पूर्ण जाणावा.

स. पृ. ११२ ले. २ }
मु. १०५० जिल्हेज १० } (५७६) खुदर्खत { श. १५७१ मार्ग. शु.१२. इ. १६४९ डिसें. ५

अजर० सिवाजी राजे—कार० व देशमुख प्रा पुणें
नारायण त्रिमल दीक्षित यांस चाणेरे हें गांव इकासह इनाम आहे.

खं. २० ले. २०९ }
मु. १०५० जिल्हेज १२ } (५७७) खुर्दखत ( फा. मु. सी. ) { श. १५७१ मार्ग. शु. १४. इ. १६४९ डिसें. ७

अजर० शर्जा मलिक रेहान—कार० व देशमु. मौ. करकंब
नरसीह नारायण याचा गुलसरे येथील इनाम चौकशी करून त्याकडे चालविणें.

शि. प्र. पृ. १०० ले.२४ }
सु. १०५० जिल्हेज १३ } (५७८) खुर्दखत फा. मु. म. मज सी. { श. १५७१ मार्ग. शु. १५. इ. १६४९ डिसें. ८

?—कार० व देसमुख तपे वालवा. (ले. ४८६ प्रमाणें )

खं. २० ले. १२ }
सु. १०५० मोहर १० } (५७९) खुर्दखत. फा. सी. { श. १५७१ पौष शु. ११. इ. १६५० जाने. ३

अजर. माहा. रा. शाहाजी राजे——— कार. पर. सुपें
क. सुपें येथील चांमाराकडून वहिवाटीप्रमाणें पायपोसाच्या रूपानें सारा घ्यावा व सुपे व बारामती येथील सरमेहेतरीबद्दल दोन वर्षांत ७५ होन घ्यावे. परवा. हैदरशा

खं. २० ले. २४० }
सु. १०५० मोहर २३ ? } (५८०) उल्लेख. { श. १५७१ पौष. व. ९ इ. १६५० जाने. १६

माहादाजी गोसावी ( मोरेश्वर ) याचा इनाम चालविणें परवा० अजम हैदरशा.

शि. प्र. पृ. १०१ ले. २५ }
सु. १०५० सफर १३ } (५८१) { श. १५७१ माघ शु. १४ इ. १६५० फेब्रु. ५

नारायण रुद्र हवाले देसमुखी तपे वालवे— आऊजी रैया पालक कस. मज.
नागनाथाचे अभिसेखाबदल संभट उपाध्ये यास १ होन व ०॥ देणें.

खं. १५ ले. ८८ }
सु. १०५० सफर २३ } (५८२) हुजती. फा. मु. मज. सी. { श. १५७१ माघ व. १०. इ. १६५० फेब्रु. १५

अज दि. पर. वाई——— मोक. मौ. गोवे
मौ. गोवे येथे कालवा पाणियाचा धरला आहे. त्यास आठ रोजास सारोन पाणी घेणें.

सा. ले. ३३ } (५८३) { श. १५७१ फाल्गुन शु. ७
शु. १०५० रजब ५ } कौलनामा फा. मु. व सी. { इ. १६५० फेब्रु. २७

अज दि. ठाणे पर. सिरवल— आली बिन मनाजी दिवटा चाकर ठाणे पर. मार

गुसा (दिवट्याचा) वडील माझ्या भोलीव नांदत होता. त्यानें ती जागा मुला महामदाच्या कारकीर्दीस टाकली. पुढें जायणापंताचे वेळेस ही जागा देशकुलकर्णास दिली. त्यानंतर त्यांच्या यारिदियास (= मुतालिकास) ती जागा दिली. त्यावर गलबला जाला. तेव्हां तोहि जागा सोडून गेला. ती जागा आनंदरावास मिरास करून दिली. यासाठीं तुला (दिवट्यास) दुसरी जागा दिली.

सं. २० ले. २३९ } (५८४) { श. १५७१
शा. १ संप. व हि. १०५९ } { इ. १६४९

मुद्दल रद्द देसकुल. पाटेपेटगी वगैरे—— महादेव मल्हार.

तुम्हीं माझी वृत्ति मला मिळवून दिली यावद्दल पांच परगण्यांतील माझे देसकुलकर्ण व चिटणिशीची यारिदी तुम्हास दिली.

स. पृ. १०५ ले. ८ } (५८५) { श. १५७१
शु. १०५० } { इ. १६४९

अजर. शिवाजी राजे—— कार. व देशमु. प्रो पुणें.

मारेश्वर गोसावी याचे पणदरे येथील इनाम चालविणें. हाली पणदरे माहाराजास मुकासा मिळाला.

सा. ले. २९९ } (५८६) { श. १५७१
१ फ. १०५९ } फा. मु. सी. { इ. १६४९

बिहुजूर हाकीम शरा व ठाणे गुलशनाबाद (नाशीक) सोनप्रभु व दतदेऊ हा नाशिकचा धर्माधिकरणी व मुळे जोसी आहे. जान एक यानें मालेराव सोनाराच्या मुलीच्या लग्नाचे वेळीं हरकत केली ती खोटी ठरली.

स. पृ. १०७ ले. १० } (५८७) { श. १५७१
(सा. ले. ४१) १ } उल्लेख { इ. १६४९

परवाना वमोहर राजेश्री संभाजी राजे भोसले उमराव— बनाम महादो लक्ष्मीदत्त. हरि विष्णु यतारीख दुमालपत्र वतन देसकुलकर्ण (सुपे) वाद. बहिरी नारायण खोटा केला.

कौं. इ. सा. ले. १२८ } (५८८) { श. १५७२ चैत्र शु. १०
श. } विक्रय पट { इ. १६५० एप्रिल १

बाप सुत बाब सेणवी—अंतसुत पितांबर सेणवी

मौ. बामर्डे येथील कुळकर्णाच्या खरेदी विक्रीचा व्यवहार.

खं. १५ ले. ८७ } (५८९) { श. १५७२ वैशाख व. १३
सु. १०५० जवल २६ } खुर्दखत फा. मु. मज.सी. { इ. १६५० मे १८

अजर. अफजलखान महमदशाही—— कार. व देसमु. पर. वाई

गोवे सा निंब काळव्याचे पाणी गोविंदगीर गुरीद कमलनयन याच्या मळ्यास दोन दिवस न देता पूर्वी प्रो देत जावे.

सा. ले. ३४ } (५९०) { श. १५७२ भाद्र. शु. १३
सु. १०५१ रम. ११ } फा. मु. सी. { इ. १६५० आगष्ट २९

देऊ व बाल सालवी यामध्ये दिवाणीच्या मानपानाबद्दल भांडण आहे. अग्रवाघानें रवा व पश्चिमवाघाने साउली करावी; असें ठरलें.

सा. ले. ३५ } (५९१) { श. १५७२ भाद्र. शु. १३
सु. १०५१ रम. ११ } तकीर फा. मु. सी. { इ. १६५० आगष्ट २९

तकरीर करणार देऊ सालवी कुंभार मेहतरा पर. सिरवळ

दिवाणातील मानपान आधी आपला मागून बाल सालवी याचा. रवा करीन.

सा. ले. ३६ } (५९२) { श. १५७२ भाद्र. शु. १३
सु. १०५१ रम ११ } जमान कतबा फा. मु. सी. { इ. १६५० आगष्ट २९

दाद व माल विन पीळ म्हत माइले हुजाम कस. सिरवळ

दिवाण ठाणे पर. सिरवळ

बाल सालवी याबद्दल आपण जमान असो.

खं. २० ले. ९१ } (५९३) { श. १५७२ कार्तीक शु. ७
सु. १०५१ जिल्काद ५ } मिसेली फा. मु. मज. सी. { इ. १६५० आक्टो. २१

दि. पर. वाई—— मोक. मौ. पसरणी पर. मज.

नारायण गोविंदाय चित्राव याचा पसरणी येथें ॥- चावर इनाम चालविणें.

खं. १५ ले. ८६ } (५९४) { श. १५७२ कार्तीक व. ३
सु. १०५१ जिल्काद १६ } मिसेली फा. मज.सी. { इ. १६५० नोव्हें. १

अज. दि. पर. वाई—— मोक. मौ. निंब व गोवे

९ रवलचे खुर्द. सादर जाले. त्याप्रमाणें गोविंदगिरीचा इनाम त्याचे दुंबाला करणें.

सा. ले. १२२ } (५९५) { श. १५७२ मार्ग. शु. १
सु. १०५१ जिल्काद २९ } सुर्दखत फा. सु. { इ. १६५० नोवें. १४

अजर. मा. रा. शहाजी राजे—— कार. देसमु. पा पुणें

माहाद बिन मुद्गलभट पुरंदरे सो॥ पुणें यांचे कुल इनाम अमानत न करणें अर्धे त्यांचे हवाला करणें.

रु. ३ ले. ४ } (५९६) { श. १५७२ मार्ग. शु. ९
सु. १०५१ जिल्हेज ७ } सुर्दखत { इ. १६५० नोवें. २१

महा. रा. शहाजी राजे—— कार. देशमु. पर पुणें.

मोरोबा गोसावी (चिंचवड) याचा इनाम सालगुदस्तपर्यंत चालत असतां या साली इस्तीक झाली आहे. अहमद बिन काजी सेद यानेंही असेंच सांगितलें. तरी इनाम चालू ठेवणें. **परवा.** शाहअजम हैदरशाहा.

इं. फॅ. मा. ९ } (५९७) { श. १५७२ माघ शु. १४
पृ. १२-१३ इ. } मद्रास-कंपनी { इ. १६५१ जाने. १७

**मीर**जुमलाच सर्व राज्याची व्यवस्था पहातो. राजाला मांत नाहींत इतके लोक त्यास मितात. तो राजाला दरसाल २०,००,००० पॅ. वसूल करून देतो. त्यानें सर्व कर्नाटक जिंकलें आहे. ह्याच देश आपल्याला सर्व कापड व नाना तऱ्हेचे जिनस पुरवितो. हिंदू नाईकांकडूनच वगैरे ४० लाख पॅ. वसूल होतो. त्याच्याजवळ अनेक घोडे हत्ती वगैरे असून गलबतें घेऊन तो व्यापार स्वदेशांत परदेशांतही करतो. तो इंग्रजांशीं दोस्ती कायमची करूं इच्छितो. कारण डचांबद्दल त्याचें मन बिटलें आहे.

सा. ले. १५४ } (५९८) { श. १५७२ माघ व. ४
सु. १०५१ सफर १८ } म. सी. { इ. १६५१ जाने. ३०

?— कार. तपे मोरेश्वर वगैरे

देसमु. व देसकु. व खोतपाटील यांनीं, माहादोबा गोसावी यांस पौड तर्फेच्या गावांमधून दरगांवास नक्त रुके २४ देण्याचें ठरलें आहे ते द्यावे.

खं. १७ ले. ३ } (५९९) { श. १५७२ माघ व. १३
हि. १०६१ सफर २७ } कौलनामा (फा. मज. व सी { इ. १६५१ फेब्रु. ८

अज **रणदुलाखान**— बापूजी हैबतराऊ देसमु. तपे गुंजन मावळ

२० स्वाराची जमेती घेऊन चाकरी करू ऐसी उमेद धरितां, बापूजी पंडित हुजिर पाठविले आहेती. तरी घर तुमचे आहे. अलबता येणें. आलियावरी लायख सरंजाम होईल-

सा. ले. १५५, १८० }
शु. १०५१ रवल ८ }

(६००)
'प्रतिप' व मर्या.

{ श. १५७२ फाल्गु. शु. १०
{ इ. १६५१ फेब्रु. १९

अजर. सिवाजी राजे — कारकुनानि ता हार्ये उर्फ पौड

रा माहादाजी गोसावी वस्ती मोरगौ पा पुणा यास ता माचे देसमूख व खोत पाटील गेही सालाबाद सादिलवारी खर्च पैकी दर गावास टके चौवीस व मात अदमण देत आहेती. दरम्याने दोनी साले इसकील करून देत नाही. तरी सालाबाद-प्रमाणें देत जाणें (मर्यादेयं इ.)

राम. अं. ६५ ले. ७ }
शु. १०५१ रवल! २६ }

(६०१)
वर्षासन— ता

{ श. १५७२ फाल्गु. व. १३
{ इ. १६५१ मार्च ९

अजर. मंयाजी राजे——कार. का पावस पा पुणे.

रघुनाथ विठल व महादेव तिमणभट सो येलूर यास श्रीघृशणेश्वरच्या अभिषेका-बदल ६ होन वर्षासन दिलें.

रा. ले. १९० }
शु. १०५१ }

(६०२)
राजीनामा

{ श. १५७२
{ इ. १६५०

वाघोजी — सिदोराम तरफदार, व माहादाजी राम देसकु. पा सिरवल.

सिरवळच्या जमिनीच्या दोन तर्फा, पैकी नागोजीची तरफ मोठी व आपली लहान ाली. गोतानें बराबर दो तरफा करण्याचा निकाल दिला त्यास आपण राजी आहों.

१५ ले. ८९ }
. १०५१ }

(६०३)
कर्ज-कतबा

{ श. १५७२
{ इ. १६५०

भिमाजी कदम मौ. निंब — एसाजी कोकाट मौ. निंब

तुम्हापासून ८ मण गहू घेतले ते १६ मण घालू, मुदत शिमगा.

१७ ले.९ }
१०५१ व श. }

(६०४)
श्री

{ श. १५७२
{ इ. १६५०

अजर. शिवाजी राजे———कारकुनानि... ता गुंजनमावळ...

बापूजी हैबतराव व हायाजी हैबतराव व बाळाजी नाईक सिलिंबकर देशमुख ता हे गलबल्यामध्यें आपले जमेतीनसी साहेबाचे मसलतेस येऊन ्तारी केली. त्यावरून देशमुखावर मेहेरबान होऊन आजरा मर्‍हामती इनाम मौजे ाले बा देहे १ एक दिले ............

प. सा. सं. ९

पिसु. शिवा. } (६०५) { श. १५७२
पृ. ५ टीप १ } उल्लेख { इ. १६५०

गोवेंकर गव्हर्नरच्या एका पत्रावरून कळतें कीं सन १६५० मध्यें अफजलखा-नास 'वरच्या' घाटची जहागीर होती.

खं. २० ले. १३ { (६०६) } श. १५७३ चैत्र शु. ७
सु. १०५१ रखर ६ { खुर्दखत फा. मु. सी. } इ. १६५१ मार्च १८

माहा० रा० शहाजी राजे ———कार० व. देस० पर० सुपे.

लक्ष्मीधरभट बिन जाऊभट यास सुपे येथील इनाम- व रोजमुरा बरहु० फर्मान व खुर्दखते वजीर चालू आहे. तरी या साली अमानत केलेला इनाम चालू ठेवणें.

सा. ले. १५६ } (६०७) { श. १५७३ वैशाख शु. ८
सु. १०५१ जवल ७ } { इ. १६५१ एप्रिल १८

माहा. रा. शहाजीराजे—— कार० व देसमु० व देसपा. पर० सुपे.

गणो तिमाजी जनूवदार (मोरगाऊ) यानें काशीस जाते समयीं माहादाजी गोसावी यास आपले इनाम दिले. हालीं पर० मज० साहेबास मुकासा मिळाला आहे. तरी तें इनाम चालविणें.

खं. १८ ले. १० { (६०८) } श. १५७३ वैशाख व. ३
श. सु. १०५१ { महजर } इ. १६५१ एप्रील २६

गोविंद राम देसकुलकर्णी पर० पुणे

कृष्णाजी बिन सताजी पाटील मो० मौजे मुंढवे.

तुमचा भाऊ बाल बिन दाद पाटील हा मुंढवे येथील मोकदमी करीत असतां कहत दुकोष्ट पडल्यामुळें त्यानें निमे मोकदमी आपला बाप रामाजी यास दिल्ही.

शि. घ. ले. ३७५ } (६०९) { श. १५७३ श्रावण व. ४
सु. १०५२ साबान १७ } महजर फा. मु. { इ. १६५१ जुलै २६

संभाजीराजे मोहिते कस. तळबीड—— दिपाजी घारोजीराजे मोहिते

घारोजीराजे मोहिते यानी कसबे तळबीडची देसमुखी व मोकदमी व हक वाटून दिल्हे; व राहिलेले हक मजालसीनें वाटून दिले तसे खाऊ.

शि. च. प्र. पृ. ९९ ले. २२ } (६१०) { श. १५७३ भाद्र. शु. ३
सु. १०५२ रम २ } { इ. १६५१ आगष्ट ९

प्रतापराऊ हवाले देसमुखी तर्फ वाळवे— मोक. मौ. नागठाणे.

संबभट यास बदल अभिसेख सावणमास १ होन देविले.

सा. ले. ३७ } (६११) { श. १५७३ पौष शु. २
सु. १०५२ जिल्हेज ३० } झाडा गैर महसूल { इ. १६५१ डिसें. ४

हा हिशेब सिरवळ परगण्यांतील दोन गांवांचा हा अवल साल ता ३० जिल्हेजचा आहे. त्यांत जकातीची खोती जानोजी पानसऱ्यास सेकली; आवटी यानें कोंढाण्याच्या हवालदारासमोर तुपाचें माप करून रयतेपासून हक म्हणून तूप घेऊन जात असे होता. तेव्हां रयतेनें गवगवा केला इ. उल्लेख आहे.

शि. व. ७ पृ. १०६ } (६१२) { श. १५७३
सु. १०५२ } महजर { इ. १६५१–५२

सावाजी बिन बाजी कृष्णाजी येशवंतराऊ पासलकर व धर्माजी बिन मलाजी नाईक पासलकर } यामध्यें मोसे खोऱ्याच्या देसमुखीचा तंटा.

साहेबी हाजीर मज्यालसी गोत बैसऊन निवाडा केला; सावाजी येशवंतराऊ याचे घर वडील, नामर निशाण वगैरे मान सावाजीचा. धर्माजीचे घर धाकटें, यास वरकडी बापभाऊ जैसें समजाविले आहेती तैसीच यासी समजावीस. वडीलपणाचे मान वगैरेस धर्माजीचा संबंध नाहीं.

स. ६ पृ. १३५ } (६१३) { श. १५७३
सु. १०५२ } कौलनामा फा. सु. सी. { इ. १६५१–५२

दिवाण तर्फे बंदर माहामदाबाद व बंदर तर्फे संगमेश्वर—

बीरसेटी बिन दादसेटी व हरसेटी बिन गनसेटी सोनार टकसाळी बंदर मजकूर.

बंदर मजकुरी **टकसाळी**ची उमेद धरिता तरी कौल दिला आहे. पण नेमलेले व्हासील देत जाणे. **लाहान्या व खुर्दा** पाडीत जाणे.

शि. व. १ अं. २१३ पृ. ३७ } (६१४) { श. १५७३
सु. १०५२ } खुर्दखत फा. सु. सी. { इ. १६५१–५२

अजर. **जिजाबाई** साहेब—— हुंदे. व मोकं, मौ. वेहरवडे पर. पुणें.

गणो गवाजी तरीश फस. पुणें यास वेहरवडे येथे जमीन इनाम ( प्रज पदमाजी होनप ) त्याचें फर्मान वजीर **महाराज** व **सिउबा** ( जिल्हेज ७ ) यांच्या खुर्दखताप्रमाणें चालू आहे. सालमजकुरी इनाम अमानत करण्याबद्दल **चिर. रा. राजे** यांचे पत्र आलें. तरीहि इनाम अमानत न करिता पूर्वीप्रमाणे चालू ठेवणें. चिर. रा. **सिउबाचे** खुर्दखताचा उजूर न करणें.

सं. ३ पृ. १६७ }　　(६१५)　　{ श. १५७३
मु. १०५२ }　'प्रतिपच्चंद्र.' व 'शामराजमति.' मु. व सी.　{ इ. १६५१-५२

ई कौलनामा अजर. सिवाजी राजे—माल पाटील व बाजी पाटील व अदिकारी तपे वीरवाडी ......दादे कौलनामा ऐसा जे, वीरवाडी खालील देह चंद्रराऊ खात होते. तेथील अदिकारपण आपलें आहे. येस्यास चंदररायामधें व आपणामधें बेरपणा नाहीं म्हणौउनु सदरहू गांवीचें अदिकारपण चंदरराऊ खात असेती, त्यांसी जरी आपण कुसूर करावा तरी ते सबल आपण कमजोर; याकरितां आपण गै करीत गेलो. हाली सदरहू गांव चंदररायें किले कांगोरी खाले दिघले आहेती. हे खबर आपण आइकोन साहेबांचे सेवेसी आलों आहो. तरी आपण मिरासीदार नफर आहो. साहेबीं आपणास हातीं धरुनु आपला अदिकारपण आपणास देउनु मिरासीवरी बैसविले पाहिजे. म्हणौउनु मालूम केले. बराये मालुमाती खातिरेस आणौनु साहेब तुम्हांवरी मेहेरबान होउनु सदरहू गांवाचें अदिकारपण तुमची मिरासी तुम्हास दिघली असे. तुम्ही अदिकारपण खाउनु अदिकारपणाची चाकरी करणे. हकलाजिमा व गांवखंडी व फिरकोली हक निा बलुते व बाजे हक खाउनु लेंकराचे लेंकरी खाणें व जे वख्तीं मसलतीचें काम पडेल ते वख्ती तुम्ही दाहा लोक बराबरी घेऊनु साहेबापासीं येत जाणे. जोंवरी मसलतीचें काम असेल तोंवरी दाहीं लोकांनसीं चाकरी करुनु दरोज रोजमुरा दरनफरें रुके ८६ प्रमाणे साहेबांपाहुनु घेत जाणे. मसलती जालियावरी साहेबाची रजा घेउनु गांवास जात जाणे. ये बाबे कौल असे.

लॅन्. २ पृ. २८५-२८६ }　　(६१६)　　{ श. १५६५ पौष
इ. }　　　　{ इ. १६४३ डिसें.

गोव्याचा गव्हर्नर————　　पोर्तु. बादशहा.

आदिलशहा व मलबार किनाऱ्यावरचे राजे यांच्याशीं पोर्तुगीजांचे संबंध शांततेचे आहेत.

इं. फॅ. ९ }　　(६१७)　　{ श. १५७३ माघ शु. १४
पृ. ९९ इ. }　फोर्ट सेंटजॉर्ज-कंपनी　{ इ. १६५२ जाने. १४

विजापूर व गोवळकोंडे यांचें युद्ध चालू झालें आहे. हें जर्जर झालेलें राष्ट्र या दोघांनीं वांटून घेऊन आतां आपसांत भांडण चालविलें आहे. गरीब बिचारे हिंदुलोक, या यादवींत या उभयतांचा परस्पर युद्धांत नाश होऊन आपण पारतंत्र्यांतून केव्हां मोकळे होतों याची वाट पहात आहेत. बरेच दिवस युद्ध चालून आतां विजापूरचे सैन्यानें नबाब मिरजुम्लाला गोवळकोंड्याच्या डोंगरांत कोंडून टाकलें आहे.

इं. फॅ. ९ पृ. १०४ } (६१८) { श. १५७३ माघ शु. १४
इं. } स्वालीमरीन-कंपनी { इ. १६५२ जाने. १४.

[इ. १६५१ आक्टो. १६ चे सुमारास] दंडाराजपुरीच्या लोकांनीं, वेढा घालण्यास आलेल्या विजापुरकरांचे सैन्यास प्रतिकार करण्याची तयारी चालविली होती.

इं. फॅ. भा. ९ } (६१९) { श. १५७३ फाल्गुन शु. १३
पृ. १११ इ. } फोर्टसेंट जॉर्ज-कंपनी { इ. १६५२ फेब्रु. २२

गोवळकोंड्यावर विजापुरकरांनीं अकस्मात हल्ला केला. त्यानंतर गोवळकोंडेकरानें ६ लाख होन खंडणी भरल्यामुळें त्याचा मुलूख मुक्त होऊन तह झाला आहे. **विजापूरचा सुलतान** गेलीं कित्येक वर्षे **आजारी** होता. गेले दोन महिने **तो मेल्याचीच बातमी** होती. आतां त्याची तब्यत सुधारली आहे.

इं. फॅ. भा. ९ } (६२०) { श. १५७३
प्रस्ता. पृ. २४–२५ इ. } उल्लेख { इ. १६५१

या वर्षी कर्नाटकावर मुसलमानी शाह्यांच्या स्वाऱ्या होत राहून शिवाय अंतस्थ यादवीचेंही बंड मोडलें नव्हतें. जिंजी किल्याखालील सर्व प्रांत व **तेगनापट्टणच्या** आसपासचा किनाऱ्यावरील मुलूख विजापूरकरांनीं घेऊन **मलयाला** तेथील सुभेदार नेमिलें होतें. **डचांनीं** याचा फायदा घेऊन (१६५१ ऑग.) त्या मुलखांतील व्यापाराच्या सवलती मिळविल्या [ हेग् ट्रॅन्स्क्रिप्ट्स सेरीज १ भा. १७ नं. ५३२; भा. १८ नं. ५३९ ]. **कर्नाटकचा** दुर्दैवी राजा विजापुरकरांशीं युद्ध करणाऱ्या **म्हैसूरच्या** नायकाच्या आश्रयानें राहिला होता. [सदर भा. १७ नं. ५१८ ] गोवळकोंड्याच्या सैन्याचा सेनापती **मीरजुम्ला** उत्तरेकडील भागांत आपलें बळ वाढवीत होता.

खं. १५ ले २७२ { (६२१) } श. १५७४ श्राव. शु. २
सु. १०५३ रम १ { फार. मु. व सी. } इ. १६५२ जुलै २७

अजर. नरसो धोंडदेउजी हवालदार रोहिडा--- मोकदम कारजिये.

मोकदमांना वांचविण्यासाठीं गोंदनाक महार यानें जीव धोक्यांत घातला व तो दिवाणाकडून मारला गेला. यासाठीं त्याचा मुलगा अर्जनाक यास तरालाचें वतन करून दिलें.

शि. प्र. पृ. १०१ ले. २६ { (६२२) { श. १५७४ आश्विन शु. ३
सु. १०५३ जिल्काद १ { कौलनामा { इ. १६५२ सप्टें. २५

पाटील, कुळकर्णी, चौगुला व मोकदम मौ. जासले किले **पन्हाला**

रामण बिन लक्ष्मण मोकासे का वाळवे

मोकाशी काटे पानी दिलेल्या धर्मादाऊ 'पाहर'चा गला घेऊन आम्हाशी आशीर्वाद देऊन सुखे राहणे. कोणी आड येईल त्यास **गाइत्रींची** आण असे.

खं. १५ ले. २०७ } (६२३) { श. १५७४ आश्विन व. १२
सु. १०५३ जिल्काद २५ } महजर { इ. १६५२ आक्टो. १९

दादाजी नरसप्रभू देशकु. व गावकु.
बाबाजी सिवदेऊ सोनटके फारकून निसवत पदाजी } यांमध्यें तंटा.

बाबाजी सिवदेव यानें उत्रोलीच्या देशकुळकर्णाकरितां खोटेपणानें खोपडे याज-पासून निमे देशमुखी घेतली. उत्रोलीचे देशकुळकर्ण आपले म्हणून महजरावर खोटाईनें बिकलम घालून गरगसा मांडला. यामुळें नरसप्रभू यानीं **सिवाजीराजे** व हमशाही देशमुख यांजकडे फिर्याद केली. त्यावरून चौकशी करितां बाबाजी खोटा ठरला.

खं. २० ले. ५१ (२) } (६२४) { श. १५७४ कार्तिक शु. ४
सु. १०५३ जिल्हेज ३ } महजर-उल्लेख { इ. १६५२ आक्टो. २६

**संभाजी मोहिते** सरहवाल. ( सुपे ) व दादाजी रुक्मांगद मुजुम. याचे वेळचा महजर. बाळाजी पाटील मौ. लाटे व कान्होजी यास करून दिल्हा. बावदेसर, रामचंद्रभट धर्माधिकारणी, विठल महादेऊ त्रिंबक गोमदेऊ याचे दसखत आहे.

खं. २० ले. ९४ } (६२५) { श. १५७४ कार्तिक व.७
सु. १०५३ जिल्हेज २० } खुर्दखत--उल्लेख { इ. १६५२ नोव्हें. १२

पेशजी पर. वाईमधील कुल इनामें अमानत केली होती. ती आतां त्याची त्यास दुमाला करणें.

खं. १५ ले. २७३ } (६२६) { श. १५७४ मार्ग. शु. ५
सु. १०५३ मोहर ३ } यजितपत्र--नकल { इ. १६५२ नोव्हें. २५

श्रीमंत राजश्री **सिवाजी राजे** महाराज साहेबाचे सेवेसी

दा। बा। यजितपत्र बाबाजी सिवदेव सोनटके गुमास्ते दिमत दादाजी नरसप्रभु देश-कुळकर्णी व गावकुळकर्णी ता। उत्रोली व ता। मोर ता। रोहिडखोरे हुजूर केदारजी बीन नरसोजी व खंडोजी बिन धर्माजी खोपडे देसमुख ता। उत्रोली याचा महजर गोत वगैरे माहाराजाचे समोर हाजर मजालसींत जाला. कथला तुटून निमे निमे वतन उमयेतानी खावे असे जाले. त्यात मी लबाडी करून आपले बिकलम लिहिले. **मी चाकर, वतन-दार नव्हे.** हा गुन्हा मजकडून जाला. या उपरी असी लबाडी केल्यास दिवाणाचा गुन्हेगार व गोताचा खोटा. छ ३ मोहरम हे लेहून दिल्हे सही हरतक्षर खुद गोही इ.इ.इ.

( याप्रमाणें कागद हुजूर लिहून दिल्हा त्याची नकल पुढें वामा येईल सबब दादोपंत दिमत सरकार याणे दिल्हे सन मार ).

सं. १५ ले. २७० } (६२७) { श. १५७४ मार्ग. व. ६
सु. १०५३ मोहर १९ } खुर्देखत म. { इ. १६५२ डिसें. ११

अजर. सिवाजी राजे — कार. सरदेश. देशकु. मोक. ता॰ मोसेखोरे.

बो शामराज नीलकंठ कांजकर (शामराज नीलकंठ रांजेकर ?) सेकिन हिवरे-नागेश याने हुजूर मालूम केले कीं, मुसेखोऱ्यांतील ६ गांवांचे गांवकुलकर्ण रंगो त्रिमल वाकडा चालवीत होता. यावरी दावाई ब्राह्मणी रांडकी इत्यादींस त्यानें सिंदळकीचा अंमल केला. ते खबर दिवाणांत आलियावरी रंगोबा पळून जावलीस चंद्ररायाच्या आश्रयानें राहिला. यावरी देवकरणीनें तेथेंच मयत जाला. तो निपुत्रिक होता त्याचे बुडाले. तेव्हां गावच्या मोकदमानीं व सावाजी यशवंतराव देशमूख व देशकुलकर्णी यानीं शामराज नीळकंठ यास गांवकुलकर्ण देऊ केलें. त्यास ५० होन सेरणी घेऊन दिवाणी मान्यता देण्यांत यावी; व महजर करून द्यावा.

इं. फॅ. मा. ९ } (६२८) { श. १५७४ मार्ग. व. ७
पु. १२६ इ. } { इ. १६५२ डिसें. १२

सुरत — गलबताच्या कप्तानाला सूचना

विजापुरकरांचा किनारा गोवा ते चौलपर्यंत आहे. यांमधील बंदरचीं गलबतें भरावीं व सुरतेला पाठवावीं.

शा. ले. ४९ पृ. ७१ } (६२९) { श. १५७४ मार्ग. व. १४
श. } उल्लेख { इ. १६५२ डिसें. १९

गोंदपाटील वगैरे पाचपुते मोक. मावाळी पर. सिरवळ—आबाजी पाचपुते

तुज ओझरडे येथें जाऊन पाटिलकीचे सहावीं तकसीम देऊन आणिलें. यावरी घराचा कुसूर झाला म्हणून गाव टाकोन पळोन गेलास. तरी पूर्वीप्रमाणें लिहून दिधलें.

खं. १५ ले. २७१ } (६३०) { श. १५७४ पौष व. ३
सु. १०५३ सफर १५ } महजर किले रोहिडा सी. { इ. १६५३ जाने. ६

उत्रोळीचे पाटील व सिरले यांच्या तंट्याच्या निकालासाठीं दिव्य करण्यांत आलें. त्यावरून पाटील यांची मोकदमी खरी ठरली.

स. ११२ } (६३१) { श. १५७४ फाल्गुन शु. १
श. } 'प्रतिपचंद्र' मु. { इ. १६५३ फेब्रु. १८

वेदमूर्ती गोपाळभट बिन श्रीधरभट, वास्तव्य श्रीमहाबळेश्वर

विद्यार्थी शिवाजी राजे दंडवत. [ प्रधानाची मु. ] विनंति उपरी स्वामी मले थोर अनुग्रहातें सूर्य—उपासनी पद्महस्ती; ऐसे जाणोन आपण मातुश्री जिजा-

वाई आउसाहेब वेदमूर्ती प्रभाकरभट उपाध्ये यांच्या वियमानें स्वामीपासून मंत्र उपदेश संपादिला. स्वामी आपले गुरु. स्वामीस आपण आपले अभ्योदयार्थ सूर्यप्रीत्यर्थ अनुष्ठान सांगितलें. प्रतिवर्षी वर्षासन चावयाची मोईन केली असे. तितपशील वर्षासन पैकीं गल्ला नवशेरी. सूर्यप्रीत्यर्थ अनुष्ठान प्रतिवर्षी करावें त्यास नक्त होन १००

याप्रमाणें होन पातशाई एकशें व गल्ला नवशेरी वारले मापे खंडी आठ वजन टकचंदी सवा आठरा मण व आरक्त वस्त्रें दोनी व पीतांबर एक शाल एक व आसन एक याप्रमाणें वर्षासन व पूजा सामुग्री मोईन दानपत्रें करून दिल्ही असे. स्वामींनी आमचे अभ्योदयार्थ सूर्यप्रीत्यर्थ प्रतिवर्षी अनुष्ठान उत्तरोत्तर करावे व मंत्रउपदेशही स्वामींचे वंशपरंपरेने आमचे वंशपरंपरेस करावा. आपण संकल्पपूर्वक प्रतिवर्षी वर्षासन दानपत्र करून स्वामीस दिल्हें. हें आपले वंशपरंपरेने उत्तरोत्तर चालवावयास अन्यथा करूं तरी श्री महादेव साक्ष. स्वामींनी निरंतर देवापाशी आमचे कल्याण इच्छावें. लेखनालंकार मोर्तब.

खं. २० ले. ९२ } (६३२) { श. १५७४ फाल्गुन शु. ४
सु. १०५३ रखर २ } खुर्दखत फा. मु मज. सी. { इ. १६५३ फेब्रु. २१

अजर. अफजलखान महमदशाही ——कार. व देशमु. पर. वाई

नरसिंह रंगभट चित्राव (वाई) यास रणदुलाखानानें होन १० दिले आहेत. ते शहाजादा अलमियाच्या कारकीर्दीत चालत होते. तरी चालवीत जाणें.

खं. २१ ले. ५७ } (६३३) { श. १५७५ चैत्र शु. ३
सु. १०५३ जवल १ } खुर्दखत फा. मु. मज. सी. { इ. १६५३ मार्च २१

?—— कारकून पर. कऱ्हाड

हाली साहेबास मोकासा अर्जानी जाला. अंतभट सो कऱ्हाड यास कोणेगाव येथे ·॥· चावर जमीन इनाम चालविणें.

खं. २० ले. ९३ } (६३४) { श. १५७५ चैत्र शु. ४
सु. १०५३ जवल २ } खुर्दखत फा. मु. मज. सी. { इ. १६५३ मार्च २२

अजर. अफजलखान महमदशाही—— कारकू. व देसमु. पर. वाई.

नरसिंह रंगनाथ चित्राव यास त्यांच्या बापापासून मौजे पसरणी येथे नीम चावर जमीन चालते ती चालविणें.

ख. २० ले. ९४ } (६३५) { श. १५७५ चैत्र शु. ४
सु. १०५३ जवल २ } खुर्दखत उल्लेख { इ. १६५३ मार्च २२

गोपिनाथ रामेश्वर तबीब याची मौ. बोरखळ व किन्ही येथील १॥ चावर जमीन चालविणें.

शि. प्र. ९७ टीप }
श. }

(६३६)
मिसेली

{ श. १५७५ चैत्र शु. ९
{ इ. १६५३ मार्च २७

दिवाण तर्फे वालवे—— मोक. देहाय तर्फे मजं.

( संवैसट यास बदल अभिषेख सिद्धेश्वर मौ. शिरगांव, होन ६॥= आदा करणें.

स. पु. २१ हि.१०६३ }
सु. १०५३ जखर ३ }

(६३७)

{ श. १५७५ वैशाख शु. ४
{ इ. १६५३ एप्रिल २१

बादशाह विजापूर—— मामलेदार व देशमूख पर. सुपे.

मोरया गोसावी (चिंचवड) यांस निजामशा, मलिकंबर, व **शाहाजी** राजे यांचे पत्रावरून इनाम चालू आहे. कागद हरवले आहेत. तरी त्यांचा इनाम चालू ठेवणें.

इ. सं. १८३५ }
पृ. २१० श. }

(६३८)
शिलालेख

{ श. १५७५ वैशाख शु. ११
{ इ. १६५३ एप्रील २८

(देवरूख येथील रामाच्या देवळांतील मारुतीच्या देवळावर.)

कृष्ण सानें यानें गोपिनाथाचें लिंग, त्रिपुर वृंदावन, प्राकार, दगडी रस्ता, तळें, धार, बांधले खर्च १०० होन. लेख कोरला १५८१ मध्यें. बांधणी १५७५ मध्यें.

गो. इ. सा. ले. २ }
सु. १०५४ रजब ११ }

(६३९)
फर्मान उल्लेख

{ श. १५७५-७६ ज्येष्ठ शु. १३
{ इ. १६५३ मे २९ (-५४मे१८)

**महमद** आदिलशाहा (विजापूर)— मामले गोवा.

मलिक रेहान यानें जोशास आगराचा वतूल इनाम दिला आहे तो चालविणें.

सा. ले. ८७ }
सु. १०५४ रजब १६ }

(६४०)
समाधानपत्र

{ श. १५७५-७६ ज्येष्ठ व. ३
{ इ. १६५३ जून ३(-५४ मे २३)

माहाराज रा. शाहाजी राजे

रा. रा. निळोपंत तथा शंकराजी पंडित व विसाजीपंत तथा त्रिंबक पंडित.

निळकंठरायास देवाज्ञा जाहली म्हणौन **चिरंजीवे** [शिवाजी] लिहिलें. तरी बहुत अनुचित जाहले श्रीच्या करणीस कांहीं चालत नाहीं. तुम्ही विवेकी आहा. आपले समाधान असो देणें. चिरंजीवें तुमच्या सरंजामीचें बाबे लिहिले. तरी तुमच्या कंटाली व लुगडी पाठविली आहेत ते घेणें. राजश्री राऊ गोसावी जैसे काही चालत होते तेच रीतीनें तुम्ही वर्तणें. तेणेंकरून तुमचे ऊर्जित आहे. कोण्हे विशई चिंता न करणे. राजश्री भटगोसावी व रघुनाथ बहुता रीती तुमचे विशई सांगितले. तरी तुम्ही सुखें, कोण्हेविशई तुम्हापासून अंतर पडणार नाहीं. आपले समाधान असो दीजे.

सा. ले. १३९ } (६४१) { श. १५७५ आपा. व. १४
सु. १०५४ साबान २७ } कौलनामा प्रतिचंद्र सु. व सी. { इ. १६५३ जुलै १३

अजर. रा. **सिवाजी राजे**——शुरव पुजारा श्री मार्तंड भैरव जेजुरी

गुरवातील मिरासीचा गरगसा होता. त्याचा निवाडा मातुश्री ( **जिजाबाई** ) साहेबी करून सलासा कारणे कौल दिघला आहे. तेणेप्रमाणें साहेबाचाहि कौल असे. पा हुजूर रा येसाजी सर खवास. ( मर्या. )

स. पु. ११३ } (६४२) { श. १५७५ श्राव. शु. ३
सु. १०५४ रम १ } वर्षासन नक्कल { इ. १६५३ जुलै १७

**सिवाजी** राजे बिन शाहाजी मोसले—सिद्धेश्वरभट मझे उपाध्ये (चाकण).

स्वामीच्या अनुष्ठानबळें राज्यास अधिकारी जालों व सकळ मनोरथ चिंतिले पावलो. अनुभव आला. स्वामीस वर्षासन होन पादशाही १०० केले असेत.

खं. १५ ले. ४३८ } (६४३) { श. १५७५ श्राव. व. ३
सु. १०५४ रम १६ } प्रतिप. व सामरा. { इ. १६५३ आग. १

अजर• **सिवाजी राजे**———कारकून व देसमुख पा चाकण.

मुरारीभट याच्या नावे चाकण व इंदोरी येथें इनाम चालू होते. साल गुा चालत आले आहे. हाली साल मजकुराकारणें माहाली कारकून ताजे खुर्दखताचा उजूर करताव असे कळले. तरी कुस्णमट विन मुरारीभट मझे यास इनाम चालविणें.

गो. इ. सा. ले. २ } (६४४) { श. १५७५ श्रावण व. १४
सु. १०५४ रम २७ } मिसेली फा. मज. { इ. १६५३ आगष्ट १२

दिवाण मामले गोवा—हुदे व गावकर मौ० केरी तपे अंतरूज

११ रजबचे फर्मानाप्रमाणें नारायण कृष्ण जोसी मौ० केरी यास इनाम.
(ले. ६३९ पहा.)

ख. १५ ले. ४३९ } (६४५) { श. १५७५ आश्विं शु. २
सु. १०५४ सवाल ३० } तालीक { इ. १६५३ सर्प्टे. १३

अजर० **सिवाजी** राजे———कारकून पा चाकण...बाबदेभट मझे व निंबकभट राजगुर का मा यास **आचार्यांच्या** वृत्तीचें भांडण होतें...हरदोजण हुजूर आले. निंबकभट राजगुर एथे दिव्य केले तो खोटा जाला. त्याचा भाऊ मोजभट राजगुर एथे होता. तो एथून पळाला आहे. तरी मोजभटास दस्त करून हुजूर पाठवणे व निंबकभटाची व मोजभटाची माणसे का मजकुरी आहेती त्यास मोकळ देणे. त्यांचे कुल वस्तभाव जे जे असेली ते कैद करून जाविता हुजूर पाठविणे. या कामाबद्दल राघ्र कमा माहालदार पाठविला असे यास मसाला टके ७॥ साडेसात रास आदा करणें.

खं. २० ले. २७० }
सु. १०५४ जिल्हेज १ }
(६४६)
कर्ज-कतबा
{ श. १५७५ कार्तिक शु. २
{ इ. १६५३ आक्टो. २३

अजर. सेख अली सेख अबदुल मो. आगसी तये अठागर मामले पाछावाद ऊर्फ चेऊल

वालजी हरिदास खोत मौ. तहूक मामले चेऊल आम्हीं तुम्हा पासोन कर्ज घेतले ते मुदतीत देऊ. भायनाक भंडारी तुम्हास दिधला असे.

इ. सं. त्र. गोष्टी ११ मा. २ }
सु. १०५४ जिल्हेज १५ }
(६४७)
{ श. १५७५ कार्तिक व. ४
{ इ. १६५३ आक्टो. २७

विसाजी, सोन व एकोजी प्रभू देशकु. तर्फ मुठे खोरे

महा. रा. शामराज पंडित पेशवे.

स्वामीस तर्फ मजकूरचे सात गाव कुळकर्ण दिले. त्याबदल वाघोजी खोपडे या बरोबर २५० होन दिले ते पावले.

एपि. कर्ना. १० }
पृ. १३२ ले. १५४ संब. }
(६४८)
शिलालेख (मुळवागळ)
{ श. १५७५ कार्तिक व. ११
{ इ. १६५३ नोव्हें ५

विजय संवत्सरी श्रीमत रा. रा. संभाजी राजे महाराज यांचा कुमार कन्हरायाजी पंडित यांनी दान केले.

सा. ले. ४० }
सु. १०५४ जिल्हेज २९ }
(६४९)
फा. मु.
{ श. १५७५ कार्तिक व. ३०
{ इ. १६५३ नोव्हें. १०

माहाराज राजेश्री शाहाजी राजे — कार. व देसमु. पर. पुणे.

चन्होली येथील बाजार बहुत दिवस मोडला. तेव्हा रामसेटी सेटिया यास पेठ मामूर करण्यास सांगितले. त्याने पुणे येथून विनायकभट ठकार यास बिडवैपण देतो म्हणून आणिले. तेव्हां विनायकभट रामसेटियास म्हणो लागला जे 'तुवा आपणा बिडवैपण देतोस तरी तू काही मुकासी नव्हेस. जैसे बोलतोस तैसेच माहाराज साहेबाचे (=शहाजीचे) खुर्दखत करून देणे व महाली महजर करून देणे.' त्यावर हे खुर्दखत दिले. दरम्यान रेणकोजी देवकर यासा बिडवैपण दिले होते तरी आतां विनायकभट ठकार याजकडून बिडवैपण घेत जाणे.

सा. ले. ४२ }
सु. १०५४ जिल्हेज २९ }
(६५०)
कौलनामा फा. मु.
{ श. १५७५ कार्तिक व ३०
{ इ. १६५३ नोव्हें. १०

अजर. माहा. रा. शाहाजी राजे — विनायक भट ठकार

मौजे चन्होली येथील नव्या पेठेचे बिडवैपण तुम्हास दिले आहे.

-सा. ले. ३८
श. (६५१) { श. १५७५ मार्ग. शु. ८
{ इ. १६५३ नोवें. १८

कोंडाजी व विठल सुखदेऊ देसकु. पर. सिरवल — माहादाजी राम देसकु. पर. मज.
आपण भांडत होते. तुमचे आमचे कर्ज कतबे सोमाजीचे गुजारतीने होते. रामाजीपंती मरते समयी तुमचे आमचे लिगाड तोडिले. कागद त्याचे त्यास दिले व गोष्टी केली. उभयतानी आपले सत्य स्मरून चालावे.

खं. १५ ले. ८०
सु. १०५४ मोहर १२ (६५२) मिसेली फा. मु. मज. सी. { श. १५७५ मार्ग. शु. १३
{ इ. १६५३ नोवें. २२

दिवाण किले चंदन——— मोक. गावगना पर. कुडाल
जोगींद्र गोसावी मो. निंब यास मंडान्याबद्दल गावगना जे चालले असेल ते देवविणें.

-खं. १५ ले. ९१
-सु. १०५४ मोहर १२ (६५३) मिसेली फा. मु. मज. सी. { श. १५७५ मार्ग. शु. १४
{ इ. १६५३ नोवें. २३

अज. दिवाण किले चंदन——— मोक. व रया. गावगना पर. कुडाळ
जोगींद चेला कमलनयन यास गावगना मंडान्याबद्दल चालत असेल ते चालविणें.

खं. २० ले.९४
सु. १०५४ सफर ६ (६५४) मिसेली फा. मु. मज. सी. { श. १५७५ पौष शु.८
{ इ. १६५३ डिसें. १०

दिवाण पर. वाई———मोक. बोरखल, किण्हई.
गोपिनाथ रामेश्वर तबीब सो वाई यास १॥ चावर जमीन इनाम चालविणें.

स. पू. १०७ ले. १०
सु. १०५४ रबल १४ (६५५) उल्लेख } श. १५७५ माघ व. २
} इ. १६५४ जाने. २४

सुर्दखत बमोहर थोरले महाराज शहाजी राजे भोसले बनाम विठल महादेव.
(सुपे बारामती)

सा. ले. १२९
सु. १०५४ रबल २२ (६५६) { श. १५७५ माघ व. ९
{ इ. १६५४ फेबु. १

सिदी अबर बगदाद हवाल० व कार० पा पुणें—हुदे० व मोक० पा पुणें
विनाजी नागोजी तबीब याचा पुणें येथील इनाम साल गुाश्तों चालविणें.

सा. ले १०५
पृ. १४१ (६५७) उल्लेख { श. १५७५
{ इ. १६५३

श्रीमंत सिवाजी महाराज शिवापुरास येऊन बाग आमराई लावावयाकरितां धरणाचें काम लाविलें.

हि. रे. क. ८ } (६५८) { श. १५७५ माघ फा.॰
पृ. १३२ } { इ. १६५४ जाने. फेब्रु.

महमद आदिलशाहा—— पोर्तुगीज गव्हर्नर

"पाद्रि आंतोन्यो बोतेल्यो व (फोंड्याचा सुभेदार) **मलिक याकूत** यांनीं तुमची हकीकत कळविली. शिवापा नायकास महालदार याजबरोबर आम्ही हुकूम पाठविला आहे. त्यावरून तो होनावरचा वेढा उठवील. तुम्ही पाद्री गोसालो यास इकडे पाठवावें. तो येण्यापूर्वी शिवापानें वेढा न उठविला तर त्याला शिक्षा करूं.

शि. प्र. १०२ } (६५९) { श.
? } { इ.

बापूजी—— मोक. व विठलपंत कुळ. मौ. पुणदी
संभट याचा इनाम त्याचे दुंबाला करणे.

खं. २० ले. ९६ } (६६०) { श. १५७५
सु. १०५४ } खुर्दखत उल्लेख { इ. १६५३-५४

नरसीहु रगभट चित्राव याची मौ. पसरणी येथील जमीन इनाम चालविणें.

शि. प्र. पृ. १०२ ले. २७ } (६६१) { श. १५७५
सु. १०५४ } फा. मु. सी. { इ. १६५३-५४

?—— हुदे. व मोक. मौ. मालवाडी
आमचे ठाणे बाबेपैकी वेद. संभट वालवेकर यास होन ॥॰ देविले.

शै. २-३-३८ } (६६२) { श. १५७५
सु. १०५४ } खुर्दखत प्रति. व साम. सी. { इ. १६५३-५४

अजर. **सिवाजी राजे**—— कार. मोक. मौ. वेहरवडे पा॰ पुणे.

(गणो) गवाजी तवीब सो॰ पुणे यासी इनाम. बा फर्मान वसिके खास व भोगवटे कारकीर्दी दर कारकीर्दी व खुर्दखत **माहाराज** साहेब प्रमाणे ता सालगुदस्ता चालत आलें आहे. हाली सालमजकुरा कारणे मौजे मजकुरीचे हुदेदार ताजे खुर्द. मागतात. तरी चालविणें.

इं. फॅ. भा. ९ } (६६३) { श. १५७५-७६
प्रस्ता. पृ. ३३-३४ } उल्लेख { इ. १६५३-५४

कर्नाटकांतील युद्धें पूर्ववत चालू राहिलीं. डच रेकर्ड्सवरून असें दिसतें कीं, **विजापुरी** सेनापतीनें पेनुकोंडा हा महत्त्वाचा किल्ला (इ. १६५३ मार्च) घेऊन जिंजीकडे जात असतां वाटेंत गोवळकोंडेकरांच्या मुलखांतून जाण्याची परवानगी मागितली ती

मीरजुम्लानें दिली नाहींच. उलट विजापूरचे वादला सत्तेला आळा घालण्या-करितां म्हैसूरच्या नायकाला त्यांच्या विरुद्ध वळवून आणखी कर्नाटकच्या राजाशीं बोलणें करण्यास सुरवात केली. मीरजुमल्याच्या वचनांवर विसंबून कर्नाटकचा राजा वेलोरला आला आणि त्यानें विजापूरकरांना हांकून लावण्याच्या उमेदीनें मोठें सैन्य उभारलें. [हेग ट्रॅन्सिक्रप्टस सेरीज १ भाग १९ नं. ५५० (१)] इ. १६५४ नोवें. १७ च्या बटेव्हियाच्या पत्रांत याचा वृत्तांत दिला आहे तो असा : विजापूरचे सेनापतीनें दीर्घकाल वेढा देऊन वेलोर घेतलें आणि राजाशीं तह केला त्यांत चंद्रगिरी आणि इतर कांहीं मुलखाचा वसूल त्याच्याकडे ठेविला. [सदर नं. ५५१] उभय युध्यमान शहाशीं स्नेहानें रहाण्याचा प्रयत्न डच लोक करीत होते. परंतु कांहीं पासांची मानगड होऊन आणि मीरजुमल्याचें एक गलबत डचांनीं पकडल्यामुळें मीरजुमला व डच यांचें वैमनस्य आलें. पण पुढें दिलसफाई झाली [हेग. ट्रॅ. १-१८-५५०]. विजापूरच्या जिर्जीवरील नवीन सुभेदारानें व खुद्द सुलतानानेंहि मलयानें (तेगनापट्टण वगैरे बंदरी मुलखाचा सुभेदार) पूर्वी दिलेले डचांचे सर्व हक्क व अधिकार आतां तो कामावरून दूर झाल्यावरहि चालविले. [सदर नं. ५५१, ५५६-५७]. सप्टेंबर १६५४ मध्यें कर्नाटकांतील राजकारणांत आणखी विचित्रच पालट झाला. गोवळकोंड्याचा राजा अबदुल कुतुबशहा याला आपला सेवक मीरजुमला याच्या वाढत्या सामर्थ्याचा हेवा वाटावयास लागून त्यांच्यांत उघड विरोधाला सुरवात झाली. कर्नाटकांत नव्या जिंकलेल्या मुलखाचें राज्य स्वतंत्रपणें करण्याचा इरादा असल्याचा मीरजुमल्यावर त्याच्या राजाकडून आरोप केला गेल्यामुळें विजापूरचे सुलतानाची त्यानें मदत मागितली. परंतु शेवटीं दख्खनचा सुभेदार औरंगजेब संधी करितां टपूनच बसला होता त्याच्या कक्षेत तो सांपडला. मीरजुमला औरंगजेबाचा नोकर होणार या विचारानें कुतुबशहा घाबरून त्यानें मीरजुमल्याला पुनः आपल्याकडे वळविण्याची खटपट केली. परतु शेवटीं मीरजुमल्याच्या मुलाच्या हट्टी वर्तनामुळें त्याच्या कुटुंबाला गोवळकोंड्यांत कैद करण्यांत आलें ( १६५५ अखेर ). त्यामुळें तो औरंगजेबाकडे कायमचा गेला आणि त्यायोगानें गोवळकोंड्याच्या राज्याला मोठा धक्का बसला.

| | | |
|---|---|---|
| वै. व. ६ पृ. ७२ ले. ४<br>श. १५७६ श. | (६६४) | श. १५७६ चैत्र ब. १०<br>इ. १६५४ एप्रिल २ |

रा. चिंबकजी राजे भोसले— गणेश विन विठ्ठल दिक्षीत सो वणी-

तुम्ही आमचे सप्तशृंगीचे परंपरागत तीर्थपुरोहित आहा.

| | | |
|---|---|---|
| इ. फॅ. ९<br>पृ. २६१ इ. | (६६५) | श. १५७६ चैत्र व. १२<br>इ. १६५४ एप्रिल ४ |

मालुमातें मद्रासकडील वादाचे वेळीं सांगितलेली हकीकत:—

पुलिकतहून लक्ष्मण नायकाला घेऊन विजापूरचें सैन्य या

मार्गानें गेलें. त्यावेळीं शेपार्दीनें प्रतिनिधीची भेट घेऊन पोर्टोनोव्हेच्या खंडाबद्दल बोलणें केलें त्यावर १०० होन ( पँगोडाज ) खर्च पडले.

खं. १५ ले. ९२
सु. १०५४ जवळ २५
(६६६)
खुदखत फा. मु. सी.
श. १५७६ चैत्र व. १२
इ. १६५४ एप्रिल ४

अजर. रा. संभाजी राजे—— बजा. कार. बालाघाट किले पनाळा

मधुकरगिरी गोसावी याचा मठ व इनाम जमीन मौ. आंबोडे येथें आहे. तीस इनामपटी न घेणे. पा हुजूर रा गोविंद महादेऊ मुजुमदार रुजु सुरु सुरु सुद.

हि. रे. कं. ८
पृ. १३३-१३४
(६६७)
श. १५७६ चैत्र व. १३
इ. १६५४ एप्रिल ५

पोर्तुगीजांनीं फा. मार्टिन यास बरोबर नजराणा देऊन विजापुरास पाठविलें. पण मार्टिन हा सरकारी वकील म्हणून पाठविला नसून आदिलशहानें बोलावल्यावरून पाहुणा या नात्यानें गेला. त्यानें आदिलशहाशीं बिन सरकारी रीतीनें कांहीं गुप्त गोष्टी बोलाव्या असें त्याला सांगण्यांत आलें होतें. मार्टिन यानें यावेळीं १२ हजार अशरफी किमतीचा नजराणा नेला होता.

हि. रे. क. ८
पृ. १३४-७
(६६८)
श. १५७६ चैत्र व. १४
इ. १६५४ एप्रिल ६

पोर्तु. नीं विजापूरकडे मार्टिन यास पाठविलें तेव्हां त्याला सांगितलेल्या कामाची कलमबंदी.

प्रथम इकडील पद्धतीनें नजराणा द्यावा. कानडा प्रांतातले ३ किल्ले उध्वस्त झाले. होनावरच्या वेढ्याला जूनमध्यें २ वर्षे होतील. तेव्हां इक्केरीच्या शिवापा नायकाला विजा.नीं फर्मान पाठविलें हे उपकार झाले. शिवापानें न ऐकल्यास वि.नें मन वळवून मुद्दास प्रवृत्त करावें; कारण शिवापानें म्हैसूरकरांची मदत मागितली आहे. बार्सेलोर कंबोली आणि मंगळोर हे आम्हांस परत मिळावे म्हणून बोलणें लावावें. पण त्यासाठीं पैसा कबूल करू नये. कारण आतां आमचा खजिना रिकामा झाला आहे. मार्टिन होनावरास जाऊन आला आहे; तेव्हां तुम्हास सर्व माहिती आहेच. तेव्हां शिवापानें विजा.शीं बोलणें लावलें असण्याचा संभव आहे. तरी विजा. मध्यस्ती करीत असल्यास पहावें. विजा. चा स्नेह आम्हांस पाहिजे. त्यानीं आमचे शत्रु डच यांना आपल्या मुलखांतून घालवावें. फोंड्याचे हवालदार शहाबाहेन अगर गरिवो(?) याचे पक्षपाती असल्यानें आमच्याशीं दुरापनी करतात असा अनुभव आहे. आमच्या मतें फत्तेखान, दादाजी व मलिक याकुत हे तिघे वदशहाशीं निष्ठेनें वागतात व दरबारांत त्यांचें चांगलें वजनहि आहे. त्यांना आम्ही नजराणे पाठवीत आहों. ते आमची

शत्रू धरतील. मलिक याकुत हा तर आमचा स्नेहीच आहे. तरी त्याला कांहीं बक्षीस देऊं करावें. मुस्तफाखान हा पोर्तु. चा शत्रु होता. त्याचा जावई शहासाहेब याचेहि धोरण तेंच आहे. तरी त्याला एक कपडा नजर करावा. खवासखानासहि जरूर पडल्यास नजराणा देऊ.

इ. सं. ऐ. गो. मा. ३ } (६६९) {श. १५७६ वैशाख व. २
हि. १०६४ जखर १५ पृ.१० } फर्मान {इ. १६५४ एप्रील २३

बादशहा औरंगजेब—अबदुलहसन

जुनीं देवालयें पाडावयाचीं नाहींत व नवीन बांधू द्यावयाची नाहींत. ब्राह्मणास किंवा इतर हिंदू रहिवाशास त्रास देऊं नये व त्यांच्या धर्मास हरकत करूं नये. त्यांच्या वृत्तीचा त्यांस शांततेनें उपभोग घेऊं द्यावा.

गो. इ. सा. ले. २७ } (६७०) {श. १५७६ वैशाख व. १२.
सु. १०५४ जखर २५ हि.१०६४ } फर्मान {इ. १६५४ मे ३

विजापुरचा महंमदआदिल-शाजलाल दीन महमद हवाल. व कार० मामले गोवा मठ विन विठल जोसी, धर्माधिकरणी सीा कवले मामले अंतरूज यास जी जमीन म्हापुरी, महुकई वगैरे गावीं आहे ती चालविणें.

खं. २० ले. ९५ } (६७१) {श. १५७६ श्रावण व. १
सु. १०५५ रम १५ } मिसेली फा. मु. मज. सी. {इ. १६५४ जुलै २०

अज० दि० पर० वाई—ता. हुदे. व मोक० मौ. ओझरडे नारायण गोपीनाथभट चित्राव यांचें इनाम चालविणें.

हेरास स. } (६७२) {श. १५७६ श्रावण
इ. } पोर्तुगीज {इ. १६५४ ऑगष्ट

विजापूरच्या सैन्यानें श्रीरंगाकडून वेलूर घेतलें. त्यानंतर श्रीरंग इकेरीकडे गेला.

सा. ले. ८८ } (६७३) {श. १५७६ अ. भाद्र. शु. ७
सु. १०५५ सवाल ६ } {इ. १६५४ आगष्ट ९

रा. सिवाजीराजे—रा. रा. नीलकंठराऊ

दंडवत उपरि तुम्ही राजेश्री बाबाजी नाइका बरावरी पत्र पाठविले ते व विस्येक मुखवचनें नाईक माहाले तिही सविस्तर सांगितले व नाईक बोलिले कीं आम्हीं त्यांसी तह केला आहे कीं जैसे काही राऊ गोसावी साहेबासी वर्तत होते तैसेच हिि

साहेबांसी वर्ततील व साहेब जैसे राजेश्री राऊगोसावी यांचे चालवीत होते तैसेच याचेहि चालवावे. तरी जे काही राजेश्री बावाजी नाइकी तुम्हासी निश्चय केला तोच आमचा निश्चय असे. जैसे काही राऊगोसावी आम्हासी वर्तत होते तैसेच तुम्हीहि आम्हासी वर्तत जाणें व आम्ही जैसे काही राजेश्री राऊगोसावी यांचे चालवीत होतो तैसेच तुमचेहि चालऊन. पविशाई आम्हास श्रीची व राजेश्री **महाराज साहेबाच्या** पायाची व **सौभाग्यवती मातुश्री साहेबांच्या** पायांची आण असे; व गेविशाई श्रीचा दवणा पाठविला असे तो घेणे व जोंपर्यंत तुम्ही आम्हासी इमानें वर्ताल तोंपर्यंत आम्हीहि तुम्हासी इमानें वर्तोन. **तुम्हापासोन इमानात अंतर पडलिया आमचाहि इमान नाहीं.**

सं. २० ले ५१ (१) } (६७४) { श. १५७६ अ. माद्र. शु.१२
श. सु. १०५५ सवाल ११ } महजर-उल्लेख { इ. १६५४ आगष्ट १४

दर अमल संभाजी मोहिते व हवाल० दादाजी रघुनांगद मुजू० कनकोजी भाकोजी व सुभानजी व महादजी यांस प्रत्येकी निमे मोकदमी मौ. सिरठाणेची असे.

हि. रे. क. ८ } (६७५) { श. १५७६ अ. माद्र.
पृ. १३७-३८ इ. } { इ. १६५४ आग.

**विजापूरचें सैन्य गोव्यावर चालून** आलें. पोर्तुगीज सैन्य कानडा, वसई-कडे गेलें होतें. घाटेशांतील लोकांनी विजा० ना बोलावलें होतें. वि० चे चार हजार स्वार अबदुल हकीम व मुल्लाखान यांच्या हाताखालीं होते ते चालून आले. किल्ला दोन दिवस लढला. पण शेवटीं शरण गेला. अदिलशाही सैन्यानें गोव्यावर हल्ला केला त्या दिवशीं (२।८।१६५४ सूर्यग्रहण होतें. डॅनव्हर्स भा. २ पृ. ३०८)

हि. रे. क. ८ } (६७६) { श. १५७६ अ. माद्र.
पृ. १३९ इ. } { इ. १६५४ आग.

पोर्तु०तर्फेचा मार्टिन विजा०स पोचला. त्याच्या मध्यस्थीनें दोघांतील युद्ध थांबावें असे ठरलें. मह०आदिलशहानें पत्र पाठवून असें कळविलें कीं "आपल्यांतील स्नेहाची वृद्धी व्हावी असें आमच्या मनांत आहे. आम्ही अबदुल हकीम यास मुसाखानामार्फत हें कळविलें आहे. अबदुल हकीम यानें आम्हास थापा मारून मलतेंच सांगितलें आहे. मार्टिन तुम्हांस येथील वस्तुस्थिती सांगेल.

इं. फॅ. भा. ९ } (६७७) { श. १५७६ माद्र. व. २
पृ. २९० इ. } फोर्ट सेंटजॉर्ज-कंपनी { इ. १६५४ सप्टेंबर १८

विजापूरकर आणि गोवळकोंडेकर यांनीं दोन्ही बाजूंनीं हल्ला करून गेलीं दहा

वर्षे सतत या देशाला कष्टप्रद अवस्था आणून ठेविली आहे. आतां स्थिरस्थावर होण्याची कांहीं आशा वाटूं लागली होती. तोंच मीरजुम्ल्यानें बंड उभारल्यामुळें तो आणि त्याचा स्वामी गोवळकोंडेकर यांच्यांत बेबनाव होण्याची आपत्ति येऊन कोसळली आहे. आपण जिंकलेला मुलूख आपल्याच ताब्यांत ठेवावा अशी मीरजुम्ल्याला महत्त्वाकांक्षा उत्पन्न झाली असावी असा तर्क आहे. तसें झालें तर तो आपल्या सुलतानाएवढाच राजा होऊन त्याच्या राज्याचा वसूलहि जवळजवळ तितकाच होईल.

| | | |
|---|---|---|
| एपि. कर्ना. १० पृ. ६८<br>ले. १९३ जय संव. दक्षिणा | (६७८)<br>मद्रसमुद्र शिला. | श. १५७६ आश्विन व. ५<br>इ. १६५४ आक्टो. २० |

श्रीमत् राजाधिराज रा. रा. संवोजीराज महाराज यांच्या प्रतिनिधीनें ४९ कण्डुग मात जमीन तलाव बांधण्यास दिली. मौ. मुद्दवाडी ता. कोलार.

| | | |
|---|---|---|
| हि. रे. क. ८<br>पृ. १४० इ. | (६७९) | श. १५७६ आश्विन<br>इ. १६५४ आक्टो. |

विजा. नीं पोर्तु. कडे मार्टिन व मलिक याकूत यांस पाठविलें; व पुष्कळ दिवस चालत आलेला दोन्ही राज्यांतील स्नेह कांहीं मूर्ख लोकांच्या गैरसमजानें नाहींसा होऊं नये अशी कळकळीची इच्छा प्रकट केली.

| | | |
|---|---|---|
| सा. ले. ४३<br>मु. १०५५ मोहर ११ | (६८०)<br>कौल फा. सी. | श. १५७६ कार्तिक शु. १२<br>इ. १६५४ नोवें. ११ |

१——　　मल्हारजी येसवंतराऊ देसमुख व माहादो राम देसकु. व सेटिये व महाजन व बकाल व मोकदम व रयेत व बाजे लुम पर. सिरवल.

शिवाजी खडेराऊ मज्मुदार आणिला म्हणौन दिलगीर न होणे. त्याचे बाबे हुजूर लिहिले आहे. **तुमचे धनी आम्ही** असे. कोणे बाबे शक अंदेशा न करितां बहादुरखानाचे रजा असोन उमुलास व कीर्दी मामुरीस तकसीर न करणे.

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ. मा. ९<br>पृ. २९८ इ. | (६८१)<br>सुरत-कंपनीचे चालक. | श. १५७६ कार्तिक व. १०<br>इ. १६५४ नोवें. २३ |

पोर्तुगीज आणि दख्खनचा सुलतान ( **विजापूरकर** ) यांचें **युद्ध** चालू आहे. [ विजापूरकरांनीं गोव्याला वेढा घातला जुलै-आगष्ट १६५४ ] यामुळें पोर्तुगीजांच्या मुलखांत जाणें येणें अशक्य झालें आहे.

| | | |
|---|---|---|
| हि. रे क. ८<br>पृ. १४१ इ. | (६८२) | श. १५७६ मार्ग.<br>इ. १६५४ डिसें. |

विजा॰ महंमद आदिलशहानें पोर्तुगीज गव्हर्नर यास पाठविलेलें पत्र: "मलिक

याकूत यानें गव्ह०च्या स्नेहभावाविषयीं लिहिलें आहे. तर मित्रत्वाचा तह घडवून आणावा. रुमा (Rumaas) पाठविले आहेत ते घ्यावे. इतर हकीकत मार्टिन सांगेल."

| | | |
|---|---|---|
| क. ३ ले. ५ पृ. २४<br>सु. १०५५ रवल १७ | (६८३)<br>खुर्दखत फा. व सी. | श. १५७६ पौष व. ५<br>इ. १६५५ जाने. १६ |

अजर. माहा. रा. शाहाजी राजे———वजा० कार० पर० पुणें

मोरोबा गोसावी सो चिंचवड याचेविशीं रघुनाथ भट खेडकर यांनीं सांगितले कीं, "गोसावी याचे इनाम फर्मान, वजीर व महाराज यांची खुर्दखते याप्रमाणे चालत असता, त्यावर कनकगीरपट्टी नवी बाब जाले ते घालून पेकियाची तहसील लाविली आहे. व आणखी नव्या पट्या जाल्या आहेत त्याही घेऊं म्हणताती. तरी ये बाबे तसवीस न लागे व केली उचापती फिराऊन देती ऐसा हुकूम केला पाहिजे." तरी त्याचे इसमाचे बाबेस एक जरा न जाणे. परवा. अजम जैनाखान पीर जादे.

| | | |
|---|---|---|
| हि. रे. क. ८<br>पृ. १४२ इ. | (६८४) | श. १५७६ माघ व. १४<br>इ. १६५५ फेब्रु. २५ |

पोर्तु. व विजा. यांच्यांत सलोख्याचा तह झाला. त्याचें वर्णनः हा समारंभ गोव्यास गव्ह. च्या वाड्यांत झाला. मलिक याकुत व मार्टिन हे विजा. तर्फे व गोव्याचा कप्तान व सभ्य लोक आणि कृष्ण शेणवी व राय शेणवी कोठारी पोर्तु. तर्फे होते. शपथविधी झाल्यावर गव्ह. म्हणाला अराजनिष्ठ दरबाऱ्यांच्या सांगण्यावरून विजा. नीं पोर्तु. शीं युद्ध पुकारलें होतें; पण हा अन्याय लक्ष्यांत येतांच आदि. नें युद्ध थांबविलें; आणि सलोखा करण्यासाठीं वकील पाठविले. तें पत्र असें (पत्र वाचण्यांत आलें). तेव्हां कौंसिल ऑफ स्टेटनें पूर्वीचे तह कायम करण्याचें ठरविलें. ते तह एप्रिल ३ (न्यू. स्टा.) १६३३; आणि इ. १५७६; जाने. २१ (न्यू. स्टा.)इ. १५८२ रोजीं करण्यांत आले होते. मलिक याकुत व मार्टिन्स यांनीं पूर्वीचा सलोखा कायम ठेवणाऱ्या नव्या तहावर विजा. तर्फे सही करण्याची तयारी व्यक्त केली. मार्टिन म्हणाला मी पोर्तु. राजाचा प्रजाजन आहे. पण मला महं. आदि. नें वकील नेमले म्हणून माझ्या व मलिक याकुता- तर्फे मी सही करतों.

| | | |
|---|---|---|
| सा. इ. ले. २९<br>सु. १०५५ जवल १ | (६८५)<br>कौलनामा | श. १५७६ फाल्गुन शु. २<br>इ. १६५५ फेब्रु. २८ |

श्रीमंत लखम सावंत देसाई पर० कुडाळ—सेटिये वो महाजन वो वकाला. तुमची तकार समजली. तुमची मोईन व दिवाण बाब आमीं आपले निसबत करून घेऊन आमचे निसबतीनें रामजी फर्जंद पितांबरधारी चिटणवीस यास टेविले असे. तरी सेणवी मजकुराचे वर्तीनें हरएक कारबार चालवणें.

शि. प्र. पृ. १०२ }
ले. २८ ? } (६८६) खुर्दखत फा. मु. मज. { श. १५७६ फाल्गुन शु. ७ { इ. १६५५ मार्च ४

अज० ?—कार. देसमूख तपे वालवे.

धंभुभट यास मौ. सिरगाऊ येथील ॥- चावर जमीन जिनत कमानीचे खुर्दखताप्रमाणें चालत आहे. हाली तपे मजकूर साहेबास मुकासा अर्जानी जाला आहे. तरी इनाम चालविणें.

सर. ले. ४२ हि. १०६५ }
सु. १०५५ जवाल १५ } (६८७) फर्मान { श. १५७६ फाल्गुन व. २ { इ. १६५५ मार्च १४

विजापूरचा बादशहा—

मुजफराबाद शेख अली हवाल. मुरतफाबाद सयदनूरउल्ला सर हवाल. केशव राघो महालुंगकर याचे सरदेश. देशमुख इनामें चालविणें.

फरा. सला. पृ. २०८ }
सु. १०५५ हि. १०६५ जवल २१ } (६८८) फर्मान { श. १५७६ फाल्गुन वद्य ८ { इ. १६५५ मार्च २०

महमद आदिलशाह—हवालदार मुद्गल कोटाल, नौली. अफजलखान महमदशाही यानें उडचपा नायक याच्या राजनिष्ठेविषयीं आग्रहास कळविलें; त्यावरून त्याच्यावर बादशाही कृपा केली आहे. त्यास वरील गांव दिले आहेत. तरी त्याच्या आज्ञेत राहावें. शुजाअत व इजत दस्तगाह् अमदये दौलतखाहाव व फावीश.........
रुक्तुद्दौलत महाराज फर्जंद शहाजी भोसला आणि इतर लोक जे नायकाविरुद्ध होते त्यांनींहि नायकास मदत केली पाहिजे.

सा. ले. ३८८ }
सु. १०५५ } (६८९) खुर्दखत फा. मु. व सी. { श. १५७६ { इ. १६५४-५५

अजर. मलिक याकुत तपे पेडगें मामले गोवा—— कार. व देसा.

कोंड बिन विठल नायक सरदे. याचे हक याचे दुमाला करणे.

शि. प. ले. ३७६ }
सु. १०५५ } (६९०) खुर्दखत फा. मु. सी. { श. १५७६ { इ. १६५४

अज दि० ठाणे गावगना ता पाली—— हुदे. मोक. वस. तर्लबाह

छ ८ सावानचे खुर्दखतांत रजा की, धारोजी राजे मोहिते यास इनाम बरा. मज. येथे सेत दिल्हे असे तरी हवाले करणें.

शि. सा. ले. ४४ } (६९१) { श. १५७६
( सा. ले. ४३ )) पत्र-खासगत { इ. १६५४

शिवाजी खडेराऊ——— माहादाजीपंत गोसावी

घरी वेधेनें उपद्रव केला आहे. पुरधरी सिवाजी वैद प्रामाणिक आहे. तरी त्याचें समाधान करून येथे पाठविलें पाहिजे.

इ. व. ३८ पृ. १४ } (६९२) { श. १५७७ चैत्र शु. १
श. व सं. } नकल { इ. १६५५ मार्च २८

चांदजी कान्होजी भूपतराय देसमु. पर. कडेवलित, पाडियापेडगाऊ व मोकदम कस. माडो, पेठ कातरावाद.——— सुडाजी बिन नरसीह कुळ० व देसकु० अहमदनगर. देसमुखी वतन आपले. परंतु आपणास भोगवट्या किती मुदतीत नाहीं. तलाश करावा तरी नातवान. तुम्हास देसमुखीची तकसीम दोनी हिसे मिरास करून दिधली. एक तकसीम माझी. तुमी देसमुखीचा तलाश करून अमल चालता करणें. पहिला मान तुमचा. मागाहून माझा. सर्वेवेच वाटणीप्रमाणें घेऊ. वगैरे.

हि. रे. क. ८ } (६९३) { श. १५७७ वैशाख
पृ. १४३ इ. } { इ. १६५५ मे

विजा. च्या महंमद आदिलशहानें पोर्तु. नी केलेल्या तहनाम्यास मान्यता दिली. ही बातमी समजताच पोर्तु. गव्ह. नें हिऱ्याची एक आंगठी नजराण्या दाखल पाठविली.

सं. २० ले. ९७ } (६९४) { श. १५७७ श्रावण व. १२
हि. १०५६ सवाल २५ } खुर्दखत उद्देश { इ. १६५५ आगष्ट १८

आमण दामोधर क्षीरसागर यांचे येकंबे येथील इनाम, बादशाही फर्मान व मोकाशी यांचे खुर्दखताप्रमाणें चालवीत जाणें. (ले. ५५४ पहा)

हि. रे. क. ८ } (६९५) { श. १५७७ श्रावण वा १४
पृ. १४३–४६. } { इ. १६५५ ऑगष्ट २०

विजापू. च्या महं. आदि. चें पोर्तु. गव्हर्नर इनमास पाठ पत्र. "तळकोकणांतील अलीकडे हस्तगत केलेले किल्ले व ठाणीं रुस्तुमजमाच्या सेनाधिपत्याखाली दिले आहेत व ते राखण्याचें काम मलिक याकुत याजकडे सोंपविलें आहे. आतां या दोघांना अंकोला, मंजा, कारवार वगैरे कडील नाईकवाड्यांच्या बंदोबस्तासाठीं पाठविलें आहे. त्यांना तुम्ही सर्व प्रकारें मदत करावी. मलिक हुकूम देईल ते आमचे, असें समजून तुम्ही पाळावे.

सा. पू. २४ लि. १९ हि. १०६५ }
सु. १०५३ जिल्काद ३ }
(६९६)
फर्मान न. मार्पा.
{ श.१५७७ माद्र. शु. ४
{ इ. १६५५ आगष्ट २५

बादशाह विजापूर———————मामलेदार व देसमुख पर० पुणे

शेख अबदुला बिन शेख मिया चाकर दरगा शेखसला होदिन साहेब.

वरील गृहस्थास दरग्याचे चाकरीबदल १ चाहूर जमीन निजामशा व बादशहा याचीं फर्मानें व वजिराचे खुर्द. रावत व महाराज चिरंजीव शहाजी भोसले यांच्या खुर्दखताप्रमाणें चालू आहे. तरी त्याचा इनाम त्याजकडे चालू ठेवणें.

हि. रे. क. ८ }
पृ. १४३ इ. }
(६९७)
{ श. १५७७ माद्र. शु. ५
{ इ. १६५५ आगष्ट २६

ज्या गव्ह. नें विजा. शीं तह केला त्या गव्ह. स सार्जेदास नांवाच्या नव्या गव्हे.नें कैद करून पोर्तुगालकडे पाठविलें. नंतर नव्या व्हाइसरायाकडे मलिक याकुतानें वकिली-साठीं गोव्यांत येण्याची परवानगी मागितली. त्याप्रमाणें परवानगी दिल्यावर विजा. च्या बादशहाचें पत्र त्यानें दिलें तें जुन्या गव्हे. च्या नांवें होतें. यामुळें त्याला नवें आणवावें लागलें व नंतर तें देण्यांत आलें.

सा. ले. ३५२ }
सु. १०५६ जिल्हेज ३ }
(६९८)
कर्ज-कतबा
{ श. १५७७ आश्विन शु. ५
{ इ. १६५५ सप्टें. २४

बसपा बिन त्रिसलणा तेली का अथणी—सितया बिन लिंगया मुचंडी.

आपणापासून आम्ही कर्ज घेतले ते कलांतरे देऊ. दर माहे दर होन येकसी होन ०।· कलंतर देऊ.

हि. रे. क. ८ }
पृ. १४४ इ. }
(६९९)
{ श. १५७७ मार्ग. शु. २
{ इ. १६५५ दिसें ५

विजा. तर्फे मलिक याकुत गोव्यास गेला. पण त्याचें व गव्ह० ( सार्जेदस )चें जमलें नाहीं. त्यांच्यांत बोलाचाली होऊन मलिकाला जावें लागलें. त्याला फोंड्याचा हवालदार नेमलें होतें. तेथेंहि त्यानें चुका केल्या. यामुळें त्याला अधिकारभ्रष्ट व्हावें लागलें. ही हकीकत नव्या गव्ह.नें पोर्तु. च्या राजास लिहिली व "मी येथें यावेळीं आलों नसतों तर विजा.च्या मनांत आमच्यापासून खंडणी घेण्याचा विचार होता असें दिसतें. पण आतां मोंगलांशी त्यांची बोलाचाली सुरू आहे." वगैरे त्यानें लिहिलें आहे.

शि. च. ७ पृ. १११ ले. २ }
सु. १०५६ ? सफर ७ }
(७००)
कौलनामा
{ श. १५७७ मार्ग. शु. ८
{ इ. १६५५ नोवें. २६

अजर० रा० शिवाजी राजे—सावाजी येसवंतराऊ पासलकर देस. मुसेखोरे.

तुझे बावे + + व रामाजी व नागोजी व बाबाजी बिरादर बाजी येशवंतराव हुजूर येऊन अर्ज केला जे पेशजी बाजी येशवंतराऊ + लानी नवलोजी पासलकर यामधे तपे मजकुरी वडीलपणाच्या नावनिशाणाबदल गरगशा होता. निवाडा जाहला नाहीं. तोंच मयेत जाला. देशमुखीचा निवाडा + म्हणून वडीलपणाबदल तुकोजी फर्जंद साबाजी येशवंत + + जी फर्जंद कृष्णाजी मजकूर व आपण चौथे भाऊ धर्मोजी बालाजी नवलोजी तो देसमुखी खात होता. त्यास वडील + + नावानिशाणाबदल भांडत. साहेबानें बंदगी रा हु (जूर) उभे राहिलों. यावरि साहेबी हुजूर हजीर मज्यालसी या + (जी साबाजी दे) समुख (स) गत बसवून धर्मोजी बालाजीची व महाली मुनसबी मनास आणली.

सा. ले. १४० } (७०१) { श. १५७७ मार्ग. व. ५
सु. १०५६ सफर १८ } खुर्दखत फा. मु. व सी. { इ. १६५५ डिसें. ७

अजर० माहा० रा० शाहाजी राजे————कार० व देसमु० पर० सुपे

थोरल्या दुकालामधे रखमाजी व अंताजी उंडा कुलकर्णी मो. कोल्हाले बु॥ पर० मज० येही तिमाजी खेडराऊ मु. जेजुरी यास कुलकर्ण जोतिस देखील वृती देऊन २० होन घेतले. यावर तिमाजी वृती चालवीत असता विसाजी उंडा फर्जंद रखमाजी याने बलात्कारें वृती लिहून घेतली, कागदहि घेतले. तरी मौ० मज० चे कुलकर्ण व जोतीस अमानत करून दोघास गोतात पाठवून देणें. निवाडा होईल तेणेंप्रमाणें दुमाले करणें.

फरामीन सलातीन ११ } (७०२) { श. १५७७ पौष शु. ९
हि. १०६६ रबल ८ } शिक्का इब्राहिम आदिलशहा जगद्गुरु { इ. १६५५ डिसें. २७

विजापूर बादशाहा—— उज्व नायक कनकगिरी

अफजलखान महमदशाही यास नायब नेमून पाठविलें आहे; तुम्ही काळजी करूं नये; नवाबाच्या शब्दावर विश्वास ठेवून जलद इकडे यावें म्हणजे तुम्हास विजारत (वजीरी) देण्यांत येईल. मोयास पाठविला आहे.

इं. फॅ. १० } (७०३) { श. १५७७ माघ व. ७
पृ. ६२-६३ इ. } आग्रा-सुरत { इ. १६५६ फेब्रु. ६

गोवळकोंड्याचा सेनापती मीरजुमळा याने रामराजाचा विस्तृत मुलूख जिंकल्यानंतर, आता आपल्या सुलतानाविरुद्ध बंड करून शहाजहानकरितां गोवळकोंड्याचें राज्य मिळवून देण्याचें त्यानें कबूल केल्यामुळें गोवळकोंडा व विजापूर या राज्यांवर बादशहा मोठें सैन्य पाठवून त्याला मदत करील अशी वदंता आहे.

सा. ले. १३० }
सु. १०५६ }
(७०४)
मिसेली म. मु. व सी.
{ श. १५७७
{ इ. १६५५

अज दि० प्रा पाकण— ता। मोक. मौ. वेहरवडे
गणी गबाजी तर्वाव याचा वेहरवडे येथील इनाम चालविणे.

मठ शि. ले. ५ }
? श्रावण ११ }
(७०५)
{ श. १५७७ ?
{ इ. १६५५

मानजी प्रभू सरदे. प्रा कुडाळ — समस्त ब्राह्मणवृंद, वालावल.
आमचे वडील दादाजी प्रभू यानीं नारायणभट उपाधे याचेकडे पंचायतन देऊन त्यास इनाम करून दिल्हें. हाली काहीं अटराल दिसून आला. तर मर्यादेप्रमाणें चालविणें.

मठ शि. ६ }
(७०६)
{ श.
{ इ.

मानजी प्रा सरदे०—— माने व विडे प्रभू समस्त व ग्रामस्त मौ. वालावल
नारायणभट उपाधे याचेकडे शाळिग्राम देऊन श्रीचे देवालयी श्रावणी करणेसाठीं इनाम दिला. हाली प्रतिवाद पडिला तरी पूर्वीप्रमाणें इनाम चालविणें.

खं. २० ले. २८८ }
? }
(७०७)
उल्लेख–चद्रराव
{ श.
{ इ.

वडील **रामोजी याडकर** हा चंदररायाशी टोगाईनें राहात होता यावद्दल त्यास जिवे **चंदररायानी चिखलीस मारिला.** याउपरि त्याचा लेक लुमाजी हाही पलसोसी येथें चदररायाचे स्वारीस सांपडला व मारिला.

रु. ३ ले. २१ }
सु. १०५६ }
(७०८)
कौलनामा म. मु.
{ श. १५७७
{ इ. १६५५

अजर० रा. **सिवाजी** राजे —— हैबतराऊ देशमुख ता गुंजणमावळ.
तुमचे बावे हुजूर खबर मालूम जाली जे, कितेक वडिया लोकांनीं तुमचे **पाठी शक घातला आहे;** की तुमची **देशमुखी आम्ही येऊ,** तुम्हास वाईट करू, ऐसा शक घातला आहे व दळवी यांचें कर्ज आहे त्यास तुम्हीं जमान आहा जमानती झाडे लावून आम्हास कष्टी करू, ऐसा शक तुमचे पोटी बैसविला आहे व कितेक तुमचिया घरोबियामध्यें एक प्रकार वर्तणूक जाली आहे असे कितेक लोक बोलताती. तरी येही गोष्टीच्या निमित्या येऊन कष्टी करितील, ऐसा शक बसविला आहे. या तिही गोष्टीकरितां व कितेक गोष्टी करिता तुम्ही शकजादे आहा. **डावा डौल होता तरी तुम्हास साहेब घरिच्या लेकरासारिखे जाणिती** आणि तुमचे फार हेहि गोष्टीचे वाईट

करावे ऐसे मनावर कधीं धरणार नाहींत; हे तुम्हास विचित कळले असावे. कोणेहि गोष्टीचा शक न धरणें. तुमचे हजार गुन्हे माफ आहेती. तुम्हासी आम्ही काहिंहि वाईट वर्तणूक करूं तरी आम्हास **महादेवाची आण** असे व **आईसाहेबांची आण** असे. कोणेहि गोष्टींची चिंता न करणें. अवांतरहि लोक मेडसविले असेल ते मेटविणे. **आमच्या इमानावरी आपली मान ठेउनु आम्हापासी येणे.** कोणे गोष्टी चिंता न करणे. मोर्तब

फरा. सला २१२ } (७०२) { श. १५७८ चैत्र शु.६
सु. १०५६ व हि. १०६६ जखर ४ } { इ. १६५६ मार्च २१

विजापूरचा बादशहा——— आमिलान व देसायान हिसार **कनकगिरी**
आम्ही हा किल्ला उद्धव नायकास पूर्वीप्रमाणें दिला आहे. तरी त्याच्या हुकमतींत वागावें.

श्री. नि. वि. ३४ पृ. २०९ } (७१०) { श. १५७८ श्रावण
१ ( सौवाल) } **'आम्ही तो रजपूत'** { इ. १६५६ जुलै

खान आलीशान फेरोजी निशान खाते अजम अक्रम ममलकत मदार दयाम यकबालहू व इजलालहू अमारत व अदालत पन्हाह शुजाअत व शहामत दस्तगाह अजमत व शौकत इतिहाद यकबाल व इजलाल हमराह आलीशान रफिअल कदर बुलद-मकान उमदह वजराये जमा क्रुद व उमराय नसरत निशान—

अर्जी वदिलमाहिद **महाराज शहाजी राजे**———

सलाम वादज सलाम महबत अंजाम महबतलमुराम आंकी पा कनकगीर पेश अर्जी दरगाह वदगीस पेश केली. त्याचा मुबादला आपल्यास मन्हामत जाला. यावरी पा अंनागोदीहि पेश केली (पाचा) महिना जाला. इनोज मुबादलियाचा सरजाम जाला नाहीं. जमेयतीवाहि दिलास जाला पाहिजे. कुदगोलकार मनेवारे आपले जागी व **तामगौड** तर्फेस तसवीस देउनु फसाद केली आहे. त्यास गोशमाल वावयाबदल हजरत जाहपन्हा साहेबी आपल्यास रजा दिल्ही. ते तर्फेस मैसूरकराचीहि सरहद्द नजदीक आहे. वगैरे संगीनात मुराई वके होउनु पातशाही नामोश राहत नाहीं. आजी वास्ते हजार दीड हजार जाजती कामाचे लोक ठेविले आहेती वगैरे जागीर लोकाची समजावीस होत नाहीं. तरी दर चंदगीस अर्ज करुनु अनेगोदीच्या मुबादलियाचा सरजाम केला पाहिजे. यास येवज ये तर्फेस कर्यात अकोळेज व तपे टेमुरणी व मतग्राम अगर पेडणे हे कदीम मुलकात देविले पाहिजे. अगर कदीम मुलकात सदरहू देणे नसेल तरी मामले पादशाहवादखाले सरजाम केला पाहिजे. अगर मामले पादशाहबादे खाले जागा नसेल तरी पा चटेरू या मामले मजकुराखाले चजाउरकरास दिधले आहे तें तन्ही मुबादलियास दिधले पाहिजे. आपण हरामखोर मजेवार भजाऊरकरास गोशमाल देउनु सोडउनु घेउनु हराम-खोर मनेवारास दिधल्यात काय फायदा. कुल मनेवाराचे हेजीव **मीरजुमला** वावरी

गेले आहेती व पा मुसलरुल आपली जागीर पेशजी भिस्त रोजी रुस्तुमजमा बराबरी माहोलीहून हुजूर आलो ते वख्ती चौ लाखाची जागीर दिधली. त्यामध्ये मुसलकलचा फर्मान आपले नावे दिधला यावरी [शिक्यांतील अक्षरें—शहाजी बिन मालोजी राजे] दुसरे वख्ती मरहुमी खाने अजम असदखानाचे गुजारतीनें लक्ष्मेश्वरचें वख्ती मोकरर आली. तेही वख्ती व तिसरीयानेंहि मरहुमी खा अहमदखान याचे वख्ती मोकरर फर्मान दिधले. तेही वख्ती मुसलकलचा फर्मान आपलेच नावे आहे. येसे तीन वख्त आपले नावे फर्मान पा माचे आपले नावे आहेती. या फर्मानाच्या नकला पातशाही दफतरी असतील त्या काढाडून पाहिल्या पाहिजेत. आपले माई व फर्जंद याचे दिलासियाबा क + + + + + विले व फर्मान त्याचे नावे करुनु दिधले तरी ते काय मसमुबाली इरकसीने गलथ हुजूर मा + + करणारी करुनु मुसलकलचा मुबादला पंधरा खेडी कर्याती कारवे आपली जागीर मिवकजीस यावयाची काय निसबत धरीते. इजरत साहेबाचा तरी कौल करारदाद आपल्यास आहे की तुमचे जागीरपैकीं एक चावर कसीदगी करणें नाहीं. जरूर येक वख्त पादशाही कामावा कांहीं कसीदगी केले तरी अवल सवाईन मुबादला देउनु मादज कसीद करावे. आमा अकार्तुकाचे बोले करुनु आपले जागिरीत नाहक गैर हिसाबी पादशाह खलेल करविताती. तरी आपण रजपूत लोक अजी तलग पेशजीहि दोघा चौ पादशाहीत खिदमत केली. अमा गैरहिसाबी जाजती सोसुनु कमइजतीन व गैरमेहेरबानीन पेशजीहि खिदमत केली नाहीं. व पुढेहि न करूं. उमेदीने आपण आजी दीढ वर्ष जाजती सोसिली; ते याच दमा की, थोरले हजरत साहेबाचे नवाजीस व इजरत साहेबीहि जहाबक्षी केली आहे व वख्तहि एकवजाचा समजोनु आपण सबूरी करुनु तहमूल करावयास तकसीर केली नाहीं. पेस्तर इजरत साहेबास आपली दरकार असेल तरी हिसाबी आपला सरजाम सदरहु केला पाहिजे. आणि दरकार नसेल तरी खुषनुदीनें रजा दिधली पाहिजे. आपल्यास असलादपुन्याई मामल्याचीहि इवस काही राहिली नाही. एखादे आपले हिंदूचे तीर्थी बसौनु हक तालाची बदगी करुनु इजरत साहेबास दुा देउनु फर्जंदमाई आहे. तियापासुनु खिदमत घेतली पाहिजे. अगर त्याहि पासुनु खिदमत घेणे नसेल तरी त्यासहि रजा यावी. बाजे माईबंद. जेथे आपली पोटे भरिताती तेथें हेहि भरितील. अमा नाहक आपल्यास बदनाम केले न पाहिजे. दरीबाब इजरत बदगीस हाली अर्जदास्त पाठविली आहे तरी वडेभाईनेंहि इजरत बदगीस अर्ज करुनु सदरहुप्रमाणे अनागोदीच्या मुबादलियाचा सरजाम व पंधरा खेडियाचा ताजा फर्मान आपल्याच नावे देविला पाहिजे. अगर आपल्यास खुषनुदीन रजा दिधली पाहिजे व पा कनकगीर व अनागोदीहि दरगाह बदगीस पेश केली. येक कपली खेडे दिढा दो हजाराचे तेथे आपण राहिलो होतो. तेव्हडे आपल्यास असो दिधले पाहिजे तेथे बाग आपण केले हवासीर जागा आहे तरी दरगाह बदगीस अर्ज करुनु मोकरर करुनु

देणें म्हणौनु मनुरलदौलत सावतराऊ यास लिहिले होते. सावतराऊ माईलेने अर्ज केला. असा हजरत साहेबी हुकूम फर्माविला की अनेगोदीच्या मेहतानास कपली पाहिजे सोडून देणे म्हणौनु राऊ माईलेने लिहिले. यावरी आपल्यास रहावयास जागाहि नव्हती व तामगौडतर्फेहूनहि ताजी खबर आली की कुंदगोलकरास आपले लोकानी सिकस्त दिधली होती. असा तो मागती सवारीनु कोटास येउनु दिलगोव्याची फिर्याद करिती मदत न व्हता जागा राहणार नाही. अजीवास्ता हजरतसाहेबीहि पेशजीच रजा दिधली होती म्हणौनु छ४ माहे सौवाली कपली सुबेदाराचे लोकाचे व कदनवेलीकराचे लोकाचे हवाले करुनु आपण स्वार झालो. येक मजली आलियावरी आनेगोदीकार व हुलालखोर हे दूर गलथ मालूम करणाराचे बोले करुनु आले आहेती. तेहि पादशाही लोकावरी हिसा करुनु कपली त्याजपासुनु घेतली हे खबर आपण कपलीस आलियावरी पाहाटा रात्री आपल्यास आली होती. ते पेशजीच लिहिली आहे. पेस्तर सिदी अजम सिदी संबूल आलियावरी अनागोदीस व कपलीस व बाजे विलायतीस दखल होऊ देतील की ने दितील हेहि पेस्तर रोशन होईल. सेभरा वर्षाचे मुठमर्द त्यास गोशमाल देउनु दफे केले होते ते जागी पादशाही बंदियापासुनु घेउनु मुठमर्द हरामखोरास जेही देविले असतील त्यास याचा जबाब पुसिला पाहिजे. साहेब अवी सवा जमजम स्वार होउनु येतील म्हणौनु सबुरी करुनु दीड महिना राह साहेबाचे यावयाचे पाहिली असा साहेबाचे यावयास मातल जाले मग आपण पादशाहाचे रजेवरुनु स्वार होउनु वलदारी नजदीक आलो. पुढेहि मजली दर मजली ताम-गौडतर्फेस जात आहो. तरी आपण (पेशजी) लिहिले आहे त्याप्रमाणे मनेवारास फर्मान व साहेबी आपले कागद पाठविले पाहिजेत. कपलेत मुतलख चारा नव्हता; थोडी जाया जाली व पुढेहि राहिल्यानें होतील तामगौडतर्फेस चारा घास जाला आहे; या दमा ते तर्फेस जाउनु मुराई मनेवारास गोशमाल देउनु दोनी महा-[ कागद सपला म्हणून येथून पुढील मजकूर समासांत लिहिलेला आहे व अस्सल पत्रांतील हा समासाचा भाग बराच फाटला आहे.] लाची मजबूद करुनु खडे++मसलहतेस रहावे अगर ते मसलहतेचे काम फिरउन आधी करारवादप्रमाणे तयारी फर्मावितील मजबूत आहो+ + +पुरा मागे + +भाई+कळून+ +लकी येह+ +कपिले मस्+ +.

खं. २० ले. ९६ } (७११) { श. १५७८ आश्विन व. ११
सु. १०५७ जिल्हेज २५ } सिसेली फा. सु. मज. व सी. { इ. १६५६ आक्टो. ४

अज दि. पर. वाई— ता. मोक. मौ. पसरणी पर. मज.

नरसीह रंगभट चित्राव यास पसरणी येथील ।॥। चावर जमीन इनाम चालविणें.

सा. ले. ४५ } (७१२) { श. १५७८ कार्तिक शु. ११
सु. १०५७ मोहर ९ } { इ. १६५६ आक्टो. १८

अजर. अफजलखान महमदशाही— मल्हारजी देशमु. व महादाजी देसकु. पर. सिरवल.

आमचे **मोकासा** जाहल्या तागाईत आमचे तरफेने जरा तसवीस होत नसता मामूरी होत नाहीं. यावरून अजब मालूम होते. **देसमुखीचा काइदा** की विलायती तमाम जमीन कीर्दी करावे तरी येक तसू ना पडीत करवीजे. दिवाणींचे पैसे दिवाणासी नेदिता नुकसान केलिया खेरती कैसे होईल.

खं. २० ले. ९७ } (७१३) { श. १५७८ कार्तिक व. ५
सु. १०५७ मोहर १९ } मिसेली फा. मु. मज. व सी. { इ. १६५६ आक्टो. २८

अज० दि० पर० वांई— मोक. मौ. एकंब समत कोरेगाऊ पर. वाई

अनण दामोदरभट क्षीरसागर यांचा एकंबे येथील ½ चावर इनाम जमीन चालू ठेवणें. ( ले. ५५४ पहा )

सा. ले. ३५३ } (७१४) { श. १५७८ कार्तिक व. ६
सु. १०५७ मोहर २० } { इ. १६५६ आक्टो. २९

अबदुल अली. हवाल. का अथणी— फौजदार **क्षेत्र कासी**

**लिंगायतः**-पूर्वीपासून, जंगमाचे देव खेळत असतां जैनाचा निंदा करीत होते कारण मजबी तैसे चालिलें असे. ब्रह्मसभेंत निवाडा होईल तो मान्य करूं.

**जैनः**-जंगमाचा देव खेळत असता आमचा देव व गुरु व जैन लोक यास शिव्या देत असे. ते करिता कुसूर. ब्रह्मसभा सांगेल तेप्रमाणे असो.

येसे कलह आहे. हरदो खुमासी पाठविले आहे. ब्रह्मसभा निर्णय करील तो पाठविणे.

इं. फॅ. १० पृ. ७३ } (७१५) { श. १५७८ मार्ग. व. १४
इ. } आग्रा—सुरतः { इ. १६५६ डिसें. ४

**शाहाजहान** बादशहाची कंदाहारवरील स्वारी रद्द होऊन, आतां दख्खनचा **महमद अदिलशहा** मुलतान वारला असल्यामुळें त्या भागावर स्वारी करण्याकरितां, **मीर** जुमल्याच्या बरोबर देण्यासाठीं मोठें सैन्य उभारलें जात आहे.

नै. व. ८ पृ. १०३ } (७१६) { श. १५७८ माघ शु. १३
श. व सव. } { इ. १६५७ जाने. १८

सुभाजी बापूजी अत्रे जोसी कुळकर्णी कोढीत पर. पुणें.

बालाजो हरी मेहजोगी कुळक. मौ. वढयांऊ नेपरज.

मौं. कोढीत बु. येथील जोतीस व कुळकर्ण आपली मिरासी. ती सोनाजीपंत आपले गोत्रज खात होते. तो गंगथडीस लेकीकडे जाऊन राहिले व सांगून पाठविलें तुमची मिरासी तुम्ही खाणें. यावरी विठोबा आमचा पुतन्या चालवीत होता. कम. सासवड रामाजी देसक. आपले माणूस ठेऊन चालवू लागला. तरी मौं. कोढीतचे जोतीस कुळकर्ण तुम्ही सोडवून खाणें. जोतिस आम्ही खाऊ. हरकती करील त्यासी आपण निवारू.

| | | |
|---|---|---|
| स. प. ११४ ले. ५<br>सु. १०५७ | (७१७)<br>मुद्रा. | श. १५७८<br>इ. १६५६ |

अजर सिवाजी राजे—कारकून व देसमूख ता हवेली प्रा पुणे

बो काजी इमराहम व काजी शरीफ बिन काजी आबदुल्ला बिन काजी महमद बिन काजी चिमन हकीम हरा प्रांत मा हुजूर......प्रां मा कजा व नेबकजा सतीव आपली मिरासी आपले वडिलांचे नावें वा फर्मान निजामशहा व खुा मलिक अंबर व खु॥ वजिरानी कारकीर्दी दरकारकीर्दी चालत आहे. येणेप्रमाणें होते. यावरी खर्तावाचे टके तीनशें तीस याचा मोगवटा मुरारपंताचे कारकीर्दीपासून तुटला आहे......मेहेरबान होऊन खुा देविले पाहिजे......यांवर मेहेरबान होऊन यांचा रोजमुरा कजा व नेबकजा व प्यादगी टके तीनशें साडेसात यास जागा जकात को मजकूर देविले असे...मोगवटा व तसरुफाती मनास आणून ता सालगुा प्रमाणें चालविणें. पा हुा रा पंताजी गोपिनाथ चिटणीस...मोर्तब असे.

| | | |
|---|---|---|
| सं. १५ ले. ४४० <br>सु. १०५७ | (७१८)<br>खुर्द. 'प्रति. व 'मति' मु. | श. १५७८<br>इ. १६५६ |

अजर. सिवाजी कारकुनानि पा चाकण कृष्णभट बिन मुरारी...आपणास इनाम व रोजमुरा व तेल दरोज सतका चालत आहे. ऐसियासी ता मजकूरचा मोइसचा हुजूर होता. मुरनिसीहून निजा याणी बंदी कलम काहाडिले आहे की भट मजकुरास वा तेल वजन ८८॥ एकूण टके ८२ प्रमाणें खर्च घातला आहे. पैकी मजुरा८१॥ देऊनु निम्मा दरोज अडका ८॥ अडकाप्रमाणें बेती(री)ज काहाडिली आहे म्हणउनु माहालीचे कारकून निम्याचे पैके आपणास मागताति व इनामास हि खुर्दखताचा उजूर करिताति तरी माहराज धर्मपरायण पुण्यउदधि आहेती (गहाळ...)

| | | |
|---|---|---|
| सं. ८ ले. १<br>? | (७१९) | श. १५७८ (अखेर)<br>इ. १६५७(आरंभ) |

दियानतराऊ— रा. रा. निळोपंत गोसावी.

मौ. उडार्डे किले मंदन हा गांव चालत असता सांप्रत नूरखानास चालू झाला. यावर हुजरून माहालाचे देह माहालास मोकरर केले असे. तरी नुरखानाचे हुवाले मौ. मज. न करणें. सिवाजी पंतांचा सांगतील त्या सारिखे केले पाहिजे. त्याचे मदतीस अंतर पडो न देणे. [दियानतराव बंदे अली आदिलशहा, हा फारसी अक्षरें शिक्यांत आहेत.]

| | | |
|---|---|---|
| सं. ८ ले. २<br>? | (७२०)<br>फा. मु. शी. | श.<br>इ. |

दियानतराऊ— असं. लक्ष्मी. दरो. रा. रा. निळोपंत गोसावी

मौ. उझार्डे किले वंदन हा गाव पूर्वीपासून किल्लेखाली आहे. सांप्रत चंद्ररायाचे जाऊलीखालील म्हणोन गोसावियांचे (शिवाजीच्या) लोकांनीं कबज केला आहे. तरी मौ मज. चंद्रराये दिले नाहीं व जाउलीखाले नव्हते. तरी तो गांव सोडवून किल्लेखाली चाले ऐसे केले पाहिजे. चिनाजी कोनेरीपंत हेजीब यास मदत करणें.

खं. १५ ले. ९३ }　　(७२१)　　{ श. १५७९ चैत्र व. १
सु. १०५७ जखर १४ }　　मिसेली फा. मु. सी.　　{ इ. १६५७ मार्च २०

अज. [———]　　रा. वेंकाजी नरसीह हुदे. व मोक. मौ. निंब

मौ. मज. लग्न-मुहूर्तास जंगमानें गोविंदगिरी मठ सदानंद यास टाकून एकट्यानें जाऊन पानमान घेऊं नये.

खं. १७ ले. १० }　　(७२२)　　{ श. १५७९ चैत्र व. २
सु. १०५७ जखर १५ }　　महजर पुणे देशमुखी तंटा　　{ इ. १६५७ मार्च २१

हाजीर मजालसीः— रा. सिवाजी राजे, सामराज नीळकंठ (पे.) वासुदेव बाळकृष्ण ( मुज. ), सोनाजी विश्वनाथ ( ड. ), माहादाजी सामराज (सुर.), माणकोजी दाहातोंडे ( स. नौ. ), रघुनाथ बल्लाळ ( स. सब. ), नूरबेग ( स. नौ. पाऊलोक ) सामराज पद्मनामी ( सब. पाऊ. ) देशमु. देशकु. वगैरे.

तंट्याचे स्वरूप ( ले. ४३२ ) प्रमाणेंच असून दादाजी कोंडदेवांचा निवाडा फिरविला आहे.

हवाजी वडिले घरी दिधला आहे म्हणौन वडील, बाजी रुद्राजीचा लेक म्हणौनु वडील. ऐसी दोघास वडिलपणाची निसबती व करकसाहि तीन पिढिया लागला आहे. याबद्दल तह दिधला की, वडिलपणाची तकसीम दोघास बरावरी. वडिलपणाचे गाऊ दोघास बरावरी. बाकी हवाजी, बापूजी, बालाजी यास प्रत्येकी एक तकसीम एणे प्रमाणे निवाडा केला आहे.

सा. ले. ३०० }　　(७२३)　　{ श. १५७९ चैत्र व. ७
श. जखर २० }　　फा मु. व मज.　　{ इ. १६५७ मार्च २६

द्वारका अवरत कृष्ण बिन मुरप्रभु धर्माधिकरणी कस. नासीक

सोन बिन कोंड प्रभु धर्माधिकरणी कस. नासीक.

मी आपली तकसीम रु. १५ स तुम्हास दिधली आहे.

खं. ८ ले. ५ जुलस ३१ (७२४) श. १५७९ वैशाख व. ६
हि. १०६७ रजब १८ फारसीचें सारांतर इ. १६५७ एप्रिल ३

औरंगजेब——— शिवाजी भोसले

तुमची अर्जदास्त इकडील पंज्याचे निशाणाचे फर्मान पोचल्यानंतर चिट्ठी पावली. हरएक विषयीं जें सांगणें तें तुम्हांकडील वकील सोनाजी यांजपाशीं सांगितले. त्यांणीं तुम्हांसी बोलोन खातरजमा केलीच असेल-सांप्रत जे किल्ले व मुलूख विजापुर-करांकडील तुमचे हातीं होते ते पेशजीप्रमाणें ठाऊन तुमचे मनोगता-अन्वयें बंदर दाभोळ व त्याजखालील मुलूख तुम्हांस दिल्हा असे. ऐशि-यास इकडील दौलतीची किफायत मदत जी करणे असेल तिचा समय हाच आहे, जाणोन करण्यांत आणावें, आणि हुजूर भेटीस यावें. याखेरीज जे मतलब तुमचे मनांत असतील ते घडोन येतील. हाली तुमचे वकील यास परत जाण्याची जलदी होती, सबब निरोप दिल्हा आहे. त्यांचे जबानीं इकडील लक्ष दिसोन दिवस तुमचा उत्कर्षाचा करण्याचा वगैरे सर्व ध्यानांत येईल. याकरितां इकडील दौलतीचे लहान मोठ्या कामाकाजाची तर्दूद आपले ऊर्जिताचे कारण समजून करीत जावी व वारंवार इकडील कृपेचें इच्छित असावें. सांप्रत ईश्वरकृपा व आमचे देवशक्तिरव व फौजेचें शेरपणा यांनीं इकडील वाईट इच्छिणार नाहींसे झाले. दिवसानुदिवस इकडे जय येत चालला. तो असा कीं, किल्ला बेदर हा मोठा मजबूत, आजपावेतो त्यास कोणीच सर केला नव्हता व कोणाचे मनांत कल्पना देखील सर करावयाची येत नव्हती, तो एकंदर दक्षण व कर्नाटक देशचा दरवाजा तो एक दिवसांत हस्तगत आला. हजारों वर्षांचा कोणेही वश जाला नाहीं. ईश्वराचें सर्व करूं. इकडील प्रतापशूरांचे शौर्यामुळे तुम्हीं येविषयींचा संतोष मानून, वरचेवर जसे आमचे जय होतील तसे त्या संतोषाने वर्तमानावर कान ठेवीत जाणें, आणि आमचा लोभ पूर्ण आहे असें मानीत जाणें.

इं. फॅ. १० (७२५) श. १५७९ आषाढ शु.१२
पृ. १३५-१३६ इ. फोर्ट सेंट जार्ज-सुरत इ. १६५७ जून १३

मीरजुम्ल्यानें गुलबर्गा घेतला एवढी गोष्ट सोडून, त्याच्या दक्खनमधील हालचालींची तुमची माहिती बरोबर आहे. आतां तो कल्याणी या दुर्गम ठिकाणाला वेढा घालून बसला आहे. तेथें उभय पक्षांत भयंकर युद्धें होत असून वेढ्याचा निकाल त्वरित होण्याचा संभव नाहीं. आणि त्यामुळें या मार्गांत (कर्नाटकांत) असलेल्या त्याच्या सैन्याला त्याची मदत होत नाहीं. नुकतेंच इकडील हिंदूंनीं (कर्नाटकचा राजा श्रीरंग याचे लोक) त्याचे (कर्नाटकांतील) सैन्याचा असा कोंडमारा केला कीं त्यांना फार दिवस टिकाव धरतां आला नसता; परंतु हा सेनापती तोप कृष्णाप्पा (मीरजुम्ल्याचा कर्नाटकांतील सेनापती. इं. फॅ. १० पृ. १७४-१७५) याने राजाचें बरेच मोठें घोडदळ लूट करून

निर्धारितपणें परत येत असतांना, दवा धरून बसून टपरून लावल्यामुळें तो प्रसंग वांचला. ह्या घोडदळांपैकीं कोणीहि मृत्यु पावले नाहींत. परंतु अचानक हल्ल्यामुळें भेदरून जाऊन ते पळून गेले. यामुळें राजा आणि त्याचा सेनापती शान(म)जी ह्यांचेजवळ घोडदळ व पायदळ मिळून फक्त १००० लोक राहिले. हे उभयतां दोन दिवस मार्गें राहून नंतर जिंजीच्या सरहद्दीवरील अरणी या मजबूत किल्ल्याकडे गेले. तेथें ते विजापूरकरांच्या मदतीनें सैन्यभरती करीत असून पूर्वीपेक्षां अधिक जमावानिशीं रणक्षेत्रांत पुनः उतरणार आहेत. मध्यंतरीं तोपर्यंत्हि आपल्या सैन्याचें बळ वाढवून राजाचें सर्व सैन्य एकत्र होण्याचे आधीं, पूर्वीप्रमाणेंच डाव टाकता येतो कीं काय हें पहात त्यांच्या पाठीमागून जात आहे. वर सांगितलेला छापा जेथें अचानक घातला गेला. तें ठिकाण येथून ४० मैलांवर आहे.

स. पू. ११४ ले. ६ } (७२६) { श. १५७९ श्रावण शु. १५
सु. १०५८ जिल्काद १२ } { इ. १६५७ आगष्ट १३

अजर. सिवाजी राजे ——कारकून व देशमुख तपे खेडेबारे

इनामदार ता॥ मा॥ हुजूर ... जे आपणास तपे मजकुरी इनाम हिंदू मुसलमान जमीन चावर व रोजमुरे व रोयनाई आहे. यांस साहेबाचे कारकून माहालास आले आहेत ते साहेबांचे खुर्दखताचा उजूर करतात. साहेबीं मेहेरवान होऊन खुर्दखत दोवीले पाहिजे म्हणून......तपे मजकुरीं इनामदार हिंदू व मुसलमान यांसी ता मारीं जमीन चावर व रोजमुरे रोयनाई जे असेल ते जैसें कांहीं सालगा॥ चालिलें असेल तेणेप्रो सालमाजीहि चालविणें उजूर न करणें. राजश्री चनाजीपंत तुम्ही तालीक लिहून घेऊन. इत्यादि.

इं. फॅ. मा. १० } (७२७) { श. १५७९ श्रावण व॥ १०
पृ. ११८-१९ इ. } विजापुरकर-मोंगल तह. { इ. १६५७ आगस्ट २४

आमा-मुरतः मोंगलांचा व विजापुरकरांचा तह झाला असें बोलतात.

सर. औरंगजेब १ } (७२८) { श. १५७९ श्रावण
पृ. २७८ इ. } { इ. १६५७ ऑगस्ट-

विजापूरकर व दिल्लीकर (शहाजहान) यांमधील तहः

१ आदिलशहानें १ कोटी रुपये खंडणी द्यावी.

२ बेदर, कल्याण, परिंडा हे किल्ले आणि त्याखालील सर्व मुलूख व निजामशाही कोंकणांतील सर्व किल्ले आणि वांगी परगणा आदिलशहानें मोंगलांस द्यावे. [आदाब, ११२ ब. जुलै आरंभीं तहाची वाटाघाट चालू झाली].

[ ले. ७१० हा श. १५७९ श्रावणनंतरचा असल्यामुळें येथें पाहिजे. ]

खं. १५ ले. ९४ (७२९) { श. १५७९ भाद्र. शु. २
सु. १०५८ जिल्काद २९ } मिसेली फा. मु. व सी. { इ. १६५७ आगष्ट ३०

१— कमलनयनगिरी

तुमचे इनाम मौ. गोवे व नींबमधे आहे. त्यास पैकेचे तगादा न लावण्याबद्दल लिहिले आहे.

खं. १५ ले. ९५ (७३०) { श. १५७९ भाद्र. व. १०
सु. १०५८ जिल्हेज २३ } खुर्दखत मु. व सी. { इ. १६५७ सप्टें. २२

अजर. अंबाजी राजे घाटे— हुदे. व मोक. मौ. चिंचणेर किले ताथोटे

कमलनयनगिरी (निंब) यास गहू पाच कुडो बदल धर्मादाऊ ठेविले.

खं. १५ ले. ९६ (७३१) { श. १५७९ आश्वीन शु. ३
सु. १०५८ मोहर २ } मिसेली फा. मु. { इ. १६५७ सप्टें. ३०

अज दि. ठाणा तपे पाली— हुदे. व मोक. मौजे उडतरे

२७ माहे जिल्हेजच्या खुर्दखताप्रमाणें सदानंद (निंब) यासी निंब येथें तीस बिघे जमीन चालू ठेवणें.

म. रि. मा. १ पृ. ४१२ (७३२) { श. १५७९ कार्तिक शु.१
सु. १०५८ श. } ताकीद पत्र { इ. १६५७ आक्टो. २७

रा. **शिवाजी राजे** सो— ठाणेदार हजरतखान मो वाल्हे प्रां. पुणें.

वाल्हेकर बरवोजी मोकदमी चालवीत असतां बाळ जोशी कुळकर्णी यास त्यानें जिवे मारिल्यावरून शिरवळचा हवा. शिवकराव यानें धांवणी करून बरवोजीस धरून नेलें. यास नागवण खंड होन १२०० केले; व उगवणीबद्दल म्हाकोजी मापकर मोकदम लोणी यास जमान दिलें. पुढें पैशाच्या अडचणीमुळें बरवोजीनें मापकरास पाटिलकी दिली. म्हाकोजी मेल्यावर मुलगा खंडोजी यासी बरवोजीनें कमूर केला म्हणून दोघांस हुजूर बोलावून ९०० होन खंडोजीस व ३०० बरवोजीस देऊन पाटिलकी विकत घेऊन रा. **महादजी नाईक निंबाळकर आमचे जांवई** यास दिली. तरी त्यास तुम्ही राजी होऊन असणें.

खं. २० ले. १०५ (७३३) { श. १५७९ कार्तिक व. ८
सु. १०५८ सफर २१ } खुर्दखत फा. मु. मज. व सी. { इ. १६५७ नोवें. १८

अजर. अफजलखान महमदशाही— कार. व देस. पर. वाई

नरसींह रंगभट व एकनाथ रामेश्वरभट यांस बोरखल व किण्हई या गावीं एकंदर ८॥ चावर जमीन इनाम चालत आहे. हालीं कुल इनामें अनामत करण्याबदल खुर्दखतें सुटली आहेत. तरीपण याचें इनाम याकडे चालू ठेवणें. पा। हुा **रा। शहा** मलिक गोरी

शि. प. सा. स. ११

खं. २० ले. ११ } (७३४) { श. १५७९ कार्तिक व. १०
सु. १०५८ सफर २३ } सुर्दखत फा. मु. मज. सी. { इ. १६५७ नोव्हें. २०

अजर. अफजलखान महमदशाही— कार. व देसमु. पर. वाई

हाली कुल इनामे अमानत करण्याबद्दल सुर्दखते पाठविली आहेत. पण अपदेव विष्णुभट चित्राव याचें खेड व तडवले येथील १ चावर इनाम चालवावें. रा शाहामलीक गोरी.

खं. २० ले. १८ } (७३५) { श. १५७९ कार्तिक व. १०
सु. १०५८ सफर २३ } सुर्दखत फा. मु. मज. सी. { इ. १६५७ नोव्हें. २०

अजर. अफजलखान महमदशाही—कार. देसमुख पर० वाई

नारायणभट चित्राव याचें उमर्डेचें इनाम चालवावें (ले. ७३५ पहा).

सर. औ. मा. १ पृ. २८९ } (७३६) { श. १५७९ कार्तिक
आदब. ? } फारशीचें मार्या० { इ. १६५७ नोव्हें.

औरंगजेबाचा चिटणीस काबिलखान—मीरजुमलाः -विजापूरचा सेनापती खानमहमद [जानमहमद ?] हा विजापूरकरानीं मारविला. हें ऐकून शाहाजादा (औरंगजेब) एवढेंच म्हणाला कीं, 'खान महंमदास त्याचा लवाड मित्र मुल्ला अहमद नाटिया यानें विश्वासघातानें मारलें. मी त्याला वारंवार बजाविलें असून त्यानें घ्यावी तितकी काळजी घेतली नाहीं यामुळें प्रतिपक्षाच्या डावपेचास तो बळी पडला.'

खं. १५ ले. ४४२ } (७३७) { श. १५७९ पोष शु. ४
सु. १०५८ रखर २ } मिसेली फा. सी. { इ. १६५७ डिसें. २८

गोजो बापूजी हुदे. व मोक. मौ. कन्हेर पा चाकण——

चाकण येथील जोतीस कृष्णभट ब्रह्मे याचें आहे. बानूभटानें हरकती करू नये.

इं. फॅ. १० } (७३८) { श. १५७९ पौष व. ८
पृ. १२३-१२४ इ. } सुरतकौन्सिल-कंपनी { इ. १६५८ जाने. १६

मुरादचा सुरतेवर हल्ला (१६५७) आला त्यावेळीं सुरतेचा इंग्रज गव्हर्नर रेव्हिंगटन यानें शाहबाजखानाला मदत करण्याकरितां आपल्या खाजगी तोफा विकल्या. [O. C. २९०५ व डाग रजिस्टर १६६१ पृ. ४११] या तोफांची किंमत वसूल होण्याचे बाबतींत नंतर घोटाळा पडला !

खं. ८ ले. ६ (हि. १०६८) जखर १ (नंतर खाना) (७३९) श. १५७९ फाल्गुन शु. २ इ. १६५८ फेब्रु. १४

औरंग-शिवाजीः— तुमची अर्जदास्त कृष्णाजी भास्कर पंडित यांचे पत्रासुद्धा रघुनाथपंत वकील यांबरोबर पाठवून (दिल्ली पाहून) मजकूर ध्यानास आला. यद्यपि तुमच्या पेशजीच्या गोष्टी विसरावयाजोग्या नाहींत तथापि तुम्हीं आपले कृतकार्याचा पश्चाताप केला आणि हा दरबार उपेक्षेचा नाहीं जाणोन, वडिलांचें लक्ष निर्भ्रांत इकडे आहे असें समजोन, तुमचें कल्प मनांत आणीत नाहीं; येविषयींचा संतोष मानून, इकडील दौलतीविषयीं कोशीस करीत जावी. आपले वतनी माहाल किल्ले व कोकण देशसुद्धां नगरवाले खेरीज, विजापूरकर आदिलखानाचे इलाख्यांत जे आहेत ते त्यांजकडून मुलूख हस्तगत जाल्यानंतर बंदोबस्त होण्याविषयीं वचन असावें. म्हणजे सोनोपंत यांस हुजूर पाठवितों आणि इकडील लक्षांत वागून सरकारी मुलखाची सरहद्द रक्षण करून कामदाराशी परीक होतो; कीं ज्यायोगें बंड वगैरे बखेडे न होवोत; म्हणोन लिहिलें. त्यास, तुम्हीं लिहिल्या अन्वयें वर्तन हा फर्मान पाहताच आपले मजकुराची अर्जी लेहून पंताबरोबर पाठवून देणें म्हणजे त्याप्रमाणें केलें जाईल. जाणोन लक्षांत वागोन, आमचे लोभाची पूर्णता समजावी.

ताजा कलमः— महाराज जसवंतसिंग व कासमखान हे उभयतां इकडील फौज आलीशी समजोन उज्जनीहून सहा कोस पुढें लढाईचे इरादानें आले आहेत. परंतु ईश्वर-कृपेनें इकडील शूर अस्सल लौकिकी सहा सात हजार त्यांजकडील कामास येऊन शेवटीं पळूं लागले. त्यांजकडील खजिना व तोफखाना व हत्ती वगैरे बहुत कारखाने लुटले गेले. ईश्वरें अशा तऱ्हेनें आमची फत्ते करविली. पुढें आणखी नाना प्रकारचें जें सर्वांस संतोष-दायक व शत्रूस पादाक्रांति देणार असें सत्वरच होईल. तुम्हीं याविषयींचा संतोष मानून इकडील लक्षांत राहून कल्याणाचे उमेदवार असावें. सा छ मजकूर.

सर. ले. ४३ शु. १०५८जखर ४ (७४०) फर्मान श. १५७९ फाल्गुन शु. ५ इ. १६५८ मार्च २७

विजापूर बादशहा—समदनुरुल्ला सरहवाल. व खान मख्दुम अफगान हवाल० व कार० मुजफराबाद.

हवालदाराचे अर्जावरून असें दिसतें कीं, नायकवाडी व इतर लोक फितूर होऊन दिवाणकाम चालू देत नाहींत व इतर वसूलहि होऊ देत नाहींत व रयत परागंदा होऊन, मुलख खराब होतो. तरी फितुरास शासन करून मुलख आबादान होय तें करणें.

शि. घ. ले. ५८ शु. १०५८ (७४१) खुर्दखत फा. मु. सी. श. १५७९ इ. १६५७-५८

अजर० अबदुलाखान मलिक रेहान—कार० पर० कन्हाड

आपदेऊभट बिन कृष्णभट जुनारदार यास बादशहा, मोकाशी, बडे मलिक साहेब, मलिक अलिशान वगैरेंच्या पत्राप्रमाणें येशेगाव येथें नीम चावर जमीन इनाम आहे. हाली परगणे मजकूर साहेबास मुकासा मिळाला आहे. तरी या इनाम पूर्वीप्रमाणे याजकडे चालू ठेवावे. रा चिताखान.

शि. प्र. पृ. १०२ ले. २९ } (७४२) { श. १५७९
सु. १०५८ } कबूल कतबा { इ. १६५७-५८

जाया घाटगुडा कस. वालवे—उपाध्ये सिद्धेश्वरः—इनाम ·।· चावर व होन १॥·

सर. औ. १ पृ० २८५ टीप. } (७४३) { श. १५७९
यादव ? औ. } { इ. १६५७

१ औरंगजेब——मुल्तफतखान

*अहमदनगरची दसतेनें व्यवस्था ठेवा. नासिरीखान हिंदुस्थानाकडे गेला म्हणजे रिकामें रान पाहून शिवाजी लुटण्यास सुरवात करील; यासाठीं तुम्ही आपलें सैन्य अम्यत ठेवा.*

२ औरंगजेब——नासिरीखान

*शहाजहानाचें बोलावणें येतांच घाईनें आपलें ठाणें सोडून निघून जाऊं नका. नाहींतर शिवाजी चालून येईल.*

३ औरंगजेब——मीरजुमला

नासिरीखान निघून गेल्यामुळें तो मुलूख मोकळा पडला आहे; त्याकडे लक्ष द्या; कारण तो *son of a dog शिवाजी, संधी साधण्यासाठीं टपून बसला आहे.*

सर. औ. १ औ. पृ. ३६७ } (७४४) { श. १५७९-८०
यादव. औ. } { इ. १६५७-५८

औरंगजेब——अली आदिलशहा (विजापूर)

मीरजुमल्याच्या दुष्टाव्याच्या सल्ल्यावरून मी विजापूर व गोवळकोंडा या राज्यावर हल्ला केला. पण आतां तुम्ही आपल्या प्रजेचें संरक्षण करा, व सुखांत नांदा. राजनिष्ठेनें वागून आपलें वचन पाळा. (१) परिंड्याचा किल्ला, कोकण, वांगी महाल हे प्रांत खालसा केले होते ते व कर्नाटकांतील मुलूख, तुमच्याकडे पूर्वीप्रमाणें रहावे; (२) आणि एक कोटी रुपये खंडणी तुम्हीं कबूल केली आहे त्यापैकीं ३० लाख सूट घावी, ह्या दोन अटी मी मान्य करतों. तुम्ही मात्र मुलखाचें चांगलें संरक्षण करा; व त्याची व्यवस्था सुधारा. त्या प्रांतातील कांहीं किल्ले शिवाजीनें बळकावले आहेत तेथून त्याला घालवून द्या. त्याला नोकरींत ठेवण्याची तुमची इच्छा असेल तर त्याला कर्नाटकांत जहागीर

द्या. म्हणजे त्याचा उपसर्ग मोगलाँ मुलखास पोचणार नाहीं....मी हिंदुस्थानाकडे जात आहे; तुम्हास राजनिष्ठा व स्नेह दाखविण्यास ही संधी आहे. माजी आदिलशहानें प्रसंग पडल्यास सैन्य पुरविण्याचें वचन दिलें होतें. तुम्ही निदान १० हजार सैन्य पाठवा. मी तुम्हाला बाणगंगेपर्यंत मुलुख देईन. **शहाजी** किंवा **बहलोलखानाचे मुलगे** अगर तुमचे इतर अधिकारी यांना **माझ्या नोकरींत घेणार नाहीं.** तुम्ही माझ्याशीं निष्ठेनें वागाल तोंपर्यंत तुमच्या मुलखास आमच्या अधिकाऱ्याकडून उपसर्ग पोचणार नाहीं व तुमच्यावर हिंदुस्थानाकडून स्वारी आल्यास आम्ही तुमच्या मुलखाचें संरक्षण करू.

सा. ले. ३०१ } (७४५) { श. १५८० चैत्र शु. ७
श. } { इ. १६५८ मार्च ३१

त्र्यंबकभट वगैरे प्रभु धर्माधिकारी—— मोरेश्वरभट प्रभु नाशीक

महाद प्रभु मृत्यु पावला; त्याची स्त्री गंगाई हिनें गोविंद प्रभूस आपले तकसीमेचे सर्व बक्षीस देऊन सहगमन केलें. पुढें गोविंद व इतर प्रभु यांनी वृत्तीची वांटणी करून घेतली.

खं. २० ले. १०४ } (७४६) { श. १५८० चैत्र शु. १४
सु. १०५८ रजब १२ } खुर्दखत फा. मु. मज. व सी. { इ. १६५८ एप्रिल ६

अजर. **अफजलखान** महमदशाही—— कार. व देसमु. पर. वाई

हाली सर्व इनामें अमानत करण्याबद्दल खुर्दखत दिलें आहे तरी गिरमाजी त्रिंबक याचे वाईचे १ चावर इनाम चालवावें.

पिसुर्लें. शिवाजी पृ. ४ } (७४७) { श. १५८० वैशाख शु. १३
इ. १६५८ मे १५ (न्यू) } { इ. १६५८ मे ५

गोव्याचा गव्हर्नर—— पोर्तुगालचा बादशहा.

आदिलशाही सरदार **शहाजी** ( हाहि आदिलशहाच्या हुकमतांत नाहींच ) याचा बंडखोर पुत्र **शिवाजी** यानें उत्तरेकडील मुलखास उपद्रव दिला आहे. यामुळें मला ८० शिपाई चौल येथें हिवाळ्यांत ठाणें देऊन राहण्यासाठीं पाठवावे लागले.

पिसुर्लें. शिवाजी पृ. १२–१३ } (७४८) { श. १५८० वैशाख शु. १३
इ. न्यू. १६५८ मे १५ } { इ. १६५८ मे ५

गोव्याचा गव्हर्नर—— पोर्तुगालचा बादशहा

मोठा सरदार रणदुल्लाखान याचा **मुलगा रुस्तुमझमा** हा कोंकणचा मुख्य सरदार नेमला गेला असून तो कोंकणांत आला आहे. त्याचा इकडे येण्याचा उद्देश **लखम**

**सावंत** यास जिकणें हा आहे. लखम सावंतानें त्याचे १५०० च्या वर लोक मारले. पण रुस्तुमनें त्याच्याकडून एक किल्ला ( रांगणा ) परत घेतला.

फरा. सला. पृ. ५७ हि. १०६८ } रम ४ जुलूस १ } (७४९) फर्मान {श. १५८० ज्येष्ठ शु. ५ {इ. १६५८ मे २७

**औरंगजेब**—— पेड नायकास

तुमचे अपराध क्षमा केले आहेत; व नुसरताबादेची सरदेशमुखी तुम्हास दिली आहे.

शि. प्र. पृ. १०३।३२ } सु. १०५९ रम ७ } (७५०) खुर्दखत फा. मु. मज. व सी. {श. १५८०-८१ ज्येष्ठ शु. ८ {इ. १६५८ मे ३०(-५९ मे १९)

अजर. **सरनोवत**——कार. व देसक तपे वाळते. साहेबास **मोकासा** जाला (ले. २०३ पहा).

इं. फॅ. १० } पृ. १७६ इ. } (७५१) फोर्ट सेंटजॉर्ज-बँटम {श. १५८० भाद्र. शु. ११ {इ. १६५८ आग. २८

आमच्या समोवती युद्धाचा खणखणाट चालू असला तरी आम्ही शांततेंत आहों. येथून १० मैलांवरील पुलीमोलीच्या किल्ल्यांतील लोक बंड करून **गोवळकोंड्याला** मिळाल्या-मुळें तोपकृष्णाच्या सैन्यानें त्याला वेढा घातला आहे. **गोवळकोंड्याची** फौज या मार्गानें येत असल्यामुळें त्यांच्या आशेवर ते आतांपर्यंत टिकाव धरून राहिले आहेत. अशा तऱ्हेनें या देशांत सर्वत्र व्यापार व दळणवळण यांस प्रतिकूल परिस्थिति उत्पन्न झाली आहे.

फरा. सला. २२० हि. १०६९ } सु. १०५८ मोहर १२ } (७५२) फर्मान {श. १५८० आश्वीन शु. १४ {इ. १६५८ सप्टें. ३०

अली अदिलशाहा——**अफजलखान** महमदशाही सरहवालदार व सयद दाऊद हवालदार

मामुलात ( = कर वसूल करण्याचा हक्क) काजी अबदुल हसन यास दिली आहे.

सं. ४ पृ. ७९ } सु. १०५९ मोहर १३ } (७५३) न. सी. {श. १५८० आश्वीन शु. १५ {इ. १६५८ ऑक्टो. १

रा. **शिवाजी** राजे—कृष्णाजी भास्कर देशाधिकारी बारा मावळ. मौजे कळ-बोली ता पौन मावळ व मौजे रावळ ता पौडखोरे या हरदो गांवांचा शिवेचा कथला लागला म्हणोन आज्ञापत्रावरून तुम्ही मौजे मारास जाऊन कथला मनास आणिला. आसि आरजोजि दमाला हा म्हणो लागला कीं आपण दिव्य करून. यावरून सर्व देसक मेळऊन दिव्याचा ग्रह दिल्हा. इतिकियामध्यें दुसरे दिवशीं आरजोजि दमाला देह ++

ता पौडखेरे [ गैरहजर ] जाला. सबब नरहरी दिवाकर देशकुलकर्णी पौनमावळ व द्वावजी या मौजे कलबोली ता मारःयाणी हुजूर पुरंधरचे मुकामी येऊ(न) विदित केले. त्यावर साहेब करणाटक प्रांती मसलतीस गेले. त्या प्रांतीहून आलियावर जो निवाडा करणे तो करतील. तोंपरियंत हरदो गावामध्ये टकियाचे कासेवी जमीन आहे ते आमानत आसो देणे. मोर्तब सूद.

सा. ले. ९८ } (७५४) { श. १५८० आश्विन व. २
सु. १०५९ मोहर १५ } निवाडा पत्र-छुपे खुर्द { इ. १६५८ आक्टो. ३

बिहुजुर रामाजी हवालदार माहाअनिहाय व पदो नारायण सभासद नामजाद किल्ले कोंडाणा.

अमवादी--लुमाजी बोतरे मोक. मौ. पारगांव माळा तर्फ पाटस प्रांत पुणे. राजे साहेब यापासी सांगितले जे, कोंडाजी ताकवणे याने आपले सहा खून केले; मोकदमीची करकर करितात: गावाला राहावत नाहीं. त्यावरून माहाराज राजेश्री राजे यानी देशमुख, देशपांडे व हवालदार गोत वगैरेस निवाडा करण्यास सांगितले. करीणा मनात आणिता लुमाजीचे कोंडाजीनें सहा खून केले व लुमाजीने कोंडाजीचे २ खून केले. कोंडाजीनें पदर पसरला म्हणून लुमाजीने खून माफ केले. निवाडा केला कीं कोंडाजीनें आपली निमे पाटिलकी लुमाजीस यावी व लुमाजी वडील असल्यानें वडिलपणा त्यानें करावा.

खं. १५ ले. ४४१ } (७५५) { श. १५८० कार्तिक व. १०
सु. १०५९ सफर २४ } मिसेली म. सु. सी. { इ. १६५८ नोवें. १०

अज. दि. ठाणे पर० चाकण--ता मोक. कस. चाकण.

कृष्ण बिन मुरारीभट महो याचें कसबे चाकण येथील इनाम चालू ठेवणें.

खं. २० ले. १०० } (७५६) { श. १५८० मार्ग. शु. ८
सु. १०५९ रवल ६ } खुर्देखत फा. मु. मज. व सी. { इ. १६५८ नोवें. २२

अजर. अफजलखान महमदशाही—ता कार. व देसमूख पर० वांई.

हाली कुल इनामे अमानत करण्याविषयीं फर्मादिलें आहे. तरी नरसिहभट बिन रंगभट व एकनाथभट बिन रामेश्वरभट यांची मौ. बोरखल व किन्ही येथें एकंदर १॥ -चावर जमीन चालविणें. रा मुला अली.

खं. २० ले. १०१ } (७५७) { श. १५८० मार्ग. शु. ९
सु. १०५९ रवल ७ } खुर्देखत फा. मु. मज. व सी. { इ. १६५८ नोवें. २३

अजर. अफजलखान महमदशाही—— कार. व देशमू. पर वाई

हाली कुल इनामें अमानत करण्यावदल फर्माविले आहे. तरी गिरमाजी त्रिंबक याचे इनाम चालू ठेवणें. रा मुलाअली.

खं. २० ले. १०२ }	(७५८)	{ श. १५८० मार्ग. शु. ९
सु. १०५९ रवल ७ }	खुर्दखत फा. मु. मज. व सी.	{ इ. १६५८ नोव्हें. २३

अजर. अफजलखान महमदशाही——	कार. व देशमु. पर. वाई

हाली कुल इनामें अमानत करण्याची खुर्दखतें सुटली आहेत; तरी नारायणभट चित्राव याचे मुन्हे येथील इनाम चालविणें.

खं. २० ले. १०३ }	(७५९)	{ श. १५८० मार्ग. शु. ९
सु. १०५९ रवल ७ }	खुर्दखत फा. मु. मज. व सी.	{ इ. १६५८ नोव्हें. २३

अजर. अफजलखान महमदशाही.——	कार. व देस. पर. वाई

हाली कुल इनामें अमानत करण्याचें फर्मान आहे: तरी आऊभट चित्राव याचे इनाम चालू ठेवावें.

सं. ७ पृ. ५९ }	(७६०)	{ श. १५८० मार्ग. शु. १५
सु. १०५९ रवल १३ }	खुर्दखत उल्लेख	{ इ. १६५८ नोव्हें. २९

दिवाण ठाणे पर. पुणे यानीं चिंचवडच्या गोसाव्यास ५० इजार गवत काटून द्यावे.

शि. च. ले. ३७७ }	(७६१)	{ श. १५८० मार्ग. व. २
सु. १०५९ रवल १५ }	मिसेली फा. मु. व सी.	{ इ. १६५८ डिसें. १

अज. दि. ठाणा तर्फ पाली——	ता हुदे. व मोक. तळवीड, कोळवीर

फर्मान व खुर्दखत याप्रमाणें देसाई व मोहिते यांचे हक व इनाम चालविणें.

सा. ले. ३५५ }	(७६२)	{ श. १५८० मार्ग. व. ४
सु. १०५९ रवल १७ } तकरीर, जवखंडीचे मारुतीचें देऊळ	{ इ. १६५८ डिसें. ३

अथणीचे सिदणाभूपति देसाई, कुळकर्णी व नागौड पाटेल व चौधरी व महाजन व बारा बलुते यानीं लिहून दिल्ही तकरीर ऐसी जे —

आपले लिंगाईताचे जंगम देवरु वा जैना समाचे लोक निवाडाबदल कासीसी गेले होते. जगम देवरु जयापत्र घेऊन आले असे. लहानथोर समोरा जाऊन बोलाऊन आणावे. म्हणून दिवाणलोक, आम्ही व गोत बोलाऊन आणले. जैन काहीं बोलिले नाहीं. यावरी ५ महिनेसी जैन गुरु व लोक आपण जयपत्र घेऊन आले आहे. समोरा जावे. म्हणून बोल्ले. ते वख्ती लिंगाईत बोलिले, जैन लोक गलतपत्र आणिले. बोलाऊन आणाविया निसबत नाहीं. पण जैन लोकाने सागोन पाठविलेवरी आम्ही, दिवाण व समस्त जाऊन बोलाऊन आणिले.

सा. ले. ३५६ } (७६३) { श. १५८० पौष व. १
सु. १०५९ रखर १५ } महजर { इ. १६५८ डिसें. ३०

कसबे अथणी व पर. जवलिहोचे लोकास बोलावून आणून जैन व लिंगायत यांचे गुरु कोण रथेतीने येत असेत वगैरे पुसता सांगितले कीं, लिंगाइताचे गुरु आलिया समोरा जाऊन मिरवीत आणीत असे. जैनाचे गुरु आलिया मिरवीत आणीत नाहीं. आपआपले वस्तीमधें राहताती. फर्मान व खुर्दखतेहि अशीच आहेत. तरी निवाडा केला कीं लिंगाइताचे गुरु मिरवीत यावे व जैनाचे गुरु मिरवीत येऊं नये.

फरा. सला. पृ. ५९ } (७६४) { श. १५८० फाल्गुन व. १
हि. १०६९ जखर १५ } फर्मान अस्सल { इ. १६५९ फेबु. २७

औरंगजेब——— अबुल हसन

आमचा हेतु असा आहे कीं, लहान थोर सर्व प्रजेची व्यवस्था करावी आणि आमच्या धर्माप्रमाणें असें ठरलें आहे कीं **देवळाचा नाश करूं नये व नवीं देवळें बांधण्यास परवानगी देऊं नये.** तेव्हां या न्यायाच्या काळांत असें ऐकण्यांत आलें कीं, बनारस व त्याच्या आसपास राहणाऱ्या हिंदूंना कांहीं लोक त्रास देत आहेत; व सदना ( = प्राचीन) ब्राह्मण यांना अडथळा होत आहे व फार प्राचीन सधांत (सिद्धांत?) थांबविण्याचा विचार आहे; पण असें होऊं नये. हिंदूंना स्वस्थपणें राहता यावें.

सां. इ. सा. ले. ७ } (७६५) { श. १५८० फाल्गुन व. ७
सु. १०५९ रा. } तहनामा { इ. १६५९ मार्च ५

तहनामा राजश्री खेमसावंत व लखम सावंत सरदेसाई बहादूर प्रांत कुडाळ यांजकडील पितांबर शेणवई कारभारी येऊन ठराव करून दिला.

प्रांत मजकूरचे महाल वगैरे चालत आहेत. आकार होईल त्याचा ऐवज दरसाल निमे हुजूर पावता करावा. निमा आकार राहील त्यांत तीन हजार लोक पायदळ, हेटकरी ठेवावे आणि ज्यावेळेस हुजूर चाकरीस बोलाविले जातील तेव्हा तीन हजार लोकानिशी सेवा करावी. खासा जातीनें येण्याचें प्रयोजन पडेल तेव्हां बोलावणे होईल तेव्हा यावे.

किल्ले फोंडा प्रांत तालुका घेऊन हुजूर ठेविला त्यास हरएक प्रसंगास कुमक राखीत जावी. विदनूर वगैरे संस्थानच्या खंडण्या घेण्यास स्वारी होईल त्याच्या कुमकेस जात असावे.

**स्वराज्य** साधनाच्या ठायीं वकिलापाशी मध्यें राहून दुश्मन लोकांचे साधान करावे.

प्रांतातील जमाबंदीच्या चौकीस हुजुरून लोक राहतील ते ठेऊन त्यांच्या नेमणुकीबद्दल हुजूर अमलप्रमाणें पावते करावे.

प्रांत मजकूरची देसकत वतने व बहादूर कितावत अजरामरात चालेल. त्यांतील किल्ले कोट व ठाणीं तुमच्या स्वाधीन केली आहेत. तेथें दास्तान करून जतन करावी. तेथे हुजूरचे कारकून व लोक येतील ते ठेवावे.

शके १५८० विलंबी नाम संवत्सरे फाल्गुन वद्य ७ मी एकूण ५ कलमी करार करून तहनामा दिला असे. मोर्तब

रामदास अं. ६२ ले. १ } सु. १०५९ जखर २६ }　(७६६) खा फा. मु. व सी.　{ श. १५८० फाल्गुन व. १३ { इ. १६५९ मार्च १०

अजर. याकुतखान——　कारकुनानीं ता मसूर.

कार्समिट जुनारदार शेकिन पाटण यास इनाम बिघे २० बा भोगवटा माजी मुकासाई शाहाजीराजे चालिले आहे. हाली साहेबास मुकासा अर्जानी जाला. इनाम दुमाले करणे.

खं. २० ले. १७६ } पु. २४० श. }　(७६७) उल्लेख　{ श. १५८० { इ. १६५८-५९

रंगं जोसी——　बाप जोशी चित्राव वाई.

मध्वाजी पंताचे वेळच्या महजराप्रमाणें मुन्हे व वाईचे ज्योतिष चालवावे.

सा. ले. ३५४ } सु. १०५९ }　(७६८) फा. मु.　{ श. १५८० { इ. १६५८-५९

माहामेव पार्वती देसाईणी व गदिगी आपा सिदनंदीराऊ देसाई पर. जवखडी लेहून दिधले इत्यादि ( अपूर्ण ).

खं. २० ले. १४ } ? }　(७६९) बाजारभाव व भाडे　{ श. { इ.

सुप्याहून अहमदनगरास जोडीच्या बैलास भाडे ॥= होतु. व दर बैलास प्रताप अर्धा; दौल्तावादेस याकूदखान ? जोडीच्या बैलास होन ११; कसाबाच्या येथील मांसाचे व कातडी रंगविण्याचे दर.

इं. फॅ. १० } इ. १७४-१७५ इ. }　(७७०) चेंबरचा वृत्तांत　{ श. १५८० ? { इ. १६५८

कर्नाटकांतील कारमार मीर जुमल्यानें तुपाके कृष्णाप्पा याच्या हातीं दिला आहे.

हॅन् २ } (७७१) { श. १५८०
पृ. ३२४ इ. } उल्लेख { इ. १६५९

इ. स. १६५९ मध्यें आदिलशहानें पोर्तुगीज प्रांतावर हल्ला केला; पण मडगाव जवळ त्यांचा पोर्तुगीजांनीं पराभव केल्यामुळें त्यांना परतावें लागलें.

शि. प्र. पृ. १०४ ले. ३३ } (७७२) { श. १५८१ वैशाख शु. १४
सु. १०५९ शावान १२ } मिसेली { इ. १६५९ एप्रील २५

अज दि. वाळवे—हुदे. व मोक. पुणदी (ले. २०३ मधील) संभटाचें इनाम.

शै. ७ पृ. ४४ } (७७३) { श. १५८१ ज्येष्ठ शु. २
सु १०५९ रम १ } व्यवस्थापन म. मु. व सी. { इ. १६५९ मे १३

मा अनाम बाज प्रभू प्रति राजेश्री सिवाजी राजे. जास जा कासलोड गड हिरडस मावळामध्यें आहे तो गड ऊस पडला होता. याचे नाव मोहनगड ठेउनु किला वसवावा ऐसा तह करुनु किल्यास महरल अनाम पिलाजी मोसले यासि किले मजकूरचा हवाला देऊन पाठविले असेत; व माइले बराबर किलाचे संगनाती बदल लोक २५ पाठविले असेत. तरी तुम्ही माइलेस व पंचविसा लोकास बराबर देउनु मोहनगड गडावरी मशारनिलेम + + व पंचविसा लोकास किल्यावरी ठेवणे; आणि किलाच्या हवालदारास घ(र) व लोकास अळंगा मजबूद करुनु देणे. घर व अळंगा करुनु घाल त्या पावसानें अजार न पावे येसा करुनु देणे. नाहीं तरी सजवंज (दिखाऊ) करुनि घाल? आणि किल्यावर लोक राहातील त्या अजार न पावे येसे हवालदारास घर व लोकास अळंगा व थेक मावल (बखळ) मुस्तीद करुनु देणे. तुम्ही सदरहू प्रमाणे काम विलेवार लाउनु घाल म्हणउनु साहेबास भरवसा आहे याबदल तुम्हास लिहिले असे. तरी सदरहू लिहिलेप्रमाणे किला मजबूद करुनु देणे. मग तुम्ही किल्याखाले उतरणे. मोर्तबसुद (मर्यादेयं) (सामराज-मुद्रा)

साधन चि. पृ. २८७-८८ } (७७४) { श. १५८१ आषाढ शु.६
सु. १०५९-६० } फर्मान फारसी भाषांतर { इ. १६५९ जून १६
हि. १०६९ सवाल ५ }

अलीआदिलशहा—— कान्होजी जेधे

शिवाजीनें अविचारानें व अज्ञानानें निजामशाही कोंकणांतील मुसलमानांना त्रास देऊन लूट करून पातशाही मुलखांतील कित्येक किल्ले हस्तगत केले आहेत. यास्तव त्याचे पराभवार्थ...अफजलखान महमदशाही यांस तिकडील सुभेदारी देऊन नेमून पाठविले आहेत. तरी खान माचे रजामंदींत व तानेदारींत राहून...

शिवाजीचा पराभव करून निर्मूळ फडशा करावा. शिवाजीचे निसबतीचे लोकास आश्रय न देतां ठार मारून या दौलतीचें कल्याण इच्छिणें. खानाच्या सांगण्यावरून ... तुमची योग्यता वाढविली जाईल. त्याचे सांगण्याप्रमाणें वागावें. तसें न केल्यास परिणाम चांगला होणार नाहीं. हें जामीन या सरकारी आज्ञेशी चालावें तेरीख.......
हुजूरची परवानगी झाली असे.

खं. ८. ले. ५ सं. ४.७७ हि. १०६९ } (७७५) { श. १५८१ श्रावण शु. ६
जुलुस.१ जिल्काद ४ } फर्मान { इ. १६५९ जुलै १४

औरंगजेब———शिवाजी

ईश्वरें छ २४ रमजान रोज रविवार (इ.१६५९ जून ५) या दिवशीं आम्हांस सिंहासनाधीश्वर केलें. तुमची अर्जदास्त अशा संतोषसमयांत पावून मजकूर ध्यानांत आला. ऐश्चियास तुम्ही इकडील लक्षांत वागतच आहांत. त्या अन्वयें वागून खेरखाही करीत जाणें. हाली दक्षिणेकडील सुभ्याचे कामावर उमदे-नुलनुल्क अमीरुल उमराव म्हणोन् याची योजना करून तेथील सर्व लोकांचा बंदोबस्त सांगितला आहे. तरी तुम्हींहि त्याचें सलेंत वागून वारंवार कोशीस करून जसें पूर्वीचें बोलणें त्याप्रमाणें अमलांत आणावें. शत्रु हस्तगत आले. ते लवकरच शिक्षाहि पावतील. तुम्ही इकडील लोभ आपणावर पूर्ण आहे असें जाणून असावें. तुम्हांकरितां येथून पोषाख पाठविला आहे हा घ्यावा.

इं. फॅ. १२ पृ. २०८–२०९ } (७७६) { श. १५८१ श्रावण व. १
हि. १०६९ जिल्काद १४ } { इ. १६५९ जुलै २४

कारवारचा सुभेदार आघा मुरीद यानें अली अदिलशहाचे वतीनें रँडॉल्फटेलर व फिलिप गिफर्ड ( कारवार ) यांना दिलेल्या व्यापारी सवलती:— १ इंग्रजांना व्यापाराकरितां मुक्तद्वार ठेवण्यांत आलें ( free trade ); २ खजिन्याशिवाय इतर इंग्रजांच्या आयात मालावर शेंकडा १३ टक्के याप्रमाणें जकात घेण्यांत यावी; ३ कर्जवसुलीच्या बाबतींत सुभेदारानें मदत करावी; ४ इंग्रजांनीं आपल्या स्वतःच्या नोकरांचें बाबतींत स्वतःच न्याय द्यावा. इ. इ.

शि. प्र. पृ. १७८ इ. १६५९ ऑगष्ट १६ } (७७७) { श.१५८१ श्रावण वा १४
न्यू स्टाइल } { इ.१६५९ ऑगष्ट ६

गोव्याचा व्हाइसरॉय———पोर्तुगालचा बादशहा.

शिवाजी नामक शहाजीच्या एका मुलानें वसई व चौलकडील प्रदेश काबीज केला असून तो बलिष्ठ झाला आहे. त्यानें कांहीं लढाऊ गलबतेंहि भिवंडी, कल्याण

व पनवेल या वसई तालुक्याचे बंदरामध्यें बांधिलीं आहेत. त्यामुळें आम्हांस खबरदारीनें राहणें भाग झालें आहे. हीं गलबतें समुद्रांत फिरकूं न द्यावीं म्हणून (पोर्तुगीज) कॅपटनला आम्हीं आज्ञा केली आहे कीं, त्यानें सदर गलबतें बंदरांतून बाहेर येऊंच देऊं नयेत.

सा. ले. १५७ } (७७८) { श. १५८१ भाद्र. शु. १
सु. १०६० जिल्काद २९ } खुर्दखत. { इ. १६५९ आग. ८

अजर० रा. खेलोजी राजे——देशमुख व देशपांडे पर० सुपे.

बाजी याकूदखानाच्या वेळेपासून चालत आलेले सुपे येथील इनाम गणो तिमाजीनें मोरेश्वरच्या गोसाव्यास दिलें आहे तें चालू ठेवणें.

खं. २० ले. १०६ } (७७९) { श. १५८१ भाद. व. ४
सु. १०६०जिल्हेज१६ } खुर्दखत फा. मु. व सी. { इ. १६५९ आगष्ट २५.

अजर. मिया अजम मिया **दरवेश महमद**—कार. हिसार जाउली.

**मोकासा** अर्जानी जाला. नारायणभट चित्रावाचें इनाम (ले. २३७) चालवा.

शि. म. पृ. ८३ } (७८०) { श. १५८१ आश्विन शु. १
सु. १०६० जिल्हेज २९ } खुर्दखत फा. मु. { इ. १६५९ सप्टें. ७

अजर० **अफजलखान** महमदशाही—— कार. पर. तेरदल.

परगणे तेरदलचे विलायतीस **सिवजी** तसवीस देतो. त्यास क्रिष्ण गौडा देसाई बहुत मशागत करून गनिमास घेरा केले त्यावरून देसाई मजकुरास इनाम वगैरे दिले. रा शामलीक गोरी.

इं. फॅ. १० } (७८१) { श. १५८१ आश्विन शु. ७
पृ. २६३ इ. } { इ. १६५९ सप्टें. १३

कमीटीज ऑफ दि न्यू जनरल स्टॉक—— फोर्ट सेंट जॉर्ज.

**मीरजुमल्याच्या** हातून तख्त-संपादनांत कांहीं अंश मिळविण्याच्या महत्त्वाकांक्षेनें गोवळकोंड्याच्या सुलतानाशीं संगनमत करण्याचा गुन्हा घडल्यामुळें **औरंगजेबानें त्याला कैद केलें.** [जाने. १६५८. पहा औरंगजेब मा. १ पृ. ३११]

ने. व. ७ पृ. १०४ } (७८२) { श. १५८१ आश्विन व. १०
सु. १०६० मोहर २२ } कौलनामा फा. मु. { इ. १६५९ सप्टें. ३०

अज सर सुभे अफजलखान महमदशाही——

शिवाजी फर्जद कान्होजी जेधा देसाई तर्फ भोर. कृष्णाजी पंडित हवालदार

-व श्रमाजी आनंदराऊ किल्ले रोहिडा येही तुमचे बाबे मालूम केले. तुमचा बाप व चिरावर धाहार्यास धरिसे शिवाजी भोसलेचे चाकरी करितातीं. तुम्ही आ बातेचा उजूर व धक अंदेशा न करितां येणें. आलेवरी सरफराजी होईल.

-सा. ले. ३४३ } (७८३) { श. १५८१ आश्विन
श. } हुज्जति फा. मु. { इ. १६५९ सप्टे.आक्टो.

केशव नाईक सरदेसाई मामले मुरतजाबाद व मुजफराबाद व देसाई तर्फ संगमेश्वर-नारो बिन अंतो व केसो बिन नारो पाध्ये धर्माधि. व जोति. व अष्टाधि. गुण-वली (गोळवली)

तुम्ही सांगितलें कीं आपली मिरासी १४७५ वर्षे चालिली असे. ताम्रपटे आहेती. कागद जळाल्यामुळें नवीन आणलेले कागद पाहिले. तुम्हासच मोकरर केले.

शि. च. ले. १ मु. १०६० } (७८४) { श. १५८१ कार्तिक शु. ४
हि. १०७० सफर २५ } फर्मान { इ. १६५९ आक्टो. ९

अली आदिलशहा—अफजलखान सरह. व अबदुलकादिर सरवरखा मुजफराबाद.

केसो व रंगो सरदेसाई यांचा वंशपरंपरेचा इनाम अबदुल नबी फकुदीन पटीदार यास दिला आहे तो परत त्यांचा त्यास द्यावा.

इं. फॅ. मा. १० } (७८५) { श. १५८१ कार्तिक व. ७
पृ. २३९ इ. } रायबाग-कोल्हापूर { इ. १६५९ आक्टो. २७

विजापूरच्या राज्यांत अव्यवस्था माजली आहे; परंतु रुस्तुमजमानें २५ घोडेस्वार आमच्या मदतीस पाठविले आहेत.

शि. प्र. पृ. १०४ ले. ३४ } (७८६) { श. १५८१ कार्तिक व. ११
सु. १०६० सफर २४ } खुर्दखत उल्लेख { इ. १६५९ आक्टो. ३१

(ले. २०३ मधील) वाळव्याच्या संभुमटास खुर्दा या हुजूर रा मा हजरत मेलगिरी पंडित.

शि. सा. ले. ३५७ } (७८७) { श. १५८१ मार्ग. शु. ५
सु. १०६० रवल ४ } कौल फा. मु. मज. सी. { इ. १६५९ नोव्हें. ९

?———बजा. समस्त माहानाड पेठ कस. अषणी मामले महमदपूर.

तुम्ही अरिजा लिहिले की, 'पेठ मजकुरासी नवा ठाणेदार येत आहे तरी आपणासी तकवा होईना.' कांहीं नाहीं ते गोष्टीवरून बेतकवा होवे काये माना आहे. कांहीं अंदेशा न करितां उदीम वेव्हार करून सुखे असिजे.

इं. फॅ. १० }
इ. पू. २५१ }

(७८८)
राजापूर-सुरत

{ श. १५८१ मार्ग. व. १
{ इ. १६५९ नोव्हें. १९

(पन्हाळयाचे बाजूला धामधूम झाली त्यामध्यें सुरतेला पडून राहिलेली सामुग्री खपण्याची संधी आली. एक तोफ व कांहीं मेनेडो सुरतेहून राजापुरास पाठविण्यांत आले.)

तुम्हीं शिफारस केलेला गोलंदाज वगैरे अगदींच अडाणी आहे. म्हणून आम्हीं दुसरा घेतला आहे. त्याचा दरसालचा पगार ३० पौंड आहे. लवकरच **रुस्तुमजमा** त्याला आपल्याकडे घेईल; आणि यापेक्षांहि अधिक पगार देईल.

इं. फॅ. मा. १० }
पृ. २४६ इ. }

(७८९)
राजापूर- सुरत.

{ श. १५८१ मार्ग. व. १
{ इ. १६५९ नोव्हें. १९

**रुस्तुमजमाकडून** आम्हांला अशी सवलत मिळाली आहे कीं कंपनीचा माल कारवारला भरला गेला तरी त्यावरील जकात राजापूरला भरावी.

कारवारचा सुभेदार रुस्तुमजमाचाच हस्तक आहे. त्याला तो प्रांत त्याच्या खर्चाकरितां दिलेला आहे. [ ३१ ऑक्टोबरचें पत्र. ]

इं. फॅ. मा. १० }
पृ. २५१ इ. }

(७९०)
राजापूर-सुरत.

{ श. १५८१ पौष शु. ६
{ इ. १६५९ डिसें. ९

मोठा रजपूत **शिवाजी** हा राणीचा महाशत्रू असून त्यानें कोल्हापूर पासून ६ कोसावरील मोठा किल्ला **पन्हाळा** घेतला. विजापुरास ही बातमी गेल्यावर राजा व राणी खास चकित होतील. शिवाजीला यश यावें अशीच आमची इच्छा आहे; कारण **शिवाजी** व **रुस्तुमजमा** यांची **दोस्ती** आहे.

इं. फॅ. मा. १० }
पृ. २८७ इ. }

(७९१)

{ श. १५८१ पौष शु. ७
{ इ. १६५९ डिसें. १०

राजापूर हेन्री रेव्हिंगटन् व रँडॉल्फ टेलर-कंपनी.

आमचे व **पोर्तुगीजांचेहि** शत्रु **डच** लोक यांनीं पोर्तुगीजांची या किनाऱ्यावर सर्वत्र दुर्दशा उडविली आहे. आम्हीं तपास केला, त्यावरून असें कळतें कीं, **वेंगुर्ल्याच्या** डचांनीं दख्खनचे राणीला मोठा लांच भरून गोव्यावर सैन्य पाठविलें होतें. तिच्याकडे आतां गोवेकरांनीं वकीलहि पाठविला आहे. एक लक्षांचा नजराणा दिल्यामुळें यावर्षी तरी ती सैन्य पाठविणार नाहीं असें गोव्याचा वकील रायबागवरून जातांना आम्हाला म्हणाला. परंतु डचांनीं पुनः नजराणा भरून हा सलोखा उठला. १००० घोडदळ विजापुराहून गोव्यावर निघालें! आदिलशहाच्या एका मानानें खिन्न होऊन पोर्तुगीज राजाला दिलेल्या बार्देश व साष्टी या मुलखांबद्दल दरसालच्या खंडणीचा वाद उकरून हें सैन्य रवाना

केलेलें आहे. परंतु इतक्यांमुळे गोंवेकर ही मोठी रकम देऊं शकत नाहींत. तेव्हां इंग्रज व डच यांच्यांत युद्ध उपस्थित होणें अगर पोर्तुगालकडून पैसा येणें यापैकीं कांहींच न घडेल तर तीन वर्षांपेक्षां अधिक टिकाव त्यांना धरतां येणार नाहीं. गोव्याचे अधिकारी लोकप्रिय नाहींत. शिष्ट लोक देश सोडून बाहेरच पडत आहेत. थोडी खटपट केल्यास पोर्तुगीजांच्या मुलखांत आपलें चोट शिरलेले असें वाटतें. युरोपांत खटपट करून पहावी मुसलमानांच्या सैन्याचा गोवेकरांनीं पराजय केला आहे. इचाजवळहि पुष्कळसें सैन्य नाहीं. परंतु लवकरच जमा करून त्यांनीं विजापुरकरांशीं संगनमत केल्यास ते गोंवें घेऊं शकतील.

परंतु रुस्तुमजमानें मनांत आणल्यास व पोर्तुगीज लोक त्याचेशीं सढळ हातानें वागतील, तर डचांना मुसलमानांची कुमक मिळणार नाहीं. मग पोर्तुगीजांनीं गोवें सोडून तेथें आम्हीं प्रवेश केला तर आपलें काम होईल. रुस्तुमजमा इंग्रजांचा दोस्त असल्यामुळें त्याचे स्वतःचे सांगण्यावरून समजतें कीं, थडी साहेबीण त्याला शत्रु समजते. आणि म्हणून पूर्वीप्रमाणें ती त्याला गोव्याच्या स्वारीवर पाठवीत नाहीं.

दहींचा अदिलशहा बडे साहेबिणीच्या मृत नवऱ्याचा लेकवळा असतांनाहि त्यालाच राज्य मिळावें अशी तिची इच्छा आहे. परतु कित्येक उमराव यामुळेंच त्याचेपुढें नम्र होण्यास नाखूष असून दरबारला जात नाहींत. रुस्तुमजमा, बहलोलखान, शहाजी व शिवाजी हे ते होत. शिवाजी उत्तरेचे बाजूला ससैन्य वावरत असून चौलपासून दाभोळपर्यंत सर्व किनाऱ्याचा स्वामी झाला आहे.

शिवाजीवर या सालीं राणीनें १०००० घोडदळ व पायदळ देऊन 'अबदल्ला खानाला' पाठविलें. एवढ्या सैन्यानें शिवाजीशीं टक्कर देणें अशक्य, असें जाणून तिनें शत्रूशीं मित्रत्वाचा बहाणा करण्यास सांगितलें. त्याप्रमाणेंच तो वागला. शिवाजीला बातमी मिळाली म्हणून म्हणा, किंवा संशय आल्यामुळें म्हणा, त्यानेंहि स्नेहाचा आविर्भाव आणून आपल्या आईला ओलीस पाठवून आपल्याबद्दल विश्वास उत्पन्न केला.' इतकें झाल्यावर अफजलखान पुढें आला. दोन्ही सैन्यें थोड्या अंतरावर राहिलीं. व हे दोघे थोड्या लोकांनिशीं एकमेकांना भेटून आलिंगन देण्याकरितां मिळाले. कांहीं वेळ उघडपणें बोलणें होऊन गुप्तपणें बोलणें होण्याची वेळ आली. शिवाजीनें आपल्या (हृदयाजवळ) अंगरख्यांत लपवून ठेवलेला खंजीर काढून अफजलखानाच्या छातींत खुपसला. त्यानें इशारत देतांच रजपूत, हिंदू आदिकरून लोकांचें बनलेलें त्याचें सैन्य मुसलमानांवर तुटून पडलें. तीन हजार शत्रु पडले व इतर पळाले. शत्रूचा पाठलाग करीत असतांनाच शिवाजीनें पन्हाळा हस्तगत केला. आम्हीं रहतों त्या कोल्हापुरापासून पन्हाळा आठ मैल आहे. पन्हाळा ही नाक्याची जागा असून अदिलशाही राजाचें महत्त्वाचें आश्रयस्थान होतें. त्यानें बंदरी व आंतील शहरेंहि काबीज झालीं. यामुळें पुष्कळ

बंदरांचे सुभेदार राजापूरला पळून येत आहेत. राजापूर **रुस्तुमजमाचे अधिकारांत आहे** आणि **रुस्तुमजमा शिवाजीचा स्नेही** असल्यामुळें राजापूरला शांतता आहे. **रुस्तुमजमा शिवाजीकडे** येत असून थोड्याच दिवसांत दोघे एकत्र होतील ! तसें झालें म्हणजे त्याचे गतसालच्या मागणीप्रमाणें आमच्याजवळील सर्व दारूगोळा पाठवूं. शिवाजीलाहि थोडा दारूगोळा पुरविण्याबद्दल त्यानें सांगितलें होतें. शिवाजीचे मनांत **दंडाराजपूर घ्यावयाचें आहे**. शहर आधींच त्याच्या ताब्यांत आलें आहे. तेव्हां या सधन किल्ल्यावर यशस्वी हल्ला करण्याकरितां आम्हीं आपलीं गलबतें नेऊन समुद्रांतून वेढा घातला तर तेथील संपत्तीपैकीं कांहीं व किल्ला बहुतेक तो आमच्या हवालीं करील । आम्हीं हें सर्व शिजवून तयार ठेवतों.

एका महिन्यांत ही दंगल शांत होईल असें वाटतें. कारण शिवाजीचा बाप **शहाजी** दक्षिणेकडे आहे; तो १७००० सैन्य घेऊन आठ दिवसांत येईल अशी अपेक्षा आहे. तो राजधानी ( विजापूर ) वर चालून जाईल आणि तेथलि सैन्य अपुरें असल्यामुळें **हें राज्य बुडेल**. आणि असें झालें तर रुस्तुमजमानें दिलेलीं वचनें-टांकसाळ, सोन्या-वरील जकातींत सवलत, दंडाराजापूर किल्ला इंग्रजांना मिळवून देणें, हीं सर्व खरीं होण्यास वेळ लागणार नाहीं. आम्हांला अधिकार व साधनें आणि सुरतेला चांगला अध्यक्ष पाहिजे.

पिसुर्लें. शिवाजी. पृ. ४ }
इ. डिसें. २८ न्यू. } गोवें गव्ह.-पोर्तु. बादशहा (७९२) { श. १५८१ पौष शु. १५ { इ. १६५९ डिसें. १८

आदिलशाही राज्यांत कित्येक सरदारांनीं बंडें उभारलीं आहेत. त्यांपैकीं एक **शिवाजी** नांवाचा असून तो बलिष्ठ झाला आहे व आदिलशाही मुलूख ताब्यात घेण्याचें काम झपाट्यानें करीत आहे. असेंच जर चालत गेलें तर तो लवकरच विजापूरचें राज्य आपल्या ताब्यांत घेईल. **या शिवाजीला औरंगजेबाचा पाठिंबा आहे.**

फॅ. रे. राजापूर }
पृ. १०३ इ. } (७९५) { श. १५८१ माघ शु. १५
{ इ. १६६० जानेवारी १४

राजापूर, रेव्हिंग्टन इत्यादि वखारवाले–राजापूर मर्चंटचा कॅप्टनः–आम्हीं जैतापुराहून आल्यापासून, आता शिवाजीचें सैन्य राजापुरांत आहे. त्याच्या सेनापतीच्या मनांत काय आहे हें कांहींच समजलें नाहीं. आल्याच्या दुसऱ्या दिवशीं सकाळीं आपण होऊन आम्ही भेटीला गेलों तेव्हां 'आज संध्याकाळपर्यंत येऊं नये' असें त्यानें सांगितलें. आम्हीं दुसऱ्या दिवशीं सकाळीं जाण्याची इच्छा दर्शविली.

रत्नाकर १९२७ }
पृ. ६२३ ? } (७९६) उल्लेख { श. १५८१
{ इ. १६५९

अफझलखान यानें सिवाजीचे मसलतीवर येतांना पजाजी नायकास दस्त केलें व हत्तीच्या पायाखालीं मारणार तों नाइकजी राजे पांढरे यांच्या मध्यस्थीनें ६०००० होन घेऊन मोकळे केले. ( श. १५९७ मार्ग. शु. ११ या मितीचा लेख पहा. )

सा. ले. ४६ }
शु. १०६० } (७९७) समापत्र { श. १५८१
{ इ. १६५९

माहादाजी राम व यादव केदार व विठल लुखदेव देसकु. पर. सिरवल यांचें गलबलियाचा (प्रसंग) आहे. पादशाही सैन्य दुतर्फा आहे. (?) राजयास शिवाजीस सलियाखालीं आपला देश दिल्हियानें बरें वाईट होईल तें तिघांचें.

ख. १७ ले. ११ }
शु. १०६० } (७९८) कौलनामा फा. मज. व सी. { श. १५८१
{ इ. १६५९

अज सरसुभे अफजलखान महमदशाही

ता विठोजी हैबतराऊ देसमु. तर्फ गुंजनमाऊल. तुमचे बाबे कृष्णाजी भास्कर येही बहूत तारीफ केली त्यावरून खातिरेसी आले. तुम्ही लोक कामाचे नामोसी. हा वख्त कामाचा. जरा अदेशा न करितां जाउले जवळी देखील आपले लोक येऊन फर्मावतील तेबरहु. मसलहतेस सुशीक होणे. मुजरा व सरफराजी होईल.

सा. ले. ४७ }
श. } (७९९) भविष्य { श. १५८१
{ इ. १६५९

पंढरपूर, तुळापूर, कोलापूर, रत्नलनाथ येथील मूर्ती काडिली. विजापुरांत आलिपातशाय असतां अफलखान वजिरानें हें केलें. मार्गशीर पंचमीस शिवाजी भोसला यानें महापापी अफजलखान मारिला. मार्गशीर वदि ७ शनिवारीं पनाळे घेतले. सिंहस्त बृहस्पती आला होता. पौष शु. १४ वाळव्यास शिवाजीच्या लोकांनीं तोरण बांधले.

इं. फॅ. १०
पृ. ३५४ इ.

(८००)

श. १५८१ फा शु. ४
इ. १६६० फेब्रु. ४

राजापूर, (हेन्री रेव्हिंग्टन, रँडॉल्फ् टेलर इ.)——सुरत

**शिवाजीच्या सैन्याच्या हालचाली** आमचेपासून जवळच होत असल्यामुळें आम्हांला त्या समजात. त्याला सारखें यशच येत **असून** किनाऱ्यावरील अनेक बंदरें त्याच्या ताब्यांत गेलीं आहेत. त्यांपैकींच **दाभोळ** हें एक असून तेथील सुभेदार (महमूद शरीफ)-त्या बंदरांत अफजलखानाचीं तीन गलबतें होतीं तीं बरोबर घेऊन—राजापुरास आला. येथें आल्यावर **अफजलखानाचा मुलगा फाजलखान** यानें आपलें सैन्य, या प्रांतावरील अधिकारी रुस्तुमजमा याच्या सैन्यांत मिळवून ते दोघे पन्हाळ्यावर असलेल्या **शिवाजीचे** सैन्यावर चालून गेले. त्यांनीं अफजलखानाच्या गलबतांवरील माल ताब्यांत घेण्याबद्दल राजापुरचा सुभेदार **अबदुल करीम** यास कळविलें. (हें सुभेदारानें स्वतःच सांगितलें.) राजापुराहून पन्हाळ्याकडे जातांना वाटेंतच उभय सैन्याच्या गांठी पडल्या. त्यांत **फाजलखान** अघाडीस होता. त्याच्या सैन्याचा धुव्वा उडाला; पुष्कळ लोक पडले, व नंतर त्याचा पाठलाग झाला. **रुस्तुमजमाचें** फार नुकसान न होतां तो हुकेरीवर मार्गे सरला. ही बातमी राजापुरास येऊन पोंचतांच येथील सुभेदाराची गाळण उडून तो आमचा हिशेब पुरा केल्याशिवाय पळून जाण्याचे तयारीस लागला. परंतु, त्याचा अधिकारी **रुस्तुमजमा** आमच्या माहितीप्रमाणें **शिवाजीचा दोस्त** असल्यामुळें खुद्द त्यानेंकडून कळेपर्यंत तसें करूं नये, असें आम्हीं सांगण्याचा प्रयत्न केला. **'वडेसाहेबांत आणि रुस्तुमजमा यांचें रहस्य नाहीं.** फाजलखानाच्या बरोबर तो लढला ही गोष्ट केवळ वरवर धोरणाची होती. कारण, आतां शिवाजी त्याच्या अंगावरून विजापुरावर जात आहे तेव्हां त्याला फारसाहि विरोध तो करीत नाहीं.'…………इ. गोष्टी सांगण्याचा त्याच्यावर परिणाम झाला नाहीं………आणि तो रात्रींच दाभोळच्या जहाजांवरून जैतापूरला गेला. लगेच आम्हीं आमचें गलबत पाठवून त्याला अडविला आणि आमच्या गलबतावर बोलाविला; निघून जाण्याचें कारण न सांगतां त्यानें १२००० होनांचा माल देऊन राहिलेलें देणें नंतर देण्याचें ठरविलें. परंतु इतक्यांत राजापुरला ५।६ शें व जैतापुरला २ शें अशीं शिवाजीचीं माणसें अफजलखानाचीं गलबतें ताब्यांत घेण्यास आलीं आणि तीं घेण्याचे कामीं आमची मदत मागूं लागलीं. तें आम्हीं नाकारलें. 'आम्हीं हिशेब पुरा करण्याकरितां आलों आहोंत; तें काम झाल्यावर तुम्हीं वाटेल तें करा.' असें सांगितल्यामुळें शिवाजीचे लोकांना राग आला. पण सुभेदारांना धीर वाटून त्यांनीं दोन तीन जहाजें आमचे ताब्यांत देण्याचें बोलणें लावलें. परंतु आमच्या राहिलेल्या रकमेची फेड होईपर्यंत फक्त एकच आम्हीं ताब्यांत घेतलें व तें इंग्रजांचें आहे, असा लेख शिवाजीच्या लोकांना दाखविण्याकरितां तयार केला. सुभेदाराच्या लोकांना इंग्रजांनीं वेंगुर्ल्याला पोंचवावें हें त्यांचें मागणें इंग्रजांना कबूल करतां येईना. कारण, शिवाजीला

त्याचा जाब घावा लागला असता. राहिलेली दोन गलवतें घेऊन त्यांनीं सुरत किंवा दुसऱ्या कोणत्या तरी मोंगली बंदरांत जावें ही आमची सूचना त्यांना अमलांत आणतां येईना. कारण गलबतावरील लोकांनीं शिवाजीचे नांवानें बंड करून गलबत ताब्यांत ठेविलें. या आपत्तीमुळें एक भाडयाचें जहाज करून रेव्हिंगटनचें शिफारसपत्र घेऊन तो सुभेदार वेंगुर्ल्यांला गेला आणि तेथें डचांच्या रक्षणाखालीं आहे.

हेनरी रेव्हिंग्टन किनाऱ्यावर उतरला; आणि शिवाजीच्या माणसांना झालेल्या व्यवहाराची माहिती देऊन 'आपण व्यापारी असल्यामुळें कोणतीहि बाजू घेणें इष्ट नाहीं' वगैरे सांगून राजापूरला गेला.........

गलबत परदेशांत व्यापाराकरितां पाठविण्यास आमचेजवळ पैसा नाहीं; इत्यादि विचार करून आम्हीं राजापूरला परत आलों. तों (शिवाजीच्या) सेनापतीला आमच्याशीं बोलणें करावयाचें आहे असें समजलें. सकाळीं रँडॉल्फ टेलर गेला. सुभेदाराबद्दल विचारणा झाली. तो निघून गेल्याचें नक्की सांगण्यांत आलें. मोंगली गलबतें ताब्यांत घेण्याचें आम्हीं साफ नाकारलें. मग आमचे ताब्यांतील गलबत आणि माल त्यानें मागितला. मालाचे पैसे देण्याचें त्यानें वचन दिल्यावरून आम्हीं फक्त माल देण्यास कबूल झालों. परंतु त्या बाबतींत नक्की लिखाण व्हावयाचें राहिलें. पुढें दंडाराजपूरचा किल्ला, खजिना इत्यादि घेण्यांत शिवाजीला इंग्रजांनीं मदत करण्याबद्दल बोलणें निघालें. तेथून आम्हीं जैतापुरास गेलों. शिवाजीचे नांवानें बंड करणाऱ्या गलबताच्या लोकांनाहि शिवाजीचे लोक आपल्या बायकापोरांची अब्रु घेतील अशी भीती वाटून, फिरून एकमत करून मराठयांच्या डोळ्यादेखत दोन्ही किनाऱ्यांवरील मराठयांच्या बंदुकांच्या माऱ्याच्या पलीकडे जाऊन त्यांनीं नांगर टाकिला. मराठयांनीं चिडून जैतापुरांतील आमचे दलालांना पकडलें. त्यांना सोडलें नाहींतर तोफा डागण्याची आम्हीं दहशत घालतांच दलालाला पुढें घालून ते एका टेकडीकडून पळाले. थोडा पाठलाग करून आम्हीं गिफर्ड आणि एक कप्तान, दलालाला परत पाठवा म्हणून सांगण्यास पाठविला. तों त्यांनीं गिफर्डलाहि गिरफदार करून कप्तानाचे हातीं 'पुढें येऊं नका' असा इशारा दिला. आणि रात्रीं २०० शिपाई घेऊन ते खारेपाटणाकडे गेले. तेथून गिफर्डचें पत्र आलें आहे. गलबतें आणि माल मराठयांचे हवालीं केल्याशिवाय ते कैदी सोडण्यास तयार नाहींत. याबद्दल तुम्हीं आपलें मत घावें.......आमचे लोक कैदी झाले तरी हरकत नाहीं. ते त्यांना फारतर कितीं दिवस ठेवतील ! शिवाजीकडून आम्हीं मुटकेचें पत्र आणून लावूं पर्यंत ! शिवाजी इतका मोठा आणि उदार आहे कीं असल्या अन्यायाच्या सबबीवर हे कैदी ठेवणार नाहीं...अन्यायानें मराठ्यांचें मागणें मान्य केलें तर आपल्या राष्ट्राचें नांव बद्दू होईल...पत्र घेऊन जाणारे शिपायांना भितात...परंतु हा धीटपणानें रस्ता काटील ! महिन्याचे आंत इकडील दंगल कमी होईल.'

[ हें पत्र १० दिवसांत पुनः राजापूरलाच परत आलें. आणि त्याला खाणखी पुरवणी लिहून तें १५ फेब्रुवारीला पुनः रवाना झालें. ]

इं. फॅ. १०
पृ. ३५८ इ.

(८०१)

श. १५८१ फा. शु. १३
इ. १६६० फेब्रु. १३

राजापूर, हेन्री रेव्हिंगटन्——शिवाजी हिंदुसेनाधिपती

दंडाराजपूरप्रकरणीं आपल्याकरितां इंग्रजांनीं किती दोस्तीचें वचन दिलें आहे हें दोरोजी व इतर अधिकाऱ्यांनीं कळविलेंच असेल. तुमचे लोकांकडून आम्हांला किती त्रास झाला आहे हें सांगतां पुरवत नाहीं. परंतु कृपा करून इतकेंच लक्षांत घ्यावें कीं (राजापूर बंदरांत असलेलीं गलबतें मराठ्यांच्या ताब्यांत देऊन) आमचे मित्राचें शत्रुत्व आम्हीं पत्करलें नाहीं एवढ्याकरितां एक दलाल आणि एक इंग्रज त्यांनीं २५ दिवसपर्यंत कैदेंत ठेविले ! दलाल सोडून दिला. परंतु इंग्रजाला खारेपाटणांत अडकवून ठेविला आहे ! आम्हांला यानें खेद होत असून इतर व्यापाऱ्यांना सर्वत्र दहशत बसून व्यापाराला धक्का बसला आहे. आपण हुकूम पाठवून आमचा माल व मनुष्य परत याल अशाबद्दल खात्री असल्यामुळें धीर धरून आहोंत.

फॅ. रे. राजापूर
पृ. १०८ इ.

(८०२)

श. १५८१ फा. शु. १३
इ. १६६० फेब्रु. १३

राजापूर (रेव्हिंगटन्)——फाजलखान अवदलखान.

हें पत्र हातीं येण्यापूर्वींच दाभोळचा सुभेदार महमद शेरीफ यानें सर्व हकीकत कळविलीच असेल. त्यांतून हें तुमचे हातीं पडेल अशी खात्री नाहीं म्हणून थोडक्यांत लिहितों. हातीं पडेल तर कृपा करून विश्वास धरा कीं, आम्हीं तुमचे दोस्त आहोंत. आम्हीं असें ऐकिलें आहे कीं, आमचा दोस्त रुस्तमजमा व तुम्हीं सैन्यें एकत्र करून शत्रूवर गेलां. म्हणून दाभोळचे सुभेदाराचे म्हणण्याप्रमाणें आम्हीं वागलों. शिवाय तुमच्या सारख्या दोस्तांशीं लढणें आणि तुमचीं गलबतें शत्रूच्या हवालीं करणें हें आमच्या धर्माच्या विरुद्ध होतें. परंतु असें वागल्यामुळेंच शिवाजीच्या लोकांनीं आमचा एक माणूस दलालासह जुलमानें कैद करून नेला आहे. परंतु आतां आमचा कांहीं उपाय नाहीं. कारण तुम्हीं मोठ्या कामांत गुंतलां आहां. तथापि लवकरच शांतता होऊन तुमच्या देशाचें बरें होईल अशी आशा करून आहोंत.

फॅ. रे. राजापूर
पृ. १०८ इ.

(८०३)

श. १५८१ फा. शु. १३
इ. १६६० फेब्रु. १३

राजापूर, हे. रेव्हिं.—— रुस्तुमजमा

इंग्रजांच्यामुळें राजापूरला व्हावयाचा लाभ तुमच्या उत्तेजनामुळें होऊं लागलाच

आहे. परंतु दुर्दैवानें मध्यंतरीच्या धामधुमीमुळें इतक्यातच अडचळा झाला आहे. आपला माह्यलदार येऊन आपलाच अधिकार चालूं राहिल्याचें कळून आनंद झाला. आम्ही राजापूर सोडून जाणार नाही असा आमचा निश्चय आहे. तुमचा सुभेदार अबदुल करीम सोडून गेला हें वाईट झालें. त्यानें झालेल्या गोष्टी तुम्हांला कळविल्याच असतील. त्यामुळें आपल्याला समाधानच वाटलें असेल. इतरांनाहि असमाधान वाटण्यासारखें त्यांत कांहीं नाहीं. तुम्ही आमच्या दोस्तीबद्दल खात्री ठेवावी; आणि आम्हांला तुमचे नोकर असें समजून आमचा एक कैदी खारेपाटण किल्लयांत ठेविला आहे तसें होऊं देऊं नये. फाजलखानाची गलबतें आणि तुमच्या हिशेबाच्या मरपाई करितां दिलेला ११७१⅔ हो.चा माल आम्ही शिवाजीचे लोकांच्या ताब्यांत देण्यास तयार झालों नाहीं. एवढेंच कार्यतें कारण झालें. याबद्दल शिवाजी आम्हांला त्रास द्यावा, असें कधींच सांगणार नाहीं, अशी आमची खात्री असल्यामुळें त्याला आम्हीं लिहिलें आहे. तुम्हींहि आपला एक मनुष्य हें पत्र घेऊन त्याचेकडे पाठवावा अशी विनंति आहे. दुसरें पत्र फाजलखानाकरितां पाठविलें आहे. तुम्हीं वाचून पाहून जरूर वाटल्यास त्याचेकडे पाठवावें. कारण तुमचे दोस्त ते सर्व आमचे दोस्त असें आम्हीं समजतों. इतरांचे आधीं आम्हांला कामकाज लिहावें कारण तुमची आमची दोस्ती आहे. इ०.

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ. १० <br> पृ. ३५८ इ. | (८०४) <br> राजापूर-सुरत | श. १५८१ फा शु. १४ <br> इ. १६६० फेब्रु. १५ |

४ फेब्रु. चे पत्रास ताजा कलमः— गिफर्ड समवेत गिरफदार झालेल्या आमच्या दलालानें रुस्तुमजमा व शिवाजी यांस पत्र पाठविलें. रु. जमाचा अधिकारी व शिवाजीचा एक अधिकारी असें येऊन त्यांनीं राजापुरांत कांहीं घेतलें असेल तें व कैदी सोडून देण्याचा हुकूम दिला. यामुळें दलाल परत आला. परंतु खंडणीच्या आशेनें एका लबाड ब्राह्मणानें गिफर्डला खारेपाटण किल्ल्यावरच ठेविलें आहे. पुनः आम्हीं उभयतांना लिहिलें आहे. कारण ते खात्रीनें दोस्तच आहेत. तेव्हां या लबाडाला बडतर्फी मिळेल असें वाटतें. कैदी घेऊन जाणारा सेनापती दोरोजी याला अपराधाबद्दल असेंच प्रायश्चित्त मिळालें !

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. राजापूर <br> पृ. ११३ इ. | (८०५) <br> राजापूर-सुरत | श. १५८१ फा व.४ <br> इ. १६६० फेब्रु. २० |

मि. गिफर्डला कैद होऊन एक महिना झाला...रुस्तुमजमाचा नोकर राजापूरच्या जकातनाक्यांत येऊन बसतो. शिवाजीनें शिपायांनीं नेलेल्या सर्व वस्तु परत देण्याबद्दल हुकूम केला...

इं. फॅ. १० } (८०६) { श. १५८१ फा व. ७
पृ. ३५५ इ. } राजापूर-सुरत { इ. १६६० फेब्रु. २३

खारेपाटण किल्यांत गिफर्डला आम्ही खाणें व पाणी पुरवीत होतों. मागचे पत्रानंतर गिफर्डनें पत्र पाठविलें. त्यावरून खारेपाटणच्या हवालदाराच्या मनांत त्याला तेथून काढून सातवळी किंवा खेळणा किल्यावर पाठविण्याचें आहे असें कळलें. त्यांचा रस्ता कळल्यामुळें ३० शिपायांनिशीं जाऊन गिफर्डला सोडवून आणलें. त्याचे रक्षणाकरितां २५ शिपाई बरोबर होते.

सा. ले. ३४२ } (८०७) { श. १५८१
श. } कौल नकल म. मु. व सी. { इ. १६५९-६०

सूर्याजी राजे प्रभातवळीकर — केसो नारो व नारो आतो पाध्ये. धर्मा. ज्योति. व अष्टा. तर्फ संगमेस्वर वगैरे

तुमची मिरासी पिढी दर पिढी चालत आहे. बादशाही फर्मान व ठाणाची मिसेली याप्रमाणें तुम्हास मिरासीचा कौल दिल्हा असे.

सं. २१ ले. ५९ } (८०८) { श. १५८१
पृ. १०६० } मिसेली फा. मु. व सी. { इ. १६५९

अज दि. पर. कऱ्हाड——ता मोक. मौ. कोपर्डे खुर्द
नरहरिभट गिजरे यास फर्मानाप्रमाणें इनाम चालूं ठेवणें.

सं. ३ पृ. १३५ } (८०९) {
वेचनपत्रक

रंगभट बिन जगभैत पिरंगूटकर मौ. पिरंगूट तर्फ मुठेखोरे——रा. बालाजी हरी मेडजोगी.

मौ. पिरंगूटचें कुळकर्ण आपली मिरासी, तें तुम्हांस विकिलें. [ कुळकर्णाचे हक कमाजिमे यांची गणना यांत आहे].

पिसुर्लें. शिवाजी पृ. ५ } (८१०) { श. १५८२ चैत्र शु. ११
इ. न्यू. } गोवें गव्ह.—पोर्तु. बादशहा. { इ. १६६० मार्च १२

सरदार शहाजीचा पुत्र शिवाजी हा सध्यां विजापूरजवळ असून विजापुर कराच्या सरदारांशीं त्याचें युद्ध चालू आहे. त्यांत त्यानें कांहीं सरदारांचा पराभव केला असून त्यांचे बरेच शिपाई व घोडे ठार केले. चौलपासून बांद्यापर्यंत सर्व मुलुख शिवाजीच्या ताब्यांत आहे. त्यानें ह्या मुलुखांतील पुष्कळ शहरें व समुद्रकांठचीं बंदरें काबीज केलीं आहेत; तशीच बरीच संपत्तिहि मिळविली आहे. विजापूरचा आदिलशहा हा

त्याच्याविरुद्ध रुस्तुमहीशी तयारी करीत आहे; पण ती पूर्ण होईल की नाही यासंबंधीं शंका आहे. कारण एकतर त्याच्या राज्याची अव्यवस्था व दुसरें, शिवाजीनें त्याचे हुशार व वजनदार सेनापति सर्व मारले आहेत. इशिवाय विजापूरचा राजा हा दासीपुत्र आहे व त्यामुळें शिवाजी विजापूरच्या तख्तावर दुसरा एक राजपुत्र बसविणार आहे; अशाबद्दलची एक अफवा येथे उठली आहे.

इं. फॅ. १० }
र ३६४६. }

(८११)

राजापूर-सुरत

{ श. १५८२ चैत्र व. ३
{ इ. १६६० मार्च १९

रुस्तुमजमा शिवाजीचा स्नेही असल्यामुळें त्याचें मूळचें राजापूर शहर अद्याप त्याचेकडेच आहे. शिवाय शिवाजीनें त्याला आणखी दोनतीन शहरें दिलीं आहेत. या सर्वांवर अबदुल करीम पुनः सुभेदार म्हणून आला आहे. त्याचेबरोबर १०० शिपाई आले............[कांहीं देण्याघेण्याचे बाबतींत स्थानिक व्यापाऱ्यांशीं बिनस-ल्यामुळें त्यानें इंग्रजांचें गलबत ताब्यांत घेतलें व इतरहि त्रास दिला]...आम्हीं रुस्तुम-जमाला लिहिलें आहे. परंतु शिवाजी आणि तो मिळाले आहेत. मोठ्या गोष्टींचा विचार करीत असतांना अशा शुल्लक गोष्टींकडे लक्ष कोठून लागणार ! शिवाय शिवाजीचे ३।४ हजार लोक सर्व किनाऱ्यावर फिरत आहेत हें आम्हीं पाहतों. शहरें घेणें हा उद्देश नसून केवळ सैन्याचें पोषणाकरितां हें सैन्य पैसा जमवितें ! रुस्तुमजमाहि असेंच करील असा संभव आहे...रुस्तुमजमानें न भिण्याबद्दल पत्रें लिहिलीं आहेत. परंतु सुभेदारानें त्याला पैसा दिल्यास 'तूं हा कसा मिळविलास' अशी चौकशी कोणीच करणार नाही !......कंपनीचा दारुगोळा रुस्तुमजमाला विकला तर कंपनीला पुष्कळच नफा होईल. परंतु राजापूरच्या जकातींतून तो किंमत देणार. तसा माल त्याला विकावा काय ?...पत्रांच्या अदलाबदली होतात...एकदां रुस्तुमजमाचें आमच्याकडे आलेलें पत्र शिवाजीच्या शिपायानें पकडून नेलें...त्याला त्याबद्दल शिक्षा झाली.

हेगसंग्रह }
डचपत्रव्यवहार }

(८१२)

{ श. १५८२ वैशाख
{ इ. १६६० एप्रील

वेंगुर्ला येथील डच वाकनीस-गव्हर्नर जन. : ज्या शहाजीनें इ. १६५७ मध्यें सदंपट्टण येथील (डच) कंपनीचें ठिकाण जबरदस्तीनें ताब्यांत घेतलें व कंपनीच्या नोक-रांना कैदेंत ठेवलें; त्या वयोवृद्ध शहाजीचा मुलगा शिवाजी याला विजापूरचा माजी सुलतान महमद आदिलशहा यानें आपल्या हयातींत नोकरींत घेतलें होतें. गेलीं १०।१२ वर्षें त्यानें राजसत्तेविरुद्ध बंडाळी चालविली आहे; त्यांतच त्यानें चौल वस-ईच्या बाजूचा मुलूख ताब्यांत घेतला. तेव्हां त्या ठिकाणीं त्याला पुष्कळसे अनुयायी मिळाले. यामुळें त्याला रणांगणांत जबरदस्त सैन्य आणणें शक्य झालें. तेव्हांपासून त्यानें

किल्लेक महत्वाचे किल्ले घेऊन व्यापाराच्या पेठ्या लुटल्या. हा त्याचा क्रम अद्याप चालूच आहे. अली आदिलशहाला हा प्रकार असह्य वाटून त्याने सेनापती अबदुलखान याला मोठ्या सैन्यानिशी त्याच्यावर पाठविलें. 'या शिवाजीला शस्त्राच्या जोरावर तरी नाहींसा करा किंवा गोड शब्द व सलोख्याचीं अघळपघळ अभिवचनें देऊन तरी त्याचा जीव घ्या' असा स्पष्ट हुकूम बादशहानें दिला व तो खानाला (शिवाजीला?) दरबारांतील एका अत्यंत वजनदार गृहस्थामार्फत कळ(वि)ला. इकडे आपलें डोकें मारण्यासाठींच या खानाची रवानगी झाली असली पाहिजे व त्याच्या शब्दावर विश्वास ठेवणें योग्य नाहीं, हें शिवाजीनें पक्केपणीं ओळखलें होतें. खानाशीं मोठ्या सैन्यानिशी सामना देण्याचें शिवाजीनें योजलेंच होतें; पण थोडी चकमक उडाल्यानंतर पळाल्याचा देखावा शिवाजीनें दाखविला. त्यानें आपल्या सैन्यांत अशी अफवा पसरली कीं 'अफजलखानानें शत्रूविरुद्ध कितीतरी वेळां मोठमोठे विजय मिळविले आहेत; तेव्हां त्याच्यापुढें आमचा निभाव लागणार नाहीं आणि मी तर अगदीं भिऊन गेलों आहे.' ही बातमी पसरत पसरत अबदुलखानाच्या कानावर गेली व मुसलमानी पद्धतीप्रमाणें तो फुशारकी मारूं लागला. या अफवाप्रमाणें आपण खरोखरच भ्यालों हा समज दृढ करण्यासाठी शिवाजीनें आपली आई* व दासी यांना खानाकडे पाठविलें. त्यांनीं अशी विनवणी केली कीं, आमच्या मुलास तुम्ही वाईट रीतीनें वागवूं नये किंवा भीती दाखवूं नये. कारण तो यावरून गोंधळला म्हणजे काय करावें आणि काय न करावें असें त्याला होऊन जाईल; त्याच्यावर तुम्ही मेहेरनजर करा. म्हणजे विजापूरकरांचे जे २३ किल्ले शिवाजीनें घेतले आहेत ते तो तुम्हांला देऊन टाकील; तो आपल्याकडे फक्त ४ किल्ले ठेऊन घेईल आणि आपलें उत्पन्न आहे त्यावर सुखासमाधानानें राहील. हें ऐकून अफजलखानानें शपथ घेऊन सांगितलें कीं 'मी शिवाजीस यत्किंचित् इजा पोचविणार नाहीं; उलट विजापूरच्या बादशहाची मर्जी त्याच्यावर होईल असें करतों.' हें वर्तमान समजल्यावर शिवाजीनें तातडीनें पत्र पाठवून कळविलें कीं "माझ्या मनाचें पूर्ण समाधान झालें. आतां माझी विनंति अशी आहे कीं, आपण जावळीस यावें; म्हणजे चार लोकांनिशी मी भेटीस येऊन नम्रपणें किल्ला अर्पण करीन." याप्रमाणें सर्व गोष्टी पदरांत पाडून घेण्यासाठीं अबदुलखानानें तेथें जाण्याचें ठरविलें. इतक्या सरळपणानें बंडखोर व लबाड अशा शिवाजीच्या भेटीस खानानें जाऊं नये, असा अर्थाचा सल्ला तिघांनीं दिला. पण त्याचा उपयोग झाला नाहीं. हे उभे सुळके, खडे डोंगर आणि दुर्गम वाटा यांमधून निबिड अरण्यांत तो बोलावतो त्या अर्थी यांत काहीं तरी दगाबाजी असली पाहिजे, असें या सल्लागारांनीं सुचविलें; पण खानानें त्यांना कडक

* यावरून शिवकालीन परकीय लोकांना मराठ्यांच्या अंतर्गत व्यवहारासंबंधींच्या बातम्या किती विपर्यस्त व चुकीच्या स्वरूपांत पोंचत व त्यांना त्या खऱ्या वाटत हें लक्षांत येण्याजोगें आहे.

रीतीनें शिक्षा केल्या. एकाचें नाक कापलें, दुसऱ्याला जिवंत पुरलें आणि तिसऱ्याला असें उत्तर दिलें कीं, 'मी रुस्तुमजमाप्रमाणें मोठ्या कुळांत जन्म पावलों नसलों तरी मी शूरांच्या पद्धतीनें चालणारा आहे.' नंतर तो निधडक ७ हजार घोडेस्वार घेऊन ठरल्या ठिकाणीं गेला. शिवाजीच्या प्रमुख लोकांनीं त्याला एका नवीन उभारलेल्या व उत्तम प्रकारें शृंगारलेल्या सदरेंत नेलें; या समोर दुसरी एक सदर शिवाजीसाठीं अशीच शृंगारलेली होती. इकडे त्या यवनयाभागल्या घोडेस्वारांकडे शिवाजीनें पुष्कळसें शिजविलेलें अन्न पाठविलें; तेव्हां खालीं उतरून घोडेस्वारांनीं जेवणास प्रारंभ केला. शिवाजीनें अंगांत चिलखत घातलें होतें; आपला हेतु तडीस नेण्याच्या उद्योगास तो तावडतोब लागला. त्यानें अशी विनंति केली कीं 'मी सेनापतीला किल्ल्या अर्पण करणार; आणि आजपर्यंत केलेल्या अपराधाबद्दल माफी मागण्यासाठीं मी पाया पडणार.' नाहीं, होय, करीत खानानें या गोष्टीस परवानगी दिली. तेव्हां त्या बंडखोरानें एका गुप्त हत्याराच्या योगानें खानाच्या पोटावर असा मारा केला कीं, त्याचा कोथळा बाहेर पडला. यानंतर तो तावडतोब पळून गेला. त्याचा पाठलाग करण्यांत आला पण कांहीं उपयोग झाला नाहीं. जावळीच्या किल्ल्यांत जाऊन त्यानें आपला बचाव केला. इकडे खानाच्या लोकांनीं त्याला पालखींत घातला; पण शिवाजीच्या एका सैनिकानें अशा रीतीनें मारा केला कीं खान गतप्राण झाला. विजयदर्शक तोफेची इशारत देतांच शिवाजीच्या ६ हजार पायदळानें व २ हजार घोडदळानें (हें सैन्य वर सांगितलेल्या जागीं झाडींत दडवून ठेवलें होतें.) बाहेर पडून खानाचें बरेंच सैन्य कापून काढलें; त्या वेळीं जे पळून गेले तेवढेच काय ते वांचले. या पळून जाणाऱ्यांत खानाचा वडील मुलगा होता; पण त्याचे २ भाऊ, रुस्तुमजमाचा एक भाऊ या शिवाय आणखी कांहीं प्रतिष्ठित लोक पाडाव सापडले त्यांना कैद करण्यांत आले. या लोकांची प्रथम अप्रतिष्ठा झाली; पण आतां त्यांना योग्य रीतीनें वागविण्यांत येत आहे. यानंतर विजापूरच्या सैन्याचा नाश करावा आणि इशारा देऊन देखील पळून जाणार नाहींत त्यांच्यावर गोळीबार करावा असा शिवाजीनें हुकूम सोडला. त्यावेळीं बरेच लोक कापून काढण्यांत आले. अबदुलखानाचा खून पाडल्यानंतर शिवाजीनें विसावा न घेतां जे अनेक किल्ले लबाडीच्या मार्गानें ताब्यांत घेतले त्यांतच दुर्गम असा पन्हाळा किल्ला होता. शिवाय विजापूरकरांच्या राज्यांतल्या अनेक व्यापाराच्या पेठा त्यानें घेऊन थेट विजापूरच्या आसपास तो थोड्याच वेळांत पोहचला. नंतर विजापुरापासून दोन तीन दिवसांच्या मजलीवर असलेल्या रायबाग नांवाच्या पेठेच्या गांवीं तो आला. त्या गांवांतील प्रमुख लोकांशीं गुप्तपणें पत्रव्यवहार झाला होता. बडी साहेबिणीनें जर पाटगांवाहून तावडतोब एका दिवसाच्या मजलीवर असलेल्या या ठिकाणाकडे चांगली सैन्याची तुकडी पाठविली असती तर शिवाजीला आपला बेत सिद्धीस नेता आला नसता. या सर्व प्रकारापुळें विजापुरास एकच गोंधळ माजून राहिला आहे. विजापूरच्या राजानें रुस्तुमजमा यास तावडतोब मोठ्या सैन्यानिशी "जाऊन या बड-

खोरास धांवविण्याविषयीं व त्याच्यावर हल्ला चढविण्याचे पराकाष्ठेचे प्रयत्न करण्याविषयीं हुकूम दिला होता. इकडे रुस्तु- म्या सैन्याचा चोहोंकडून कोंडमारा झाला होता. हें ओळखून शिवाजीनें त्याच्यावर तडाखा मारून यश मिळविलें. या चकमकींत रुस्तुम-जमाचे १५ हत्ती, १००० घोडे व पायदळ खर्ची पडले; व त्याला आपल्या जहागिरीच्या ठिकाणाकडे परत जावें लागलें. यानंतर त्या बंडखोरास दुसऱ्यांदा जय मिळा-ल्यामुळें स्फुरण चढलें व तो सैन्यानिशीं विजापूरच्या वाटेनें निघाला व दोन अडीच मजली गेल्यावर वाटेंतलीं बरींच गांवें त्याला विरोध न होतांच हस्तगत करतां आलीं. मिरजेचा किल्ला मात्र त्याला ताब्यांत घेतां आला नाहीं, कारण तेथील लोक शौर्यानें लढले; यामुळें शिवाजीला तेथें वेढा घावा लागला. इकडे विजापूरच्या राजानें पराकाष्ठेचे प्रयत्न करून १६ ते २० हजार घोडेस्वार व ३५ ते ४० हजार पायदळ जमविलें व हें सैन्य सिद्दी जोहाराच्या हाताखालीं देण्यांत आलें; आणि तिसऱ्यांदा युद्धाचा प्रसंग आणिला. हें जेव्हां शिवाजीला समजलें तेव्हां त्यानें वेढा उठवून पन्हाळ्याच्या रोखानें चालण्यास सुरवात केली; व चोंहोंकडे पांगलेलीं सैन्यें एकत्र जमविण्याचा उद्योग आरं-भिला; यावेळीं त्याचें सैन्य विजापूरच्या सैन्याइतकें बळवान आहे असा समज होता. नंतर ज्या ठिकाणाचें संरक्षण करतां येण्याजोगें नव्हतें ते गांव शिवाजीनें सोडून दिले व ते रुस्तुमजमानें ताब्यांत घेतले. यावरून असें स्पष्ट दिसतें कीं ४० हजार होन घेऊन रुस्तुमजमा अंतस्थ रीतीनें शिवाजीला सामील आहे. यामुळें रुस्तुमजमा जरी वरपांगी बादशहाचा नोकर व मित्र म्हणवितो तरी त्याच्यावर बादशहाचा बिलकूल विश्वास नाहीं. हा रुस्तुमजमा हुकेरीलगत राहिला; असा करतां कीं, तीन वाटांच्या संगमावर राहून वेळ पडेल त्याप्रमाणें युद्धाच्या बदलत्या परिस्थितीचा फायदा घेतां यावा. वर सांगितलेल्या सैन्यांचीं अद्याप तोंडास तोंडें भिडलीं नाहींत. तथापि शिवाजी हा पक्का लबाड असल्या-मुळें तो वाटेल ते उपाय योजून शिद्दीजोहार व त्याच्याबरोबर आलेले नामांकित सरदार यांना पैसे देऊन अगर इतर फायद्याचें अभिवचन देऊन वश करून घेईल असें आम्हांला निश्चितपणें वाटतें, कारण ही वेळ निभावली म्हणजे विजापूरचा बादशहा पुनः या उद्यो-गांत पडणार नाहीं हें शिवाजी जाणतो. शिवाजी हल्ल आश्रयार्थ ज्या किल्ल्यांत गेला होता त्या पन्हाळा किल्ल्याजवळ सिद्दीजोहार येऊन पोचला. इकडे शिवाजीनें दुसऱ्या रस्त्यानें ७५ हजार घोडेस्वार विजापुराकडे पाठविले. त्या सैन्यानें अचानकपणें विजा-पूरनजीकच्या शहापुरावर रात्रीं हल्ला केला व तें ताब्यांत घेतलें; आणि यथेच्छ लुटलें. यामुळें दरबारांत विलक्षण गोंधळ उडाली. पण त्यांना असें समजलें कीं, शत्रूचें सैन्य फारसें मोठें नाहीं. तेव्हां वेंगुर्ल्याचा जहागीरदार खवासखान याच्या हाताखालीं राज-धानींत शिल्लक असलेले ५ हजार घोडेस्वारांचें पथक बादशहानें शिवाजीच्या घोड-दळाशीं लढण्याकरितां पाठविलें. या सैन्यानें अशा रीतीनें हल्ला चढविला कीं, यांत कोणाची सरशी होईल हें ठरविणें कठिण होतें. पण बादशाही सैन्यानें इतका जोर केला

श्री देवरी शिवाजीच्या लोकांना बरीच हानी पत्करून सहा मैल हटावें लागलें. विजापूर-वरील या अचानक हल्याचें वर्तमान कळल्यामुळें अर्थात आदिलशहाच्या सुरक्षिततेसाठीं तो सेनापती ४।५ हजार घोडेस्वारानिशीं विजापुरास परत आला आहे.

यानंतर थोड्याच दिवसांनीं असें समजलें कीं, शिद्दीजोहारानें ४०० पायदळ, कांहीं घोडेस्वार व पांच पालख्या राजापुरास पाठविल्या व विजापूरच्या राजास इंग्रजांनीं मदत केली पाहिजे असें बोलणें टाकलें. त्यावेळीं इंग्रजांकडे तेथें दोन तोफा होत्या त्या त्यांना आपल्या इच्छेविरुद्ध शिद्दीजोहाराच्या ताब्यांत द्याव्या लागल्या. मात्र प्रत्यक्ष किती इंग्रज इसम शिद्दीजोहाराकडे मदतीस गेले हें तेवढें समजलें नाहीं.

येथवर वर्णन केलेल्या वंडाळींत देसाई लखम सावंत यानीहि कामगिरी लक्षांत धरण्याजोगी आहे.........खवासखानानें वेंगुर्ल्याकडे फाजी ( Chasi ) अवदुला नांवाचा पाठविला तो १४ फेब्रुवारीस (फाल्गुन शु. ४) दाखल झाला. इकडे शिवाजीच्या लोकांनीं कोंकण प्रांतांत शिरून दाभोळ ते कुडाळपर्यंत मजल मारली. तेव्हां देसाई लखम सावंत यानें बांदा व वेंगुर्ले या भागाचें संरक्षण करण्याचा निश्चय केला. या कामीं संमोवारचे बरेच देसाई त्याला सामील झाले व ४ हजार सैन्यानिशीं तो फेब्रुवारी-च्या मारमीं कुडाळास आला. पण शिवाजीचे लोक तेथें येतांच लखम सावंतास त्याच्या सोबत्यांनीं सोडलें व तो परत सैन्यानिशीं वाडीस गेला. तेव्हां शिवाजीच्या लोकांनीं कुडाळचा किल्ला ताब्यांत घेतला. त्यानंतर लखम सावंतानें पुनः समोवारच्या देसायांना जमवून मार्चच्या १७–१८ तारखेस कुडाळावर रात्रीं हल्ला केला; पण शिवाजीच्या लोकांनीं दाद दिली नाहीं; मात्र आपल्या जवळची दारू संपली हें लक्षांत घेऊन शिवा-जीचे लोक सकाळीं कुडाळांतून मारामारी करीत बाहेर पडले व पळून गेले. यामुळें लखम सावंत गर्वानें फुगून गेला आहे व आपलें नांव आदिलशाही दरबारांत गाजेल असें त्याला वाटतें.

लखम सावंताप्रमाणें आचऱ्याच्या राजानें देखील शिवाजीशीं शत्रुत्व जाहीर करून तिकडील बंदरांतून शिवाजीच्या लोकांना घालवून दिलें आहे. या सुमारास रुस्तुम-जमाची स्वारी तेथें येऊन पोचली; आणि त्यानें विजापूर दरबाराकडे लिहून पाठविलें कीं शिवाजीच्या सैन्यावर जो नुकताच जय मिळविला तो माझ्या हुकमानें व माझ्या सहायानें मिळविण्यांत आला. पुढें रुस्तु. नें कुडाल व फोंडा हे किल्ले ताब्यांत घेतले व (Chamier) खा(शा)मीर यास सुभेदार नेमून त्याजकडे लखम सावंताशीं लढण्याचें काम सोंपविलें आहे. यामुळें कोंकणांत पुनः धांदल उडाली आहे. रुस्तु. व शामीर हे पोर्तुगीजांशीं स्नेहभावानें वागणारे आहेत. यामुळें त्यांची आमच्यावर ( डचांवर ) वक्रदृष्टी होण्याचा संभव आहे.

इं. फॅ. १० } (८१३) { श. १५८२ वैशाख शु. ६
पृ. ३७०,३७१ इ. } { इ. १६६० एप्रिल ५

राजापूर—हेन्री रेव्हिंग्टन (पन्हाळ्याचे मार्गावर):—[सिद्दीजोहारकडून तोफ व दारूगोळा पुरविण्याबद्दल अनुकूल उत्तर आल्यावर रेव्हिं० २ एप्रिलला रायपाटण, अणस्कुरा मार्गानें पन्हाळ्याकडे निघाला होता]...माहालदार सुभेदाराला सुलतानाचा हुकूम घेऊन आला आहे कीं, **सिद्दीजोहरकडे** तोफ व दारूगोळा (तो सांगेल त्या ठिकाणीं) सुरक्षित पोंचविण्यासाठीं इंग्रजांना मदत करावी......पण त्याचा कांहीं उपयोग नाहीं. वाहतुकीची तजवीज आपणच केली पाहिजे.......रुस्तुमजमाला दिलेली एक तोफ व ४ गोळ्यांची पावती मागितली पण सुभेदार टाळाटाळी करितो....काल रुस्तुमजमाचीं माणसें सुभेदाराकडे आलीं. तुम्हीं प्रथम सिद्दीजोहारला लिहिलेल्या पत्राची नक्कल त्यांनीं सुभेदाराला आणून दिली...रुस्तुमजमाला कबूल केलें असतांना दारूगोळा सिद्दीजोहरला दिल्यामुळें रु.जमाला वैषम्य वाटलें आहे. आणि आपल्या सर्व बंदरांतून इंग्रजांना काढून लावून डचांना भरण्याचा त्याचा विचार आहे. त्याकरितां त्यानें वेंगुर्ल्याला वकील पाठविलीं अशी बातमी आहे. पण ही एक गप्पच आहे....**सुलतानाला शिवाजीवर जय मिळाला** हें वाचून बरें वाटलें. पुढील पत्रांत पक्की बातमी लिहावी.

इं. फॅ. १० } (८१४) { श. १५८२ वैशाख शु. ७
पृ. ३६८-६९ इ. } सुरत–कंपनी { इ. १६६० एप्रिल ६

दख्खनमधील प्रबळ हिंदु **शिवाजी** यानें गेल्या जानेवारींत दख्खनचे सुलतानाविरुद्ध (विजापूर) सैन्य उभारून **राजापूर** आदिकरून पुष्कळ शहरें घेतलीं.

इं. फॅ. १० } (८१५) { श. १५८२ वैशाख व. १
पृ. ३७२ इ. } राजापूर (टेलर इ.)–सुरत { इ. १६६० एप्रि. १६

विजापूरचा सेनापती सिद्दीजोहर पन्हाळ्यासमोर १५००० सैन्यानिशीं (वेढा घालून) आहे. कंपनीचा दारूगोळा खपविण्याकरितां पत्रव्यवहार केल्यामुळें नमुना पहाण्याकरितां सिद्दीचीं माणसें येऊन गेलीं. १ तोफ व ५० गोळे घेऊन रेव्हिंग्टन **मिंघॅम, गिफर्ड** व वेलजी यांसह गेला. कोल्हापुरापासून पन्हाळ्याचा तळ ८।१० मैल असून तेथपर्यंत मोठ्या सन्मानानें रेव्हिंग्टनला नेण्यांत आलें. माल पसंत पडल्यास आणखी मागणी येईल....

इं. फॅ १० } (८१६) { श. १५८२ वैशाख व. २
पृ. ३७२ इ. } राजापूर वखारवाले–रेव्हिंग्टन (पन्हाळा) { इ. १६६० एप्रिल १७

तुमचें १३ चें पत्र काल मिळालें. विजापूरला गेलेला इसम दारूगोळा विकत

घेण्याबद्दल हुकूम घेऊन आलाच असेल. ... ... ... ... ... ... तुम्हीं स्कोटक टोल उठविली ती पाहून सेनापती खुष झाला. उत्तम झालें. रुस्तुमजमा इतकेच त्याचे भाऊ अपराधी असतांना त्यांना छावणींत इतकें स्वातंत्र्य मिळतें याचें आश्चर्य वाटतें. आपल्या लिहिण्यावरून असें दिसतें कीं, या विकट परिस्थितींत अपराधाबद्दल शासन करून अडचणी उपस्थित करावयाला सेनापति तयार नसावा. ...फाजलखानाची व तुमची भेट झाली....विजापुराहून शिवाजीचें सैन्य परतल्याची बातमी आली आहे ती ऐकून आम्हांस आनंद झाला पाहिजे. कारण यामुळें किल्ला त्याचे हातून घेण्याची आशा अधिक वाढली आहे. एकदांचा हा दंगा थमला पाहिजे. पन्हाळ्याबद्दलचें आपलें मत आणि वेढा यशस्वी होण्याचें चिन्ह आहे काय हें कळवावें.

इं. फॅ. १० }
पृ. ३७४-७५ इ. } राजापूर वखारवाले–रेव्हिंगटन (पन्हाळा) (८१७) { श. १५८२ वैशाख व. ९ { इ. १६६० एप्रिल २३

तुमचीं पत्रें १९ व २० ची काल रात्रीं पावलीं. थर्जदास्त पावली. परंतु (शिवाजी) राजाचे लोक पूर्वी कळविलें आहेलीं गेले ते पुनः आलेले नाहींत. तसा आयचीचा प्रसंग पुनः येईल त्यावेळीं उपयोग करूं. रुस्तुमजमानें तुम्हांला राजापुराला परत आल्याबरोबर हुकेरीला बोलाविलें आहे. त्याचा हेतू समजत नाहीं. तथापि आमचेबद्दल गैरसमज दूर होण्याकरितां म्हणून तरी त्याची भेट होणें इष्ट वाटतें. दारूगोळ्याचा करार दान झाला. परंतु राणीची संमति आणून तो पक्का केला पाहिजे. मग कारभारांत कांहींही बदल झाला तरी हरकत पडणार नाहीं. नाहींतर सेनापती (जोहरचा) कोणी शत्रु लबाडीनें असें म्हणेल कीं, राणीनें शिक्का करून दिलेले कोरे डौलांचा यानें दुरुपयोग केला. किंवा शिवाजीकडे कारभार गेल्यासहि शिवाजी शत्रू या नात्यानें असें प्रमाण पुढें करील.

इं. फॅ. १० }
पृ. ३७६इ } (८१८) { श. १५८२ वैशाख व. १४ { इ. १६६० एप्रि. २८

राजापूर वखारवाले——रेव्हिंगटन.

राजापूरहून सुरतेला जाणाऱ्या गलबताला, दंडाराजापुरीच्या दिवानें त्रास देऊं नये म्हणून इंग्रजांची चिठी पाहिजे अशी एक व्यापारी रदबदली करितो. तरी मसुदा करून पाठवावा सही करूं....कांहीं बातमी नाहीं. रु. जमाचे लोक स्तब्ध आहेत. अशी बोलवा आहे कीं, सिद्दीजोहरनें खारेपाटण, [1]सांवडा इ. शहरें घेण्याकरितां लोक पाठविले आहेत. तुम्हांला खरें समजलेंच असेल.

---

१. राजापूरचे ईशान्येस ८ मैल (–फॉस्टर).

इं. फॅ. १०
पृ. ३७६ इ. }

(८१९)

{ श. १५८२ अधिक ज्येष्ठ शु. १
{ इ. १६६० एप्रिल ३०

राजापूर वखारवाले—रेव्हिंग्टन (पन्हाळा) — ब्राह्मण सुभेदाराची व आमची भेट झाली नाही...आम्हीं निघून येण्याचे पूर्वी त्याला भेटून पहातों......राणीच्या कारकुनानें काम जलद करण्याचें वचन दिलें व तो भेटीला आला या चांगल्या गोष्टी झाल्या. ...हा ब्राह्मण मोठा इसम आहे. .... डच लोक पोर्तुगीजांच्या विरुद्ध दरबारांत खटपट करण्याकरितां त्याला दरसाल १००० पौंड देतात ! ... तो ब्राह्मण म्हणून हात दाखविण्यास चुकणार नाहीं !

शि. सा. ले. १४३
सु. १०६० रम. १४ हि १०७० } फर्मान (मारांतर) (८२०)

{ श. १५८२ अ. ज्येष्ठ शु.१५
{ इ. १६६० मे १४

अली आदिलशाहा———— आमील व देसाई ( कोल्हापूर )

परगण्याचा देशकुलकर्णी याचा निर्वंश झाला असें खोटें सांगून अंबरकरानें कुलकर्णांची मिरास करून घेतली होती ती रद्द केली आहे.

इं. फॅ. १०
पृ. ३७७ इ. }

(८२१)

{ श. १५८२ ज्येष्ठ शु. २
{ इ. १६६० मे ३०

कोल्हापूर ( रेव्हिं० टेलर, गारवे )—— राजापूरः- तुमचें १९ मेचें पत्र पावलें. रुस्तुमजमाच्या माहालदारांना दारूगोळा दिला नाहीं हें चांगलें केलें. सिद्दीजोहरसाठीं म्हणून घेऊन त्याला तो पोंचवूं नये, अशाकरितां त्यांची ती युक्ति होती ! ...इंग्रज त्याच्या नोकरांच्या वागणुकीला विटून गेले आहेत; यांचें रुस्तुमजमाला फार वाईट वाटत आहे. आपले दोन भाऊ व जांवई यांचेकडून रेव्हिं. चें मन वळविण्याचा प्रयत्न तो करीत आहे. परंतु महत्त्वाच्या गोष्टींची घडामोड चालू असतांना याच्यावर विश्वास कसा ठेवावा हा प्रश्नच आहे. तसें नसतें तर सिद्दी जोहरचें नांव सांगून गोळे घेऊन जाण्याचा बहाणा त्यानें कां करावा ? शिवाय रेव्हिं. नें राजापूरला परत जावें अशी त्याची इच्छा दिसते. या वेळीं तर सर्व व्यापारी देशांत जात असतात !

इं. फॅ. १०
पृ. ३७७ इ. }

(८२२)
कोल्हापूर-फोर्ट सेंट जॉर्ज

{ श. १५८२ ज्येष्ठ शु.७
{ इ. १६६० जून ५

पन्हाळ्याला पक्का वेढा पडला असून त्यांत राणीचा महाशत्रु शिवाजी पांच सहा हजार लोकांसह अडकून पडला आहे. राणीचा सेनापति सलाबतखान यानें गोळे घेण्याचें वचन दिलें आहे. ह्या गोळ्यांनींच वेढ्यांत अडकलेल्यांना पुष्कळ त्रास होईल.

(इं. ऑफिस) डच रेकर्डस
हिंदुस्तानची पत्रें
इं. १६६०-६१ भा. २४
नं. DOLXIV

(८२३)

श. १५८२ ज्येष्ठ शु. १२
इं. १६६० जून १०

[हिंदी किनाऱ्यावरील कामगिरी (२७ जुलै १६५९ ते १० जून १६६० पर्यंत) बाबत कमँडर ॲड्रिअन स्ट्रल यानें गव्हर्नर जनरल व कौन्सिल यांना सादर केलेला अहवाल.]

विजापूरचे राज्यांत परिस्थिति थोडी सुधारली आहे. बंडखोर शिवाजीनें आपलें सैन्य राजधानीचे नजीक व वेंगुर्ल्याजवळ ( ३ तासाचे मुक्कामावर ) आणिलें होतें. परंतु कुडाळच्या देसायानें त्याला हाकून लाविलें आणि विजापुरकरांच्या व गोवळकोंडेकरांच्या संयुक्त सैन्यानें भयंकर रक्तपात करून त्याचा पराजय केला. आतां शांतता आहे.

इं. फॅ. १०
पु. ३७९ इ.

(८२४)
कोल्हापूर-सुरत

श. १५८२ ज्येष्ठ व. ३
इं. १६६० जून १५

शिवाजीच्या बंडामुळें अद्याप सर्वत्र अस्वस्थता आहे.

इं. फॅ. १०
पु. ३८० इ.

(८२५)
सुरत-कोल्हापूर

श. १५८२ आषाढ व. ४
इं. १६६० जुलै १६

रेव्हिंगटन आपल्या मालकीचा दारूगोळा खपावा म्हणून झटतो. कंपनीच्या मालाची काळजीच घेत नाहीं.

हेगसंग्रह डचपत्रव्यवहार
इ. न्यू

(८२६)
वेंगुर्ले-डच गव्ह. जनरल

श. १५८२ आषाढ व. ६
इं. १६६० जुलै १७

आम्ही मागलें पत्र रवाना केल्यानंतर विजापूरकरांच्या सैन्यानें पाठलाग केल्यामुळें शिवाजी (८ हजार शिपाई व ६० घोडेस्वार घेऊन) पन्हाळ्याच्या बळकट किल्ल्यांत शिरला; आणि बाकीचें सैन्य त्यानें जिंकलेल्या ठाण्यांच्या बंदोबस्तासाठीं ठिकठिकाणीं रवाना केलें. पावसाळा जवळ आल्यामुळें शिद्दी जोहाराला वेढा फार दिवस चालवितां येणार नाहीं असा शिवाजीचा अंदाज होता. पण हा त्याचा अंदाज चुकीचा ठरला; कारण सिद्दी जोहारानें बऱ्याच सैन्यानिशीं पावसाळ्यांत देखील वेढा चालू ठेवण्याचें ठरविलें व पावसाळी छपरेंहि बांधविलीं. किल्ल्यांत तंबाकू, मीठ वगैरे जिनसांचा तुटवडा असून पुष्कळ पैसा भरून अद्धि आदिलशाहाकडून माफी मिळविण्याची शिवाजी खटपट करीत आहे अशी लोकवार्ता आहे. तथापि अशी माफी देण्याचें नाकारण्यांत आलें. याकरितां थोड्या लोकांनिशीं किल्ल्यांतून निघून जावें असें शिवाजीनें योजलें, पण आंतल्या पठाणांनीं (शिपायांनीं ?) त्याला अडवून धरलें व शेवटचा मनुष्य जिवंत आहे तोंवर तुम्हां

येथें राहिलें पाहिजे असा आग्रह घरला. यामुळें त्यांची आपसांत पुष्कळ वाचावाची झाली. या सर्व गोष्टी लक्षांत घेतां या बंडखोराला विजापूरकरांच्या हस्तगत व्हावें लागेल असा समज आहे. इकडे शिवाजीच्या कांहीं धाडस्या सैन्यानें विजापुरापर्यंत धुमश्चक्री केली; व शिद्दी जोहाराला आपल्या सैन्यांतील कांहीं भाग दुसरीकडे पाठविण्याची आवश्यकता भासावी म्हणजे त्याच्या सैन्याची पांगापांग व्हावी यासाठीं देखील कांहीं प्रयत्न झाले; पण ते व्यर्थ गेले.

खं. २० ले. १०७
सु. १०६१ जिल्काद २० } (८२७) खुर्दखत फा. मज. व सी. { श. १५८२ आषाढ व. ८ इ. १६६० जुलै १९

१—वजानेब कारकून वाई:—माजी मोकाशी व मरहूम अफजलखान यांचीं खुर्दखतें आहेत. त्याप्रमाणें नारायणभट चित्राव यांचें उंब्रडें, पसणी व एकसंबे येथील इनाम चालवावें.

इं. फॅ. १०
पृ. ३८१ इ. } (८२८) सुरत-राजापूर वखारवाले { श. १५८२ श्रावण शु. ६ इ. १६६० ऑगष्ट २

रुस्तुमजमाला दारूगोळा विकत देण्याचें काय कारण होतें ? तो केवळ तावेदार होता. सर्व देशांत अंदाधुंदी माजून अनेकांची स्पर्धा असल्यानें कोणाला शेवटीं यश येईल ही गोष्ट अनिश्चितच होती. हिंदू असो किंवा मुसलमान असो कोणावरच विश्वास ठेवणें आम्हांस योग्य वाटलें नाहीं. याकरितां दुसरी एकादी संधी येईल त्याची वाट पहात राहिलों. रु. जमा तुमचा दोस्त असला तरी राणीनें त्याचा केव्हांच पराजय केला असता. त्याचें जमत नाहीं हें उघड आहे.

स. ले. २१ पृ. २५
सु. १०६१ जिल्हेज २५ } (८२९) खुर्दखत { श. १५८२ श्रावण व. ११ इ. १६६० आगस्ट २२

अजर. झुंजारराऊ—वजा. कार. व देशमु. तर्फ कार्वे प्रांत कन्हाड

घाटोजी राजे मोहिते यांच्या खुर्द. वरून चालू असलेली इटामिंडे येथील जमीन कमलनयन गोसावी (निंब) याजकडे चालविणें.

शि. सा. ले. २१७–२१८
सु. १०६१ स. } (८३०) वाटणीपत्र { श. १५८२ भाद्र. शु. १० इ. १६६० सप्टें. ४

कान्होजी जेधे यानें आपल्या समोर मुलांना वाटण्या करून दिल्या. बाजी सर्जाराऊ देशाई नायकिणीस दिला. पुढें देशाईस संभाजी मुलगा जाला. तेव्हां बाजी सर्जाराऊ यानें नेमाप्रमाणें संभाजीस वाटणी दिली व संभाजीनें बाजी सर्जारावाचे पाटीशीं असावें असें ठरविलें.

शि. प. सा. सं. १३

हेग दूंसाकेरस् इ.न्यू.
बी. फोलिओ मा. २६

(८३१)

श. १५८२ माद. शु. ११
इ. १६६० सप्टें. ५

रघ वाक्नीस येंगुर्ले ———— गव्ह. हेग!

गेल्या म्हणजे आगष्ट महिन्याच्या १४ व्या तारखेस (=ओ. स्टा. आगष्ट ४ श्रावण शु. ८) कृष्णा ये या व्यापाऱ्याकडे पन्हाळ्याखालील सैन्यांतून पत्र आलें आहे. त्यांत लिहिलें आहे कीं, "बंडखोर शिवाजीनें आपला गंगाधर नांवाचा एक वकील विजापुरी सेनापति सलाबत याजकडे पाठविला असून मागणी केली आहे कीं, आपण केलेले सर्व मोठे गुन्हे जर माफ होतील व सलाबतखान कोणत्याहि संकटापासून वडीलपणें आपलें संरक्षण करील तर आपण जातीनें सलाबतखानास भेटूं व आपली सर्व मालमत्ता बादशहाच्या नांवानें त्याच्या स्वाधीन करूं. त्याच पत्रीं आणखी असेंहि लिहिलें आहे कीं, दुसऱ्या दिवशीं रात्रीं चंद्र दिसत नसतां (When the moon was dark), मुसळधार पाऊस व वादळ सुरू असतां वरील बंडखोर (शिवाजी) आपल्या बरोबर १००० शिपाई, १५ उमदे घोडे, २ पालख्या व कांहीं खजिना घेऊन पळाला. ही बातमी थोड्याच दिवसांत विजापूरच्या सैन्यांत पसरली. त्याबरोबर उद्विग्न झालेल्या सलाबतखानानें तावडतोब २००० स्वार व १००० पायदळ त्याला गांठण्यासाठीं पाठविलें. हेरांकडून ही बातमी ज्या वेळीं शिवाजीस समजली तेव्हां तो एकदम खेळणा (Helna) नांवाच्या आपल्या एका किल्ल्यांत गेला; व त्यानें आपल्या जवळचे लोक रस्त्यावरील दाट झाडींत ठेविले व पाठलाग करणाऱ्या शत्रूस त्या रस्त्यानें येऊं न देण्याविषयीं त्यांना आज्ञा केली. एवढेंच नव्हे तर शक्य असल्यास तोंड देऊन पराभूत करण्यासहि सांगितलें. त्यांनीं शिवाजीच्या हुकुमाप्रमाणें शत्रूवर शौर्यानें जोराचा हल्ला चढविला. आपली विशेष हानी होऊं न देतां त्यांनीं शत्रुसैन्याच्या बऱ्याच मोठ्या भागाचा निःपात केला. कांहींस कैद केलें व बाकीच्यांस पळावयास लाविलें आणि धैर्यानें त्यांचा पाठलागहि केला. नंतर सलाबतखानाचे कांहीं लोकांनीं आपल्या ताब्यांतील दुसऱ्या एका मार्गानें जाऊन लढाई केली, जय मिळविला व कांहीं लूटहि मिळविली. यामुळें बंडखोरानें पळ काढिला. याच वेळीं शिवाजीनें आपल्या सैन्याचे दोन भाग केले व स्वतःच्या बचावाकरितां एका पालखींत शिवाजी नांवाच्या आपल्या एका न्हाव्यास बसवून ती पालखी नेहमींच्या लवाजम्यासुद्धां नेहमींच्या रस्त्यानें पाठविली व स्वतः दुसऱ्या पालखींत बसून दुसऱ्या जास्त अवघड रस्त्यानें निघाला. शत्रूनें पहिली पालखी चांदण्यांत सहज पकडली व गोटांत आणली. यामुळें सर्व राज्यांत 'शिवाजीस सलाबतानें कैद केल्याची' बातमी पसरली व बादशहाच्या बाजूकडील लोकांस अत्यानंद झाला. पण ज्या वेळीं शिवाजीचा कावा लक्षांत आला त्या वेळीं सर्वांचा आनंद नाहींसा झाला. एवढ्या अवधींत बंडखोर शिवाजी पुरणदुर्ग (पुरंदर?) नांवाच्या आपल्या अत्यंत बळ-

कट किल्ल्याच्या आश्रयास गेला व तेथून त्यानें निरनिराळ्या किल्ल्यांवर विशेषतः पन्हाळ्यास शिपाई व सामुग्री पाठविली. प्रत्येक गोष्ट त्याच्या मताप्रमाणें होत आहे. थोडक्याच दिवसांनंतर अशी बातमी आली कीं **रुस्तुमजमा हा शिवाजी व विजापूरदरबार यांमध्यें सल्ला घडवून आणण्याची खटपट करीत** असून त्यास इतकें यश आलें कीं, बादशाह ( वृद्ध राणीसह ) तहासाठीं विजापुराहून **मिरजेच्या** किल्ल्यास आला आहे. लोकवार्ता अशी आहे कीं, रुस्तुमजमा यास **सेनापतीची पदवी** देण्यांत आली. तो बादशहाचा वकील शहासाहेब यासह हुकेरीहून सैन्याकडे जाण्यास निघाला आहे व तेथून तो मिरजेस दरबारीं भेटण्यास जाणार आहे. संधी येतांच आम्ही तुम्हांस यापुढें होईल तें कळवूं.

| सा. ले. २६८<br>सु. १०६१ मोहर २० | (८३२)<br>खुर्दखत फा. सु. व सी. | श. १५८२ माद्र व. ८<br>इ. १६६० सप्टें. १६ |
|---|---|---|

अजर. खंडोजी राजे व बाजी राजे, व हंसाजी राजे, व कृष्णाजी राजे घोरपडे वजा. कार. व देसाई पर. सिरवळ.

लिंगोजी बापूजी देसकु. यास मौ. नायगाऊ येथें एक चावर जमीन इनाम चालवावी. (शिक्काः—हंसाजी बाजी नाईक घोरपडे आदिलशाही.)

| खं. २० ले. १०८<br>सु. १०६१ सफर १५ | (८३३)<br>खुर्दखत फा. सु. मज. व सी. | श. १५८२ आश्विन व.२<br>इ. १६६० आक्टो. १० |
|---|---|---|

१—वजा. कार. व देसमु. पर. वाईः—पूर्वींचे मोकाशी व मरहूम अफजलखान यांच्या खुर्द.प्रमाणें अमणभट क्षीरसागर यास एकंदरे येथील इनाम जमीन चालू ठेवावी. इल्लीं पर. मोकासा मिळाला.

| खं. १५ ले. १७<br>सु. १०६१ सफर२७ | (८३४)<br>खुर्दखत सी. | श. १५८२ आश्विन व. १४<br>इ १६६० आक्टो. २२ |
|---|---|---|

अजर. अंबाजी राजे घोरपडे—हुदे. व मोक. मौ. चिंचणेर किले तायोडे कमलनयनगिरी सदानंद मठ निंब यास धर्मादाऊ गल्ला चालू ठेवणें.

| फरा. सला. पृ. २२४ सु. १०६१<br>सफर २८ हि. १०७१ | (८३५)<br>फर्मान | श. १५८२ आश्वीन व. ३०<br>इ. १६६० आक्टो.२३ |
|---|---|---|

बादशाहा-बजानीब देसाई परगणे तावरगिरीः—शरजाखान यानें नबाब अबदुल रहीम बहलूलखान याचा मुलुख घेतला आहे. तरी तुम्ही नबाबाच्या मुताळिकाना मदत करावी आणि चंडखोराचें शासन करावें.

ई. ऑफिस डच रेकर्डस
हिंदुस्थानचीं पत्रें १६५९-६०
मा. २३ नं. DCLI इ. न्यू.

(८३६)

श. १५८२ मार्ग. शु. १५
इ. १६६० डिसें. ६

गव्हर्नर जनरल अँन्ड कौंसिल—डच ई. इं. कंपनीचे चालक.

गेल्या वर्षी विजापुरांत पुष्कळ धामधूम झाली. राणीच्या खराब कारभारामुळें आणि जुलमामुळें तिची प्रजा बंड करून उठली. सांप्रती एक बंडखोर शिवाजी इतका यशस्वी झाला आहे कीं, अनेक किल्ले व शहरें त्याच्या ताब्यांत गेलीं आणि त्याचें सैन्य विजापूरच्या आसमंताला येऊन भिडलें. तेथून त्याला परतावें लागलें असें ऐकितों.

खं. ८ ले. ११
सु. १०६१ रवार २४

(८३७)
सरंजामी वट हुकूम

श. १५८२ मार्ग. व. ११
इ. १६६० डिसें. १८

पुणें व इंदापूर व चाकण सुपें यारामतीं ऐसे इनाम हिंदू व मुसलमान यांसी आहेत. त्यास पेसजी आपणास (शिवाजीस) मुकासा असतां अफजलखाना आधीं जेणेंप्रमाणें तसलमती ज्यास जें पावत असेल त्यास तेणेंप्रमाणें देणें. ऐसा तह केला असे. मोर्तब सूद (मर्यादेयं इ.)

स. २ पृ. ७८
सु. १०६१ जखर ७

(८३८)
खुर्दखत न. फा. मु. व सी.

श. १५८२ माघ शु. ९
इ. १६६१ जाने. २८

अजर. सैद सादात सैद अशाफ इवाल. को मीउ गव्हाण–हा मानजी हरी हुदे. व देसा. व कुळ. व खोत गावचे:——कृष्ण व नार विन गोविंद माहाजनी यांस तर्फेचेदल मिठागर इनाम दिलें आहे.

हाग रजिस्टर १६६१
पृ. ४१-४२ फेब्रु. १७ इ. न्यू.

(८३९)

श. १५८२ माघ व. ३
इ. १६६१ फे. ७

अशी बातमी आली आहे कीं मदुरा व तंजावर येथील नायक व लिंगम नायक यांनीं विजापूरचे बंडखोर सरदार शहाजी व अंतोजी पंतलू यांच्याशीं (परचक्राविरुद्ध परस्परांनीं परस्परांस साहाय्य करावें असा) तह केला. यामुळें तंजावरचा नायक आतां अधिकच आग्रह धरूं शकेल. आणखीहि अशी बातमी आहे कीं उपरिनिर्दिष्ट शहाजीचा मुलगा बंडखोर शिवाजी (याच्याबद्दल गेल्या वर्षाच्या वेंगुर्ल्याच्या वृत्तांतांत पुष्कळच लिहिलेलें आहे) यानें विजापूरच्या आसमंतात सेनापती मुल्ला महमद व दोन सरदार बाबुलखान (बहलोलखान) आणि अजापा नायक यांचा पराजय करून निदान २००० घोडेस्वार कैद केले ............शहाजीच्या लोकांनीं इ. स. १६६० डिसें. २५ ( ओल्ड स्टा. डिसें. १५ )रोजीं तेगनापट्टनला वेढा घातला. त्यामुळें कंपनीचा व्यापार बसला.

शि. प्र. पृ. ८४ ले. २ }
सु. १०६१ जखर २१ } खुर्दखत फा. मु. व सी. (८४०) { श. १५८२ माघ व. ७
{ इ. १६६१ फेब्रु. ११

अजर. **फाजिल अफलखान** महमदशाही–ता कृष्णगौडा देसाई पर. तेरदल दलपतराऊ सर हवाल. व मुगी गौडा यांनीं लिहिलें कीं सालगुदस्ता **सिवाजीची** फितरत होउनु घोडा राऊत तहद रायेबाग व अडगल पावेतों काबीज केलें. मौ. हरोंगरा पावेतों घोडा राऊत **जाधवराऊ** आले. त्यास घोडा राऊत हसम मोवलग खर्च करून कर्जदार होऊन पर. मज. काबीज होऊं नेदीता लडाई केली. यावदल मुगळखोड इनाम तुझे घर व जिणजितरब लुटिले गेले. यावद्दल मुगळखोडची नायकी दिली. साल मजा विलायती पीक नसता लष्कर पायमल्ली झाली. गनिमाचे गलबलेकरितां विलायत खराब जाली. तरीहि तू कोशीं केलीस यावदल गावगना दर चावरी दोन होन दिल्हे असेती. साल गुदस्त **सिवाजीचे** फितरतीकरितां नाडगिरास तकवा दिल्हा की तुम्ही आम्ही मिलोन गनिमास मारू. यावदल नाडगिरास दर गावी पाव चावर पडी पैकी दिल्हा आहे.

सा. ले. ४८ }
१ } (८४१) { श. १५८२
{ इ. १६६०-६१

गोरखोजी दिनकरराऊ काकडे सुभे.—मल्हारजी देसाई पा सिरवल

अतोजी निगडा यानें मानजी कुळ. मौ. निवूंत व गुळचे यांसि **भुताकरितां जीवें मारिला**. आतां आतोजी व आम्हास **दावा लागला** आहे. **सूड** व धीताहि घेऊं.

शि. च. ले. ३७८ }
सु. १०६१ } मिसेली फा. मु. मज. सी. (८४२) { श. १५८२
{ इ. १६६०–६१

१——रजा. कार. कसबे वांगीः–कस. मज. चे देसमुखी संकराजी राजे व नेतोजी राजे व दिपाजी राजे मोहिते यांची असे.

कों. इ. सा. ले. ९२ }
१ } (८४३) उल्लेख { श. १५८२-८३
{ इ. १६६०-६१

**सिवाजीनें** प्रभावलीकर **दळवीराजे** व **सूर्याजी** यासी मारून चालविले. श्रीगारपुराहून ते लखम सावंता...सीं आले सन इहिदेमधे. जागा चराठियेस करून होते इसनेमधे. इतबार सुभा करून आला तो यक मास होता. तोहि विजापुरी गेला, नांदला नाहीं. देसायांची त्याची भेट जाहली.

· फॅ. ११ }
r. १८ इ. }

(८४४)
कमेटी-एरत.

{ श. १५८३ चैत्र शु. ७
{ इ. १६६१ मार्च २७

सुरत, राजापूर, कारवार, व केलवेला येथील वखारी चालू ठेवाव्या. ...दंडा-राजपूर अगर किनाऱ्याची एकादी जागा घेण्याबद्दल कितपत यश आलें तें कळवावें.

डाग रजिस्टर १६६१ }
पृ. ९६-९७ एप्रिल १० इ. न्यू. }

(८४५)

{ श. १५८३ वैशाख शु. २
{ इ. १६६१ एप्रिल २०

विजापूरच्या राज्यांतील यादवीमुळें झालेली हानि (जखमा) अद्यापि भरून आलेली नाहीं. पन्हाळ्याविरुद्ध मोठें सैन्य घेऊन विजापूरचा सुलतान आला. त्यानें महाबंडखोर शिवाजीशीं सलोखा केला आहे. परंतु जोहर सलावत-खानानें बंड उभारून आपण विजापूरचे हस्तक नसून मोंगलाचे सरदार आहों असें जाहीर केलें आहे ! या जोहरला वेंगुर्ला आदिकरून विजापूरच्या राज्यांतील सर्व सधन प्रांत बहाल करून व बहुतेक सैन्य बरोबर देऊन, सुलतानानें कानडाच्या वें-(क)टापा नायकाशीं युद्ध करण्यासाठीं किंवा जमल्यास मोठी खंडणी वसूल करण्या-साठीं पाठविलें होतें. (कानडयाकडे जात असतांना) वाटेंत त्याचा विचार बदलला व तो विजापुरापासून १४ मैलांवर रकसी-तगडीकडे माघारी आला (आणि तेथें त्यानें वरीलप्रमाणें बंड उभारलें). विजापूरचें सर्व झेंडे व निशाणें नष्ट करून त्यानें त्यांचे-बदली मोंगली तऱ्हेचीं तयार करविलीं.

वेंगुर्ल्याचा हवालदार बदलून त्यानें मिर्झा फत्ते मलक या नांवाचा नवीन हवालदार पाठविला. तो वेंगुर्ल्याला ५ नोवेंबरला(ओल्ड) येऊन पोंचला. परंतु एक-क्षणांत पळून जाण्याची त्यानें तयारी ठेविली होती. कारण सलाबतखानाच्या या बदल लेल्या धोरणामुळें फिरून खवासखानाला हा गांव (वेंगुर्लें) बहाल होण्याचा संभव होता. जानेवारी महिन्यांत विजापूर सोडून इराणांत जावयाचें असल्यामुळें आपल्याकरितां एक गलबत तयार ठेवावें म्हणून आमच्याकडे बड्या साहेबिणीनें कळविलें होतें. परंतु सेनापती रोटेस यानें ती गोष्ट नाकारली. आणि राणीनें ही मागणी तितकी मनापासून केलीच नव्हती असें नंतर समजलें.

डाग रजिस्टर १६६१ }
पृ. १२६-१२७ मे १६ इ. न्यू. }

(८४६)

{ श. १५८३ वैशाख व. २
{ इ. १६६१ मे ६

मदुरा व तंजावरचे नायक आणि विजापूरचे सरदार शहाजी व अंतोजी पंतोले आणि लिंगमनायक यांनीं संरक्षक आणि आक्रमक (offensive) असा उभयविध तह केला आहे; ही गोष्ट थोडी काळजी करण्यासारखी आहे; आणि त्यामुळें मच्छलीपट्टणला जाण्याचें गव्हर्नरानें टाळलें. पण त्यानंतर लगेच हा तह मोडला असून शहाजीवर

हल्ला करण्याचें, नायकांनी आपसांत गुप्तपणें ठरविलें असेंहि गव्हर्नरास कळलें. मध्यतरीं तंजावरच्या राज्यांत अव्यवस्था माजली.......देन्स लोकांपासून ते खंडणी घेणार... तेगनापट्टणलाहि त्रास देणार...बंदोबस्त चालू आहे. गव्ह. पिटचे पत्रावरून दुसरें असें कळतें कीं, पत्र बंद करण्याचें पूर्वी थोडे दिवस शहाजीचे लोकांनीं कर्नूलचे लोकांपासून १७०० पार्डोचीं (झेराफिन्) लूट नेली......तेगनापट्टणशीं युद्ध होऊन ४ फेब्रुवारीला (न्यू.) किल्ला शहाजीच्या हवालीं झाला. तेव्हां आतां तेगनापट्टण व कंपनीची फक्तेरी हीं शहाजीचे ताब्यांत गेलीं आहेत. त्यामुळें काळजी उत्पन्न झाली आहे.... [ १२ झेराफिन् = १० रुपये. इं. फॅ. भा. १३ पृ. ५२ टीप ]

खं २० ले. २४५ } (८४७) { श. १५८३ ज्येष्ठ व. १
सु. १०६२ सवाल १५ } खुर्देखत (फा. मु सिदी हिलाल { इ. १६६१ जून ३
याची व सी.)

अजर० सिदी अजम सिदी हिलाल—— कार. व देसमु. पा. सुपे.

गणो तिमाजी हुनारदार हे कारीस जातेवेळीं माहादाजी गोसावी सो मोरेश्वर यास आपला वांटा देऊन गेले, तरी तो त्यांजकडे चालविणें. रा गणेश पंडित.

ऑ. मॅ. भा. १५५ पृ. १-२१ } (८४८) { श. १५८३ ज्येष्ठ व. ८
इं. फॅ. ११ पृ. ५-११ इ. } { इ. १६६१ जून १०

(रेव्हिंगटन, टेलर्स, गिफर्ड) सोनगड-सुरत

तुमचें २ मेचें पत्र सोनगडावर ८ जूनला पोंचलें...या पूर्वी खारेपाट्याहून आमचें पत्र पाठविलें होतें....आमच्या सूचनेप्रमाणें आमच्या सुटकेची खटपट करावी:—

गेल्या वर्षी दंडाराजपूर किल्ला घेण्याबद्दल खुद शिवाजीजवळ बोलणें झालें तें त्याचा नोकर दौरोजी याचे मध्यस्थीनेंच झालें. शिदीकडून तो किल्ला घेतां आला असता तर आसपासचा सर्व मुलूख शिवाजीला मिळाल्यामुळें शिवाजीकडून द्रव्य किंवा बंदरें वाटेल तशीं मिळालीं असतीं. आम्ही कैदेंत असतांना राजापूरचा त्याचा ब्राह्मण मीठचंदर आमचे स्वाधीन करण्याचें बोलला. आम्हांला पकडून ठेवून लुटल्यामुळें आतां आम्हांला बंदराची इच्छा नसल्याचें आम्हीं सांगितलें, आणि 'आमचें स्वातंत्र्य आम्हांला मिळाल्याशिवाय आम्ही काय बोलावें ?' असें म्हटलें. त्यावर त्यानें आमच्या सुटकेची खंडणी नेमून आम्हांला खारेपाट्यावर पाठविलें. आतां या अत्याचाराचें कारण काय सांगणार ? याच तन्हेनें तो बनिये, मूर्स, इराणी, अरबी लोक यांना लुबाडून कोंडून पैशाकरितां मारही देतो ! येथें परदेशस्थ गलबतांवरून धरून आणलेले शूर इराणी व अरबी लोक आमच्यापेक्षां तीव्रतर कष्ट सहन करीत आहेत. आमचेकडून दंडाराजपूरीचे बाबतींत त्याला मदत पाहिजे आहे आणि त्याबद्दल आम्ही कांहींतरी करावें या करितांच

फॅ. ११
१८ इ.
(८४४)
कमेटी-सुरत.
श. १५८३ चैत्र शु. ७
इ. १६६१ मार्च २७

सुरत, राजापूर, कारवार, व कैलवेला येथील वखारी चालू ठेवाव्या. ...दंडा-राजपूर अगर किनाऱ्याची एकादी जागा घेण्याबद्दल शिवाजीशीं बोलणें चालू आहे, परंतु तें स्वीकारील व त्याबद्दल यश आलें तें कळवावें.

डाग रजिस्टर १६६१
पृ. ९६-९७ एप्रिल २० इ. न्यू.
(८४५)
श. १५८३ वैशाख शु. २
इ. १६६१ एप्रिल २०

विजापूरच्या राज्यांतील यादवीमुळें झालेली हानि (जखमा) अद्यापि भरून आलेली नाहीं. पन्हाळ्याविरुद्ध मोठें सैन्य घेऊन विजापूरचा सुल्तान आला. त्यानें महत्वाकांक्षी शिवाजीशीं सलोखा केला आहे. परंतु जोहर सलाबत-खानानें बंड उभारून आपण विजापूरचे इस्तक नसून मोंगलाचे सरदार आहों असें जाहीर केलें आहे! या जोहरला वेंगुर्ला आदिकरून विजापूरच्या राज्यांतील सर्व सधन प्रांत बहाल करून व बहुतेक सैन्य बरोबर देऊन, सुलतानानें कानडाच्या वें-(क)टापा नायकाशीं युद्ध करण्यासाठीं किंवा जमल्यास मोठी खंडणी वसूल करण्या-साठीं पाठविलें होतें. (कानडयाकडे जात असतांना) वाटेंत त्याचा विचार बदलला व तो विजापुरापासून १४ मैलांवर रकसी-तंगडीकडे माघारी आला (आणि तेथें त्यानें वरीलप्रमाणें बंड उभारलें). विजापूरचें सर्व झेंडे व निशाणें नष्ट करून त्यानें त्यांचे-बदली मोंगली तऱ्हेचीं तयार करविलीं.

वेंगुर्ल्याचा हवालदार बदलून त्यानें मिर्झा फत्ते मलक या नांवाचा नवीन हवालदार पाठविला. तो वेंगुर्ल्याला ५ नोवेंबरला(ओल्ड) येऊन पोंचला. परंतु एक-क्षणांत पळून जाण्याची त्यानें तयारी ठेविली होती. कारण सलाबतखानाच्या या बदल लेल्या धोरणामुळें फिरून खवासखानाला हा गांव (वेंगुर्ले) बहाल होण्याचा संभव होता. जानेवारी महिन्यांत विजापूर सोडून इराणात जावयाचें असल्यामुळें आपल्याकरितां एक गलबत तयार ठेवावें म्हणून आमच्याकडे बड्या साहेबिणीनें कळविलें होतें. परंतु सेनापती रोठेस यानें ती गोष्ट नाकारली. आणि राणीनें ही मागणी तितकी मनापासून केलीच नव्हती असें नंतर समजलें.

डाग रजिस्टर १६६१
पृ. १२६-१२७ मे १६ इ. न्यू.
(८४६)
श. १५८३ वैशाख व. २
इ. १६६१ मे ६

मदुरा व तंजावरचे नायक आणि विजापूरचे सरदार शहाजी व अंतोजी पंतोले आणि लिंगमनायक यांनीं संरक्षक आणि आक्रमक (offensive) असा उभयविध तह केला आहे; ही गोष्ट थोडी काळजी करण्यासारखी आहे; आणि त्याचमुळें मच्छलीपट्टणला जाण्याचें गव्हर्नरानें टाळलें. पण त्यानंतर लगेच हा तह मोडला असून शहाजीवर

आम्हीं कैद्यांस सोडण्याबद्दल १००० होनांपेक्षां अधिक खंडणी कबूल करूं नका...आम्हीं अधिक कबूल केलें असें कोणीं सांगितलें तरी विश्वास ठेवूं नका...दंडाराजपुरीबद्दल बोलणें करणें माझ्यावर सोंपवा.

आम्हीं दारूगोळा दंडाराजपुरीच्या सिद्दीला दिला नाहीं, परंतु विजापूरचा सेनापती सिद्दी जोहरला दिला. जोहरच्या ताब्यांत खारेपाटण व बेटहि असून तो आतां स्वतःच्या देशाकडे गेला आहे. आमच्या जासुदाला वाटेंत रुस्तुमजमा भेटला होता. तो म्हणाला कीं 'राजापूर सोडून जाण्याबद्दल त्यानें मला तीन पत्रें पाठविली !' यावरून शिवाजीचा बेत त्याला माहीत होता असें दिसतें. पण तो अगदीं खोटें बोलतो... आमचा एक पहारेकरी शिवाजीकडे गेला आहे.

आमच्या सुटकेची तजवीज प्रथम करा...चौलचा पोर्तुगीज अधिकारी साहाय्य देण्यास तयार नाहीं...छळामुळें एका व्यापाऱ्याला खेळण्यास मृत्यू आला...

आतां राणी परदेशीं गेल्यामुळें (घालवून दिल्यामुळें) पुष्कळ उमराव या प्रांतांत लुटालूट करितात. लेकवळा सुलतान नांवापुरता आहे. कारण दुसरा कोणता बसवावा हें सुचत नाहीं. दरवेश नांवाचा वारस होता त्याला शाहिस्तेखानानें शिवाजीच्या एका किल्ल्यांतून आपल्या ताब्यांत घेतला आहे.

आग्र्याहून सैन्य येत आहे असें आम्ही ऐकतों. शिवाजी तोंड देण्याची तयारी करीत आहे. नुकतेंच दळवी राजा (!) आणि शृंगारपूरचा राजा अशा दोघांचा मोड करून शिवाजीनें आपल्या ताब्यांतील मुलूख वाढवून चांगला बंदोबस्त केला आहे. या योगानें दंडाराजपूर किल्ल्यापासून तों खारेपाटणपर्यंत सर्व किनाऱ्यावर त्याचा ताबा झाला आहे. लवकर गोव्याला त्याची हद्द मिळून प्रत्यक्ष गोव्यालाहि धोका येणार आहे....

राजापूरच्या लुटींत कंपनीचें व आमचे मिळून १२००० पॅगोडाचें नुकसान झालें आहे.

ब्राह्मणानें आम्हांला पैशाबद्दल विचारलें... आम्हीं साफ नाकारलें. तेव्हां शिवाजीकरितां तुम्ही काय करितां म्हणून त्यानें विचारल्यावर आम्ही दंडाराजपुरीबद्दल बोललों....इंग्रजांना त्यानें दारूगोळा देऊं केलें....दंडाराजपुरी घेण्यास इंग्रजांनीं मदत केली तरी शेवटचा हल्ला शिवाजीनेंच करावा म्हणजे इंग्रज किंवा आपणच घेतील, ही भीति बाळगण्याचें कारण नाहीं....दंडाराजपुरी घेण्याबद्दल औरंगजेब इंग्रजांना तीन लाख रुपये देण्यास तयार आहे असें रेव्हिंग्टननें सांगितलें. २ दिवसांनीं शिवाजी महाडला आला. दोन दिवस राहून तेथील कैद्यांना त्यानें रावजी पंडिताच्या स्वाधीन केलें आहे. आतां तो कल्याण भिवंडीकडे आहे. नुकतेंच मोंगलांनीं कल्याण भिवंडी घेतली

तर हें खंडणीचें द्रमणें आहे. त्या (शिवाजी) शीं म्हणून खालीलप्रमाणें बोलणें करावें–

(१) राजापुरास धरलेले कैदी सोडून नेलेल्या लुटीची भरपाई करावी. निदान कैदी सोडावे.

(२) दंडाराजपुरी येथें इंग्रजांची गलबतें लागतील त्यांचा खर्च शिवाजीनें द्यावा. खर्चाबद्दल शिवाजीनें चौकशी न केली तर प्रसंग येईल त्याप्रमाणें तो देऊ करील त्याहून थोडा अधिक मागून त्याला नकार देतां येईल ! शिवाजीनें विचारलेंच तर चार गलबतांपैकीं प्रत्येकाबद्दल १०००० होन खर्चाचे सांगावे. हें ठरल्यावर सर्व रकम एकदम आगाऊच मागितली म्हणजे हेंहि बोलणें टांसळण्यास वेळ लागणार नाहीं !

(३) सोईचें बंदर कंपनीला देऊन आपलें सामान व मजूर लावून इंग्रजांना तेथें किल्ला बांधूं द्यावा.

(४) त्या बंदराचें अर्धे उत्पन्न इंग्रजांना मिळून शिवाय त्यांचा आयात व निर्यात माल करमुक्त यावा जावा.

(५) रुप्याचें नाणें पाडण्याकरितां बंदरांत एक टांकसाळ काढूं द्यावी. आणि मलबाऱ्यांना हाताशीं धरूं नये. ( राजापूरला असतांना 'आपण मलबारी असून आपल्या हाताखालीं मलबारी आणणारच' असें शिवाजी म्हणे ! ) ही अट अवश्य घालावी.

(६) सोरा बिनहरकत खरेदी करण्यास परवानगी असावी.

(७) बंदरांत वखारीकरितां एक इमारत द्यावी.

या तपशिलासह गौरवून पत्र लिहून रेव्हिंग्टन व इतरांबद्दल सामोपचाराच्या गोष्टी लिहून रदबदली करावी...तो कैदी सोडायला तयार नसेल तर आमच्याकडून काडी-चीहि मदत होणार नाहीं......राजापूर सोडल्यानंतर शिवाजीला आम्हीं पाहिलें नाहीं. इतक्यांत शिवाजीनें पाठविल्यावरून रावजीपंडीत आमची जबानी घेण्याकरितां येणार आहे......आज आमच्या समोर एका मुसलमानाला फटके मारण्यांत आले. ... तेव्हां त्या ब्राह्मणाच्या कानावर जाण्याकरितां आम्हीं असें बोललों कीं, आमची सुटका न होईल तर औरंगजेबाचें सैन्य सुरतेहून दख्खनमध्यें आणण्यास आम्हीं मदत करूं. राणीच्या स्नेहाखातर आम्हीं आजपर्यंत असें केलें नसलें तरी आतां राणीला पदच्युत केल्यामुळें ती गेली आहे. आणि त्यामुळें त्याचा वचपा काढणें आम्हांला कठीण नाहीं ! या बोलण्यानें मात्र त्याला दहशत बसेल. हें बोलणें शाहिस्तेखानाशीं केलें तर शिवाजीचा नाश होण्यास [illegible]ळ लागणार नाहीं. शाहिस्तेखान पर्वताच्या पलीकडे येथून ७ गांव (४० कोस) अंत-रावर आहे. त्याला मुख्य **अडचण पर्वताखालीं कसें यावें हीच** आहे. परंतु ह्याबाबत आम्हीं कळवीपर्यंत कांहीं करूं नये....शिवाजी पेशाबद्दल लिहील तेव्हां

विकला. त्यांच्याजवळ पुष्कळसें कापड होतें त्याची विक्री न करितां त्यांनीं तें कर्जफेडी-करितां दिलें. **शिवाजीचें बंड मोडण्याकरितां विजापूरच्या सुलतानाला त्यांनीं युद्धोपयोगी दारूगोळा पुरविला.** त्याची किंमत अजून त्यांना मिळाली नाहीं. मात्र त्या कृत्याबद्दल **शिवाजी**कडून त्यांना फार त्रास सहन करावा लागला. **राणी** मक्केच्या यात्रेकरितां निघून जातांच **शिवाजीनें** पुनः डोकें वर काढिलें. आणि इंग्रजांनीं केलेल्या नुकसानीचें उट्टें काढण्याकरितां **मार्चच्या मध्याचे सुमारास** [श. १५८२ फाल्गुन वद्य पक्ष.] राजापुरावर १००० घोडदळ व ३००० पायदळ पाठविलें. ह्या सैन्यानें, शहराजवळ आल्यावर, तेथील रिवाजाप्रमाणें शहरांतील प्रमुख मंडळींना बोलावून आणून शहरांत प्रवेश केला व तेथील नागरिकांना तोशीस न देण्याचें वचन दिलें. ते भोळे लोक मनांत संशय न आणतां भेटीस आले. आपणहि ह्या स्वागतांत सामिल व्हावें म्हणून रेसि० रेव्हिंग्टन व दोन तीन इंग्रज त्यांच्याबरोबर गेले. लगेच त्या-सर्वांना पकडून त्यांचा छळ करून जिंदगी जप्त करण्यांत आली. रेव्हिंग्टन व त्याचे बरोबरचे लोकांना **शिवाजी**च्या एका किल्ल्यावर ( सोडनगड-कुलाबा ) ठेविलें. राजापुरांतील इंग्रजांनाहि कैद झाली व त्यांतील एक छळानें मृत्यु पावला. त्यांच्या वखारीची सर्वस्वीं नागवणूक करून पुरून ठेवलेला खजिना पहाण्याकरितां सर्व ठिकाणीं **जमीनहि** कुदळीनें **खणून** टाकिली. इराण व मस्कतचे व्यापारी आपला माल घेऊन दरसाल राजापूरला विक्री करण्याकरितां येतात व काम होतांच परत जातात त्यांचीहि लूट झाली. कोणा एका राजानें व कांहीं लोकांनीं विरोध करण्याची तयारी केली होती. परंतु ह्याच्या लुटीनें तृप्त झालेले **शिवाजीचे** लोक त्याच्या आधींच निघून गेले.

| | | |
|---|---|---|
| शि. च. ले. ६१<br>सु. १०६२ जिलकाद २५ | (८५३)<br>खुर्दखत | श. १५८३ आषाढ व. १२<br>इ. १६६१ जुलै १३ |

१— कार. व देस. पा कन्हाड

आपदेव कृष्णभट गिजरे यांचा कोणेगाव येथील इनाम अवदुला खान वगैरेंच्या खुर्दखताप्रमाणें चालविणें.

| | | |
|---|---|---|
| डाग रजिस्टर १६६१<br>पृ. ४४७-४८ न्यू. डिसेंबर ५ | (८५४)<br>उद्देश | श. १५८३ श्रावण शु. ३<br>इ. १६६१ जुलै २१(१९) |

वेंगुर्ल्याचें पत्र———

बंडखोर शिवाजी विजापूरचे मुलखावर पुनः स्वारी करण्याचा बेत करीत आहे. आणि लखम सावंत, मिळून जाऊन, पोर्तुगीजांनीं प्रसंग पडल्यास त्यांनीं आपल्याला बिनहरकत आश्रय द्यावा म्हणून त्यांचेशीं स्नेहाचें बोलणें लावीत आहे. याकरितां

आहे. या पावसाळ्यांत शिवाजी ती परत घेणार. नंतर त्याची आमची गांठ पडेल....उमरावांमध्येंच दुही आहे. विजापूर लुटलें जाईल असें वाटतें....शिवाजीचा एकच हेतु असेल तर तो. दंडाराजपूर घेण्याचा. त्याबद्दल उत्सुकतेनें बोलावें. कंपनीला तें आवडलें नाहीं तर मागाहून बोलणें फिरवावें....बेटें किल्ला स्वतःकरतां घ्यावयाचा म्हटलें तरी माणसें (शिपाई) लागतील. तीं शिवाजीशिवाय दुसरा कोण पुरवील ? वकिलानें पत्र शिवाजीच्या स्वतःच्या हातांत द्यावें. हे ब्राह्मण त्यांना वाटेल तो मजकूर त्या पत्राकडून वदवितात.

शा. ले. १५८
सु. १०६२ सवाल २३ } (८४९) मिसेली फा. मु. व सी. { श. १५८३ ज्येष्ठ व. १० इ. १६६१ जून ११

अज दि० पर० सुपे—— .ता मोक० का सुपे
गणो तिमाजी ( ले. ८३७ पहा. )

खं. २० ले. १०९
सु. १०६२ सवाल २५ } (८५०) कौलनामा फा. मज. { श. १५८३ ज्येष्ठ व. १२ इ. १६६१ जून १३

अज दि० पर० वाई—— ता अंतोजी बिन शंकराजी लष्करी चाकर.

पेसजी गनिमानी कोट वलकाविला होता त्यावर सिद्दी जोहार काबिजाती आले. सर सुन्हो वगैरे बरोवर तूहि त्यांना भेटलास. तुझे मशाकत पाहून तुला २ चावर जमीन इनाम दिल्ही. तलग मल्हाजी कृष्ण हवालदार मार्जी पर. मज. यास सुन्हाणखान गोरी यानें दस्त करून कोट बलकाविला. त्यावर पर. मज. हजरती साहेबाचे खासखेलीस मन्हामत जाहाले. सुन्हानखान कोट सोडून गेला. तुला जमीनीशिवाय गला व इतर हक दिल्हे. सेरणी दिल्ही नाहीस ती २५ होन घेतली. आतां मिरासी खाऊन सुखें असणें.

शि. प्र. पृ. १०५ ले. ३६
सु. १०६२ जिल्काद १ } (८५१) मिसेली फा. मु. व सी. { श. १५८३ आषाढ शु. ३ इ. १६६१ जून १९

?——ता सिलार नायक व मोक. मौ. नागठाणे तर्फे वाळवे

चौंडेस्वरीचे पहिले देऊळ संमट बांधीत आहे. पाटलानीं अडथळा करूं नये.

डाग रजिस्टर इ. १६६१
पृ. २१५-२१६ जुलै ११ इ.न्यू. } (८५२) { श. १५८३ आषाढ शु. १४ इ. १६६१ जुलै १

इमजांच्या विषयीं रेसिडेंट (वेंगुर्ल्याचा) असें लिहितो कीं, गेल्या पत्रापासून त्यांनीं विजापूरचे राज्यांत कांहीं खरेदी न करितां आयात केलेला माल मुख्यत्वेंकरून रोखीनें

स. पृ. २५ ले. २० हि. १०७१ } (८५८) { श. १५८३ श्रावण व.८
सु. १०६१ जिल्हेज २१ } फर्मान { इ. १६६१ आगष्ट ७

अली आदिलशहा—— हवाल. व कार. मामले महमदपूर

श्री शंकर भारती जगद्गुरु यास मौ. येपनहाल, उकळी मामले मज. येथें शृंगेरी व कुडगी मठाकरितां चालू ठेवणें.

सा. ले. ४९ } (८५९) { श. १५८३ आश्विन व. १०
सु. १०६२ व श्र. } महजर { इ. १६६१ आक्टोबर ७

गोंदजी बिन जाउजी मोकदम पाचपुता मौजे भवाली ( शिरवळ ) यानें **दुष्काळांत** पाटीलकीचा सहावी तकसीम सोमाजी आबाजी पाचपुता यास दिली. नंतर माहादाजी बहजोजी रणदिवे यानें राजश्री **राजे पालकर सरनोबत सुभेदार** याजपुढें 'भवालीची पाटेलगी आपली मिरासी' अशी तक्रार केली. चौकशीअंती पाचपुत्यांची पाटीलकी असें ठरलें. ( ले. ३८५ व ले. ६२९ ) पूर्वीचे कागद पाहून हा महजर करून दिला.

डाग रजिस्टर १६६१ } (८६०) { श. १५८३ आश्वीन व.११
पृ. ३२०-३२१ आक्टो. १८ न्यू. } कर्नाटकांत-शहाजी { इ. १६६१ आक्टोबर ८

**तंजावरचा नायक** राजधानींत थोडे दिवस राहून **मदुरा** येथील नायकाच्या आश्रयानें पुनः **त्रिचनापल्लीच्या** किल्ल्यांत गेला. तेथें या दोघांचा परस्पर तह झाला. जूनच्या अखेरीस लिंगमनायक ४० हजार पायदळ व २००० घोडेस्वार घेऊन पोर्टोनोव्होपासून २ मैलांवर सिलेंबोनल आला. तेथें राहून **शहाजी** प्रत्यहीं तंजावरच्या मुलखांत लूट करी. हत्यार उचलण्यापूर्वी शहाजीशीं बोलणें करण्याचा **नायकानें** प्रयत्न केला. परंतु किनान्याबद्दलचा त्याचा आग्रह पाहून त्याला त्यानें वरदेशांत रेटीत नेलें. अखेरीला **शहाजी** त्याच्या बिकट किल्ल्यांत जाऊन बसला. जिंजीचा **संबरखान** किंवा **त्याचा कारभारी अंतोजी पाटेले** यांनीं आणी किल्ला, शहाजीला त्यांतून काढून लाविल्याविल्यावर मदुरा नायकाला देण्याचें कबूल केलें आहे. तसें झालें म्हणजे विजापुरी मुसलमानांना जिंजी प्रांतांतून हांकून लावणें सोपें होईल. **शहाजीचा** पाठलाग चालू असल्यामुळें तेगनापट्टणचे किल्याकडे लिंगम नायकाला लक्ष देणें झालें नाहीं. तेगनापट्टण अद्यापि शहाजीचेच ताब्यांत आहे...ते घेण्याबद्दल प्रयत्न...रावळ कृष्णाप्पानायक शहाजीला मिळाला परंतु लगेच निघून गेला...शहाजी अंतर्देशांत पळाल्यामुळें तेगनापटणकडे व्यापारास तेजी आली. परंतु अतर्देशांत मंदावला....शहाजीनें पुरा गलबतावरील माल पकडला......**गोवळकोंडेकरांनीं** ४० लाख होन ( रुंगोडा ) खंडणीचे भरले, आतां तरी **मोंगलांशीं** त्याचा बेबनाव संपला किंवा नाहीं हें समजत नाहीं. लाहोर व चन्द्राणपूरचे रस्ते अजून व्यापाराकरितां हाशित झाले नाहींत.

गोव्याहून कोठारी या नांवाचा ब्राह्मण लखम सावंताकडे येऊन त्याच्याकडून पत्र व वकील बरोबर घेऊन परतला आहे. विजापुरांत यादवी वाढत असून परिस्थिति अशीच चालू राहिली तर विजापुराचा नाश जवळ आला आहे असें म्हटलें पाहिजे. रेव्हिंग्टन व त्याचे जोडीदार अजूनहि सोनगडावर (महाडचे वायव्येस ३ मैल) शिवाजीचे कैदेत आहेत. सलाबतखानानें त्यांच्या सुटकेचें बोलणें करण्याकरितां आपला एक वकील पाठविला; आणि खुद्द तो स्वतः मोठें सैन्य घेऊन बहलोलखानावर स्वारी करीत आहे. ...६ जुलैला इंग्रजांचें मोठें गलबत इराणांतून गोव्याचे बंदरांत आलें. [ जुलै २९ पहा इं. फॅ. ११ पृ. ५ ]

सं. २० ले. १११
सु. १०६२ जिल्हेज ७ (८५५) सुर्देसत फा. मु. व सी. श. १५८३ श्रावण शु. ८
इ. १६६१ जुलै २४

अजर. शर्जाखान सो—— कार. व देसमु. पर. वाई

हाली पर. चा मोकासा साहेबास मिळाला. नरसीभट चित्राव यांचें इनाम चालावें (ले. ७३३ प्रमाणें).

सं. २० ले. ११०
सु. १०६२ जिल्हेज १० (८५६) सुर्देसत फा. मु. व सी. श. १५८३ श्रावण शु. ११
इ. १६६१ जुलै २७

अजर. शर्जाखान सो—— कार. व देश. पर. वांई

साहेबास मोकासा मिळाला. नरसीहभट चित्राव याचे पसरणी इनाम चालावें.

शि. च. ले. २ व सर. ले. ४६
सु. १०६२ जिल्हेज १७ (८५७) मिसेली श. १५८३ श्रावण व. ३
इ. १६६१ आगष्ट ३

पिलाजी नीलकंठराव सुभेदार नामजाद

हवाल. कार. देश. दशपां. मोक. सेटि. माहा रया. महालानिहाय मामले प्रभावली

रंगो विन केसो नाईक यांनीं राजगड मुकामी साहेबास सांगितलें कीं, देशमुखीचें वतन आपले आपणाकडे चालत आहे. हाली तलकोकण साहेबास अर्जान जाइले. यावरी कौला प्रमाणे आपण खिजमतीस हजर राहिलो. दिवाणातून सारी वतनें अमानत जाहाली. साहेबी माम. मज. २००० लाहारी देण्याची सनद दिली पण कांहीं पावलें नाहीं. यामुळे सेवक हैरान आहे. साहेबी लारी २००० व मौ. कोलवेची इनामत दिल्ही. सनदहि दिल्ही. तरी वरीलप्रमाणें सरदेसाई यास देत जाणे.

सप्टेंबरपूर्वी) फिरून सुरु झाला आहे. आम्हीं (डच लोक) तटस्थ राहिल्याबद्दल शहाजीनें समाधान व्यक्त केलें.

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ. ११<br>पृ. ५१ | (८६४)<br>मद्रास-कंपनी. | श. १५८३ मार्ग. व. ३<br>इ. १६६१ नोव्हें. २८ |

पोर्टोनोव्होचे बंदरांत गलबतें नेण्याची कांहीं जरूर नाहीं. कारण **अदिलशाही सेनापती शहाजी** यानें शहराचा पुरा नाश केला असून व्यापाऱ्यांचेंहि नुकसान झालें आहे.

**मीरजुमलाचें** जहाज पकडण्यांत आमचा हात नाहीं....**मद्रासवर** शिबंदी अगदीं थोडी आहे. या वेळीं बेसावध राहून चालणार नाहीं. आसपास **१०० मैलांचे टापूंत निदान पांच सहा सैन्यें** वावरत आहेत!

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ. ११<br>पृ. ११ द. | (८६५)<br>सुरत-कंपनी | श. १५८३ मार्ग व. ११<br>इ. १६६१ डिसें. ७ |

**शिवाजीनें** रेव्हिंग्टन व आणखी सात इंग्रजांना सहा **महिनेपर्यंत** अटकेंत ठेविलें. ...मोठा दंड मागितला. अनेक विनंतिपत्रांना त्यानें दाद दिली नाहीं. शेवटी रेव्हिंग्टन आजारी पडल्यामुळें-वरें होतांच परत जाण्याचा करार करून-१७ ऑक्टो. ला येथें येऊन पोंचला....देश सर्व धामधुमींत आहे. एका बाजूला, हा बंडखोर व दुसऱ्या बाजूला सुलतान आणि कित्येक नासुष झालेले सरदार हे देशाचे वाभाडे काढींत आहेत. काय होईल हें परमेश्वर जाणे!

| | | |
|---|---|---|
| शि. प. ले ६०<br>सु. १०६२ जवल ९ | (८६६)<br>सुर्दसत फा. मु. प सी. | श. १५८३ पौष शु. १२<br>इ. १६६१ डिसें. २२ |

अजर० जाधवराऊ राजे— मजा. कार. पर. कन्हाड

**पर. साहेबास अर्जानी** आज्ञा. आपदे कृष्ण सुनारदार कोणेगाव याचें इनाम चालू ठेवावें.

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ. ११<br>पृ. १० इ. | (८६७)<br>सुरत-कंपनी. | श. १५८३ माघ शु. १<br>इ. १६६२ जाने. ११ |

राजापूरला कांहीं व्यापार नाहीं. सर्व देश रणक्षेत्र (रणक्षेत्र) झाला आहे. दख्खनचा (अदिलशाही) सुलतान औरंगजेबाशीं, आणि दख्खनमधील उमराव बंड करून स्वतःच्या सुलतानाशीं, एकमेकांशीं आणि औरंगजेबाशीं अशी ही लढत सुरु असतां त्याची झळ येथेंहि लवकरच लागेल अशी भीति वाटूं लागली आहे.

ई. फॅ. ११ } (८६१) { श. १५८३ कार्तिक शु. ६
पृ. ५० इ. } मद्रास–सुरत { इ. १६६१ आक्टो. १९

तुम्हांला सुरतेचे सुभेदारानें वेढिलें....एक गोष्ट सहन केली तर पुढें तो अधिक धीट होईल! इकडे **शहाजीकडून** आम्हांला तसाच त्रास पोंचतो. शहाजी, हा **विजापूरचा सेनापती (शिवाजी)** ज्यानें रेव्हिंगटनला अटक केली, त्याचा बाप. शहाजी गेल्या जुलैमध्यें **पोर्टोनोव्होला** लूट करून गेला....कंपनीचे नोकरांचें त्यांत ३० हजार पार्डो (पॅगोडा=होन)चें नुकसान झालें....कंपनीचें देणें देता येणार नाहीं. करितां समुद्रांतील गलबतांवर सूड उगवून घेतला पाहिजे. शहाजीचे ताब्यांत आतां पोर्टोनोव्हो आहे. ( तेव्हां तेथील गलबतांचें नुकसान केलें पाहिजे. )

ई. फॅ. ११ } (८६२) { श. १५८३ कार्तिक शु. १३
पृ. १६ इ. } सुरत कसल्टेशन { इ. १६६१ आक्टो. २५

कंपनीनें **दंडाराजपुरी किल्ला** घेण्याबद्दलचा हुकूम दिला. पण सैन्य व गलबतें पुरेशीं नसल्यामुळें हें तूर्त अशक्य असें ठरलें.

डाग रजिस्टर १६६१ } (८६३), { श. १५८३ मार्ग. शु.९
पृ. ४०५-४०६ न्यू. } { इ. १६६१ नोवें. २०

**गोंवळकोंड्याकडून** खंडणी मिळाली नाहीं म्हणून **मोंगल** लढाईचा बेत करीत आहे. **गोंवळकोंडेकर**हि सैन्य वाढवून किल्ला लढविण्याची तयारी करीत आहेत....पूर्वी ही खंडणी रुपयांत भरली जाई. परंतु आतां मोगल जुने होन मागतात. कारण नवीन होन हलके झाले आहेत (१२८ नवे=१०० जुने होन )...सेनापती लिंगमनायक याच्या अपेक्षेप्रमाणें **शहाजी**विरुद्ध त्याला यश आलें नाहीं....तेगनापट्टमचा वेढा त्याला सोडावा लागला, आणि **सप्टेंबर २ रोजीं** शहाजी व लिंगम नायक यांच्यांत **सलोखा** झाला. त्या वेळीं, शहाजीच्या ताब्यांत पूर्वीप्रमाणें पोर्टोनोव्हो व तेगनापट्टन रहावीं आणि त्यानें तंजावर व मदुरा यांच्या मुलखास उपद्रव देऊं नये; व ५० हजार रायल तंजावर नायकाकडून घेऊन त्याच्या मुलास सोडून द्यावें, असें ठरलें. हा तह नायकांना नापसंत वाटल्यामुळें त्यांनीं लिंगमनायकाला त्रिचनापल्लीच्या किल्यावर कैद करून ठेवून शहाजीशीं युद्ध चालू ठेवण्याचा बेत केला. पण पुढें उभय नायकांनींहि तहाला मान्यता देऊन तंजावरचा नायक व लिंगम नायक यांच्यांत विवाहसंबंधांनीं परस्पर सोयरीक जमविण्यांत आली....ठरल्याप्रमाणें ५० हजार रायल तंजावरच्या नायकाच्या मुलाच्या सुटकेकरितां पाठवावयाचे. इतक्यांत **शहाजीनें** यापुढें वाट पहाण्यास सवड नाहीं म्हणून तह मोडला व फिरून लढाई सुरु झाली.......थोड्याच वेळांत ( २५

माहाराजास तलकोकण अर्जानी जाहाले. आपणासी ताजा सनद पाहिजे व सदरहूप्रमाणें पत्रें दाखविलीं. ये बावे केसव नायेक सरदेसाई व आवजी नाइक मोकदम व कुक सेट सेटिया व गणोवा किवळ व नारोबा करफरा व सोनबा नायवाड माहाजन याणी अर्जे केला जे सदरहूप्रो वतन उपाध्ये मार याचें पुरातन चालिलें असे व हाली भोगोटा असे. पेस्तर चालविणार साहेब धनी आहेत. हा इलतिमास खातिरेसी आणून सदरहूप्रमाणें वतन उपाध्ये मजकूर यासी मोकरर करून हें पत्र तुम्हासी सादर केलें असे. तरी वतन चाळविणें.

इं. फॅ. मा. ११ }
पृ. ९९ इ. }

(८७२)

{ श. १५८३ फाल्गुन शु. १४
{ इ. १६६२ फेब्रु. २१

दुसऱ्या चार्लसचें हिंदुस्थानांतील गुन्ह्यांबद्दल आज्ञापत्र

ईस्ट इं. कंपनीनें आमच्याकडे तकार केली कीं, कित्येक इंग्रज सदर कंपनीशीं कोणत्याहि प्रकारचा संबंध नसतांना, हिंदी गलबतें चालवितात, तेथील लोकांना गलबतें बांधावयास आणि चालवावयास शिकवितात, आणि इंग्रज राष्ट्राचें नुकसान होईल अशा तऱ्हेनें व्यापार करितात....त्यांस धरून इंग्लंडांत पाठवून द्यावें.

इं. फॅ. ११ }
पृ. ७६ इ. }

(८७३)

सुरत-कंपनी. (सुरत सुभेदाराचा जुलूम)

{ श. १५८३ फाल्गुन व. ४
{ इ. १६६२ फेब्रु. २७

सुभेदाराच्या कारभारामुळें रकमेची टंचाई फार भासते. बादशहाला भरण्याचा सर्व पैसा सुभेदारानें आपल्या हातीं घेतला आहे. पूर्वी व्यापारी आपला माल सराफाच्या मध्यस्थीनें अधिक किंमत देईल त्याला विकीत. परंतु आतां आपण सांगूं ती किंमत आणि म्हणूं तें वजन असें म्हणून सुभेदार (चांदी वगैरे) घेतो. यामुळें व्यापारी हतात्दिल झाले आहेत. पावसाळ्यामध्यें पैसा मिळविण्याचें मुख्य ठिकाण म्हणजे इराण. परंतु अद्यापपर्यंत येथून एकहि गलबत इराणाकरितां भरून निघालें नाहीं. सुभेदाराच्या जुलमाबद्दल—आम्हीं, डच, इराणी लोक या-सर्वांचीच तकार आहे. असा एक आठवडा जात नाहीं कीं ज्यांत तो कोणाला कांहीं उपद्रव करीत नाहीं. डचांचें तांबें तो बादशाही टांकसाळीकरितांच अडकवून ठेवतो. इराण्यांची निष्कारण खोटी करून दुप्पट जकात वसूल केली जाते. सुभेदाराचें असें स्वैर वर्तन आणि बेगुमानपणा चालू असतांना येथें व्यापार करणें शक्य नाहीं.

इं. फॅ. ११ }
पृ. ८७ इ. }

(८७४)

{ श. १५८३ फाल्गुन व. ३०
{ इ. १६६२ मार्च १०

मे. ॲण्ड्रुज—रायगडवरील धरांतुष्ट कैदी.

तुमचीं २८ डिसेंबर, १६ जानेवारी आणि ३ मार्च (?)चीं (सुटकेबद्दल उत्सुकता

खं. १५ ले. ९८ }
सु. १०६२ जखर १ }
(८६८)
फा. मु. व सी.
{ श. १५८३ माघ शु. २
{ इ. १६६२ जाने. १२

अजर. शर्जाखान— बजा. कार. व देश. पर. वाई

कमलनयन गोसावी यास मौ. इब्रमिड येथें, तीस बिघे जमीन पूर्वीच्या (घारोजी राजे मोहिते वगैरे च्या) खुर्दखताप्रमाणें चालत आहे. हाली मौ. मज. सरंवजखान पणी यासी साहेबी मुकासा दिधला आहे. व साहेबास मुकासा नवा मिळला आहे. तरी वरील अमीन कमलनयन याजकडे चालविणें.

शि. च. ले. ३७९ }
सु. १०६२ जखर २ }
(८६९)
महजर
{ श. १५८३ माघ शु. ४
{ इ. १६६२ जाने १३

नेताजी व दीपाजी राजे मोहिते देसाई अग्रवादी

हरीफराऊ व हंबीरराऊ व शंकराजी राजे देसाई पश्चिमवादी. संबाजी व घारोजी या चेधूनीं का तलवीड व वांगी येथील जोड वृत्ती चालविली. पुढें दोघासी देवाज्ञा जाली. शंकराजी व नेताजी भांडो लागले. गोताने दोन तक्सीमा शंकराजानें व एक तक्सीम दीपाजी व नेताजी राजांनीं खावी. वडीलपणाचा मान आधीं शंकराजीचा व मागून दीपाजी व नेताजी यांचा असें ठरविलें.

राम. अ. ६५-६६ ले ८ }
सु. १०६२ व फ. जखर ९ }
(८७०)
तालीक
{ श. १५८३ माघ शु. ११
{ इ. १६६२ जाने. २०

वाबाजीराजे भोसले—— महादेव, निमण, रघुनाथ, विठल गेटने

तुम्हास (श्री घृष्णेश्वर) देवाचा अभिषेक व पूजाबद्दल वर्षासन सालिना १२ रुपये दिले. रुजु बक्षी.

सा. ले. ३४४ }
सु. १०६२ जखर १० }
(८७१)
सामराजमुद्रा मर्या.
{ श. १५८३ माघ वा १२
{ इ. १६६२ जाने. २१

शिवाजीराजे——— पिलाजी नीळकंठराउ सुभेदार

नामजाद मामले प्रभावली वेदमूर्ती नारो पाध्ये बिन अंतो पाध्ये व केसो पाध्ये बिन राघो पाध्ये व केसो पाध्ये बिन विठल पाध्ये गोळवलीकर साकिन कसबे संगमेश्वर याणी श्रीगारपुरीच्या मुक्कामी येऊन अर्ज केला जे, आपले मिराम वतन कदीम धर्माधिकरण व जोतिष व देशोपाध्यपण अष्टाधिकार अज मौजे देवधर ता नुजारपूर मामले मजकूर व ता संगमेस्वर व ता कोंढिवरा मामले मार तहद मौजे देवधर मामले दमजाबाद मुजाफत बंदर मैमुन मुस्तफाबाद उर्फ दाभोळ व कसबे संगमेस्वरी धर्माधिकरण व देशमुखाचे घरी जोतिष पुरातन पिढी दर पिढी भोगोग्य चालत आहे. वतनाचे ताम्रपट कारकीर्दी राजा सत्येस्वर व तुरुकांचे कारकीर्दीचीं पत्रें असेत. हाली

माहाराजास तलकोंकण अर्जानी जाहालें. आपणासी ताजा सनद पाहिजे व सदरहूप्रमाणें पत्रें दाखविलीं. ये बावे केसव नायेक सरदेसाई व आवजी नाइवा मोकदम व फुक सेट सेटिया व गणोबा किवल व नारोबा करकरा व सोनवा नायवाड माहाजन याणी अर्ज केला जे सदरहूप्रो वतन उपाध्ये मार यांचें पुरातन चालिलें असे व हाली मोगोटा असे. पेस्तर चालविणार साहेब धनी आहेत. हा इलतिमास खातिरेसी आणून सदरहूप्रमाणें वतन उपाध्ये मजकूर यासी मोकरर करून हें पत्र तुम्हासी सादर केलें असे. तरी वतन चालविणें.

ई. फॅ. मा. ११ }
पृ. ९९ इ. }

(८७२)

{ श. १५८३ फाल्गुन शु. १४
{ इ. १६६२ फेब्रु. २१

दुसऱ्या चार्लसचें हिंदुस्थानांतील गुन्ह्यांबद्दल आज्ञापत्र

ईस्ट इं. कंपनीनें आमच्याकडे तक्रार केली कीं, कित्येक इंग्रज सदर कंपनीशीं कोणत्याहि प्रकारचा संबंध नसतांना, हिंदी गलबतें चालवितात, तेथील लोकांना गलबतें बांधावयास आणि चालवावयास शिकवितात, आणि इंग्रज राष्ट्रचें नुकसान होईल अशा तऱ्हेनें व्यापार करितात....त्यांस धरून इंग्लंडांत पाठवून द्यावें.

ई. फॅ. ११ }
पृ. ७६ इ. }

(८७३)

सुरत-कंपनी. (सुरत सुभेदाराचा जुलूम)

{ श. १५८३ फाल्गुन व. ४
{ इ. १६६२ फेब्रु. २७

सुभेदाराच्या कारभारामुळें रकमेची टंचाई फार भासते. बादशहाला भरण्याचा सर्व पैसा सुभेदारानें आपल्या हातीं घेतला आहे. पूर्वी व्यापारी आपला माल सराफाच्या मध्यस्थीनें अधिक किंमत देईल त्याला विकीत. परंतु आतां आपण सांगूं ती किंमत आणि म्हणूं तें वजन असें म्हणून सुभेदार ( चांदी वगैरे) घेतो. यामुळें व्यापारी हवालदिल झाले आहेत. पातसाळ्यामध्यें पैसा मिळविण्याचें मुख्य ठिकाण म्हणजे इराण. परंतु अद्यापपर्यंत येथून एकहि गलबत इराणाकरितां भरून निघालें नाहीं. सुभेदाराच्या जुलमाबद्दल—आम्हीं डच, इराणी लोक या-सर्वांचीच तक्रार आहे. असा एक आठवडा जात नाहीं कीं ज्यात तो कोणाला कांहीं उपद्रव करीत नाहीं. डचांचें तांबें तो बादशाही टांकसाळीकरितांच अडकवून ठेवतो. इराण्यांची निष्कारण रोटी करून दुप्पट जकात वसूल केली जाते. सुभेदाराचें असें स्वैर वर्तन आणि बेगुमानपणा चालू असतांना येथें व्यापार करणें शक्य नाहीं.

ई. फॅ. ११ }
पृ. ८७ इ. }

(८७४)

{ श. १५८३ फाल्गुन व. ३०
{ इ. १६६२ मार्च १०

प्रे. ॲण्ड्रुस—रायगडदरीत धसंतुष्ट कैदी.

तुमचीं २८ डिसेंबर, १६ जानेवारी आणि २ मार्च (!)चीं (सुटकेबद्दल रासुकता

शि. प. सा. सं. १४

दाखविणारी) पत्रें पोंचली....लवाड शिवाजीला पत्रें पाठविण्यास (तो उत्तरच देत नाहीं!) आम्हांला वेळ नाहीं...तुम्हीं काढलेली हुंडी तात्वडतोब भरली आहे...आपल्याला कैद कां प्राप्त झाली हें तुम्ही चांगलें जाणतां. कंपनीच्या मालाचें रक्षण केलें म्हणून ही कैद प्राप्त झाली नसून पन्हाळ्याच्या वेढ्यांत जाऊन इंग्रजांचा बावटा फडकावून गोळे उडविल्याबद्दलचें हें प्रायश्चित्त आहे. शिवाजी नसता आणि दुसरा कोणी असता तरी ज्याला म्हणून अशल्या अत्याचाराबद्दल सूड उगविण्याचें सामर्थ्य आहे तो तसाच वागला असता. व्यापाऱ्यांनीं दारूगोळ्यासारखा माल विकावयाचा नसतो किंवा शत्रु-सैन्यावर उडवावयाचा नसतो. परदेशांत असे उपद्याप केल्यास मग त्याचें फळ भोगावें लागतें. तुमच्या कैदेचें हेंच खरें कारण आहे. रेव्हिंग्टनला स्वतःला शिवाजीची दारूगोळा न विकण्याबद्दलची आज्ञा माहीत होतीच....

| | | |
|---|---|---|
| इंडियन अँटिक्केरी भा. ५० (१९२१)पृ. ३१५ इ. | (८७५) उल्लेख | श. १५८३ इ. १६६१ |

[इस्कालिअटचें भावास सुरतेबद्दलचें पत्र, इ. १६६४ जानेवारी २८ चें.]

"विजापूरचे सुलतानाला न जुमानतां शिवाजीनें राजापूर घेतलें, व लुटलें; इंग्रजांच्या वखारींतील जमिनी खणून संपत्ती नेली आणि तेथील इंग्रज व्यापाऱ्यांना ८ महिने कैद करून ठेविलें."

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ. ११ पृ. २७ इ. | (८७६) सुरत—कंपनी. | श. १५८३ इ. १६६१ |

(सुरतेशिवाय) आपल्याला स्वतःची अगदीं स्वतंत्र अशी जागा पाहिजे. या लोकांशीं खुला व्यापार चालू झाल्यापासून हे लोक आम्हांला बायकांसारखे दुर्बळ समजून वाटेल त्या प्रसंगानें आमचा अपमान करितात.

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ. ११ पृ. १८ ओ. कॉ.२८९७ इ. | (८७७) गलबताला सूचना | श. १५८३ इ. १६६१ |

कोचीन ते स्वाली पर्यंत वाटेंत सांपडतील तीं विजापुरी बंदरांतील गलबतें, म्हणजे संजान ते गोव्या पर्यंतचीं, राजापूर वखारवाल्यांच्या कैदेच्या प्रतिकारार्थ म्हणून पकडावीं.

| | | |
|---|---|---|
| राम. अं. ६५-६६ ले. ९ मु. १०६२ व हि. १०७२ | (८७८) | श. १५८३ इ. १६६१ |

अजर. सिद्दी बिलाल-- महादेव तिमण व रघुनाथ विठल सेटगे.

येसोजी व जिवाजी राजे आमिरेखावद्दल येद्दराम साल्याबाद देत आले आहेत, त्याप्रमाणें वर्षासन १२ रुपये देविले आहे. पा रा हुजूर रा गणेश

सा. ले. १०३ } (८७९) { श. १५८३,
? } करिना { इ. १६६१

**दादाजी कोंडदेऊ** याचा मुलखात कौल देणें, शाईस्तेखानाचें पुण्यास आगमन, शास्ताखाना गेल्यानंतर मोंगलाचे व शिवाजी महाराजांच्या फौजांचें मांडण कारकदखानास पुण्याचा मोकासा, वगैरे गोष्टींचा उल्लेख आहे. (साळुंबरे येथील पाटील.)

सा. ले. ३९ } (८८०) { श. १५८३,
? } अर्जदास्त { इ. १६६१

सेरीकर मोकदम मौ० खेडब्रा— दिवाण पा। सिरवळ

राहूजीपंत तरफ धामाजीपंत कारभार माहादाजीपंत देसकु. हे लावणीसंचणी करणें म्हणून गावास पाठविले. तो **मोगलाचा गलबला आला.** त्याने कुळाचे पेव वस्तभाव नेलिया. त्यावरी व **हाली मोगल येताती** म्हणउन वार्ता आइकिली. कुळास तकवा निघेना. वस्ता, गुरे गेली याकरितां कुळें गेली. येकदोषे मेलउन लावनी कर्‍हु साहेबी कौल दिला पाहिजे. व आम्ही जो देऊ तो चालविला पाहिजे.

इं. फॅ. भा. ११ } (८८१) { श. १५८३ फा.- ८४ चैत्र
पृ. १२८ इ. } { इ. १६६२ मार्च सुमार.

इंग्लंडचा राजा— सर अॅब्राहम शिपमन (मुंबई बेट प्रथम ताब्यांत घेण्याकरितां नेमलेला अधिकारी) यास सूचना.

आमच्या राज्याला हें बेट जोडून घेतल्याने आमच्या खर्चात पडण्याचें मुख्य कारण असें आहे की, त्या योगानें आमच्या प्रजेला हिंदुस्थानांत अधिक स्वतंत्रपणें आणि किफायतीनें व्यापार करतां यावा, आणि त्या **भागांतील आमच्या ताब्यांतला मुलूख वाढावा** आणि सामान्यतः आमचे राजपदाचा मान वाढून आमच्या प्रजेचा उद्यम धंदा आणि वैभव वाढावें......

शि. च. ले. ३९० व ३९१ } (८८२) { श.१५८४ चैत्र शु. ६
सु. १०६२ साबान ४ } मिसेली फा. सु. व सी. { इ. १६६२ मार्च १५

अज दि. ठाणा देहाय तर्फ पाली पर. कन्हाड—

ता हुदे व मोक. व मौजे कोळवीर (व मुढ):— १५ होन देण्याचा हुकूम.

इं. फॅ. ११ } (८८३) { श. १५८४ चैत्र शु. १०
पृ. ८७ इ. } लंडन ई. इं. कंपनी–पुरत कौन्सिल. { इ. १६६२ मार्च १९

हीं गळबतें पोंचत तोंपर्यंत **दंडाराजापूर** कंपनीच्या ताब्यांत आलें असेल तर

सोईप्रमाणें सुरत सोडून देउन वखार दंडाला आणून वसवावी. आणि तेथें हाताखीं असतील तेवढया इंग्रजांचे साहाय्यानें बंदोबस्त करावा आणि इकडे कळवावें.

इं. फॅ. ११ } (८८४) { श. १५८४ चैत्र व. ३
पृ. ७३ इ. } 'रॉयल वेलकम' गलबताला हुकूम { इ. १६६२ मार्च २७

·सर्व मलबारी किंवा दख्खनी सांपडतील त्यांना कैद करावें. गलबतें जाळावीं. आणि माणसांना किनाऱ्यावर सोडून द्यावें.

राम. अं. ६२ ले. ३ पृ. १२ } (८८५) { श. १५८४ चैत्र व. १२
सु. १०६२ साबान २५ } खुर्दखत फा. मु. व सी. { इ. १६६२ एप्रील ५

अजर. नाइकजीराजे खराडे—— कारकून व देशमुख तपे मशुर

कासीमट बिन अनंतमट सेकिन पाटण यास २० बिघे जमीन बरहुकूम भोगवटे कारर्किर्दी वजीरानी ता शाहाजीराजे भोसले चालत आले असे. हाली साहेबास मुकासा अर्जानी जाला...तरी दुमाले कीजे.

इं. फॅ. ११ } (८८६) { श. १५८४ वैशाख शु.२
पृ. ८० इ. } सुरत-कंपनी { इ. १६६२ एप्रील १०

राजापूरला मिरी मिळत नाहीं आणि इंग्रजकैद्यांचीहि सुटका झाली नाहीं. आतां शिवाजीचीं मक्केहून येणारीं गलबतें पकडून कैद्यांची सुटका आणि लुटीची भरपाई करून घेऊं. शिवाजीला कैद्यांच्या सुटकेच्या मजकुराचीं पुष्कळ पत्रें पाठविलीं परंतु तो उत्तरच देत नाही. यापुढें आदिलशाही सुलतानाला पत्रें पाठविणार आहोंत. या योगानें कदाचित् अधिक यश येईल.

शि. प. ले. ३ व सर. ले. ४७ } (८८७) { श. १५८४ वैशाख शु. १२
सु. १०६२ रम १२ } 'सामराज' मुद्रा व सी. { इ. १६६२ एप्रील २१

सिवाजीराजे-- पिलाजी नीलकंठराव सुभेदार नामजाद मामले प्रभावली सालगुा तलकोंकण सुरूकाची करवजादत बदल खासा स्वारी तल कोकणात होउनु मुलूक कबज जाहाला. ते वक्ती श्रृंगारपूरकर सुर्वे व कोकणांतील पातशाई अमलदार यांणी बेमानी केली ते नतीजा पोहचोन उधलोन गेले. मुलकांतील रयतीस सरंजामाबदल वतनदार व रयत यांस सरकारांतून कौल सादर जाहालेवर केसो नायक बिन राघो नाईक मावलंगकर व सारे वतनदार मामले मजकूर सरकारी खिजमतीस हाजीर जाहाले. साल मजकुरीं रंगो नाईक मावलगकर सरदेसाई मामले मा यांणी किले राजगडच्या मुकामी हुजूर येउन अर्ज केला जे, आपले सरदेसमुखीचें वतन मामले मा म मामले दामोल पिढी दर पिढी मातकदम इस्तकबिल

पावून ता सालगुदस्तापावेतों चालत आले. हाली सल कोकण साहेबास अर्जानी जालेवर साहेबीं सेवकावर मेहेरबान होऊन कौल सादर केले. यावर आ+ +वतनाचे बाबे खिजमतीस हाजीर जाहालो. हाली दिवाणातून सारी वतनें अमानत जाली. आपले कबिजा हक व लवाजिमा व इनामती अमानत जाल्या. आपण तों साहेबाचे खिजमतीस एकसान असो. साहेबीं मेहेरबान होऊन सेवकाची वतनावर स्थापना केलिया व कुटुंबास अंन देऊन उस्तवारी केलिया उमेद धरून एकमान चाकरी करूं व ये बाबे तुम्हीं इलतिमास लिहिली. बा इलतिमास खातरेस आणून व रयत मामुरीवर नदर देऊन बेकदीम वतनदार याबद्दल नायक मा यांस दोनी मामले मा सरदेशमुखी वंशपरंपरेनें करार करून नाईक मा यांस मामले प्रभावळीचे जमाबंदीवर पटी पासोडी हक लारी २००० दोन हजार रयत निसबत करार केली असे. तरी तुम्ही मा मा जमाबंदीवर रयत निसबत सदरहू लारी २००० दोन हजारची सीस्त दरसाल नाईक मा देवीत जाणे. दरसाल ताजा सनदेचा उजूर न धरणे. मामले दाभोलची पटीपासोडी हक याची सीस्त होणे. त्यास मा माचे अमलदार व वतंदार हुजूर आणविले आहेत ते आलियावर होईल....

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ. ११ पृ. ८८<br>इ. | (८८८)<br>सुरत-रॅव्हॉल्क टेलर, बेंदी (रायरी) | श. १५८४ ज्येष्ठ शु. १०<br>इ. १६६२ मे १७ |

शिवाजी किंवा विजापूरचा राजा कोठें आहे तें कळलें असतें तर तुमच्या सुटकेकरितां पत्रें लिहिलीं असतीं....इराणाहून आमचीं गलबतें आलीं म्हणजे एक वेंगुर्ल्याजवळ आणि दुसरें खारेपाटणजवळ ठेवून (शत्रूंचीं) मक्का व इराणहून येणारी गलबतें पकडण्याची तजवीज करूं, आणि यूरपसानी सांपडेल त्यास मोकळें सोडणार नाहीं. आमच्या पत्रांनीं जें काम होत नाहीं तें त्या मार्गानें होतें काय पाहूं. थूस राणी इतक्यांतच परत येणार आहे असें समजतें. नशिबानें ती आमचे हातीं लागली तर सुलतानाकडून तुमच्या सुटकेबद्दल खटपट होईल. तिच्या येण्याबद्दल किंवा महत्त्वाचीं गलबतें व माणसें यावयाचीं असलीं तर त्यांबद्दल कळेल ती माहिती कळवा. म्हणजे (पकडण्यास) ठीक पडेल. इतक्या लांब शत्रूच्या मुलखांत बोलणें करण्याकरितां मनुष्य तरी कसा पाठवावा? विजापूरच्या सुलतानाकडे निराळ्या मार्गानें आम्ही पत्र पाठवीत आहोत.

| | | |
|---|---|---|
| शि. प्र. पृ. १०७<br>सु. १०११ जिल्काद १० | (८८९)<br>मिमेली फा. मु. व सी. | श. १५८४ आषाढ शु. ११<br>इ. १६६२ जून १७ |

भज दि. तवे वालवे—— ता हुदे. व मोक. कदवे वालवे.

मेलगिरी पंडिताचे इनामात सिद्देश्वराचा इनाम जात आहे. त्या मोबदला सिद्देश्वरास दुसरा इनाम दिला आहे.

| | | |
|---|---|---|
| फॉ. इ. सा. ले. ९१ ? | (८९०) टिपण | श. १५८४ इ. १६६२ |

[ श. १५८२ ] माघ मासी वडे साहेबीण मखेस जाण्यासी वेंगुर्लेस आली. इसने अखेर व अवल सलासमधे [ श. १५८४ ज्येष्ठ ] मखेहून बडे० वेंगुर्ल्यास आली. आंबोली पावेतो घालविली.

| | | |
|---|---|---|
| सा. ले. २१९ सु. १०६३ जिल्काद २० | (८९१) 'महादेव' मुद्रा व सी. | श. १५८४ आषाढ वा ६ इ. १६६२ जून २७ |

शिवाजीराजे—— सर्जाराऊ जेधे देशमूख ता मोर व ता रोहिडखोरे बसेर पाठविली. लिा जे लोकी फुटून हुजूर येत आहेत तरी साहेबी हुजूर चाकर ठेविले न पाहिजेत म्हणउनु लिहिले. तरीं तुमचे लोक हुजूर येतील त्यास साहेब ठेवणार नाहींत. तुमचे तुम्हापासी फिराउनु पाठवितील.

| | | |
|---|---|---|
| खं. १५ ले. ९९ सु. १०६३ जिल्हेज ९ | (८९२) मिसेली फा. सु. व सी. | श. १५८४ श्रावण शु. १० इ. १६६२ जुलै १४ |

अज दि. ठाणा तपे तारगाऊ—— ता हुदे. ब मोक. मौ. निगडी
कमलनयन याजकडे निगडी येथील जमीन बिघे १५ खुर्दखतप्रमाणें चालविणें.

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ. ११ पृ. ८८ इ. | (८९३) सुरत कंसल्टेशन | श. १५८४ श्रावण व. १ इ. १६६२ जुलै २१ |

आतां (टेलर वगैरेंना) कैद होऊन १७ महिने झाले; आणि मोठा दंड भरल्याशिवाय सुटकेची आशा दिसत नाहीं...दुसरे उपाय थकल्यामुळें...होपवेल बोटीनें राजापूर व खारेपाटणची बाजू आणि रॉयल वेलकमनें वेंगुर्ला, दाभोळ इ० बंदरें पहावीं. २० सेप्टेंबरपर्यंत असा पहारा करावा. राणी पहिल्या (वेंगुर्ले) बंदरांत उतरेल असा अंदाज आहे. सांपडली तर तिला सन्मानानें वागवावें.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. सुरत मा. ८५ पृ. ३८३ इ. | (८९४) सुरत–कप्तानांना हुकूम | श. १५८४ श्रावण व. १ इ. १६६२ जुलै २१ |

'कोणीहि दक्षिणी इसम, दख्खनचा सुलतान, शिवाजी, आणि देशांतील कोणीहि व्यापारी यांचें गलबत असेल तें धरावें. दख्खनची राणीहि धरावी. या वर्षी ती मखेहून परत फिरली असें नक्की कळलें आहे. वेंगुर्ल्याहून निघाली असल्यामुळें

तेथेंच बहुधा परत येईल. मोठी इतबारी असामी जाणून सन्मानानें वागवावें. परंतु सुटून जाऊं देऊं नये.'

खं. १५ ले. २७५ } (८९५) { श. १५८४ श्रावण व. ६
सु. १०६३ जिल्हेज २० } 'महादेव' मु. व सी. { इ. १६६२ जुलै २६

रा. सिवाजीराजे—— रा. बाजी सर्जाराऊ जेधे देशमुख ता मोर

तुम्ही वखैर पाठविली. लिहिले जे, आपण माणसे जाउलीकडे नेईन. तरी निंबाजीस कागद दिधला पाहिजे म्हणउनु लिहिा तरी दाटून माणसे जाउलीकडे कासास नेऊ पाहतां. जैसी आहेत तैसी असो देणे व दत्ताजी कंकास कौल पाठविणे म्हणउनु लिहिा तरी कौल पाठविला असे. तरी त्यास देणे आणि त्यासी हुजूर पाठविणें.

शि. च. ले. ३८२ } (८९६) { श. १५८४ श्रावण व. ७
सु. १०६३ जिल्हेज २१ } { इ. १६६२ जुलै २७

मोहिते पटेल कस. तळबीड—— नेतोजीराजे मोहिते पटेल कस. मज.

निवाडयाप्रमाणें तुम्हास जमीन हक देत आहों.

खं. १५ ले. १०० } (८९७) { श. १५८४ श्रावण व. १४
सु. १०६३ जिल्हेज २७ } सुदेखत फा. मु. व सी. { इ. १६६२ आगष्ट २

अजर. रा. राणाजी राजे घोरपडे—ता हुदे. व मो. मी. एरोले पर. कऱ्हाड

कमलनयन गोसावी याची ५ बिघे जमीन दुमाला करणें.

राम. अं. ६५ ले. १० } (८९८) { श. १५८४ भाद्र. शु. ३
सु. १०६३ मोहर १ } फा. मु. व सी. { इ. १६६२ आगष्ट ६

झुझारराऊ राजे घाटगे—महादभट सो वेळूर घृस्नेश्वर यासी अभिषेकाबद्दल सालिना १२ होन व सिवालयतीर्थांच्या तीर्थोपाध्येपण दिल्हे असे.

गो. इ. सा. ले. ३ } (८९९) { श. १५८४भाद्र.शु १५
सु. १०६३ मोहर १४ } फर्मान-उर्दूत { इ. १६६२ आगष्ट १९

विजापूर बादशहा-बजा. हवाल. व कार. मामले गोवा.

नारायण जोशी व विठल जोसी यांस दरसाल ९ व १८ होन पूर्वीप्रमाणें देत जाणें.

इं. फॅ. मा. ११ } (९००) { श. १५८४ भाद्र. शु.१५
पृ. ९०-९१ इ. } सुरत-रायांचे कैदी { इ. १६६२ आगष्ट १९

सुलतानाला देण्याकरितां राजापूरच्या एका व्यापाऱ्याकडे दिलेलें पत्र त्यानें पांच-

वून त्याचा तोंडी जबाब आणला आहे की, शिवाजीला आपल्याकडून लिहून कांहीं फायदा नाहीं. सुलतानाचें सैन्य शिवाजीवर जात आहे. त्याचे हातून शक्य तितक्या लवकर कैद्यांची सुटका घडवून आणण्याचा त्याचा विचार आहे. लवकरच सुलतानाचें पत्र येईल....आम्हींहि कोणाला तरी समुद्रावर किंवा किनाऱ्यावर पकडून आमचें उद्दिष्ट साध्य करूं.

सं. १५ ले. २७५ } (९०१) {श. १५८४ आश्वीन शु. ११
पु. १०६३ सफर १० } 'महादेव' मु. व सी. {इ. १६६२ सप्टें. १४

सिवाजी राजे— शेंधे

तुम्हास रजा फुरसदगी दिधली. ऐसियासि फुरसदगी देउनु बहुत रोज जाले आणि तुम्ही आले नाहींत. तरी हाली रोखा पावताच हुजूर येणे. घोडी गावी ठेउनी तुम्हीच हुजूर येणे.

इं. फॅ. भा. ११ } (९०२) {श. १५८४ आश्वीन व. ८
पृ. १९६ इ. } कंपनी–सुरत {इ. १६६२ सप्टें. २५

इंग्लंड व हॉलंड या दोन राष्ट्रांत तह झाला आहे. तीन महिन्यांत उभय राष्ट्रांकडून मान्य केला जाईल. (तहाची तारीख १६६२ सेप्टेंबर ४).

इं. फॅ. भा. ११ } (९०३) {श. १५८४ आश्वीन व. १०
पृ. १०६ इ. } मुंबई (ऑजिअर)–सुरत (प्रेसिडेंट) {इ. १६६२ सेप्टेंबर २६

मॅथ्यू नोल टेलरचें (रायगडावरील कैदी) पत्र मार्लबरोला घेऊन आला. 'विजापूरची राणी (बडी साहेबीण) चौलांत गुप्तपणें रहात आहे. तिला ताब्यांत घेऊन आपली सुटका करावी' असें त्यांत लिहिलें होतें.

[ओ. कॉ. २९४१]– आपलें राजापूरला जाणें या वर्षी तहकूब झालें असें आम्हीं गृहीत धरतों. आपण सुरतेलाच असाल.

सं. १५ ले. ३३९ } (९०४) {श. १५८४ आश्वीन व. ११
मु. १०६३ सफर २३ } 'महादेव' मु. व सी. {इ. १६६२ सेप्टें. २७

रा. सिवाजी राजे—बाजी सर्जाराऊ देसमुख ता भोर ता रोहिडखोरे

अर्दास छ १५ सफर रा छ १८ मिा पहुचोन हकीकत मालूम जाली. लिा की साहेबाची रजा सादर जाली की दोघे भाऊ चाकरीस हुजूर येणे. यावरी दोघे भाऊ स्वार होवनु येत होतो. यावरी घरामध्यें दुखापती जाली आहे, याबदल खोळंबेला असो. म्हणौन लिहिले. तरी वेथा हाली बरी जाली असेल. या उपरी स्वार होउनु येणे. बहुत दिवस राहिलियावरी सबनीस जागा धरितील. येणेकरून तुमचा काम सरजा आहे. यावरी सत्वर

रवार होउनु येणे. व लिा की आपलिया माणसास जावली राहावयासी देणे....तरी तुमचेहि राहाणयाचा जागा थराज आहे. जावलीस माणसे न पाठवणे. तुमचेच तरफेस कुबल जागा असेल तेथें ठेवणें व लिा की यालाजी गुजर गोविंदराऊ आटगांवकर याकडे होता; हाली साहेबाची चाकरी करावयासी उमेद धरितो म्हणोन लिा तरी याची आम्हास चाकरीची गरज नाहीं.

| | | |
|---|---|---|
| खं. १५ ले. २७६<br>सु.१०६३ रवल २० | (९०५)<br>'महादेव' सु. व सी. | श. १५८४ कार्तिक न. ७<br>इ. १६६२ ऑक्टो. २३ |

रा. सिवाजी राजे—सर्जाराऊ जेधे देसमुख ता रोहिरखोरे

**तपियात धावणीस येताती** म्हणौन जासुदानी समाचार आणिला आहे. तरी तुम्हास रोखा अहडताच तुम्ही तमाम आपले तपियात गावचा गाव ताकिदी करून माणसे लेकरेवाळे सगत (समेत) तमाम रयेती लोकांस घाटाखाले यांका जागा असेल तेथे पाठवणे. जेथे गनिमाचा आजार पहुचेना ऐसा जागियासि आसि पाठविणे. ये कामास हेगै न करणे-रोखा अहडताच सहाहू लिहिलेप्रमाणे अमल करणे-ऐसियासि तुम्हापासून अंतर पडलियावरी मोगल जे बांद धरून नेतील **त्याचे पाप तुमचे माथा बैसेल.** ऐसे समजोन गावचा गाव हिंडोनु रातीचा दिवस करून लोकाची माणसे घाटाखाले जागा असेल तेथे पाठवणे. या कामास एक घडीचा दिरंग न करणे तुम्ही आपले जागा हुषार असणें गावगनाहि सडेकडील सेतपोत जतन करावया जे असतील त्यासहि तुम्ही सांगणे की, डोंगरवर असिरा कुबल जागा आसेरे ऐस त्यासि सागणे व गनीम दुरून नजरेस पडताच त्याचे **धावणीची वाट चुकवुनु पलोन** जाणे. तुम्ही आपले जागा हुषार असणे.

| | | |
|---|---|---|
| मे.[ब. २ पृ. ६३ सु. १०६३<br>दि. १०७३ रबर ३ | (९०६) | श. १५८४ मार्ग. शु. ४<br>इ. १६६२ नोव्हे. ५ |

?—जहागीरदाराचे गुमास्ते, देसमुख, देसपांडे, मोक. शेटे महा. व रया पा पुणे.

मोरोबा गोमावी सो चिंचवड यांस दरजागा जो इनाम आहे तो त्यांचेकडे चालू ठेवणें.

| | | |
|---|---|---|
| इ. फॅ. मा. ११<br>पृ. १०७ इ. | (९०७) | श. १५८४ मार्ग. शु. १४<br>इ. १६६२ नोव्हें. १४ |

सुरत (ऑक्झिंडेन्.)—रायरी किल्ल्यावरील कैदी.

वेणीदास एका ब्राह्मणाचे मार्फतीनें शिवाजीच्या ब्राह्मणाचें मन वळवीत आहे... आम्हीहि सुरतेचे गव्हर्नर इत्यादींना नजराणे देतांना तुमच्याबद्दल जोराची मागणी करूं.

येथून ते शिवाजींचें पारिपत्य करण्याकरितां गेलेल्या शाइस्तेखानाला लिहितील आणि तुमची मुक्तता होईल. शिवाजींवर त्याचा फारच दाब पडत आहे असें म्हणतात.

इं. फॅ. मा. ११ } (९०८) { श. १५८४ मार्ग. व. ३०
पृ. १०९ इ. } डच व इंग्रज { इ. १६६२ नोवें. ३०

सुरत—आलेपो, इंग्लिश कॉन्सल.

डच फोर्चीनला जमिनीवरून व समुद्रावरून वेढा घालून बसले आहेत. तें ते लवकरच घेतील...आमचेशीं त्यांचा उद्दामपणा चालूच आहे. त्यांनीं आमचें एक गलबत धरून सात दिवस अडकवून ठेविल्यामुळें नुकसान झालें....

इं. फॅ. मा. ११ } (९०९) { श. १५८४ पौष व. ६
पृ. १०८ इ. } { इ. १६६२ डिसें. २०

रँडॉल्फ टेलर—सुरत.

आमचे स्थितींत कांहीं फरक नाहीं. किल्ल्याचा हवालदार परत आला म्हणजे त्याचेशीं कांहीं (कोई दंडाबद्दल) नक्की ठरवितां येईल...चोलेहून इरजीला राजापुरास पाठवून त्या प्रांताचा अधिकारी रावजी पंडित याचें मन वळवून त्याचेकडून शिवाजीला आमच्या सुटकेबद्दल लिहविण्याची खटपट करणार आहोंत. त्या लुच्चानें हें मनावर घेतलें तर आमचें काम होईल,

हि. रे. क. ९ } (९१०) { श. १५८४ पौष
पृ. ११० इ. } पोर्तुगीज गव्हर्नर———शिवाजी { इ. १६६२ डिसें.

तुमचा विश्वासू मनुष्य पाठवा. त्याच्यामार्फत दोनहि संस्थानांच्या हिताच्या दृष्टीनें महत्वाच्या गोष्टी कळवावयाच्या आहेत.

नै. व. ६ पृ. ७३ ले.६ } (९११) { श. १५८४ पौष व. ९
श. सु. १०६३ जमल २१ } म. मु. व सी. अस्पष्ट { इ. १६६२ डिसें. २३

जाधवराऊ राजे———— सकलतीर्थस्व. वेद. गणेश दीक्षित

आपले श्री सप्तशृंगीचे तीर्थपुरोहितपण तुम्हास दिधले असे.

इं. फॅ. मा. ११ } (९१२) { श. १५८४ माघ शु. १४
पृ. १४४ इ. } मि. गॅरी–लंडन { इ. १६६३ जाने. १२

मुंबई व आसपासच्या लोकांनीं सुरतेला जाऊन इंग्रजांना बोलावून आणण्यासाठीं एक ब्राह्मण पाठविला. मुंबईवर हल्ला करण्याकरितां शिपमन आपल्याबरोबर

येईल तर आपण १००० गोळे पुरवूं असें तो म्हणाला. आपल्यावरील सत्ताधीश-पोर्तुगीजांनीं आपल्याला अमर्याद त्रास दिला असें त्याचें म्हणणें आहे.

खं. १५ ले. १०१ }
सु. १०६३ जखर २० }
(९१३)
मिसेली फा. सी.
{ श. १५८४ माघ व. ७
{ इ. १६६३ जाने. २०

अज. दि. ठाणे तपे देगांव किले सातारा — ता हुदे. व मोक. मौ. अनेवाडी पर: कुडाळः— कमलनयन गोसावी यासी २ बिघे जमीन इनाम दुमाला करणें.

खं. १५ ले. १०२ }
सु. १०६३ जखर २२ }
(९१४)
मिसेली फा. मु. व सी.
{ श. १५८४ माघ व. ९
{ इ. १६६३ जाने. २२

अज. दि. किले चंदन— ता मोक. व रया. कसबे कुडाळः— जोगींद्र गोसावी यांचें भात देणें.

इं. फॅ. मा. ११ }
पृ. २३९ इ. }
(९१५)
कारवार-सुरत
{ श. १५८४ माघ व. १४
{ इ. १६६३ जाने. २८

कानड्याचा राजा व विजापूरला ( दख्खन ) राजा यांच्या मध्यें वैर चालू असल्यामुळें इकडील मुलखांत व्यापारी लमाणांचें जाणें येणें धोक्याचें झालें आहे. [इकेरी उर्फ बेदनूरचा नायक 'भद्राप्पा नाईक' असून स्वरकार म्हणतात तसा शिवाप्पा नव्हे. इं. फॅ. मधील खुलासा चुकला आहे. पहा डागरजिस्टर १६६३ पृ. ३१६ ता. ११ जूनचा उल्लेख. व शिवचरित्रप्रदीप पृ. १७९ टीप २.]

फॅ. रे. सुरत मा. २ }
पृ. १३२-१३४ इ. }
(९१६)
{ श. १५८४ फा शु. ६
{ इ. १६६३ फेब्रु. ३

कौन्सिलर्टिन गलबताचा कॅपटन टिंकर यास आज्ञा.

काल २ तारखेचा हुकूम दिल्यानंतर असें कळलें कीं, शिवाजी नांवाचा एक बंडखोर दोन मोठीं गलबतें मक्केकडे रवाना करण्याच्या तयारींत आहे. समुद्रांत वादळ झाल्यामुळें बऱ्याच किंमतीचा माल त्याचे किनाऱ्याला लागला. तो त्यानें त्या गलबतांत भरला आहे. तेव्हां आपले कैदी शिवाजीचे ताब्यांत आहेत त्यांना सोडविण्याकरितां आणि शक्यतर राजापूरच्या लुटीची अंशतः भरपाई होईल ती करण्याकरितां राजापूर बंदरांत जाऊन तीं गलबतें धरावीं. गलबतें भरावयाची जागा राजापूरपासून दोन मैलांवर जैतापुरास आहे. तेव्हां शक्य तितकी त्वरा करून होडयांतून माणसें पाठवून अचानकपणें हल्ला करून गलबतें घेऊन यावीं. परंतु ताब्यांत आलेल्या मालाची अफरातफर होऊं देऊं नये. गलबतें हातीं नच आलीं तरीहि या हालचालीमुळें भीती पावून ते आपल्याशीं तह करण्यास तयार होतील व कैद्यांची सुटका होईल. आपले शिपाई मालाची लूट, चोरी करणार

नाहींतच; तशी खात्री वाटत नसेल तर हा उपोग न केलेला पुरवला. कारण पुनः तह होईल तेव्हां झालेली नुकसानी कंपनीला भरून द्यावी लागेल.

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ. मा. ११ | (९१७) | श. १५८४ फा शु. ९ |
| पृ. २३०-२३२ इ. | रँडॉल्फ टेलर-सुरत | इ. १६६३ फेब्रु. ६ |

**रावजी पंडिताच्या** हुकमाप्रमाणें १७ जानेवारीला आमची रायरीहून सुटका झाली व ता. २९ ला आम्हीं राजापुरास येऊन पोंचलों...रावजी पंडीत ॰ दिवसांनीं खारे-पाटणहून परत आल्यावर त्याच्या सांगण्यावरून आमच्या बेड्या तोडण्यांत आल्या व नंतर त्यानें आम्हांला भेटीस बोलाविलें. त्या वेळीं प्रेसिडेंटशीं केलेला पत्रव्यवहार, व त्याच्यावर प्रेसिडेंटचें आलेलें उत्तर वगैरे त्यानें आम्हांला सांगितलीं. पत्रांवरून **शिवाजी** व इंग्रज यांचा सलोखा होण्याची त्याला आशा वाटली. असा सलोखा होणें त्याला इष्ट वाटत असल्यामुळें बोलणें करण्याकरितां म्हणून आम्हांला त्यानें बोलाविलें. या तऱ्हेचें बोलणें स्वच्छपणें व्हावयाचें तर प्रथम आम्हीं बंधमुक्त झालें पाहिजे असें सांगितल्यामुळें त्यानें पुष्कळ लोक होते त्यांच्या समक्ष मुक्त केल्याचें सांगितलें. त्यानंतर 'आपल्यासारख्या खालच्या दर्जाच्या लोकांना प्रेसिडेंटच्या परवानगीशिवाय स्वतंत्रपणें बोलणें करतां येत नाहीं; पण पूर्वीचा अनुभव विचारांत घेतला तर राजापूरच्या लुटीबद्दल नुकसानीची भरपाई झाल्याशिवाय आपले अधिकारी बोलणेंच करणार नाहींत' असें आम्हीं सांगितलें. यावर त्यानें असें सांगितलें कीं 'झाल्या गोष्टी विसराव्या. यापुढें एका काडीचीहि तोशीस आम्हीं लागूं देणार नाहीं.' झाल्या गोष्टींचीं त्यानें सर्व व्यापाऱ्यांच्या समक्ष कारणेंहि सांगितलीं. परंतु अँड्रयूजनें आमच्या विरुद्ध कंपनीकडे लिहिलें त्यापैकीं कांहींच कारण सांगितलें नाहीं. तो म्हणाला कीं 'त्यावेळीं **शिवाजींचें व विजापुरकरांचें युद्ध चालू होतें** यामुळें विजापूरचा मुलूख म्हणून राजापूरला उपद्रव दिला गेला. शिवाय, त्यावेळीं **दोन प्रबळ सत्तांशीं झगडा करावयाचा होता** आणि औरंगझहानें **शिवाजीचा** बराच मुलूख उध्वस्त केला होता. या कारणांनीं **शिवाजीला (द्रव्याची) फार गरज होती**. आतां शिवाजीला तशी तीव्र गरज नाहीं आणि कदाचित् गरज लागली तरी असला प्रकार पुनः होणार नाहीं अशाबद्दल तो शपथ देईल इ०'. अशा मजकुराचें शिक्क्यानिशीं खुद्द शिवाजीचें, त्याच्यावर **चंदनाचा (गंधाचा) त्याच्या हाताचा छाप उठविला होता,** असें आलेलें पत्र त्यानें आम्हांला दाखविलें. [ Shewing us a writing from his master with his own chop ( छाप = सील ) and others accustomary to it, as also the print of the Rajah's hand on the top of the paper, done with sandall ]. यावर आम्हीं म्हटलें कीं 'तुम्हीं सांगितलेल्या गोष्टींवर विश्वास

ठेवून बहुधा आमचे अधिकारी आतां शिवाजीच्या ताब्यांत गेलेल्या (राजापूर) बंदरांत, पुनः व्यापार चालू करतील. परंतु पूर्वीच्या नुकसानीची भरपाई आधीं झाली पाहिजे.' अशी भरपाई करून देण्यानें शिवाजीचा तोटा होणार नाहीं असेंहि आम्हीं सांगितलें...दरबारांत सर्व व्यापारी आणि वडे अधिकारी जमले होते. तेथून परत जाण्यापूर्वीं, इंग्रज व शिवाजी यांच्यांत कांहीं तह ठरेपर्यंत, रावजी पंडिताला कळविल्याशिवाय आम्हीं राजापूर सोडून जाणार नाहीं, अशीं त्यानें आमच्याकडून शपथ घेवविली. शिवाय या सलोख्याच्या बाबतींत आपण आपल्या बाजूनें शक्य तो प्रयत्न करूं अशीं आम्हीं वचनें दिलीं. हा स्नेह घडून आल्यास पूर्वीप्रमाणेंच सर्व प्रकारच्या व महत्त्वाच्या सवलती मिळतील असेंहि अभिवचन त्यानें दिलें......आतां योग्य प्रकारच्या सूचना व पूर्ण अधिकार देऊन कोणाला तरी हा सलोख्याचा तह करण्यासाठीं पाठवावें. वेलजी किंवा तो नसेल तर अन्य कोणी यावा. त्याचे सुरक्षिततेबद्दल इमी येथील मंडळीनें दिली आहे...त्वरा करणें जरूर आहे. आतांच मक्केकडे गलबतें निघण्याचा समय असल्यामुळें ह्या तहानें आपल्याला पुष्कळ अनुकूल कलमें मिळण्याचा संभव आहे (!) एकदां मित्रत्वाचा तह झाला म्हणजे मग शिवाजीच्या सर्व बंदरांत निर्भयपणें व्यापार करतां येईल. कारण, **राजापूर आदिकरून जो मुलूख शिवाजीनें (युद्धांत) घेतला आहे त्याचा उपभोग शिवाजीनें घ्यावा; असा अदिलशहानें शिवाजीला फर्मान दिला आहे.** फारतर अधिक बंदोबस्ताकरितां खुद्द अदिलशहाचें दुसरें फर्मान त्याच्या सर्व मुलखापुरतें घेऊन ठेवावें म्हणजे झालें. शिवाय आधीं कल्पना नाहीं असा एकादा प्रसंग मागाहून उद्भवल्यास आपल्याला कांहींतरी उपाय करतां येईलच. कारण, **हा सर्व मुलूख अजूनहि विजापुरच्या राज्यांत असून शिवाजी त्याच्या प्रजाजनांत मोडतो......** स्वतःच्या फायद्याकरितां तरी शिवाजी आपला शब्द मोडणार नाहीं. कारण, एकदां त्यानें फसविल्यास पुनः कोणीहि त्याच्यावर विश्वास ठेवणार नाहीं किंवा त्याच्या अमलाखालीं रहाणार नाहीं. दंडाराजपुरी घेण्यासाठीं आपण शिवाजीला मदत केली तर आपल्याला वाटेल तशी सोइस्कर बंदरी जागा शिवाजी आपल्याला देईल ...आपण सुचविल्यास त्याबद्दल रावजी पंडिताशीं बोलून पाहूं...येथून मक्केला दोन गलबतें, राजाच्याच मालकीचीं निघणार आहेत. कदाचित् एकादा व्यापारी त्यांपैकीं एक गलबत मालासह खरेदी करील. परंतु हीं गलबतें पकडण्याचा विचार केला तर आपल्या तहाबद्दल उत्सुकतेला प्रत्युत्तर मिळालें नाहीं म्हणून शिवाजी क्रुद्ध होऊन जावयाचा...वेलजीला पाठवावयाचें झाल्यास स्वतंत्र गलबत करून पाठवावा; व त्याचेबरोबर गुप्तपणें रावजी पंडिताकरितां चांगला नजराणा पाठवावा.

इ. फॅ. मा. ११ } (९१८) { श. १५८४ फाल्गुन व. ६
पृ. २३३-३४ } राजापूर-सुरत { इ १६६३ फेब्रु. १८

फॉर्म्हर्टिन गलबत ९ तारखेला जैतापुरास आलें...रँडॉल्फ टेलर व फिलिफ

गिफर्ड त्यावर गेले; आणि शिवाजीची २ गलबतें पकडण्याबद्दल कॅप्टनला दिलेला हुकूम अमलांत आणिल्यास रावजी पंडितांशीं चालू केलेल्या बोलण्यास व्यत्यय येईल म्हणून त्यांनीं सांगितल्यावरून कॅप्टननें तो हुकूम अमलांत आणिला नाहीं. कारण...... शिवाजीचा मुलख किनाऱ्याचे बाजूनें अधिक वाढण्याचा संभव असल्यानें हीं गलबतें पकडून त्याचेशीं वैर संपादण्यांत फायदा नाहीं. कारवारच्या वखारीची सुरक्षितताहि त्या योगानें बिघडेल. रुस्तुमजमा हाच कारवारचा अधिकारी आहे. राजापूरप्रमाणेंच शिवाजीला हेंहि शहर तो लवकरीनें लुटूं देऊन पुनः नामानिराळा राहील !......कॉ० गलबतावरोबर वेल्जी गेलाच होता. त्याची व रावजी पंडिताची मुलाखत होऊन पूर्वी कळविल्याप्रमाणेंच आमच्याशीं झालें तसेंच बोलणें झालें....मध्यंतरीं हीं गलबतें मक्केला निघून जातील. त्यांची सुरक्षितता आमच्या मर्जीवर अवलंबून आहे अशी त्यांची भावना राहिल्यास अनुकूल तह त्वरेनें होऊं शकेल. परंतु तीं गलबतें परत येतांना त्यांचेवर पाळत राखिली पाहिजे. तीं राजापूरलाच परत येतील असें नाहीं. खारेपाटण, साटवली, दाभोळ, किंवा केळशीलाहि जातील तर लक्ष ठेवलें पाहिजे....कॉ. गलबत १३ तारखेला दक्षिणे-कडे निघून गेलें....त्यानंतर रावजी पंडितांशीं बोलणें झालें त्यावरून बंदरच्या जकातीची इंग्रज व मराठे यांमध्यें निमेनिम वाटणी करून इंग्रजांनीं आपल्या नुकसानीची भरपाई करून घ्यावी असा रोख दिसतो. हें म्हणणें आमचे मुख्याला कबूल होणार नाहीं; आणि त्यामुळें त्यांचेकडून कांहीं आगळीक झाल्यास आम्ही जामीन नाहीं असेंहि आम्हीं सांगून ठेविलें आहे....दाभोळाहून ३ व खारेपाटणाहून १ अशीं गलबतें इराण व मस्कतकडे जावयाचीं आहेत. त्यांपैकीं एकादें आम्हाला मिळालें तर बरें होईल. रावजीचें बोलणें अनुकूल पडलें नाहीं आणि समुद्रावर कांहीं विरुद्ध करण्याची पाळी आलीच तर ती खातमी येथें येण्यापूर्वीच आम्हास निघून जाण्यास ठीक पडेल....राजापूरच्या योगानें २३।२४ हजार होनांची लूट, त्याचें व्याज, २ माणसें दगावलीं त्या बद्दल कांहीं आणि आमची २ वर्षे कैद इतकें नुकसान झालें.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. सुरत मा. १०३<br>पृ. २५१ इ. | (९१९)<br>कारवार-सुरत. | ध. १५८४ फा ब. ३०<br>इ. १६६३ फेब्रु. २७ |

येतांना तेथील फॅक्टर्सच्या म्हणण्याप्रमाणें तहकूब केलेल्या आपल्या हुकमाची अमल बजावणी करण्याकरितां कॅप्टन टिकर यानें राजापूरला जाऊन मिळतील तेवढे फॅक्टर्स बरोबर घेऊन सुरतेला परत जावें असा हुकूम आम्हीं त्याला दिला आहे. सोंधे व बेदनूरचे राजांनीं विजापूरचे राजाच्या मदतीनें आपला मुलूख पुनः ताब्यांत घेतल्यामुळें हुबळीपर्यंत मार्ग आतां सुरक्षित झाला आहे.

| | | |
|---|---|---|
| सं. १५ ले. २०३<br>इ. १०६३ | (९२०)<br>फा. मु.व सी. | ध. १५८४<br>इ. १६६२-३ |

कनकनंदन गोसावी याची बरदास्त चालविणें.

ऐ. ब. ६ पृ. ७३ ले. ५ } (९२१) { श. १५८५
सु. १०६३ } फा. मु. { इ. १६६२-६३

सावित्रीबाई तीर्थस्वरूप गणेश दीक्षित बिन विठ्ठल दीक्षित (अपूर्ण)

डाग रजिस्टर १६६३ } (९२२) { श. १५८५ अ. चैत्र व. ७
पृ. १०९ इ. न्यू. } { इ. १६६३ मार्च २१

विजापूरचें सैन्यासह कोलेरून नदी उतरून तंजावरांत प्रवेश करण्याकरितां बाबुलखान (बहलुलखान) तयार होऊन राहिला आहे. २००० घोडेस्वार अपाडीवर गेले त्यांना बरी लूट मिळाली; परंतु नदीच्या पलीकडेच लिंगमनायकानें त्यांना थोपवून धरलें. आतां लिंगमनायक तंजावरचा सेनापति झाला आहे. मदुरानायक स्वतःचें रक्षण चांगलें करीत आहे. परंतु आपल्या जोडीदाराबद्दल कांहींच फिकीर करीत नाहीं. यानंतर ६।७ महिने तेगनापट्टमचा व्यापार साफ बुडाला. वेढा चालू असतांना व्यापारी बाहेर पडून ठिकठिकाणीं विजापुरकरांच्या भीतीनें गुप्तपणें राहिले.

इं. फॅ. मा. ११ } (९२३) { श. १५८५ चैत्र. शु. १
पृ. २३४-२३५ इ. } राजापूर (फिलिप गिफर्ड)-सुरत. { इ. १६६३ मार्च ३०

तुमचें २४ फे. चें पत्र १८ मार्चला मिळालें. रावजींचीं वगैरे पत्रें दिलीं. त्यांमुळें त्यांना समाधान झाल्यासारखें दिसलें.... कैद्यांना वाटेल तेथें व तेव्हां जाण्यायेण्याची मुभा रावजीपंडितानें दिली. तह्याचा एकदां निकाल करण्याकरितां पूर्ण अधिकार देऊन एखादा बनिया पाठवावा, अशी रावजीची सूचना आहे....रावजीपंडित चिपळूणला गेला आहे. रायगडला जाऊन शिवाजीला भेटून येईल असें म्हणतात. ... इकडील महत्त्वाची बातमी अशी आहे कीं १२००० घोडेस्वारांचें मोंगली सैन्य वरच्या चौलला पावसाळ्यांत छावणी करण्याकरितां घेरें चालण्याच्या उद्योगांत आहे. आणखी सात हजार घोडदळ रहिमतपूरला आहे. नेताजी मोंगलांचे मुलखांत लुटालूट करण्यास गेला होता. त्याचा पाठलाग करून तें नुकतेंच परतलें आहे. ह्या सैन्यानें त्याचा इतक्या जोरानें पाठलाग केला कीं त्याला रोजीं ४५ ते ५० मैलांची दौड करावी लागली. त्याला लूट थोडी सांपडली पण त्रास पुष्कळच पडला. नेताजीचा पाठलाग करीत हे लोक विजापुरापासून अगदीं पधरा मैलांवर पोंचले. विजापूरच्या राजाराणीला भय वाटून १०० घोडेस्वार घेऊन तीं बंकापूरला पळालीं. रुस्तुमजमानें मोंगलांना भेटून आपल्या स्वतःपुरता तह केला. काय होईल तें नकळे. परंतु मोंगल विजापूरचा सर्व मुलूख घेतील असें वाटतें. मला कोठेंहि जाण्यास प्रतिबंध होईल असें वाटत नाहीं. परंतु एकदम सरळ लिहिण्यापेक्षां माल खरेदी करण्याकरितां कोल्हापूरला पाठवीत आहोंत असें रावजीला कळविणें बरें.

इं. फॅ. मा. ११ } (९२४) { श. १५८५ चैत्र शु. ५
पृ. २६८-२६९ इ. } मच्छलीपट्टण-सुरत. { इ. १६६३ एप्रील २

मच्छलीपट्टणमध्यें राहणें धोक्याचें आहे. गोवळकोंड्यातील मोठे लोकांची आपसांत भांडणें चालू असून कित्येकजणांचा प्राणघात झाल्याची बातमी आहे. अशा बेबंदशाहींत राहण्याचा धीर कोणीं करावा ?

रां. ८ ले. १२ } (९२५) { श. १५८५ चैत्र शु. ६
सु. १०६३ रम ४ } सी. { इ. १६६३ एप्रिल ३

रा. शिवाजी राजे——मोरो त्रिमळ पेशवे व राजश्री निळो सोनदेऊ मुजुमदार उपरि साहेबीं कोंकणांत नामदार खानावरी जाण्याचा तह केला होता. ऐसियासी हालीं किले सिंहगडाहून समाचार आला आहे कीं गडावरी कांहीं फितवा जाला आहे. याबद्दल तूर्त कोंकणांत जाण्याचा तह राहिला. तरी तुम्ही लष्करी लोकानसी व खासखेली इशमानसीं कागद देखतांच स्वार होऊन पिछे सिंहगडास जाणें. आणि किल्लियावरच हुशार खबरदार असणें. फितवा कोण कोण लोकीं केला होता हें खबर घेऊन हुजूर लेहून पाठविणें; मा। तान्हाजी नाईक व कोंडाजी नाईक व + + + + हडे व कमळोजी नाईक व दरेकर व हमाजी अहिरा व गोंदजी पांढरा हे बरोबरी घेऊन सिंहगडास जाऊन सिंहगडीं अलगी अलगानीं बहुत खबरदार असणें. जे लोक किल्लियावरी मेदांत असतील ते हे आपला बरोबरील लोक अलगेस ठेवणें. पा। हुजूर

इं. फॅ. मा. ११ } (९२६) { श. १५८५ चैत्र शु. ९
पृ. २३४ इ. } सुरत ( प्रेसि० व कौन्सिल )-कंपनी { इ. १६६३ एप्रील ६

आम्हीं ठरविल्याप्रमाणें फॉन्ड्रॉटन गलबत राजापुरास गेलें आणि तेथून तांबड्या समुद्राकडे जाण्याकरितां निघालेल्या दोन गलबतांना त्यानें अडकविलें. त्यामुळें शहरचा सुभेदार आणि इतर लोक टेलरला घेऊन त्या गलबताचे कॅप्टनशीं रदबदली करण्याकरितां आले. टेलरच्या रदबदलीमुळें तीं गलबतें सोडून देण्यांत आलीं. आणि परत फिरतांना रँडॉल्फ टेलर आणि रिचर्ड टेलर या दोघांना घेण्यांत आलें. गिफर्ड आणि फॅरन राजापुरासच राहिले. परतु त्यांना स्वतंत्र घर करण्यास परवानगी मिळाली आहे. त्यांनाहि आणविलें पाहिजे......... [ पृ. २३९-४० ] डच लोकांना कानन्नूर एकहि गोळी वाजविल्याशिवाय मिळालें. आतां सर्व मलबार किनाऱ्यावर त्यांचें वर्चस्व होऊन आमचे व्यापाराला ते मनाई करूं लागले आहेत. आजपर्यंत कारवार हें ठिकाण आम्हांला राहिलें होतें. पण तेथेंहि वखार घालण्याची परवानगी त्यांनीं मागितली आहे असें समजतें. शिवाय ३० मैलांवर खालीं मटकलला त्यांची वसाहत आहेच.

फॅ. रे. सुरत भा. १०० पृ. २७२
इं. फॅ. भा. ११ पृ. २३५-३६इ. } (९२७) { श. १५८५ चै. शु. ११
इ. १६६३ एप्रील ८

राजापूर ( गिफर्ड )—— सुरत

विजापूरचा राजा, राणी व सर्व सरदार **बंकापूरला** गेले; हें वर्तमान अगदीं खरें आहे. बहलोलखान आणि राजा यांचें फार वांकडें असल्यामुळें बहलोलखानाच्या आईनें त्यांना बंकापुरांत प्रवेश करूं देण्याचें नाकारलें. रुस्तुमजमाची आणि मोंगलांची भेट झाली. परंतु अटी काय ठरल्या हें अजून कानावर आले नाहीं. ह्या भेटीनंतर त्यानें **नेताजीचा पाठलाग न करण्याबद्दल मोंगलांचें मन वळविलें.** 'पुढील प्रदेश अपरिचित सैन्याच्या हालचालींना धोक्याचा आहे यासाठीं आपणच नेताजींचा पाठलाग करतों' असें कपटानें मोंगलांना सांगून नेताजीला पळून जाण्यास त्यानें सवड दिली. या चकमकींत नेताजींचे ३०० घोडे पडले आणि त्याला स्वतःला जखमा झाल्या. रुस्तुम. राजापुरास इंग्रजांकरितां घर बांधीत होता त्याचें सामान आतां फुकट कुजत आहे... **रावजी अद्यापि परत आला नाहीं.**

इं. फॅ. भा. ११
पृ. २७० इ. } (९२८) { श. १५८५ चैत्र शु. १४
मद्रास कौन्सिल-सुरत इ. १६६३ एप्रील ११

हेन्री गॅरीचें गोव्याहून पत्र आलें. त्यावरून समजतें कीं, **फोचीन घेण्यांत यश आल्यामुळें डच लोक गर्वानें फुगून जाऊन** असें जाहीरपणानें बोलूं लागले आहेत कीं, 'आपण तेथें मुख्य सांठा आणि मोठें बंदर करणार !' (तेथून पुढें सिलोन-वर स्वारी करण्याचा त्याचा इरादा आहे.) तेथें आपल्या लोकांची मोठी वसाहत करण्याच्या इराद्यानें त्यांनीं १८००० बायकांना प्रजावाढीकरितां आणून दिलें आहे ! आम्ही कँडीच्या राजाला याबद्दल कळवून सावध करूं.

डागरजिस्टर १६६३
पृ. १४ इ. एप्रील ११ न्यू. } (९२९ = ९२३ अ) { श. १५८५ चैत्र शु. ४
इ. १६६३ एप्रील १

नागापट्टणच्या रेसिडेंटनें पाठविलेल्या ११ फेब्रुवारीचे पत्रांतील मजकूर—

**तंजावरच्या नायकानें** विजापूरच्या सेनापतीशीं तह केला आहे. तंजावरच्या नायकानें तीन लक्ष पार्डो घावे आणि **शहाजीच्या** अरणी व बंगलोर या किल्ल्यांवर सैन्य पाठवून हल्ला चढवावा अशा अटी ठरल्या.

इं. फॅ. भाग ११
पृ. २३६ इ. } (९३०) { श. १५८५ चैत्र शु. १५
राजापूर-गिफर्ड-सुरत इ. १६६३ एप्रील १२

**रावजी** पंडित परत आला आहे. आल्याबरोबर मला बोलावून, 'तहाचीं कलमें ठरविण्याकरिता कोणातरी इसमाला त्वरित पाठवून द्या' म्हणून तुम्हांला मी लिहावें

असें त्यानें मला सांगितलें. काल राजानें रावजीला स्वतः लिहिलेलें पत्र आलें [ A letter from the Rajah, *written by himself* to Raoji]. त्यांत शिवाजी ४०० निवडक लोकांसह जातीनें शाइस्तेखानाच्या तळा-वर गेला त्याची हकीकत आहे. कांहीं बहाणा करून तो सलाम करण्यासाठीं म्हणून शाइस्तेखानाच्या तंबूंत गेला. आणि लगेच पहारा साफ मारून, शाइस्तेखानाचा वडील मुलगा, त्याचा जांवई, त्याच्या १२ स्त्रिया, ४० मोठे दरकदार, मोंगलांचा सेनापति, इतक्यांचे प्राण हरण करून खुद्द शाइस्तेखानाला आपल्या स्वतःच्या हातानें जखम करून ( त्याला तो मेला असें वाटलें होतें. परंतु नंतर तो जिवंत आहे असें त्यानें ऐकलें.) त्याच्या आणखी ६ बायका, आणि दोन मुली, शिवाजीनें ठार केले. या सगळ्या भानगडींत त्याचे फक्त ६ सैनिक मेले आणि ४० जखमी झाले ! १० हजार घोडेस्वारांचा अधिपति राजा जसवंतसिंग समीप असून पाठलाग न करितां स्तब्ध राहिला. यावरून त्याचें यांत अंग होतें असें सगळ्यांना वाटतें. शिवाजी मात्र ' आपल्याला परमेश्वरानें हें कृत्य करण्याचा संदेश दिला' असें आपल्या लोकांना सांगतो.

खं. १५ ले. १०४ व ले. १०५ ) (९३१) { श. १५८५ चैत्र व. २-३
सु. १०६३ रमजान १५ व १६ } मिसिली फा. सी. { इ. १६६३ एप्रील १४-१५

सिताबखान नाइकवाडी किल्ले सतारा—हुदे. व मोक. वगैरे
जोगिंद्रगिरी गोसावी (निंब) याचे इनामास इरकील न करणें

हि. रे. क. १ } (९३२) { श. १५८५ चैत्र व. ४
पृ.११० इ.न्यू. } { इ. १६६३ एप्रील १६

पोर्तुगीज गव्ह.—शिवाजी

तुमचें पत्र आल्यामुळें पत्रव्यवहारास मोकळीक झाली. मी आतां एक वजनदार गृहस्थ उत्तरेस पाठवितों. त्याला तुमच्या व आमच्या संस्थानांत शक्य ते अविरोधी असे संबंध घडवून आणण्याचा अधिकार दिला आहे. पण हें बोलणें गुप्त राहिलें पाहिजे. तुमच्याविरुद्ध कोणत्याहि गोष्टीस त्यानें संमती देऊं नये असें आम्हीं त्यास सांगितलें आहे.

इं. फॅ. मा. ११ } (९३३) { श. १५८५ चैत्र व.५
पृ. २४७-४८, २५० इ. } पोरकद—सुरत { इ. १६६३ एप्रिल १७

डचांनीं किल्लन व काननूर घेऊन त्यांचा बंदोबस्त केला....येथील राजाशीहि त्यांनीं करार केला आहे. त्या अन्वयें या भागांत त्यांचेशिवाय दुसऱ्या कोणीच खरेदीविक्री करू नये असें ठरलें.......डचांनीं हा सर्वच किनारा आपल्या ताब्यांत घेतला. त्यांच्या परवान्याशिवाय कितीक जिनसांचा व्यापार करण्यास त्यांनीं मनाई केली आहे....मल-

चारी लोक अद्यापि त्यांच्याबद्दल संतुष्ट आहेत. कारण ते अंध आणि बुद्धिहीन आहेत. 'आपल्यामध्यें या डचांचा हात शिरकूं देण्यानें आपल्यावर केवढी गुलामगिरीची आपत्ति आपण ओढवून घेतली आहे' हें त्यांचे लक्षांत येत नाहीं. हे डच लोक लवकरच त्यांच्या खुद्द अन्नावर जकात बसविनील आणि डच भाषेशिवाय दुसरी कोणतीहि भाषा बोलूं देणार नाहींत!

हि. रे. क. ९ }
पृ. १११ इ. न्यू. } (९३४) { श. १५८५ चैत्र व.१३ { इ. १६६३ एप्रील २५

पोर्तुगीजाचा वकील शाइस्तेखानाकडे गेला तेव्हां त्याच्या हातीं दिलेल्या तालिमनाम्यांत हा मजकूर आहे. 'मजकडे थोड्या दिवसांपूर्वी राजा शिवाजीचें पत्र आलें होतें; त्यांत "तुम्हीं मोंगलांकडे असलामुमी जाऊं देत नाहीं तोंपर्यंत मी पोर्तुगीज मुलखास व किल्ल्यांस त्रास देणार नाहीं" असें म्हटलें आहे. त्याप्रमाणें तुम्हीं व्यवस्था करावी.'

फॅ. रे. सुरत भा. १०३ }
पृ. २७२ इ. } (९३५) राजापूर (गिफर्ड)-सुरत { श. १५८५ वैशाख शु. ९ { इ. १६६३ मे ५

शाइस्तेखानाचे मृत्यूची बातमी खोटी आहे....रुस्तुमजमाचा एक विश्वासू नोकर शाइस्तेखानाच्याच छावणीकडून आला आहे. तो आपण शाहिस्तेखानाला पाहिलें असें सांगतो. मात्र त्याला जखम जबर झाली आहे....विजापूरचा राजा बंकापुराहून परत विजापूरला गेला. येण्यापूर्वी तेथील स्नेप (शिवपा) नायकाचा पराजय करून खंडणीचे एकदम ४० हजार होन (पॅगोडा) देण्याचा त्याच्याकडून करार करून घेतला आहे. टेलर येथें न आला तर आपल्याला चैन पडणार नाहीं असें रावजी पंडित म्हणतो. त्याला तुम्ही पाठविणार कीं नाहीं याबद्दल तो वरचेवर विचारतो. खालीं गोव्याकडे जाण्याकरितां शिवाजी या मार्गानें येणार आहे अशी वदंता आहे. परंतु ह्या पावसाळ्यांत तो येणार नाहीं असें वाटतें.

पिसुर्लें. शिवाजी पृ. ७ }
इ.१६६३ जून २ (न्यू.) } (९३६) गोव्याचा व्हाइस.-शिवाजी { श. १५८५ वैशाख व. ११ { इ. १६६३ मे २३

आपण वेंगुर्ल्यास येऊन पोहोंचलों अशी बातमी नुकतीच येथें गोव्यांत येऊन पोहोंचली. आपलें मोंगलावरील विजयाबद्दल अभिनंदन करण्याकरितां येथून रामाजी शेणवी कोठारी यांस मुद्दाम मी पाठवीत आहे. त्याच रामाजी शेणव्यास आल्यावरोबर दुसऱ्या गोष्टीबद्दल तह करण्यास अधिकार देऊन पाठवीत आहे. आपल्याकडून लवकर उत्तराबद्दल वाट पाहात आहोंत. आपण जर तह केलात तर तो तह दोघांच्याहि फायद्याचा होणार आहे.

असें त्यानें मला सांगितलें. फाल राजानें रावजीला स्वतः लिहिलेलें प आलें [ A letter from the Rajah, *written by himself* to Raoji त्यांत शिवाजी ४०० निवडक लोकांसह अतांनें शाइस्तेखानाच्या त वर गेला त्याची हकीकत आहे. कांहीं बहाणा करून तो सलाम करण्यासाठीं म्ह शाइस्तेखानाच्या तंबूंत गेला. आणि लगेच पहारा साफ मारून, शाइस्तेखानाचा वडी मुलगा, त्याचा जांवई, त्याच्या १२ बिब्या, ४० मोठे दरकदार, मोंगलांचा सेनापति, इतरयां प्राण हरण करून खुद्द शाइस्तेखानाला आपल्या स्वतःच्या हातानें जखम करून (त्याल तो मेला असें वाटलें होतें. परंतु नंतर तो जिवंत आहे असें त्यानें ऐकलें.) त्याच्या आण ६ बायका, आणि दोन मुलगे, शिवाजीनें ठार केले. या सगळ्या भानगडींत त्या फक्त ६ सैनिक मेले आणि ४० जखमी झाले! १० हजार घोडेस्वारांचा अधिपति राज जसवंतसिंग समीप असून पाठलाग न करितां स्वस्थ राहिला. यावरून त्याचें यां अंग होतें असें सगळ्यांना वाटतें. शिवाजी मात्र 'आपल्याला परमेश्वरानें हें कृत्य करण्याचा संदेश दिला' असें आपल्या लोकांना सांगतो.

खं. १५ ले. १०४ व ले. १०५ } (९३१) { श. १५८५ चैत्र व. २-३
सु. १०६३ रमजान १५ व १६ } मिसिलीं फा. सी. { इ. १६६३ एप्रील १४-१५

सितावखान नाइकवाडी किल्ले सतारा—हुदे. व मोक. वगैरे
जोगिंद्रगिरी गोसावी (निंब) यांचे इनामास इस्कील न करणें

हि. रे. क. १ } (९३२) { श. १५८५ चैत्र व. ४
पृ.११० इ.न्यू. } { इ. १६६३ एप्रील १६

पोर्तुगीज गव्हे.—शिवाजी

तुमचें पत्र आल्यामुळें पत्रव्यवहारास मोकळीक झाली. मी आतां एक वजनदार गृहस्थ उत्तरेस पाठवितों. त्याला तुमच्या व आमच्या संस्थानांत शक्य ते अविरोधी असे संबंध घडवून आणण्याचा अधिकार दिला आहे. पण हें बोलणें गुप्त राहिलें पाहिजे. तुमच्याविरुद्ध कोणत्याहि गोष्टीस त्यानें संमती देऊं नये असें आम्हीं त्यास सांगितलें आहे.

इं. फॅ. भा. ११ } (९३३) { श. १५८५ चैत्र व. ५
पृ. २४७-४८, २५० इ. } पोरकद-सुरत { इ. १६६३ एप्रिल १७

डचांनीं किल्लन व कानन्नूर घेऊन त्यांचा बंदोबस्त केला....येथील राजांशींहि त्यांनीं करार केला आहे. त्या अन्वयें या भागांत त्यांचेशिवाय दुसऱ्या कोणांच खरेदीविक्री करूं नये असें ठरलें.... ...डचांनीं हा सर्वच किनारा आपल्या ताब्यांत घेतला. त्यांच्या परवानगीशिवाय कित्येक जिनसांचा व्यापार करण्यास त्यांनीं मनाई केली आहे....मल-

चारी लोक अथापि त्यांच्याबद्दल संतुष्ट आहेत. कारण ते अंध आणि बुद्धिहीन आहेत. ' आपल्यामध्ये या दर्यांना हात शिरकूं देण्यानें आपल्यावर केवढी गुलामगिरीची आपत्ति आपण ओढून घेतली आहे ' हें त्यांचे लक्षात येत नाहीं. हे च लोक लवकरच त्यांना सुद्ध अमावर जकात बसवितील आणि इच भाषेशिवाय दुसरी कोणतीहि भाषा बोलूं देणार नाहींत !

दि. रे. क्र. ९ }
पृ. १११ इ. न्यू. } (९३४) { श. १५८५ चैत्र व. १३
{ इ. १६६३ एप्रील २५

पोर्तुगीजांचा वकील शाइस्तेखानाकडे गेला तेव्हां त्याच्या हातीं दिलेल्या खलिमनाम्यांत हा मजकूर आहे. 'मजकडे थोड्या दिवसांपूर्वी राजा शिवाजीचें पत्र आलें होतें; त्यांत " तुम्हीं मोंगलाकडे अपसामुग्री जाऊं देत नाहीं तोंपर्यंत मी पोर्तुगीज मुलखास व किल्ल्यांस त्रास देणार नाहीं" असें म्हटलें आहे. त्याप्रमाणें तुम्ही व्यवस्था करावी.'

फॅ. रे. सुरत भा. १०३ }
पृ. २७२ इ. } (९३५)
राजापूर ( गिफर्ड )-सुरत { श. १५८५ वैशाख शु. ९
{ इ. १६६३ मे ५

शाइस्तेखानाचे मृत्यूची बातमी खोटी आहे.... रुस्तुमजमाचा एक विश्वासू नोकर शाइस्तेखानाच्याच छावणीकडून आला आहे. तो आपण शाइस्तेखानाला पाहिलें असें सांगतो. मात्र त्याला जखम जबर झाली आहे.... विजापूरचा राजा बंकापुराहून परत विजापूरला गेला. येण्यापूर्वी तेथील रवेन ( शिवप्पा ) नायकाचा पराजय करून खडणीचे एकदम ४० हजार होन ( पॅगोडा ) देण्याचा त्याच्याकडून करार करून घेतला आहे. टेलर येथें न आला तर आपल्याला चैन पडणार नाहीं असें रावजी पंडित म्हणतो. त्याला तुम्ही पाठविणार की नाहीं याबद्दल तो वरचेवर विचारतो. खालीं गोव्याकडे जाण्याकरितां शिवाजी या मार्गानें येणार आहे अशी वदंता आहे. परंतु या पावसाळ्यांत तो येणार नाहीं असें वाटतें.

पिसुर्लें. शिवाजी पृ. ७ }
इ.१६६३ जून २ (न्यू.) } (९३६)
गोव्याचा व्हाइस.-शिवाजी { श. १५८५ वैशाख व. ११
{ इ. १६६३ मे २३

आपण चेंगुल्यांस येऊन पोहोंचलां अशी बातमी नुकतीच येथें गोव्यांत येऊन पोहोंचली. आपलें मोंगलावरील विजयाबद्दल अभिनंदन करण्याकरितां येथून रामाजी शेणवी कोठारी यांस मुद्दाम मी पाठवीत आहे. त्याच रामाजी शेणव्यास आपल्याबरोबर दुसऱ्या गोष्टींबद्दल तह करण्यास अधिकार देऊन पाठवीत आहे. आपल्याकडून लवकर उत्तराबद्दल वाट पाहात आहोत. आपण जर तह केलात तर तो तह दोघांच्याहि फायद्याचा होणार आहे.

इं. फॅ. मा. ११ } (९३७) { श. १५८५ वैशाख व. १२
पृ. २३६-२३७ इ. } कोल्हापूर, गिफर्ड-सुरत { इ. १६६३ मे २४

तुमचें २३ एप्रील चें पत्र १२ मे ला पावलें. आपल्या आज्ञेप्रमाणें कोल्हापुरास जाण्याकरितां १६ ला निघून मी १९ ला पोंचलों. कोणीहि विरोध केला नाहीं. कारण रावजी ( शिवाजी ) राजाबरोबर कुडाळ, वेंगुर्लें या बाजूकडे गेला होता. आपणांकडून किंवा आपल्या शिपायांकडून त्रास दिला जाणार नाहीं; अशा तऱ्हेचे कौल सर्वांनाच शिवाजी देत आहे. अद्यापपर्यंत त्यानें हें वचन पाळलें आहे. परंतु परत येतांना काय करील याचा नियम नाहीं. त्याचे मनांत वेंगुर्ल्याच्या पुढें जावयाचें आहे किंवा कसें हाहि प्रश्नच आहे. वेंगुर्ल्याचे डच लोकांनीं कोचीनहून पुष्कळ द्रव्य आणिलें आहे असें त्यानें ऐकलेंच आहे. डचांना अद्यापपर्यंत त्यानें कोणताहि उपद्रव दिला नसून वखार त्यांच्याच हातीं आहे.

स्नेप ( शिवापा ) नाइकाची खंडणी ७ लाख होन ठरली......शाइस्तेखान-प्रकरणीं मृत्यूची संख्या- एक मुलगा मेला, दोन जखमी झाले, ६ बायका मरण पावल्या, ८ ना जखमा झाल्या आणि शाहिस्तेखानाच्या परिवारापैकीं आणखी ४० लोक मृत्यु पावले. या प्रसंगीं शिवाजीनेंच मुख्य कामगिरी केली. ४०० लोकांनिशीं तंबूंत शिरून मारतां आले तेवढ्या लोकांना मारून तो जसवंतसिंगाच्या अंगावरून बाहेर पडला. जसवंतसिंगानें त्याला विरोध मुळींच केला नाहीं. त्यावरून जसवंतसिंगाच्या सांगण्यावरूनच त्यानें हें केलें असें लोक बोलतात.

येथें राहण्यांत धोका असल्यामुळें गोव्याकडेच आम्ही जात आहोंत. कोणाला संशय येऊं नये म्हणून 'गेल्या वर्षी शिवाजीनें पकडलेल्या मुसलमानांपैकीं आम्ही आहोंत' असें सांगत व मुसलमानी पोषाख करून जात आहोंत. स्वसंरक्षणाकरितां चार शिपाईहि बरोबर घेतले आहेत. कारण मध्यंतरींच्या मुलखांतील सर्गें-डिचोलीपर्यंतचे सुभेदार शिवाजीचे भीतीनें पळून गेल्यामुळें सर्वत्र अंदाधुंदी माजली आहे....आम्हांला खर्चाकरितां पैसा पाठवावा आणि आम्ही सुरतेला कोणत्या मार्गानें यावें तें कळवावें.

इं. फॅ. मा. ११ } (९३८) { श. १५८५ वैशाख व. १४
पृ. २३८ इ. } सुरत-मद्रास. { इ. १६६३ मे २५

शाहिस्तेखानाच्या सैन्याचा सर्वांवर दळ पडला असतां शिवाजी स्वतः ४०० लोकांनिशीं खानाच्या तंबूंत शिरला व तेथें त्यानें ५० मानकरी ठार केले. खानाला जखमी केलें; १२ बायका मारल्या आणि ६ जखमी झाल्या, वडील मुलगा आणि जावई यांना ठार करून आणखी दोन मुलगे जखमी केले; खानाची मुलगी नेली आणि पुष्कळ खजिनाहि त्याचे हातीं आला. शिवाजीचे माणसांपैकीं फक्त ६ मृत्यु पावले आणि ४०

जखमी झाले. जसवंतसिंगाचे १० हजार घोडेस्वार कांहींहि विरोध न करितां फक्त पहात उभे राहिले. शाहिस्तेखानाचा कोटा आपल्या मार्गांतून काढला जावा अशी जसवंत-सिंगाच्या मनांत होतें असें म्हणतात. आणि प्रसंगी तें सिद्धीसहि गेलें असतें. परंतु खानावरील संकटाची कल्पना आल्यामुळें खानाच्या मुलानें एखाद्या सामान्य शिपाया-प्रमाणें खानाला उद्देशून म्हटलें, 'हे शिपाया, आपला जीव बचावण्याचें सोडून तूं तो चोरट्यात कां घालीत आहेस. हे लोक शोधीत आहेत ते तुला मारण्याकरितां शोधीत नसून शाहिस्तेखानालाच पहात आहेत.' या शब्दांमुळें चोरट्यास इसमच खान आहे असें समजून त्यांनी खानाला सोडून ते त्याच्या मुलावर तुटून पडले. आणि खान निसटला.

डाग रजिस्टर १६६३ } (९३९) { श. १५८५ ज्येष्ठ व. १
पृ. ३०५ इ. जून २१ न्यू. } { इ. १६६३ जून ११

सरदार शाइस्ताखान आणि राजा जीवनसिंग (जसवंतसिंग) हे वंडखोर शिवाजीशीं युद्ध करण्याच्या तयारीनें राहिलेले आहेत. याशिवाय सर्वत्र शांतता आहे. मात्र कांहीं रस्त्यावर चळवळ्या राजांचा त्रास होतो.

डाग रजिस्टर १६६३ } (९४०) { श. १५८५ ज्येष्ठ व. १
पृ. ३१५-१६ इ. जून २१ न्यू. } { इ. १६६३ जून ११

विजापूरचे राज्यांतील यादवी अद्यापि बंद झाली नाहीं. वेंगुर्ल्याचा रक्षक **लखम सावंत** हा किनाऱ्यालगतचे प्रदेशाचा राजा आहे. त्यानें पोर्तुगीजांच्या कांहीं खेड्यांत जाळपोळ केली. **शिवाजीहि** खालीं उतरणार अशी वदता असल्यामुळें रेसिडें-टनें एका व्यापाऱ्याच्या गलबतावर कंपनीचा माल आणवून तें गलबत बंदरांत तयारीनें ठेवण्याची तजवीज केली आहे. लखम सावंतानें त्या व्यापाऱ्यांना शिवाजीविरुद्ध बाजू स्वीकारण्याबद्दल सांगितलें. परंतु आमचेमुळें ते तटस्थ रहातील. कमांडर व्हर्सप्रीट आपली जहाजें घेऊन आल्यामुळें भीति कोहींशी कमी झाली आहे.

मध्यंतरीं शिवाजीनें एक लबाडीचा डाव टाकला. व्हर्सप्रीट आला हें कळतांच त्यानें एक लाघवी पत्र एका हेराबरोबर वेंगुर्ल्यास पाठविलें. 'आपल्या मनांत **वेंगुर्ला स्वतःच्या अमलाखालीं घेण्याचें आहे.** त्याबद्दल रेसिडेंटचें म्हणणें काय पडतें? आपल्याबद्दल भीति वाटून रेसिडेंटनें मालाच्या सुरक्षितपणाबद्दल खटपट चालविली आहे. त्यात 'तशी भीति बाळगूं नये. कारण आपल्या मनांत कोणत्याहि तऱ्हेनें वैरभाव नाहीं' [ पृ. ३१६ ]. अशा मजकुराचे पत्र पाठविण्यांत आम्हीं बेसावध रहावें एवढाच **शिवाजीचा** हेतु असल्यामुळें त्याच्याहि सदिच्छेबद्दल आभार मानून 'आम्हीं व्यापारी असल्यामुळें युद्धाचे बाबतींत सहा देतां येत नाहीं' असें उत्तर हेराचे हातीं पाठविलें.

इकडे **लखम सावंतानें** शिवाजीपासून मुलखाचें रक्षण करण्याकरितां म्हणून

दोन हजार होन आणि २४०० पौंड दारूगोळ्याची आमच्याकडे मागणी केली. परंतु त्याला फक्त ६०० पौंड दारूगोळा देण्यांत आला. ही मदत मिळाल्यावर त्यानें आम्हांला वेंगुर्ल्यांतून हाकून लावण्याकरितां **गोवेकरांशीं बोलणें लावलें.** विजापुरांतील एका अधिकाऱ्याचें (आमच्या) सरदाराला पत्र आलें. त्यावरून गोवेकर (सावंताला) अनुकूल असल्याचें कळतें. **लखम सावंत** इतरत्र उद्योगांत असल्यामुळें या बाबतींत पुढें कांहीं झालें नाहीं'.

वृद्ध राणी **मक्केच्या** यात्रेहून परत आली. ती वेंगुर्ल्याला ३० ऑगष्ट १६६२ (न्यू. स्टा. ९ सप्टें. १६६२) रोजी पोंचली. वाटेंत चाच्यांकडून तिला उपद्रव झाला. याबद्दल सविस्तर हकीकत आम्हीं सुरतेविषयीं लिहितांना कळविली आहे. राणीचा शरीररक्षक हकीम समद्या ४ गलबतें बरोबर घेऊन राणीला आणण्याकरितां १६६२ च्या मार्चांत निघून गेला होता. त्यानें रेसिडेंटला असें सांगितलें कीं, 'हे चांचे इंग्रज किंवा फ्रेंच लोक असावेत. त्यांनीं वरील रक्षक गलबतांपैकीं २ लुटलीं. तिसऱ्यामध्यें स्वतः समद्या होता त्याचा खडकापर्यंत पाठलाग केला. **कोंडवाऱ्याच्या** (?) इग्रजांचा आम्हीं पाठ घेतला असूनहि त्याचा उपयोग झाला नाहीं. इंग्रजांशीं किंवा डचांशीं आम्हांला कांहींच कर्तव्य नाहीं असें ते चांचे म्हणाले...... पुढें **मक्केच्या** सुभेदारानें कांहीं व्यत्यय आणिल्यामुळें राणीला एडनपर्यंत खुष्कीचाच प्रवास करावा लागला. आणि तेथून ती राहिलेल्या तिच्या गलबतांतून आली.... १६६१ पासून आपण (=हॉलंडमधील प्रेसिडेंट) पाठविलेला नजराणा व पत्र वेंगुर्ल्याला राहिलें होतें. त्याचें फारशीमध्यें भाषांतर करून तें पत्र व नजराणा राणीला सादर करण्यांत आला... त्यावर विनोदानें कांहीं बोलून वेंगुर्ल्याचा व्यापार उत्तरोत्तर वाढावा म्हणून वेंगुर्लें किंवा बंदर हें नांव बदलून त्याला इतउत्तर शहाबंदर म्हणावें असें तिनें फर्माविलें. ती डचांच्या बँटम नांवाच्या जहाजांतून गेली होती. परंतु भाड्याबद्दल कांहींच बोलणें झालें नाहीं.... राणी (न्यू स्टा. ११ सेप्टेंबर) १ सेप्टेंबरला दरबाराकडे निघून गेली-.... पोंचल्याचेंहि पत्र आलें... नंतर आम्हीं, मक्केच्या सुभेदाराचें व तिचें वांकडें आलें त्याबद्दल, मध्यस्थी करावी असेंहि तिनें लिहिलें. विजापूरचा राजा आपल्या आईला (=उपरिनिर्दिष्ट वृद्ध राणीला) घेऊन मोठ्या सैन्यासह **भद्राप्पा नाइकाकडून कांहीं खंडणी उकळण्याकरितां** म्हणून कानडावर स्वारी करण्याच्या तयारींत आहे. [पहा मागील अनुक्रम ९१५]

पोर्तुगीजांचा नवीन व्हाइसरॉय गोव्याला ३ डिसेंबर १६६२ (न्यू. स्टा.१३ डिसें.) ला येऊन पोंचला असून त्यानें सर्वत्र बंदोबस्त करण्यास सुरवात केली आहे. पूर्वीच्या व्हाइसरॉयानें सर्व अनास्था केल्यामुळें कोचीन हातचें गेलें, असें तेथील लोकांचें म्हणणें आहे. कानन्नूर डचांनीं घेतल्यानें त्याच्या तोंडचें पाणी पळालें आहे. मोंबासीकची परिस्थिति समाधानकारक नाहीं. मोंबासाचे रहिवाशांचा त्यांना खूप त्रास होत असतो.

परंतु आतां तह घडून आल्यामुळें व सैन्याच्या तयारीचा कांहींच उपयोग नसल्यामुळें आम्ही विशेष लिहीत नाहीं.

[ पृ. ३२० ] कानड्याचा राजा आणि मलाप्पा माल्लू यांनीं गव्हर्नरजनरलला पत्रें पाठविलीं आहेत. ४८ हजार पौंड दारू आणि ३ तोफा राजानें मागितल्या असून मलाप्पा माल्लूनें त्याबद्दल शिफारस केली आहे. पत्रांची भाषांतरें खालीं दिलीं आहेत....

' राजा भद्राप्पा नायक केळदीचा राजा-जॉन मेथ्युयकर, बटेव्हियाचा व्हाइसरॉय.

आमचा व तुमचा स्नेह आहे. त्याच्या दृढतेकरितां, आम्हांला गरज असल्यामुळें २००० सैन्य किंवा ४८ इ. पौंड दारू गोळा आणि ३६ पौंडी किंवा थोड्या मोठ्या अशा तीन तोफा पाठवाव्या-आमचे प्रधान मलाप्पा माल्लू-किंमतीची भरपाई करतील. सोबत मलाप्पा माल्लूचें पत्र आहे त्यावरून समजेल. '

मलाप्पा माल्लूचें १६६३ एप्रील १० चें ( न्यू. स्टा. एप्रील २० ) पत्र [ याच बाबतींत शिफारसवजा ]:—' स्नेहाची दृढता होईल. राजाला फारच जरूर आहे. तुम्हांला ही गोष्ट सहज करितां येईल. या प्रांतांतील कंपनीचें काम असेल तें आम्ही करूं ' वगैरे.

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ. मा. ११ <br> पृ. २४१ इ. | (९४१) <br> कारवार-सुरत. | श. १५८५ ज्येष्ठ व. ५ <br> इ. १६६३ जून १५ |

कांहीं दिवसापूर्वी शिवाजी इकडे वांद्यापर्यंत आला आणि सुमारें मिर्जी (मिरजन) पर्यंतचा इकडील प्रदेश काबीज करण्याचा त्याचा विचार होता असें समजलें. परंतु मोंगलांकडून जोराचा दाब बसल्यामुळें या बाजूचें सैन्य त्यानें काढून नेलें असावें असें दिसतें. पावसाळा संपल्यावर तो फिरून इकडे वळेल किंवा कसें हें निश्चित सांगतां येत नाहीं. परंतु लोकांना मात्र तशी भीति वाटत आहे.

| | | |
|---|---|---|
| ख. १५ ले. १०६ <br> सु. १०६४ जिल्काद १९ | (९४२) <br> खुर्दखत फा. व सं. | श. १५८५ ज्येष्ठ व. ६ <br> इ. १६६३ जून १६ |

अजर. अबाजी राजे घाटे—ता हुदे व मोक. मौ. निगडी किले सातारा.

जोगिंद्रगिरी यास निगडी येथें १५ बिघे जमीन इनाम असून संन्याशासाठीं अन्नछत्र चालतें. तरी त्यास कोणीहि हरकत करूं नये.

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ मा. ११ <br> पृ. २४१ इ. | (९४३) | श. १५८५ ज्येष्ठ वद्य १२ <br> इ. १६६३ जून २२ |

गोवा (गिफर्ड, फेरंड)————सुरत.

रावजी पंडिताकडून अद्यापि उत्तर आलें नाहीं. वेंगुर्ल्याला २००० सैन्य ठेवून

**शिवाजी** तेथून **परत फिरला** एवढीच शिवाजीबद्दलची बातमी आहे. शास्ताखान नक्की जिवंत असून त्यानें **शिवाजीचे** पुष्कळ लोक मारल्यामुळें **शिवाजी** एकाएकीं परत गेला.

डाग रजिस्टर इ. १६६३ पृ. ४५५ इ. जुलै १३ न्यू. } (९४४) मच्छलीपट्टणचें पत्र. { श. १५८५ आषाढ शु. ९ इ. १६६३ जुलै ३

सुरत (१३ जून) व **मच्छलीपट्टण** (१३ जुलै) या दोनहि ठिकाणांहून अशी बातमी आली कीं, आमची **वेंगुर्ल्याची** रहाती इमारत (वखार) बंडखोर **शिवाजीनें लुटली** आणि लोक पळून गेले.

इं. फॅ. मा. ११ पृ. २५३ इ. } (९४५) कायाल-सुरत. { श. १५८५ आषाढ शु. १० इ. १६६३ जुलै ४

पत्र पाठविण्याचे इतर मार्ग बंद झाल्यामुळें हें पत्र मद्रासकडून पाठविलें आहे. आतांपर्यंत **विजापूरचा आदिलशहा आणि मदुरेचा नायक यांचेमध्यें युद्धें** चालू असल्यामुळें हा मार्ग बंद होता.

इ. फॅ. मा. ११ पृ. २४२-३ इ. } (९४६) गोवा (गिफर्ड)-सुरत. { श. १५८५ आषाढ वद ११ इ. १६६३ जुलै २०

फोंड्याचा सुभेदार व कुडाळचे देसाई यांनीं आपलीं व लहानसान राजांचीं सैन्यें एकत्र करून, **शिवाजीला राजापूर व खारेपाटण यांतून काढून लावावें** असें आदिलशहानें फर्माविल्याचें आम्हांला कळलें आहे. राजापूर व खारेपाटण हीं दोनहि शहरें आतां आदिलशहानें महमदखानाला ( खानखाना उर्फ इखलासखानाचा वडील मुलगा ) दिलीं आहेत. त्यामुळें तीं आपल्या ताब्यांत घेण्याकरितां त्यानेंहि आपल्या सैन्यास विजापुराहून चाल करून येण्यास कळविलें आहे. आदिलशहानें **दाभोळ व चिपळूण**, अफजलखानचा मुलगा **फाजलखान** याला दिलीं आहेत. फाजलखानावर आदिलशहाची चांगली कृपा आहे. शिवाजीलाहि 'बऱ्या बोलानें हीं शहरें सोडून घावीं नाहीं तर प्रायश्चित्त भोगावें' असें त्यानें लिहिलें आहे.

**मोंगल महाडला आला आहे** आणि **शिवाजी जावळीवर** आहे असें बोलतात. परंतु मोंगलांची बातमी आम्हांला खरी वाटत नाहीं. मोंगलांनीं **नेताजीचा वध** केल्याचीहि बातमी कितपत खरी आहे याची शंकाच आहे....**रुस्तुमजमा** सांगितलेल्या कामगिरीवरून हुकेरीला आला असतां, तें त्याचेंच शहर असून, विजापूरच्या राजाच्या हुकमानें त्याला प्रवेश मिळाला नाहीं ! ( हें सर्व सांगणारा ) जासूद चंदपुराहून निघण्यापूर्वी, **बहलोलखान आणि शहाजी यांना बेड्या घातलेल्या**

आपण आपल्या डोळ्यांनीं पाहिल्या असें सांगतो. शहाजीच्या बेड्या दोन दिवसांनीं काढल्या गेल्या. आतां तो सुलतानाजवळ राहिला असून त्याची अद्यापि नेमणूक झाली नाहीं. बहलोलखानाच्या आईनें सुलतानाला बंकापुरांत येऊं दिलें नाहीं त्यावद्दल बहलोलखानानें माफी मागावी म्हणून आदिलशहानें शहाजीला त्याचेकडे पाठविलें होतें. आतां बहलोलखानाला माफी मागण्याशिवाय गत्यंतर नव्हतें. कारण कर्नाटकांत सर्वत्र विजय प्राप्त झाल्यामुळें विजापूरचे राज्यांत शांतता नांदत होती. शेवटीं शहाजींचे सांगण्याप्रमाणें बहलोलखान सुलतानाकडे येण्यास तयार झाला. पण शहाजीनें आपल्याबरोबर आलें पाहिजे अशी त्यानें अट घातली. त्याप्रमाणें दोघेजण बरोबर गेले असतां सुलतानानें दोघांनाहि पकडलें.

सदरप्रमाणेंच त्यानें सिद्दी जोहारचा जांवई सिद्दी मसाउद, व जोहरचा वडील मुलगा यांनाहि बोलाविलें आहे. 'आपल्या बापाला मारणाऱ्यावर आम्हांला विश्वास ठेवतां येत नाहीं' असा त्यांनीं उलट जबाब दिला. त्यास 'यापुढें गैरविश्वास करण्याचें कारण नाहीं. तुमच्या बापाच्या मृत्यूला कारणीभूत झालेल्या बहलोलखानाला नुकताच कैद केला आहे. असें आदिलशहानें कळविलें.

| | | |
|---|---|---|
| डागरजिस्टर १६६३<br>पृ. ३६५ इ. जुलै ३१ न्यू. | (९४७) | श. १५८५ आषाढ व. १२<br>इ. १६६३ जुलै २१ |

गव्हर्नर पिटर्चे ओव्याचा मुख्याधिकारी यास पत्र (२३ मार्च १६६९ चें) आलें. त्यांतील मजकूरः—३ लक्ष पार्डो तंजावरच्या नायकाकडून घेण्याचा करार ज्याच्याशीं झाला तो विजापूरचा सेनापती (पहा ले. ११ एप्रील १६६३) मृत्यु पावला; आणि त्याचा मुलगा सेनापती झाला; मदुरेच्या नायकानें ६ लक्ष द्यावे व तंजावरच्या नायकानें ३ लक्ष पार्डो द्यावे असे एकूण ९ लक्ष पार्डो, विजापूरच्या सेनापतीला मिळावयाचे होते; तेगनापट्टण आणि जिंजी येथील किल्लेदारांमध्यें वैमनस्य उत्पन्न झालें असून जिंजीहून २०० घोडेस्वार आणि ४०० पायदळ निघून त्यांनीं तेगनापट्टण लुटलें. परंतु डच कंपनीची वखार व कंपनीशीं व्यापार करणाऱ्या व्यापाऱ्यांचीं घरें सुरक्षित राहिलीं आहेत.

वरील नायकांनीं ठरल्याप्रमाणें रकमा देण्यांत दिरंगाई चालविली आहे असें पाहून "विजापुरी सेनापतीनें उलट फिरून शहाजीशीं संगनमत केलें आहे. तेगनापट्टण, पोर्टोनोव्हो इत्यादि स्थळें शहाजीला देऊन दोघांनीं मिळून उभय नायकांचें, विशेषतः मदुरेच्या नायकाचें मांडलिकत्व करावें असें ठरलें आहे. यामुळें नायकांशीं झालेला पूर्वीचा करार मोडला आहे. मदुरा-नायकाचा विकट आणि महत्त्वाचा किल्ला जो त्रिचनापल्ली त्याच्यावर प्रथम हल्ला झाला. मदुरा नायकानें धैर्यानें प्रतिकार केला. परंतु तंजावर नायक स्तब्ध राहिला. एवढेंच नव्हे तर त्यानें मधून मधून विजापुरी सैन्याला ४०।५० हजार पार्डोचा खुराक चारला! मध्यंतरीं तेगनापट्टणच्या डच रेसिडेंटला स्वतःचे रक्षणाची जय्यत तयारी करण्याचा हुकूम मिळाल्यामुळें मूल्यवान वस्तूंच्या सुरक्षिततेची व्यवस्था त्यानें केली.

पिसुर्लें. शिवाजी पृ. ७ } (९४८) { श. १५८५ आषाढ व. १४
१६६३ आगष्ट २ न्यू. } { इ. १६६३ जुलै २३

गोव्याचा व्हाइसरॉय—— रावजी सोमनाथ पंडित

आपल्याकडील पत्र आतां मिळालें. त्यावरून कुडाळ प्रांताच्या सुभेदारांवर शिवाजी राजांच्याकडून आपली नेमणूक झाली असें कळतें. शिवाजी राजे कुडाळ बंदरीं येऊन पोहोंचल्याबद्दल येथें बातमी कळतांच रामजी शेणवी कोठारी यांस नजराणा देऊन त्यांच्याकडे मी पाठविलें. परंतु शिवाजीराजे उत्तरेकडे जाण्यास निघाल्यामुळें तो तसाच परत आला आहे.

[ शिवाजीनें नेमलेला पहिला कुडाळचा सुभेदार रावजी सोमनाथ पंडित हा असून त्यानें, आपण सुभेदार नेमला गेल्याचें पोर्तुगीज गव्हर्नरास जुलै अखेर कळविलें होतें. वरील पत्र त्या पत्राचें उत्तर होय.]

गो. इ. सा. ले. ३ } (९४९) { श. १५८५ श्रावण व. १
सु. १०६४ ? } मिसेली फा. मज. { इ. १६६३ आगष्ट ९ ?

अज. दि. मामले गोवा—ता गावकरानी मो. केरी तपे अंतरूज माम. मज.

सु. १०६३ मोहरम १४ चा फर्मान आला आहे. त्याप्रमाणें नारायण जोसी यांस याचे २७ होन आदा करीत जाणें.

लेटर बुक मा. ३ } (९५०) { श. १५८५ श्रावण व. २
पृ २९२ इ. } कंपनी सुरत, प्रेसिडेंट { इ. १६६३ आगष्ट १०

शिवाजीनें गिफर्ड टेलर प्रभृति लोकांना कैद करून ठेविले आहे. त्यांची सुटका होण्याचा मार्ग तुम्हीं कांहीं काढलाच असेल. नसेल तर तुम्हीं त्या बाबतींत विशेष लक्ष घालावें अशी आमची शिफारस आहे.

गो. इ. सा. ले. ४ जु. ४० } (९५१) { श. १५८५ श्रावण व. ६
सु. १०६४ मोहरम २० } मिसेली फा. मज. सी. { इ. १६६३ आगष्ट १४

!——— अमलदार मौ. केरी तर्पे अंतरूज मामले गोवा

नारायण कृष्ण जोसी याचे २७ होन चालविणें.

इं. फॅ. मा. ११ } (९५२) { श. १५८५ भाद्रपद शु. ३
पृ. २४५-४६६. } कारवार-सुरत. { इ. १६६३ आगष्ट २५

कारवारच्या सुभेदाराच्या त्रासदायक वागणुकीची हकीकत परस्पर कानावर जाऊन आणि आम्हींहि केलेल्या तक्रारी ऐकून विजापूरचा आदिलशहा व रुस्तुमजमा यांनीं फर्मानें

वगैरे काढून सर्व तक्रारी दूर केल्या; अपराधी सुभेदारांना शासन केलें व आम्हांलाहि आश्वासनें दिलीं. न्याय्य जकाती घेण्याबद्दल रुस्तुमजमानें कारवार, शिवेश्वर, व कुडेरा येथील सुभेदारांना निरनिराळे हुकूम पाठविले. तेव्हां या गोष्टींचा विचार करून हुबळीला जाऊन राहिलों होतों तेथून निघून रुस्तुमजमाच्या अधिकाऱ्याबरोबर परत कारवारला आलों.

| | | |
|---|---|---|
| खं. २० ले. ११२<br>सु. १०६४ सफर ११ | (९५३)<br>मिसेली. | श. १५८५ भाद्र. शु. १२<br>इ. १६६३ सप्टें. ४ |

अज. दि. पर. वाई——ता मोक. देहाय पर. वाई.

नारायण गोपीनाथभट चित्राव यांस पसरणी, एकसर, उझरडे, या गांवांत जमीन इनाम चालत असल्याबद्दल सु. १०६२ जिल्हेज १४ चें खुर्दखत आहे. तरी ती चालविणें.

| | | |
|---|---|---|
| स. पु. ११५<br>श. रवल १ | (९५४)<br>महजर | श. १५८५ आश्वीन शु. २<br>इ. १६६३ सप्टें. २३ |

पार येथें नेताजी पालकर सरनोबत सुभेदार याचे विद्यमानें

अग्रवादी:—साउजी बिन सूर्याजी मोहिते
पश्चिम वादी:—नेताजी बिन राणोजी मोहिते
{ मु. तळबीड-चे मोकदम

तळबीडच्या मोकदमी बाबत तंटा चालू असतां गोतसभेनें निवाडा केला कीं, प्रत्येकानें बरोबरीच्या मानपानासह निमी मोकदमी घ्यावी. साउजीस देशमुखी मात्र नाहीं.

| | | |
|---|---|---|
| शि. घ. ले. ३८३<br>सु. १०६४ रवल १ | (९५५)<br>फा. मु व सी. | श. १५८५ आश्वीन शु. २<br>इ. १६६३ सप्टें. २३ |

**नेताजी पालकर सरनोबत**—समस्त गोत हमशाई देहाय व लहान थोर बलुते वगैरे कसबे तळबीड.

साउजी व नेतोजी मोहिते मोकदमीच्या निवाड्याबद्दल आमचेकडे आलें. दोघास निमेनीम वाटून दिल्हे आहे. बराबरी निमे करून वाटून देणें. साउजीस देशमुखीची मात्र निसबती नाहीं.

| | | |
|---|---|---|
| शि. घ. ले. ३८४<br>सु. १०६४ रवल ५ | (९५६)<br>कौल फा. मु. व सी. | श. १५८५ आश्वीन शु. ६<br>इ. १६६३ सप्टें. २७ |

**नेतोजी पालकर सरनोबत**——नेतोजी मोहिते कसबे तळबीड.

मौजे येलफल येथें तुम्ही आपले कबिलेनसीं रहात आहां तरी सुखें राहणें. आमचे तर्फेनें येक जरा तसवीस लागणार नाहीं.

डागरजिस्टर १६६३ } (२५७) { श. १५८५ आश्वीन शु.९
पृ. ४५२ इ. जास्टी १० न्यू. } { इ. १६६३ सप्टें. ३०

( ५ व १२ जूनच्या ) सुरतेच्या पत्राला उत्तर——

"कोचीनशी संबंध चांगले राखावे; कारण, पूर्वीप्रमाणें आतां पोर्तुगीजांवर विश्वास ठेवतां येत नाहीं. व वेंगुर्ल्याचे वखारीसभोंवतालची मातीची भिंत दगडी करण्याचें काम तूर्त पुढें टाकावें. शिवाय...लीरडाम गलबतावर ३० पोर्तुगीज कैदी आहेत. ते वेंगुर्ल्याला उतरवून मुक्त करावे." असा हुकूम वेंगुर्ल्यास पाठविणें.

शिवाजी व कानडा प्रांत यांचे उल्लेख आहेत. मद्राप्पा नायकानें तोफा व दारुगोळा मागितला होता; परंतु त्याबद्दल सोबतगूक करून घेतल्याचें यांत नमूद आहे. [ मागें पहा. अनुक्रमांक ९४० ]

इं. फॅ. मा. ११ } (९५८) { श. १५८५ आश्वीन व. २
पृ. २५७ इ. } शिवाजीवर इंग्रजांचा राग { इ. १६६३ आक्टोबर ९

स्वाली मरीन— रँडॉल्फ टेलरला गलबताचा मुख्य नेमतांना दिलेल्या सूचना.

पुरेसें सैन्य आणि पाहिजे तितका वेळ आम्हांला न मिळाल्यामुळेंच शिवाजीचें पारिपत्य करण्याचें ( तुमच्या लुटीनेंतर ) इतके दिवस राहून गेलें आहे. परंतु थोडा वेळ आम्ही थांबलों याचा अर्थ आम्हीं त्याचा अपराध माफ केला असें होत नाहीं. हातीं साधनें येतांच त्याचा सूड उगविण्याचा आम्हीं पक्का निश्चय केला आहे. आजपर्यंत मात्र त्या कामाकरितां लागणारें मनुष्यबळ आणि गलबतें हाताशीं नसल्यामुळें आम्ही कांहीं करूं शकलों नाहीं. पण धीर धरा !

[ फॅ. रे. सुरत मा. २ पृ. १६४ ] गेल्या वर्षी मोंगली सैन्यानें सेनापतीला पेंचांत धरल्यामुळें शिवाजीला परत फिरावें लागलें. नाहीं तर तो कारवारला खास गेला असता.

डागरजिस्टर १६६३ } (९५९) { श. १५८५ कार्तिक शु. १४
पृ. ५४३-५ इ. नोव्हें. १४ न्यू. } { इ. १६६३ नोव्हें. ४

महाबंडखोर शिवाजी ह्या मुलखातील सर्व अस्वस्थतेच्या मुळाशीं आहे. ४००० घोडदळ आणि १०,००० पायदळ घेऊन तो २३ मे रोजीं कुडाळप्रांतीं आला. यामुळें वेंगुर्ल्याचे लोक भिऊन पळाले. लखम सावंताचा वकील अगोदर आलाच आहे. त्यानें कंपनीच्या वखारीकडे एक ब्राह्मण पाठवून शिवाजी आल्याचें कळविलें. आमचे सर्व लोक, गव्हर्नर आणि वेंगुर्ल्याचे सर्व व्यापारी यांनीं वखारींत फक्त दोन तीन च लोक संरक्षणाकरितां ठेऊन सावंत रहातो त्या ठिकाणीं ( वाडीला ) येऊन रहावें असेंहि त्यानें कळविलें. हा आत्मघाताचा मार्ग आहे हें ओळखून रेसिडेंटनें ही गोष्ट नाकबूल केली.

कारण रेसिडेन्सीवर हल्ला करण्याचा लखम सावंताचा बेत आहे अशी कुणकुण आधींच लागली होती याकरितां असा हल्ला झाल्यास तो परतविण्याची त्यांनीं जय्यत तयारी करून ठेवली.

यानंतर विजापूरच्या सुलतानानें आपल्यावर मेहेरबान होऊन कुडाळप्रांत बहाल केला आणि आपण त्या प्रांताचा ताबा घेण्याकरितां आलों यावद्दल खुद्द शिवाजीकडून पत्रें आलीं. आपलें स्वागत करण्याकरितां डचांनीं प्रतिनिधि पाठवावा असेंहि त्यानें सुचविलें. रेसिडेंटनें हें पत्र सुभेदार व व्यापारी यांना दाखविलें. हेतु हा कीं पळापळी थांबावी. मध्यंतरीं शहर रक्षणाची योग्य खबरदारी घेऊन शिवाजीकडे अभिनंदनपत्र व नजराणा पाठविण्याचें त्यानें ठरविलें. पंडित व नेतोजी यांनाहीं पत्रें पाठविण्यांत आलीं. शिवाजीच्या व पंडिताच्या पत्राचें उत्तर व नेलेला नजराणा परत घेऊन बाबा सेणे ( सेणवी ) आला. " विजापूरच्या राणीला, आपल्या मुलखांतून शिवाजी नजराणे घेतो याचें वैषम्य वाटूं नये म्हणून शिवाजी तो स्वीकारीत नाहीं. " असें पंडितानें लिहिलें होतें. शिवाजीजवळ पुष्कळ विकाऊ कापड व माल पडून राहिला असल्यामुळें त्याला कांहीं रकमेची जरूर आहे असाहि निरोप तो घेऊन आला. यावर नजराणा हलक्या किंमतीचा पाठविला गेला अशी शंका घेऊन रेसिडेंटनें २०० पॅगोडा ( आबाशाही ) पर्यंत ( वाढवून ) पाठविला तेव्हां तो शिवाजीनें घेतला. त्यानंतर ८ जूनला बालाजी, शिवाजीचा हेर, वेंगुर्ल्यांतील व्यापाऱ्यांकरितां परवाना पत्रें घेऊन आला. अगदीं पहिलीं पत्रें यानेंच आणिलीं होतीं. अशा तऱ्हेनें बोलावण्यामध्यें पैसे उकळण्याचाच त्याचा उद्देश असेल असें समजून व्यापाऱ्यांनीं जाण्याचें नाकारलें. बालाजी धमकी देऊन आग्रह करूं लागला. आमचे लोकांनीं मध्यस्थी करून त्याचें मन वळविण्याचा प्रयत्न केला. त्याचेंहि तो ऐकेना. निर्लज्जपणे तो आग्रह धरून बसला. पंडिताच्या चिटणीसाचें पत्र त्यानें बाबाजी सेणव्याला आणिलें होतें. त्याला तो म्हणूं लागला "पुनः तुम्ही केव्हां तरी तिकडे यालच कीं नाहीं ! " इतक्या निकरावर प्रकरण आल्यामुळें खुद्द पंडिताचें पत्र येईपर्यंत बाबाजीला पाठवूं नये असें रेसिडेंटनें ठरविलें. बालाजीच्या तोंडी निरोपावर व्यापाऱ्यांनीं पैसा देऊं नये असेंहि त्यानें व्यापाऱ्यांना सांगितलें. बालाजी अशा तऱ्हेनें खट्टू होऊन कुडाळला परत गेला.

त्यावर पंडितानें पत्र ( बाबाजी सेणव्याला बोलावणें ) आलें. आणि शिवाजी व पंडित यांच्या लबाडीच्या व स्वार्थी वागणुकीबद्दलची हकीकत कित्येकांकडून सांगण्यांत आल्यामुळें हें आमंत्रण रेसिडेंटनें नाकारलें असतें, परंतु रागरंग कसा काय आहे तें पहाण्याकरितां अखेरीस जाण्याचें ठरलें.

बालाजी कुडाळहून परत आला होता त्याला वाटेंत बाबाजी सेणवी भेटला. बाबाजीला मागे परतण्याबद्दल तो सांगूं लागला. परंतु बाबाजी तसाच पुढें जाऊन पंडिताला

भेटला व त्याचेकडून दोस्तीचीं पत्रें घेऊन आला. खरेदीचा बाजार भरभराटीस यावा त्यासाठीं डचांनीं मदत करावी असें त्यानें लिहिलें. घटेन्द्रियाचे अधिकाऱ्याच्या नांवाचा उल्लेख करून रेसिडेंटनेंहि ( स्नेहाचीं ) उलट पत्रें लिहिलीं. मध्यंतरीं बाळाजीनेंहि व्यापारी वर्गावर जबर खंडणीचे आंकडे लादले. परंतु व्यापाराचे परवाने नवे करण्याबद्दल सांगताच तो अडला. पंडिताच्या संमतीनेंच बाळाजीनें असें केलें असें सहजच वाटतें. पंडित मात्र आपल्या कानावर हात ठेवितो. इकडील मोठ्या लोकांची ही चालच आहे कीं आपल्या हस्तकांकडून निर्लज्जपणें जुलूम करावा; व उघडकीस येतांच आपण अज्ञानाचा बहाणा करावा!

ह्या ( कुडाळ ) प्रांतीं सुव्यवस्था करून शिवाजी आपल्या मुलखांत गेला. तेथून मोंगली सेनापति शाइस्तेखान याच्यावर त्यानें विश्वासघातानें छापा घातला. त्याचे दोन मुलगे व जनान्यापैकीं कित्येक बायका प्राणास मुकल्या. राजापूरच्या उत्तरेकडील प्रजाजन त्यानें लुटले.

एका व्यापाऱ्याच्या सांगण्यावरून असें समजतें कीं, शिवाजीनें वेंगुर्ल्याला वेढा घातल्याचें ऐकून ( हें खरें नव्हतेंच ) गोव्याच्या पोर्तुगीजांना आनंद झाला. मोठे नजराणे करून शिवाजीनें डचांना वेंगुर्ल्यातून हाकून लावावें असें त्यांनीं बोलणें लाविलें व १५००० होनांचें आमिष दाखविलें. परंतु डचांचें शौर्य व त्यांचेपासून होणारा फायदा यांकडे लक्ष देऊन शिवाजीनें डचांचीच बाजू घेतली. तेव्हां गोव्याच्या व्हाइसरॉयला भय उत्पन्न होऊन त्यानें गोव्याच्या सरहद्दीवर सैन्य पाठविलें. परंतु विजापूरच्या वकिलाचें आश्वासनपत्र आलें व शिवाजीनेंहि गौरवाचें पत्र लिहिलें; त्यांवरून त्याला धीर येऊन रामाजी कोठारीबरोबर दोस्तीचें पत्र व ४३००० असरफींचा नजराणा त्यानें शिवाजीकडे पाठविला. परंतु शिवाजी निघून गेल्याचें वाटेतच कळून कोठारी परत फिरला. स्वराज्यरक्षणाकरितां गोवा व दंडाराजपुरी डचांच्या मदतीनें जिंकण्याची शिवाजीची तयारी आहे अशी वदंता आहे. शिवाय बनिये व्यापारी काशीबा व संतुबा शेणवी यांना दूर करून कंपनीची खरेदी करणारा व्यापारी आपणच व्हावें असेंहि तो ठरवीत आहे. [रामोजी शेणवी कोठारी 'शिवाजीनें मोंगलांविरुद्ध मिळविलेल्या जयाबद्दल अभिनंदन करण्यासाठीं पाठविला. श्री. पिसुर्लेकर शि. च. प्र. पृ. १७८-१७९]

कुडाळचा तात्रा विजापुरकरांनीं आपल्याला दिला असें पत्र शिवाजीनें रेसिडेंटला पाठविलें होतें. परंतु सुलतानानें तसा हुकूम दिला नसून बातमी अशी आहे कीं, फोंड्याला असणारा सुभेदार तुणबेग (?) काल्टो यानें लखम सावंत, केशव नाईक, राम शेणवी आणि चंदाराणा या चार दमायांच्या साहाय्यानें शिवाजीला कुडाळांतून पळवून लावावें असा विजापूरच्या राजाचा हुकूम आहे. या सर्वांना शिवाजीविरुद्ध उठविण्याचें

काम पोर्तुगीजांनीं केलें. (नाहींतर) सरसुभेदार आणि देसाई यांचें एकमत होण्यासारखें परस्परांत बरें नव्हतें.

लखम सावंत वाडींतून ६०० शिपायांनिशीं बाहेर पडून बाळाघाटाच्या पायथ्याशीं जंगलांत राहतो. विजापूरच्या सुलतान बंकापूरला आहे. त्रिंबक काळोला अपयश आल्यास सुलतान शिवाजीवर दुसरें मोठें सैन्य पाठवील. बडी साहेबिणी (म्हातारी राणी) चें रेसिडेंटास आलेल्या पत्राचें शब्दशः भाषांतर करून दिलें आहे.

हकीम समदा वेंगुर्ल्याचा अधिकारी झाला आहे. परंतु तो चिक्कू, संशयी व उद्दाम असून त्यानें वेंगुर्ल्याला दारूड्या ...पण सुभेदार नेमिला आहे. तो स्वतःचे अपराध छपविण्याकरितां आपल्या प्रजेविरुद्ध तक्रारी करितो. यामुळें सर्वत्र असंतोष माजला आहे. कॅडेवारचा (कारवार ?) सरसुभेदार व महमदखान हे रेसिडेंटशीं चांगलें वागतात. रयत लोक प्रत्यहीं वरघाटाकडे पुष्कळ माल पाठवितात व शिवाजीहि तो बिनहरकत जाऊं देतो म्हणून रेसिडेंट खूप माल पाठवितो........ पंडितानें आमच्या एका माणसाला व्यापाऱ्यांचे बरोबर जाऊं यावें अशा तऱ्हेचा परवाना मागविला आहे.

[पृ. ५४७] शिवाजीनें कैद केलेले तीन इंग्रज एकदांचे पंडितानें मुक्त केले आहेत. त्यांना कांहीं दिवस राजापुरांत ठेविलें होतें. परंतु सुरतेहून पत्रें आल्यावर ते युक्तीनें गोव्याला निसटून गेले आहेत. आणि त्यांनीं तेथून राजापूरच्या आमच्या नुकसानीबद्दल धमक्या देऊन सक्तीचा तगादा लाविला आहे. गेल्या पावसाळ्यांत अंजदिवला उतरलेल्या इंग्रजांपैकीं दोनशें मृत्युमुखीं पडले आणि बाकीचे बहुतेक आजारी आहेत. इंग्रजांनीं अंजदीव ताब्यांत घेतलें तेव्हां नवा सुभेदार महमदखान यानें त्यांना विरोध केला नाहीं म्हणून, कारवारचा मुख्य रुस्तुमजमा यानें त्याला कैद केलें आहे.

| | | |
|---|---|---|
| सा. ले. १५६, १६० <br> सु. १०६४ रबर १४ | (९६०) <br> मिसळी न. | श. १५८५ कार्तिक शु. १५ <br> इ. १६६३ नोव्हें. ५ |

अज दि. पर. सुभे—ता. मोक. व माहा. सेदिये का सुभे.

छ ७ रबरच्या खुर्दखतांत हाली मोकासा अर्जानी आला व महादजी गोसाव्यास गणो तिमाजीचे इनाम यांचें असें लिहिलें आहे त्याप्रमाणें करणें.

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ भा. ११ <br> पृ. २६० इ. | (९६१) | श. १५८५ कार्तिक शु. १५ <br> इ. १६६३ नोव्हें. ५ |

कारवार, रँडॉल्फ टेलर (व्हायल मर्चंट गळवत)— सुरत

राजापूरला आल्यावर एक मनियाला रावजी पंडिताकडे पाठविलें होतें. दुसऱ्या दिवशीं त्याच्या बरोबर रावजीचे दोन हवालदार बोलणें करण्यासाठीं आले. राजापूरच्या नुकसान-भरपाईबद्दल निमें रक्कम रोख देऊन राहिलेली जकातींतून वळती करून

घेण्याबद्दलचें पूर्वीचें बोलणें आतां फिरवून, सर्वच रकम जकातींतून वसूल करण्याबद्द ते बोलूं लागले तेव्हां मीं त्यांना झिडकारलें. सहानुभूतीचे अभावीं राजापूरला माल वगै न ठेवितां पुढच्या मुक्कामाकडे निघालों. **शिवाजीच्या भीतीमुळें वेंगुर्लें ओस पडल्याचें** कळल्यामुळें तेथें न जातां गोव्यासच गेलों. **कर्नाटकांतील युद्ध चालूच आहे.** खुद्द आदिलशहा जातीनें हजर आहे.

इं. फॅ. मा. ११ पृ. २०५ इ. (९६२) सुरत-कंपनी. { श. १५८५ कार्तिक व. १० इ. १६६३ नोव्हें. १४

तुमच्या इकडील व्यापाराला कोणत्याहि प्रकारें अडथळा होणार नाहीं किंवा तुमच्या मालमत्तेला धक्का पोंचणार नाहीं. याचें कारण असें आहे कीं, सुरतेच्या बंदरां एतद्देशीय लोकांचीं असंख्य गलबतें असतात; जर आमच्यावर कोणत्याहि प्रकारचा अत्याचार झाला तर त्याचा मोबदला त्वरित देशी लोकांच्या गलबतावर घेतां येईल हें जाणतात आणि म्हणून दबूनच असतात.

डाग रजिस्टर १६६३ पृ. ५७८ इ. नोव्हें. २७ न्यू. (९६३) { श. १५८५ कार्तिक वद्य १३ इ. १६६३ नोव्हें. १७

वेंगुर्ल्यांत राहणाऱ्या एका व्यापाऱ्यानें १४ ऑगष्ट रोजीं गोव्याचे मुख्याधिकाऱ्याला पत्र लिहिलें आहे; त्यावरून असें समजतें कीं, **लखम सावंतापासून** वेंगुर्ल्याला उपसर्ग पोचूं नये म्हणून **शिवाजीनें** कांहीं शिपाई (बंदोबस्ताकरितां) वेंगुर्ल्याच्या सुभेदाराकडे पाठविले आहेत.

ऑर्म मॅन्युस्क्रिप्टस मा. २६३ पृ. २३ इ. (९६४) { श. १५८५ मार्गशीर्ष शु. ५ इ. १६६३ नोव्हें. २४

लॉयल मर्चंट गलबतावरील टिपणवही.

ओनर रोड (होनावरची खाडी)— या देशाचा राजा आणि विजापूरचा सुलतान यांच्यामध्यें तह झाल्याची बातमी कानावर आली आहे. सुमारें ६।७ हजार पौंड खंडणी देण्याचें या राजानें कबूल केलें आहे.

डाग रजिस्टर १६६३ पृ. ६८१ इ. डिसें. १३ न्यू. (९६५) { श. १५८५ मार्ग. शु. १४ इ. १६६३ डिसें. ३

आमचा (डचांचा) व पोर्तुगीजांचा तह झाला हें ऐकून गोव्याला सर्वत्र आनंदीआनंद झाला आहे......१० लढाऊ गलबतांचें आरमार तयार करून वगैरेकडे (जानेवारीच्या) पहिल्या दिवशीं पाठविण्याची तयारी गोव्यास चालली आहे शिवाजीशीं

लढणारें मोंगली सैन्य वसईचे आसपास असून तें पोर्तुगीजांना उपद्रव देतें. त्याच्या बंदोबस्ताकरितां ही तजवीज आहे.

ऑर्म. मॅन्यु. मा. २६३ } (९६६) { श. १५८५ पौष वा ३ ते वा १४
पृ. २३-२४ इ. { इ. १६६४ जानेवारी ५ ते १७

'लॉयल मर्चंट' गलबताचें टिपण पुस्तक.

शिवाजी सुरतेला आल्याची वातमी.

**स्वाली होल, ५ जाने.**— शिवाजी सुरतेहून १०।१२ मैलांवर आल्याची वातमी सायंकाळीं ३ वाजतां प्रेसिडेंटनें कळविली. त्याचे मागणीप्रमाणें १० इत्यादि लोक कंपनीच्या मालाच्या रक्षणाकरितां सुरतेस पाठविले.

**६ जानेवारी.**-दोनप्रहरीं अडीच वाजतां 'सुरतेंतील माल व माणसें हीं धोक्यांत आहेत. तेथें फक्त १० माणसें ठेवून बाकीचे सर्व लोक पाठवा' अशी प्रेसिडेंटची चिठी आली. परंतु...फक्त ४२ शिपाई पाठविले. **त्या रात्रीं शिवाजी शहरांत शिरला आणि ज.ळपोळ व लुटालुटीला सुरवात झाली.** इंग्रजांच्या वखारींत सुमारें १५० इंग्रज व ६० शिपाई रक्षणाच्या तयारीनें राहिले. सुरतेचा मित्रा सुभेदार शहरांतील वीस हजार माणसांना असहाय स्थितींत सोडून किल्ल्यांत पळून गेला। इंग्रजांप्रमाणें डचहि तयारीनें राहिले इंग्रजांच्या वखारीजवळ ते लोक येतांच इंग्रजांनीं बाहेर पडून दि० चे ३ शिपाई व १ घोडा ठार केला....या उदाहरणानें आर्मीनिअन्स वगैरे परदेशी लोकहि ठासून ठिकाणीं राहिले. परंतु मनुष्यबळ अपुरें पडल्यामुळें कोणालाच चालून जातां आलें नाहीं. व शिवाजीची लूट अप्रतिहत चालू राहिली. सोनें, रुपें, मोतीं, हिरे इत्यादि मूल्यवान् जिनसांशिवाय त्यानें इतर क्षुद्र वस्तूंकडे ढुंकूनहि पाहिलें नाहीं !

**१० जानेवारी.**-या दिवशीं रात्रीं तो निघून गेला. पण तत्पूर्वी शहराचे दोन तीन भाग पार जाळून टाकून त्यानें कित्येक माणसांचे हात तोडून व डोकीं मारून बळी घेतलें. त्यानें एक इंग्रज अँथनी स्मिथ, याला ३ दिवस कैदेंत ठेविलें व ३५० रु. दंड घेऊन सोडून दिलें त्याचेहि डोकें मारलें गेलें असतें. परंतु **शिवाजीचा खून करण्याचा एकाचा बेत फसला** म्हणून घोडक्यांत वांचलें. एका मुसलमानानें शिवाजीला भोसकून मारण्याकरितां हात उगारला होता तो वरचेवरच कापला गेला. परंतु त्याच्या धक्क्यानें शिवाजी खालीं पडून रक्तबंबाळ झालेला पाहून, त्याला वार बसी लागला असा समजुतीनें, सर्व कैद्यांना मारण्याचें ठरविण्यांत आलें; त्या मुसलमानाचा तत्काल शिरच्छेद करण्यांत आला; आणि शिवाजी सुरक्षित असल्याचें दिसून आलें. लवकरच शिवाजीनें कैद्यांची कत्तल थांबविली ! रात्रीं त्याच्यावर चालून येणाऱ्या शत्रूंच्याची वातमी लागल्यामुळें व पुरेशी लूट मिळाली असल्यामुळें, सर्वांचे तळतळाट घेऊन

शिवाजीची स्वारी निघाली. १५ लक्षांची लूट त्यानें बरोबर नेली. यापूर्वीच्या किंबहुना वर्षांत सुरतेची या वर्षासारखी भरभराट झालेली नव्हती.

१७ जानेवारी.- बादशाही सैन्य शहरांत आलें. सुभेदाराची हेटाळणी करून लोकांनीं प्रेसिडेंटची फार वाहवा केली. सुभेदाराला फितुर केला म्हणून त्याच्या मुलानें एका निरपराधी बनियाला बाण मारून त्याचा प्राण घेतला......

सुरतेच्या लोकांना शिवाजी पुनः येईल अशा अफवेमुळें भीती 'वाटत असून ते एका क्षणांत शहर सोडून जाता यावें अशा तयारींत आहेत. इंग्रज व डच धीटपणें आहेत. डच स्वतः बाहेर पडण्यास धजले नाहींत. त्यांनीं आपले नोकर लोक बाहेर पाठविले. त्यांपैकीं दोन शिपाई मारले गेले..........

डाग रजिस्टर १६६४ पृ. १७ }  (९६७)  { श. १५८५ पौष व. ३
इ. जाने. १५ न्यू. }  { इ. १६६४ जाने. ५

औरंगजेब काश्मीरहून लाहोरास परत आला असून यंदातर शिवाजीचा एकदांच कायमचा नायनाट करण्याचें त्यानें मनांत आणिलें आहे.

इंडियन अँटिक्वेरी भा. ५१ }  (९६८)  { श. १५८५ पौष व. ३-८
पृ. १ ते ६ इ. }  डचांचा वृत्तांत  { इ. १६६४ जानेवारी ५-१०

शिवाजीनें सुरत लुटल्याचा वृत्तांत-- (डच डायरेक्टर आणि कौन्सिल यांनीं लिहिलेली रोजनिशी ) ५ जानेवारी (मंगळवार):- गणदेवीला कोणी एक मोठा सेनापती आल्याची खबर सुभेदार इनायत-खानाकडे आल्याचें आम्हांला सकाळीं नऊ वाजता कळलें. 'तो गणदेवीला काल रात्रीं एकाएकीं आला. तो आपलें नांव सांगत नसून ''आपण बादशाही सरदार आहों व अमदावादेकडे जात आहोंत'' एवढेंच सांगतो. त्याच्याबरोबर घोडदळ व पायदळ मिळून आठ ते दहा हजार सैन्य असून त्याच्याच लोकांचे तोंडून कांहीं थोडें ऐकावयास मिळालें त्यावरून तो शिवाजी असावा.' इत्यादि हकीकत कानावर आली. प्रथम आम्हीं तिकडे लक्ष दिलें नाहीं. परंतु लवकरच आपआपलें होतें नव्हतें तेवढें गोळा करून सर्वत्र पळापळी सुरू झालेली दिसली.

इंग्रज प्रेसिडेंटानें स्वालीला जाण्याबद्दल सुभेदाराची परवानगी मागितली होती. परंतु ती मिळाली नाहीं. कारण, सुभेदाराला राग येऊन 'इंग्रज आणि डच जर शहर सोडून गेले तर मग शहरांत राहील तरी कोण ?' असें तो म्हणाला. वगैरे हकीकत डायरे-

-चटरच्या कानीं आली.... डायरेक्टरनें आत्मरक्षणाचा उद्योग चालविला. बायकामुलांना गलबतावर पाठविण्याबद्दल परवानगी विचारावयास त्यानें मनुष्य पाठविला. परंतु सुमेदार घरीं नव्हता. शहरासभोवती रक्षक ठेवून, पूल पाडणें, निरनिराळ्या ठिकाणीं तोफा ठेवणें वगैरे नगररक्षणाच्या उद्योगाला तो लागला होता. इंग्रजांच्या वखारींतहि डायरेक्टर जाऊन आला. तेथेंहि बंदोबस्ताची खटपट चालू होती.

सुमेदाराकडे पाठविलेल्या निरोपाचें नकारार्थी उत्तर आलें. शिवाय इंग्रज व डच यांनीं नगररक्षणार्थ मदत करावी असेंहि त्यानें सुचविलें....आमच्या वखारीचे रक्षणा-करितां आम्हीं धनुष्यबाण, तरवारी व भाले हीं हत्यारें घेतलेले ८० तद्देशीय व ४० युरोपियन असे लोक जमा केले.

दिवस वर आला तसा शत्रू जवळजवळ आला. व पळणांची संख्या वाढली.... काळोख पडण्यापूर्वी डचांच्या बायकामुलांनाहि त्यांनीं गलबतांवर पाठविलें.

६ जानेवारी ( बुधवार )—अगदीं सकाळीं सुरतेपासून **शिवाजी** ४½ डच मैलांवर औदेना गांवीं आल्याचें कळलें. ' आपण बादशाही सरदार आहों व **मोहो-**बतखानाचे बोलावण्यावरून पट्टणचें बंड मोडण्यास जात असतांना वाटेंत आपल्याला उशीर झाला' अशी **शिवाजी** बतावणी करीत असल्यामुळें, सुमेदारानें एक हस्तक पाठवून " येथील लोक भीतीनें पळून जाऊं लागले आहेत; तरी तुम्ही अधिक जवळ येऊं नये' असा निरोप पाठविला. या निरोपानें चिडून जाऊन **शिवाजीनें** त्या हस्तकालाच कैद केलें. डचांनीं बातमी आणण्याकरितां दोन माणसें पाठविलीं त्यांनाच त्यानें धरून ठेविलें. पण संध्याकाळीं सोडून दिलें. त्यांनीं अशी बातमी आणली कीं, तो शिवा-जीच आहे. त्यांपैकीं एकानें त्याला राजापुरास पाहिलें असल्यामुळें आतां ओळखलें.

वखारीचा बंदोबस्त ७ वाजल्यापासूनच करण्यांत आला. कंपनीचा माल बाहेर विणकरी व रंगारी यांच्याकडे होता तो वखारींत आणून टाकविला. सुमारें १० वाजतां मैदानावरून किल्ल्याजवळून इंग्रज प्रेसिडेंटनें २०० इंग्रज व इतर शिपाई यांची मिरवणूक काढली. व ' शिवाजी आलाच तर आपण त्याच्यावर हल्ला करण्यास तयार आहोंत ' असें सांगितलें. डच डायरेक्टरनें ' आपण मरेपर्यंत स्वसंरक्षण करूं; हल्ला आला नाहीं तर इतर मानगडींत मात्र पडणार नाहीं' असें सांगितलें. इतक्यांत शत्रू जवळ आल्याची बातमी आली. मध्यान्हाच्या सुमारास (इंग्रज प्रेसिडेंट गेल्यावर ) ती बातमी खरी अस-ल्याचें प्रत्यंतर आलें. व गलबतांना स्वालीकडे निघून जाण्याबद्दल इशारा देण्यांत आला.

वखारीचे दरवाजे बंद केले नाहींत तोंच शहराच्या मध्यभागीं ज्वाळा निघालेल्या दिसल्या. जकातघर लुटणाऱ्यांना पुष्कळ लूट सांपडली. सुमेदार आणि मुख्य व्यापारी भीतीनें

लूट देण्याचें सोडून विरुद्धपक्षास जाऊन मिळाले होते. यांतेसे मुसलमान शिपाई नोकरीला ठेऊन त्यांच्याकडून सहज ( शहराचें ) संरक्षण करतां आलें असतें; तें न करितां सर्व शहर त्यांनीं लुटारूंच्या हवाली केलें ! आणि कोणाचाच विरोध न केल्यामुळें धीट झालेले लुटारू शेंकडो विरुद्धपक्षापर्यंत गेले. तथापि त्यांच्यावर तोफा डागण्यांत आल्या नाहींत ! रात्रीच्या पहिल्या प्रहरांत जाळपोळ जोरांत चालू होती. वखारीच्या गच्चीवरून एकमेकांना हाका मारून घों घोंगडांना ( मराठ्यांचा ) आवाज ऐकूं येतच होता. परंतु जाळ विशेष वाढल्याचें भासत नव्हतें.

७ जानेवारी गुरुवार—सुरतेंत राहणारा निकोलस कॅलोरट्रू या नांवाचा एक ग्रीक व्यापारी होता. त्याच्याबरोबर एक घोडेस्वार देऊन शिवाजीनें त्याला आमच्याकडे बोलणें करण्याकरितां म्हणून पाठविलं. त्याला वखारींत घेतल्यावर तो पोर्तुगीज भाषेंत सांगूं लागला:-मला माझ्या घरांतून ओढून काढून तुम्हांला व इंग्रजांना असा निरोप सांगण्याकरितां पाठविलें आहे. कीं, शाहिस्ताखा आतां शिवाजीबरोबर रहात असून त्यानें शिवाजीला सुरत शहर दिलें आहे. शिवाजीला सैन्याच्या खर्चाकरितां पैसा पाहिजे आहे. तर तुम्हीं कांहीं रक्कम द्यावी. न दिल्यास तो सर्व शहर जाळून टाकील ! शाहिस्ताखा तीन वर्षांपूर्वीच आग्र्यामध्ये वारला हे सर्वांनाच माहीत होतें. अर्थात् हा सर्व नुसता बहाणा होता.

डायरेक्टरनें उलट निरोप पाठविला कीं, 'आम्ही व्यापारी लोक; आपला पैसा जवळ ठेवीत नाहीं. चालत असेल तर कांहीं कापड व मसाल्याचा नजराणा पाठवूं. वेंगुर्ल्याच्या वखारीला तुम्ही त्रास न देतां आजपर्यंत स्नेहानें वागविलें आहे तसेंच येथेंहि चालवावें. तुमच्या माहितीशिवाय कोणी आम्हांला त्रास देऊं पाहील तर त्याच्याविरुद्ध बंदोबस्तासाठीं आम्ही हुशारीनें आहोंत.'

मध्यान्हाचें जेवण संपतें न संपतें तों संकटाची हूल उठली. दरवाजांतील दोन तोफांना झुटारू भिऊन परत गेले. उत्तर व पूर्व भागांत हुमारें एक गाजतो वणवा पसरला. वखार भस्मसात् होणार इतक्यांत अकस्मात् वारा फिरून आम्ही बचावलों.

तेवढ्यांत इंग्रज प्रेसिडेंटशीं पत्रव्यवहार करून एकमेकांचा खबर दिली. इंग्रज प्रेसिडेंटनें दोन तीनदां बाहेर पडून चढाई केली व त्यांत शत्रूचे २ शिपाई व एक घोडा ठार होऊन दोन शिपाई कैद झाल्याचें कळलें. आगीचे भीतीस्तव छप्पर ओढून काढून हल्ला आलाच तर सावधगिरीकरितां दरवाजाच्या आंतल्या बाजूस माल लावून आम्ही आडोसा केला.

.........राजाच्या वाकेनवीसानें किल्ल्यांतूनच डचांच्या शेजारच्या आपल्या घरांतला माल राखण्याबद्दल डचांना लिहिलें, तें त्यांनीं नाकारलें.........शिवाजीचीं गलबतें नदींत शिरून तिकडूनहि व्यापारी गलबतांवर हल्ला करणार असल्याची बातमी आली होती. पण

ो निराधार ठरली...ग्रीक व्यापारी शिवाजीचें उत्तर घेऊन अजून आला नव्हता म्हणून काळजी वाटत होती. रात्रीच्या प्रथम प्रहरीं वखारी समोंवतीं आगीचा, बंदुकांचा व ढोल-क्यांच्या आवाजाचा धुमाकूळ चालू होता. त्यांतच आर्तांच्या आरोळ्या आणि जखम्यांचें कण्हणें चालू होतें.

८ जानेवारी— सकाळीं ६ वाजता संकटाची हूल उठली. परंतु पुनः ती खोटी ठरली. आमचें जेवण चालू होतें. इतक्यांतच किल्लेदारानें दारूगोळा पाठवून देतों असा निरोप पाठविला. पण जाळ कमी होऊन दंगलहि ओसरत चालली होती. लुटारूंची टोळी निघून जाण्याच्या तयारींत होती असें वाटलें. शिवाजी सुरतेबाहेर दोन कोसांवर उतरला होता. फक्त त्याचाच एक शामिआना होता. इतर सर्व अधिकारी उघड्यावरच रहात. शिवाजीनें लूट बंद करण्याबद्दल हुकूम काढला अशीहि वदंता आहे. त्याच्या सर्व छावणीसर लूट वाहून नेणारे मजूर आणि बैल यांची गर्दी आहे. प्रत्येक घोडेस्वाराजवळ एक रिकामा घोडा आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे शिवाजीची ही अगदीं तात्पुरती छावणी आहे.

मध्यें थोडासा पत्रव्यवहार होऊन इंग्रजांकडून अशी सूचना आली कीं 'आम्हीं व इंग्रज एकविचारानें काय करावयाचें तें करूं' असा डचांनीं शिवाजीस जबाब द्यावा. परंतु तसें बांधून घेणें आम्हांला बरें वाटलें नाहीं म्हणून आम्हीं उत्तर पाठविलें नाहीं. असेंहि कळलें कीं, अँथोनी स्मिथला शिवाजीकडे कैद करून नेलें होतें. परंतु त्याच्या गरीबीच्या पोशाखावरून तो कोणी सामान्य नोकर आहे असें वाटून त्याला त्यानें थोडा दंड घेऊन सोडून दिलें. व त्याचे बरोबरच इंग्रजांना निरोप पाठविला कीं 'कांहीं द्रव्य दिलें नाहीं तर आम्हीं तुमचेवर हल्ला करूं.' कांहीं फ्रेंच पाद्री इंग्रजांच्या वखारीच्या आश्रयास आले आहेत. त्यांचे पैकीं एक शिवाजीबरोबर होता. इंग्रजांचे व आमचे उत्तरामुळें शिवाजी फार रागावला असल्याचें त्यानें सांगितलें.

ग्रीक वकील आमच्याकडे परत येत असतांना मराठ्यांनीं त्याला जखमी केल्यामुळें तो आसऱ्याकरितां इंग्रजांच्या वखारींत गेला आणि म्हणून तो आमच्याकडे येऊं शकला नाहीं. आमचा एक हेर शहरांत फिरून आला. त्यानें लुटीची हालहवाल सांगितली. पांच सहा जणांच्या टोळ्या करून लुटणें, घरें पाडणें हें मराठ्यांचें काम चालू होतें. मोठीं घरें सर्व पार नाश पावलीं. हेर शहराच्या बाहेर शिवाजीच्या छावणीपर्यंत गेला होता. शिवाजीच्या डोक्यावर मिनकनातीचे फक्त एक पाल होतें. लोक लूट घेऊन एकसारखे त्याच्यापुढें ओतीत होते. सोनें, रुपें बाजूला काढून ठेवून बाकीचें जवळ उभे रहाणाऱ्यांना तो लगेच वांटून टाकीत असे. छावणी हाळगार किंवा कसें हें समजण्यास कांहीं मार्ग नव्हता. कारण एकसारखी दाटीच होती. स्मशानभूमीपासून ढहावेगमच्या बागेपर्यंत

मराठा छावणी पसरली असून एकहि तंबू दिसत नव्हता.... पुनः संध्याकाळीं लुटारूंची हालचाल व जाळपोळ जोरात चालू झाल्याचें दिसलें.

९ जानेवारी (शनिवार)- रात्रभर कोठ्यांत तेल घालून पहारा केला. कोतवालाचा भाऊ ४० लोकांनिशीं किल्ल्यांतून बाहेर आला. इंग्रजांनीं त्याच्या बरोबर कांहीं लोक पाठविले तसे आम्हींहि पाठवावे असें त्यानें सुचविलें. परंतु आमच्याजवळ अधिक लोक नाहींत असें सांगून आम्हीं फक्त स्वसंरक्षण करीत राहिलों.

११ वाजण्याचे सुमारास वेलापारचा (?) राजा व भडोचचा सुभेदार कुमक घेऊन येत आहेत अशी बातमी आली. सभोंवार आगीचा कल्लोळ चालू असल्यामुळें आतां आमची वखार वाचत नाहीं असें वाटून आम्हीं गलबतावर जाण्याचा विचार चालविला. ...आतां हिशेबाचीं पुस्तकें व इतर कागद घेऊन निघणार तों पुनः वारा फिरला आणि वखार बचावली. धुरामुळें आमचें निशाण दिसेना म्हणून इंग्रजांनीं चौकशीकरितां मनुष्य पाठविला होता.

१० जानेवारी (रविवार)-सकाळीं शिवाजी निघून गेल्याची बातमी आली. व सगळीकडून तिच्या खरेपणाबद्दल भरपूर पुरावा येऊं लागला.... तसेंच सुरतेच्या मदती करितां निघालेल्या सैन्यांच्याहि बातम्या आल्या. परंतु आतां फार उशीर झाला होता.

११ जानेवारी (सोमवार)- शिवाजी खरोखरच गेला होता ! आपआपल्या ठिकाणांतून बाहेर आलेल्या लोकांना आपल्या इस्टेटींचा नाश झालेला सर्वत्र दिसला. मोठ्या शहराचा अर्धा भाग अग्नीचे भक्ष्यस्थानीं पडला होता. इंग्लिश व डच फॅक्टरी व नवी सराई (यांत आर्मेनिअन व तुर्की व्यापारी रहात होते.) यांच्याशिवाय आणखीं दहा घरांनीं देखील स्वरक्षणाचा प्रयत्न करून लुटींतून आपली मालमत्ता वांचविली नाहीं !

हाजी जाहिदबेग[1](?) किंवा वीरजी व्होरा अशा सारख्या मोठ्या व्यापाऱ्यांनीं ३।४ हजार रुपये खर्च करून कांहीं शिपाई ठेविले असते तर त्यांची सर्व मालमत्ता सुरक्षित राहिली असती.... इथिओपिआचा वकील दिल्लीला जात असतांना वाटेंत जुन्या सराईंत उतरला होता. त्याला शिवाजीकडे कैद करून नेलें होतें. परंतु बादशहाला द्यावयाचा नजराणा शिवाजीला दिल्यानंतर त्याला सोडून दिलें. त्याच्याजवळ दुसरी मूल्यवान चीज कांहीं नव्हतीच. [हेग स्ट्रॅन्क्रिप्ट्स् -सेरीज १ मा.२७. न. ७१९]

---

१ शाहिदबेग.

ओरि. रीस. पृ. १६७ } (२६९) { इ. १५८५ पौष (व. ३-८)
इ. न्यू. स्टाईल } <sup></sup>डचांचा वृत्तांत. { श. १६६४ जाने. (५-१०)

व्हॉल्काडे इन्हर्सनचा वृत्तांत ( प्रत्यक्ष पाहून लिहिलेला )

५ जानेवारीला सकाळीं ९ वाजतां २ मैलांवर रहाणाऱ्या एका शिपायानें सुभेदार इनायतखानाला शिवाजी चाल करून येत असल्याची वर्दी दिली. तीवर प्रथम कोणाचा विश्वासच बसेना. सुभेदारानें घाबरून पूड वगैरे पाडले. पण रक्षणाकरितां तोफा कोठेंच नव्हत्या. डच व इंग्रजाकडे त्यानें मदत मागितली याचें आम्हांला आश्चर्य वाटलें. दुसऱ्या दिवशीं दीड मैलावर पुरेना ( उदना ) येथें शिवाजीचें सैन्य आल्यावर 'शिवाजीनें पुढें येऊं नये; भीतीनें लोक पळून जात आहेत व हें बादशहाला आवडणार नाहीं.' म्हणून सुभेदारानें सांगून पाठविलें...डच लोकांनीं दोन नोकर पाठविले. त्यांचीं हत्यारें काढून घेऊन शिवाजीनें त्यांना सायंकाळीं सोडून दिलें....मध्यान्हाला जाळ सुरू झाला....लुटारू लोक टोळ्यांनीं फिरू लागले......अकातघर प्रथम लुटलें...... त्यांचा प्रतिकार सहज रीतीनें करितां आला असता.

सुभेदार आपलें १००० घोडदळ घेऊन किल्ल्याकडे गेला. आणि त्यानें तोफांच्या रक्षणासाठीं घोडे खडे केले. सर्व सरकारी अधिकारी मागोमाग गेले.......कोणींच प्रतिकार करण्यास राहिले नाहीं यामुळें विस्तव व लूट बेफाम फैलावली. शत्रू इतका धीट झाला कीं मराठे थेट किल्ल्याचे तटाखालीं येऊन त्यांनीं घोडे जवळ जाऊन पाहिले. किल्ल्यांतील लोक आपलें शौर्य तटामागून प्रदर्शित करण्याच्या इरादानें रात्रभर तोफा डागीत होते. परंतु त्यानें शत्रूच्या पेक्षां शहरांतील घरांनाच अधिक धोका पोंचला....या रात्रीं ( ६ जाने. ) आग थोडी कमी झाली तरी दुसऱ्या दिवशीं ( ७ जाने. ) वाढली आणि अनेक ठिकाणीं पसरली.

--भीक व्यापाऱ्याची वकीली...'बादशहाचा सर्वांत धाकटा भाऊ शहासुजा यानें आपल्याला सुरत शहर दिलें' असें शिवाजीचें सांगणें होतें. ...द्रव्याबद्दल डचांनीं नकार दिला. लूट व जाळपोळ चालू राहिली. सोडोम (सैदन)किंवा ट्रॉयसारखी स्थिति दिसली.

८ जाने.- न्यायकचेरीच्या चिटणिसानें आपली पेटी डच वखारींत ठेवण्याबद्दलचें किल्ल्यांतून पत्र पाठविलें; परंतु डचांनीं नकार दिला. सकाळीं निराधार झालेले लोक भटकतांना दिसले. जाळ चेतवण्याची मराठ्यांनीं युक्ती अशी काढली कीं तेल्यांच्या दुकानांतून तेल घेऊन तें भिंतीवर, दारांवर व खिडक्यांवर ओतून व तेलाच्या वाटल्या जमिनीवर उभ्या टेकून ते त्यांना आग लावून देत. दोन श्रीमंत व्यापारी आपलीं घरें व माल सोडून किल्ल्यांत गेले. वीरजी व्होराचें अत्यंत भव्य मंदीर भस्मसात् झालें. त्यांतच सोनें, मोहरा, मोतीं, हिरे वगैरेंनीं भरलेलीं ६ पिपेंहि नाश पावलीं. दोन दिवसापूर्वीं शिवाजीनें

१ यांतील बहुतेक हकीकत ले. ९६८ शीं जुळती असल्यामुळें पुनरुक्ति फार होऊं नये म्हणून तपशील गाळला आहे. व तेथें ... अशी खूण केली आहे.

वीरजी व्होरा व दुसरा एक व्यापारी अशा दोघांना आपल्या ताब्यांत देण्याबद्दल सुभेदाराकडे कळविलें होतें. सर्व शहराबद्दल दंड म्हणून ह्या दोघांचा ताबा घेण्यास तो राजी होता.

दुसरे दोन बनिया व्यापारी गोंधळ वाढलेला पाहून आपली संपत्ती घेऊन नदीपलीकडे जाणार होते. त्यांना सुभेदारानें परवानगी न दिल्यामुळें त्यांची सुमारें ३० सोन्याची पिपें शिवाजीला मिळाली. त्या दोनप्रहरीं...शिवाजी दोन मुक्काम दूर जाऊन राहिला.

शिवाजीची हालहवाल समजून घेण्याकरितां एक शिपाई फकीराचा वेष घेऊन त्यांना सांगून गेला होता. तो कोणालाहि संशय न येतां फिरून आला. शिवाजी तंबूंत बसला नसून एका झाडाला एक कापड टांगून सूर्य किरणापासून त्याच्याकरितां आडोसा तयार केला होता. त्याच्यापुढें त्याच्या लोकांनीं आणलेली लूट पाहून तीपैकीं कांहीं स्वतःकरितां ठेवून बाकीची तो वाटून टाकी....

एक आठवड्यापूर्वी एक इथिओपिअन वकील बादशहाकडे जाण्याकरितां येऊन राहिला होता. बादशाहाकडून त्याच्या स्वागताबद्दल वगैरे हुकूम यावयाचे होते. त्याला किल्ल्यांत न घेतल्यामुळें तो शिवाजीच्या हातांत सांपडला.

...शिवाजी मोठी लूट घेऊन गेला. जातांना तो असें म्हणाला कीं "औरंगजेबाच्या सुरतेची 'सुरत' घेण्याचा माझा पुष्कळ दिवसांचा इरादा होता तो आतां सफळ झाला."
[Orientalische Reise beschreibung p. 167]

| | | |
|---|---|---|
| डागरजिस्टर १६६४<br>पृ. १९६ इ- न्यू. स्टा. | (९७०)<br>डचांचा वृत्तांत | श. १५८५ पौष व. ३<br>इ. १६६४ जानेवारी ५ |

५ जानेवारीला शिवाजी गणदेवीला आल्याचें कळलें. गणदेवी सुरतेपासून १५ कोस आहे- ..............इंग्रज प्रेसिडेंटजवळ माणसांचा आधार असल्यामुळें शहरांतून फिरण्याचें त्यानें धाडस केलें. ३०० इंग्रज खलाशांच्या मदतीनें शिवाजीला विरोध करण्याच्या इरादानें तो आमचे वखारीकडेहि आला होता.......आमच्या वखारीवर तोफा असल्यामुळें लूट करणारे लोक समोरून फिरकूंहि शकले नाहींत.......आमची वखार जळणार होती. परंतु गोळीच्या टप्पापलीकडेच वाऱ्यानें आगीची दिशा बदलली !...... शिवाजी आपल्या सैन्यासह दोन कोसांवर तळ देऊन राहिला होता.......८ तारखेला सुभेदारानें चाळीस घोडेस्वार लूट करणाऱ्यांवर चाल करून जाण्याकरितां पाठविले. कारण लुटारू स्तब्ध असून आगहि बहुतेक शमली होती. डच डायरेक्टरनेंहि या हल्ल्यांत सामील व्हावें असें सुभेदाराचें म्हणणें होतें. डायरेक्टरनें तसें करणें नाकारलें. त्याचे मतानें 'इंग्ल

१ यांतील बहुतेक वृत्तांत ले. ९६८ प्रमाणें असल्यामुळें नवीन असलेले उल्लेखच दिले आहेत.

पोचला नसून दुसऱ्या दिवशीं शिवाजी अधिक जोराची कारवाई करणार होता.' आणि खरोखर तसेंच घडलें. ९ तारखेला सकाळीं शहरांत निरनिराळ्या ९-१० ठिकाणीं आगी लागलेल्या दिसल्या..........या लुटारूंच्या पुढें मुसलमानांचा नामर्दपणा उघडकीस आला. लुटारू आम्हांला मात्र भीत होते. आमच्या तोफांच्या टप्यांतील गल्लींत ते शिरलेच नाहींत.......

१० तारखेला धुमाकूळ कमी झाला. आग कमी झाली व विझली. कारण शिवाजी तळ उठवून रात्रींच निघून गेला होता....शिवाजीनें मार्गे ४५ शें लोकांची फौज पिछाडीचे रक्षणाकरितां ठेविली होती. त्यांनां एकदांच घेऊन लवकरच काढता पाय घेतला.... शिवाजीनें हाजी 'सि[१]अक्षनाईक' व विरजी व्होरा यांना ताब्यांत घेण्याचा उपाय केला.... कित्येक खरेदीदारांना शिवाजीनें कैद करून नेल्यामुळें डच कंपनीचें नुकसान सुमारें २० हजार रुपयांपर्यंत होईल. [डाग रजिस्टर १५ मे न्यू. मधील उल्लेख.]

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ. भा. ११<br>पृ. २९८ इ. | (९७१)<br>सुरत कन्सल्टेशन | श. १५८५ पौष व. ४<br>इ. १६६४ जानेवारी ६ |

पांचव्या तारखेस शिवाजी गणदेवीला आल्याबद्दल बातमी आली....शहरांतील लोक आपलीं घरें सोडून, बायकामुलें व कांहीं बरोबर घेतां येईल तेवढें घेऊन थोडे थोडे जमून शहर सोडून पळू लागले होते. अशा वेळीं सभा झाली.

...कांहीं खरेदी दिलेला, आणि कंपनीकरितांच रंगविलेला माल सुरक्षिततेकरितां म्हणून कंपनीचे वखारींत ठेवण्यांत यावा; संरक्षणार्थ बंदोबस्त करण्यांत यावा इत्यादि ठरलें.

| | | |
|---|---|---|
| पिछर्ले. शिवा.<br>पृ. ९ इ. | (९७२)<br>पोर्तुगीज दप्तरांतील उल्लेख | श. १५८५<br>इ. १६६४ |

गोव्याचा व्हाइसराय—पोर्तुगालचा राजा.

कोणासहि कळूं न देतां ८।१० हजार सैन्यासह शिवाजी सुरतेस पोचला. त्याला चोरतां आलें तितकें द्रव्य चोरून **आर्धी आणवून ठेवलेल्या जहाजांतून माल चढवून तो** जलदीनें परतला व सुखानें स्वराज्यांत परत आला; आणि प्रसंग पडल्यास संरक्षणार्थ आमच्या प्रदेशाचा उपयोग करून घेण्यासाठीं आमच्या मुलखाजवळ येऊन पोचला. [हा उल्लेख न्यू. स्टा. इ. १६६६ जाने. २८ पत्रांतील आहे.]

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. सुरत भा. ८६<br>पृ. २ इ. | (९७३)<br>इराण—सुरत | श. १५८५ माघ शु. ४<br>इ. १६६४ जाने. २२ |

शिवाजीनें सुरत लुटून नेलेले जिन्नस सोनें, माल, मोती, हिरे मिळून सुमारें एक कोटीचे होतील...पुनः पुनः शिवाजीच्या हल्ल्याच्या बातम्या उठतात तसे अधि-

[१] शाहिद बेग; सावकारीचें द्योतक 'नाईक' हें पद लावून 'शाहिद नाईक' असें नांव बनविलेलें दिसतें.

कच लोक पळून जातात व सुरक्षिततेकरितां आपल्या वस्तु किल्ल्याच्या खंदकांत टाकतात किंवा गलबतांत भरतात. लोकांचे हात तोडून व डोकीं मारून शिवाजीनें दाखविलेल्या निर्दयपणामुळें त्याची लोकांना इतकी दहशत बसली आहे कीं बादशहानें रक्षणाकरितां सैन्य न पाठविल्यास लोक मुकाट्यानें शहर सोडून जातील.

| | | |
|---|---|---|
| प. रे. आ. मॅन्यु. सी. ऑ. | (९७४) | श. १५८५ माघ शु. ७ |
| ७७१९ क्रम २४ | सुरत, हेन्री गॅरी-मार्लबरो. | इ. १६६४ जाने. २५ |

**दख्खनच्या (विजापूरच्या) राजाविरुद्ध बंड करणारा शिवाजी** ( त्याच्या आगमनाची वातमी येते न येते तोंच) येऊन ६ तारखेला दाखल झाला. त्यानें ३००० चे वर घरें जाळलीं व लूट नेली....आमच्याकडून त्यानें खंडणी मागितली. परंतु आम्हीं ती न देतां आमचेजवळ मनुष्यबळ असल्यामुळें त्याचे लोकांवर दोन तीनदां चालून घेऊन कांहीं लोक मारले. यामुळें आमचे शेजारचा भाग सुरक्षित राहून औरंगजेबापर्यंत आमची वाहवा झाली. उलट सुभेदाराच्या नामर्दपणाबद्दल तक्रारी गेल्या. डच लोक बाहेर पडले नाहींत परंतु त्यांनीं आपल्या वखारीचें चांगलें रक्षण केलें. या दुष्टानें ( शिवाजी ) बुधवार सकाळपासून शनिवारी सायंकाळीं ४ वाजेपर्यंत, पुरे ४ दिवस हें शहर लुटलें. जे कोणी मागितल्याप्रमाणें धन देऊ शकले नाहींत त्यांचे हात तोडणें, अशासारखीं निर्दयपणाचीं कृत्यें या मुदतींत त्यानें पुष्कळ केलीं. अँथनी स्मिथ (एक प्रमुख फॅक्टर) त्याच्या कैदेंत सापडला होता (परंतु चमत्कारानेंच सुटला). त्यानें एका सकाळच्या वेळांत २६ हात व कित्येक डोकीं कापलेलीं पाहिलीं.

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ. मा. ११ | (९७५) | श. १५८५ माघ शु.१० |
| पृ. २९८-३०३ इ. | सुरत-कंपनी. | इ. १६६४ जाने. २८ |

६ जानेवारीला शिवाजी जवळ आल्याची बातमी आली....सुभेदार व इतर सर्व लोक पळून गेले. आमच्या आसपासचे थोडे लोक काय ते राहिले....आम्हीं, प्रेसिडेंटला सर्वांत पुढें घालून किल्ल्यासमोरून सर्व शहरभर मिरवणूक काढली. शत्रूची चाहूल लागतांच किल्ल्यांत शिरण्याच्या तयारीनें सुभेदार किल्ल्याजवळ उभा होता. आम्हीं वखारींत परत येऊन पोंचलों इतक्यांत शिवाजी शहरच्या वेशी बाहेर आलाच. 'हाजी सैद बेग, वीरजी व्होरा व हाजी कासम या तीन व्यापाऱ्यांनीं जातीनें आपल्यासमोर येऊन खंडणीचा ठराव करावा. नाहीं तर शहरावर आग व तरवार चालवूं' म्हणून शिवाजीनें सुभेदाराला सांगून पाठविलें. उत्तर न मिळाल्यामुळें ता. ५ च्या रात्रीं [इतर सर्व ता. ६ म्हणतात.] किल्ल्यासमोर ठाकून राहून त्यानें केवळ आंतील माणसांना भेडसावण्याकरितां व आंतून बाहेर कोणी फिरकूं नये म्हणून किल्ल्यावर गोळी चालू केली व शहरांत अग्निप्रलय व लूटहि सुरू केली. मध्यंतरीं अँटनी स्मिथ स्वाधीहून परत येत

असतां त्याला कैद करून शिवाजीपुढें नेण्यांत आलें; आणि ३०० रु. दंड घेऊन दुसऱ्या दिवशीं आम्हांला धमकी देण्याकरितां पाठविण्यांत आलें. आम्हीं दाद देत नाहीं असें पाहून त्यानें मित्रत्वाचें बोलणें काढलें. परंतु 'एका इंग्रजाला अडकवून ठेवणें, आमच्या तबेल्यांतून घोडा घेऊन जाणें, आणि जकातघरापुढील इंग्रजांचा माल लुटणें या गोष्टी शत्रुत्वाच्या द्योतक असल्यामुळें यापुढें तुम्हांवर विश्वास न ठेवितां पुनः बोलणें करण्यास येईल त्या जासूदाला आपण ठार करूं' असें प्रेसिडेंटनें उलट कळविलें. आम्हीं त्याला स्वामित्वाचा मान द्यावा असेंहि त्यानें या वेळीं सुचविलें होतें. न दिला तर तो आमची वखार जमीनदोस्त करील हें जाणूनच आम्हीं वखारीच्या संरक्षणामध्यें सर्वजण प्राण वेंचूं असें निर्वाणीचें कळविलें. मध्यंतरीं शेजारचें होजाबेगचें घर फोडून मराठ्यांनीं ताब्यांत घेतलें. पुढें कदाचित् आमच्यावर गर्दी झाली असती परंतु आम्हीं त्याना माघार घेण्यास भाग पाडलें. त्यामुळें चिडून शिवाजी स्मिथचें डोकें मारण्यास तयार झाला. स्मिथकडून त्यानें दहशतीचें पत्र लिहविलें. त्यालाहि आम्हीं भीक घातली नाहीं. स्मिथला त्यानें परवलीवर पुनः आमचेकडे व डचांकडे पाठविलें. परंतु त्याची फिकीर न करितां आम्हीं स्मिथला ठेवून घेऊन त्याला उलट 'तुझ्यावर आमचा विश्वास नाहीं' असा जबाब पाठविला....त्यापुढें कोणीच आमचेकडे आलें नाहीं....११ व्या तारखेला त्यानें शहराला आगीचा वेढाच घातला [हें संकट ९ तारखेला आलें असें डचांचे वृत्तांतांत आहे.]. त्यामध्यें डचांची वखार जळण्यापासून थोडक्यांत बचावली! आमच्या दहशतीमुळें सभोंवारचा पुष्कळ भाग मेलाचा प्रदेश वाचून राहिल्यामुळें त्याबद्दल लोकांना फार कृतज्ञता वाटते. १२ व्या तारखेला आपल्यावर सैन्य चालून येत असल्याची बातमी हेरांकडून समजल्यामुळें शिवाजी आल्या वाटेनें परत फिरला. [डचांचे म्हणण्याप्रमाणें ही १० तारखेची गोष्ट आहे.] शिवाजीनें फारच निर्दयता प्रगट केली-एका दिसांत २६ हात कापलेले स्मिथनें पाहिले. स्वतःच्या सुटकेकरितां ज्याला म्हणून द्रव्य देतां आलें नाहीं त्याचा हात किंवा डोकें कापलें जाई. प्रथम धरावें, आणखी कांहीं घरदार वाचविण्याकरितां म्हणून मागावें आणि पुनः शेवटीं घरादाराची राखरांगोळी करावीच असा निर्दयतेचा क्रम होता. आमचे शौर्याबद्दल आमची सर्वत्र वाहवा होत असून बादशहानें आम्हांला कांहीं बक्षीस द्यावें असेंच सर्व बोलतात. कुमकेला आलेल्या सेनापतीनें घोडा, पोषाख व तरवार प्रेसिडेंटला देऊं केली; परंतु 'आपण व्यापारी, आपल्याला व्यापारी सवलती पाहिजेत' असें म्हणून प्रेसिडेंटनें जकातीची माफी मिळावी म्हणून केलेली सूचना व तसा अर्ज सर्वांनीं शिफारस करून बादशहाकडे रवाना केला आहे. एकंदरींत आमचें नुकसान १००० पौंडापेक्षां अधिक झालें नाहीं. **शिवाजीच्या पुनरागमनाची** हूल उठली म्हणजे पहिल्या लुटीमुळें भ्यालेले लोक अधिकच भेदरून पळूं लागतात. अहमदाबादेहून मोहबतखान आला आहे. त्याला शूरतेबद्दल फार वाईट वाटलें. आमचेबद्दल शिफारस तो करील असें वाटतें. [ याहि सारांशांत फक्त मागें न आलेला मजकूर दिला आहे.]

इं. फॅ. भा. ११ } (९७६) { श. १५८५ माघ शु. १०
पृ. २०८ इ. } सुरत-कंपनी { इ. १६६४ जाने. २८

शिवाजीच्या कैद्यांपैकी हयात राहिलेले रॅंडॉल्फ टेलर, रिचर्ड टेलर, गिफर्ड आणि फेरँड यांची सुटका झाली आहे. राजापूर आणि देशांतील इतर पेठा बंडखोराच्या (शिवाजी) ताब्यांत जाऊन सर्वत्र अंदाधुंदी पसरली असल्यामुळें तूर्त तेथील व्यापार सोडून दिला आहे.

इंडिअन अँटिक्वेरी भा. ५० } (९७७) { श. १५८५ माघ शु. १०
(१९२१) पृ. ३१२-३२१ } इस्कालिअटचा वृत्तांत. { इ. १६६४ जाने. २८

इस्कालिअट— इस्कालिअटचा भाऊ.

५ जानेवारीला, मंगळवारी सकाळीं १० वाजतां शिवाजी आल्याची शहरांत हूल उठली. [शिवाजी हा राजा किंवा मुख्य सुभेदार होता. असे लोक राजा हें नांव न घेतांच तरवारीच्या जोरावर आपआपल्या प्रांतांत शिरजोर होतात.] सर्व बाजूंनीं लोक पळूं लागले. श्रीमंत लोकांनीं सुभेदाराला लांच देऊन किल्ल्यांत आश्रय मिळविला. लोक मर्द असते तर शहराचें रक्षण त्यांना सहज करतां आलें असतें.

त्याच दिवशीं शिवाजी दहा कोसांवर (= १० इंग्लिश मैल) आल्याची बातमी येतांच त्याच सुभेदारानें खंडणीचा कांहीं करार करण्याकरितां आपला गुमास्ता पाठविला. त्याला कैद करून शिवाजी तसाच पुढें आला हें पाहून सुभेदारानें किल्ल्यांत प्रवेश मिळवून शहर सोडून दिलें.

...अलीकडे मोंगली सरदार कुतुबखानानें (?) शिवाजीचा मजबूत किल्ला घेतला आहे; त्याला तो सोडणें भाग पडावें म्हणून शिवाजी अशा तऱ्हेनें गुजराथवर आला असावा.

शिवाजी गांवाबाहेरील पाव मैलावरच्या एका बागेजवळ बुधवार ता. ६ रोजीं सकाळीं ११ वाजतां येऊन पोंचतांच व सैन्याची तंबू ठोकण्याची गडबड सुरू झाली होती. इतक्यांत शहरचे शेवटशेवटचे रस्त्यांतून आग लावून देण्याकरितां शिवाजीनें कांहीं घोडेस्वार पाठविले. लवकरच शहरांत धुराचे दोन स्तंभ दिसू लागले. रात्रंदिवस आग लावण्याचें काम चालू राहून गुरुवार शुक्रवार शनिवार या प्रत्येक दिवशीं नवीन ठिकाणीं आगी लागून क्रमानें आमच्या बाजूला आग सरकूं लागली. सर्व रस्ते ओस पडले. आम्ही व डच लोक आपल्या वखारींत व कांहीं तुर्क व आर्मीनिअन व्यापारी आमचे शेजारचे सराईंत असे नेट धरून राहिलों होतों. आम्हीं व डच यांमध्यें सुमारें १ इं. मैलाचें अंतर असल्यामुळें परस्पर साहाय्याची शक्यता नव्हती. माणसें व तोफा मागवून व शिशाच्या गोळ्या वगैरे तयार करून आम्हीं आपला बंदोबस्त केला. व सभोंवारच्या बंदोबस्तासाठीं एका बाजूचें हिंदूंचें देऊळ व दुसऱ्या बाजूची मुसलमानांची मशीद ताब्यांत घेऊन त्यांत असलेल्या लोकांनीं दुसऱ्या कोठें जागा पहावी म्हणून त्यांना काढून लाविलें.

ॲंटनी स्मिथला शिवाजीच्या लोकांनीं पकडून नेलें होतें त्याचें पत्र आलें त्यांत त्यानें शिवाजीचें बोलणें लिहिलेलें होतें. शिवाजी त्याला म्हणाला 'आपला इंग्रज किंवा इतर व्यापाऱ्यांचें व्यक्तिशः नुकसान करण्याचा इरादा नसून फक्त औरंगजेबानें आपल्या मुलखावर स्वाऱ्या करून आपले संबंधीं लोकांना मारलें. याकरितां **औरंगजेबाचा सूड उगविण्याचा आहे.** इंग्रज व डचांनीं कांहीं द्रव्य दिलें तर आपण त्यांच्या वखारींना तसदी देणार नाहीं. नाहींतर शक्य तेवढा त्रास देईन.' पुढें स्मिथनें परत जाण्याची परवानगी मागितली ती त्याला न देतां इतर व्यापारी वगैरे छळले जात होते तिकडे त्याला नेऊन त्यालाहि बांधून ठेवण्यांत आलें.

वरील निरोपाचें पत्र घेऊन येणाऱ्या जासुदाबरोबर 'शिवाजीनें आपल्यास त्रास दिला नाहीं तर आपण हि फक्त संरक्षण करून राहूं' असें प्रेसिडेंटनें सांगून पाठविलें. गुरुवार दोनप्रहरीं २ वाजेपर्यंत कांहीं न होऊन त्या वेळीं मात्र शेजारचे घराला आग लावून आमची वखार धोक्यांत आणण्यासाठीं मराठे जमा झालेले दिसले. त्यांच्यावर आम्हीं दोन टोळ्या पाठवून त्यांना पळवून लाविलें. बुधवार गुरुवारीं वरील प्रकार घडे-पर्यंत हाजीसैद बेगचें घर फोडून त्यांनीं लुटलें. पुढें ते घाईनें घाबरून पळाले. शुक्रवारीं सकाळीं हाजीसैद बेगच्या परवानगीनें त्याच्या राहिलेल्या वखारी आम्हीं ताब्यांत घेऊन नाकेबंदी केली. शुक्रवारीं संध्याकाळीं स्मिथबरोबर 'इंग्रजांनीं आपल्याला ३ लाख रुपये द्यावे किंवा हाजीबेगची वखार तरी लुटूं द्यावी नाहींतर आपण प्रत्येक माणूस ठार करून वखार खणून काढू त्याला तयार व्हावें' असा निरोप शिवाजीनें पाठविला. प्रेसिडेंटनेंहि स्मिथला ठेवून घेऊन शिवाजीच्या धमकीला न मोजतां प्रत्युत्तर दिलें.

स्मिथनें शिवाजीबद्दल पुष्कळ माहिती दिली. 'शिवाजीचे लोक सांगतात त्यावरून ते १० हजार आहेत. दोन राजे येऊन मिळाल्यामुळें सैन्य पुष्कळच मोठें झालें असावें यांत संशय नाहीं. त्यांचे घोडे चांगलेच होते (हें आम्हींहि प्रत्यक्ष पाहिलें होतें.) द्रव्यांच्या राशी पडल्या होत्या त्यावरून २०।२५ लाखांची तरी लूट शिवाजीला मिळाली असावी. शुक्रवारीं सकाळीं प्रत्येकजण दोन दोन पिशव्या घेतलेले असे ३००० हमाल आले होते. त्या पिशव्यपैकीं कांहीं पिशव्या तरी केवळ मोहरांनीं भरलेल्या होत्या. २८ शेर मोठे मोतीं होते. हिरे, माणकें पुष्कळच होतीं (४० शेर = ३७ पौंड वजनी). वीरजी व्होरा ८० लाखांचा मालक म्हणून नावाजला होता त्याच्याच घरांत एवढें त्यांना मिळालें. पैशाकरितां फटके, धमक्या, शिरच्छेद, हस्तछेद असे अनेक निर्दयपणाचे प्रकार तो करतो. आपण होऊन प्रामाणिकपणें सांगावयास जाणाऱ्या एका व्यापाऱ्याजवळ पैसा नव्हता म्हणून त्याचा हात मोडून शिवाय त्याचें कापड जाळून त्यानें त्याला हांकलून दिलें.

गुरुवारीं सकाळीं सुभेदाराकडून तहजोडीचें बोलणें करण्यास आलेल्या तरुण माण-

साला शिवाजी बोलला की 'हा अटी मान्य करायला आम्ही बायका आहोंत असें सुभेदाराला वाटतें की काय?' त्यावर 'आम्हीपण बायका नाही; हें घे' असें उलट बोलून तो तरुण शिवाजीच्या अंगावर खंजीर घेऊन धांवला. त्याच्या खंजीराचा हात वरच्यावर दुसऱ्यानें छाटला असताहि तो त्या भरांत शिवाजीच्या अंगावर आदळून दोघेहि कोलमडून पडले व शिवाजीच्या अंगावर दिसणाऱ्या त्या खुनी माणसाच्या रक्तामुळें शिवाजी मेला अशी एकच हाकाटी होऊन सर्व कैद्यांची डोकीं मारावीं अशी हूल उठून कांहीं थोडे कैदी प्राणाला मुकलेच. पण तिनक्यांत शिवाजीनें आपल्यास सोडवून घेतलें व दुसऱ्यानें त्या खुन्याचें डोकेंहि फोडलें. तेव्हां शिवाजीनें कत्तल थांबविण्याचा हुकूम दिला व कैद्यांना समोर आणून उभे केले आणि मर्जीप्रमाणें हात, पाय, डोकें तोडण्यात हुकूम देण्याचा सपाटा चालविला. जेव्हां स्मिथची पाळी आली व त्याचा उजवा हात कापण्याची तया-रीहि झाली तेव्हां तो हिंदींत मोठ्यानें ओरडला 'त्यापेक्षां माझें डोकेंच उडवा!' शिवाजीनें ते मान्य करून त्याची टोपीहि डोक्यावरून काढून ठेविली गेली. पण शिवा-जीला काय वाटलें कोणास ठाऊक त्यानें एकाएकीं कत्तल थांबविली व स्मिथ वांचला. तोंपर्यंत ४ डोकीं व २४ हात कापले गेले होते. त्यापुढें वर लिहिल्याप्रमाणें स्मिथ वखा-रींत पाठवण्यांत आला.

नंतर इथिओपिअन वकीलाला शिवाजीनें धमकीचा निरोप देऊन इंग्रजाकडे पाठ-विलें. 'एक प्रहर आधींच यावें, आम्ही तयारच आहोंत' असें प्रत्युत्तर दिल्यानंतर शिवाजीकडून कोणीच आलें नाहीं. गुरुवार शुक्रवार रात्री आगीनें भयंकर हलकल्लोळ उडविला. शुक्रवारींच वीरजी व्होराचें घर लुटून, जाळून, पार खणून टाकलें. आग डचांच्या वखारीकडे वाढत चालली. आगीच्या उजेडानें रात्रीं दिवसासारखें व धुरानें दिवसाला रात्रीसारखें दिसे. रविवारीं सकाळीं १० वाजतां शिवाजी निघून रात्रीं ६ कोसांवर राहून पुढच्या दुपारीं भडोच (नर्मदा) नदी ओलांडून गेला.

सिवाजीने खजीना गलबतांतून रवाना केला अशी बातमी असल्यामुळें प्रेसिडेंटनें त्याचा पाठलाग करण्यास सांगितलें आहे.

हात तोडण्याची तऱ्हा अशी होती–मनुष्याचे हात पाय बांधून त्याला उपडें निजवून एका चाकूनें मनगटाभोंवतीं हाड दिसेपर्यंत खांच करून मग हाताच्या झटक्यानें पंजा मोडून मग त्याला जोरानें पळायला लावीत; व श्रमानें व रक्तस्रावानें ग्लानी येऊन तो पडला म्हणजे त्याला मुक्त करण्यांत येई.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. सुरत भा. ८६<br>पृ. ५० इ. | (९७८)<br>सुरत–कारवार. | श. १५८५ माघ व. ९<br>इ. १६६४ फेब्रु. १० |

सुरतेच्या लुटीची थोडक्यांत हकीकत (यात सिवाजीचें सैन्य ६।७ हजार होतें

-असें लिहिलें आहे ) देऊन पुढें ' आमच्याप्रमाणेंच त्यानें ( शिवाजीनें ) तुम्हांला अचानक दगा देऊं नये म्हणून सर्वत्र हेर ठेवून जागरूक रहा. गेल्याच वर्षी **शिवाजी** -स्वतः किंवा त्याचा एखादा सरदार तुमच्या बाजूला यावयाचा; परंतु ( मोंगल ) बादशहाचें सैन्य त्याचा पाठलाग करीत होतें म्हणून चुकलें. तरी कांहीं अनिष्ट होऊं नये याकरितां शिल्लक असलेला माल सुरक्षित ठेवावा.

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ. ११<br>पृ. २०३-०५ इ. | (९७९)<br>सुरत—फॅक्टरेट जोर्जे. | श. १५८५ माघ व. ३०<br>इ. १६६४ फेब्रु. १६ |

६ तारखेला पहिली भयसूचना आली व ७ तारखेला शिवाजी सुरतेंत कत्तल व अग्निप्रलय करूं लागला. वीरजी व्होरा व हाजी झाहिद बेग वगैरेंची लूट त्यानें केली व घरांना आगी लाविल्या. शिवाजीनें आम्हांला बरेच निरोप पाठविले. प्रथम, 'इतक्या लांब येतांना आपल्या सैन्याला पुष्कळ खर्च लागला. त्याकरितां मोठी देणगी द्या' असें त्यानें कळविल्यावर आणखी माणसें आणवून आम्हीं वखारीचा पक्का बंदोबस्त केला.......१३ तारखेला तो परत गेला....अँटनी स्मिथकडून शिवाजीनें प्रथम ३ लक्ष रु. खंडणी मागितली. परंतु स्मिथच्या ओळखीच्या एका आर्मीनिअननें शिवाजीला फसवून स्मिथ एक सामान्य मनुष्य असल्याचें सांगितल्यामुळें शिवाजीनें त्याला ३०० रुपये घेऊन सोडून दिलें. [ यांतील इतर तपशील जाने. २८ च्या पत्राप्रमाणें आहे. पहा क्र. ९७५ ]

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ. ११<br>पृ. ३४३ इ. | (९८०)<br>कारवार-सुरत. | श. १५८५ माघ वा ३०<br>इ. १६६४ फेब्रु. १६ |

थोड्या दिवसांपूर्वी **शिवाजीनें 'मोंगलांशीं आपली लढाई चालू असून** त्याकरितां द्रव्य पाहिजे आहे तरी तुम्हीं पाठवावें ' असें गोव्याच्या व्हाइसरॉयाला वकिलाच्या मार्फत सांगून पाठविलें; त्यामुळें व्हाइसरॉयाला राग येऊन त्यानें त्या वकिलाला ३१४ दिवस कैदेंत ठेवून नंतर लोकांनीं विनंति केल्यामुळें सोडून दिलें. या अपमानाबद्दल शिवाजी गोव्याला वेढा घालील असें बोलतात. **चेव्याच्या भीतीनें गोवेकरहि तयारी करीत आहेत** असें समजतें. **आमच्या भागाकडेहि तो येईल** अशी वदंता असल्यामुळें मालाच्या सुरक्षिततेच्या दृष्टीनें आम्हीं काय करावें तें सुचवावें. राणीला बसरा मार्गानें बगदाद जवळील एका धर्मक्षेत्राला जाण्याचा पास द्यावा म्हणून येथील सुभेदार गेले ५१६ दिवस पाठीस लागला आहे. 'सुलतानाचें फर्मान दाखविल्यावर पास देऊं' असें सांगून तूर्त चालढकल केली आहे.

( होनावर ) होनोर इत्यादि किनाऱ्यावरील पूर्वी त्यांच्या ताब्यांत असणारी ठिकाणें पोर्तुगीजांच्या हवालीं करण्याचें बोलणें करण्याकरितां कानड्याच्या राजानें **मलाप्पा मालो** या नांवाचा वकील गोव्याचे व्हाइसरॉयाकडे पाठविला. अजून तो आपल्या

आराध्याच्या घरीं दरोडा घातला. त्यावरी जीजाईचे आबे मायपळ करून मातागळीस निर्णयाकरतां गेलों. पण ताटे व पिटे नियून गेले. म्हणून तेथल्या लोकांनीं पण देऊन आराध्यास पंढरपुरास पाठविले. पण पिटे हे विठल आराध्यास मारून रात्रीं बाळंतबाईस घेऊन पट्टून गेले. (अपूर्ण)

प्र.व. २ पृ. १६० } (९८५) } श. १५८६ चैत्र शु. ३
शु. ७ रम १ } फर्मान फा. शु. व सौ. } इ. १६६४ मार्च २०

!—— मुसदी मी. जुमेरः— नवलास उंबरे येथील मशिदीचा काजी अबदुला यास दरमहा ६ रु. देत जाणें.

सं.२० ले.१५ } (९८६) { श. १५८६ चैत्र शु. ७
श. } कर्जखत { इ. १६६४ मार्च २४

गोपाळ बाबाजी—— एसाजीपंत आबेः– २२० रु. घेतले आहे. दर माहे दर सदे रु. १० पहिल्या महिन्यास, दर म. दर स. रु. ५ पुढला महिना. पैके नरसिंहपंतापासुन घेऊन दिधले.

इं. फॅ. ११ } (९८७) { श. १५८६ चैत्र व. ४
पृ. ३११ इ. } सुरत-कंपनी { इ. १६६४ एप्रील ४

सुरतेच्या लुटीबद्दल औरंगजेबानें फार खंत बाळगून शिवाजीवर सुड घेण्याचा निश्चय केला आहे. आमचे अर्जाचा व आमच्या बहादुरकीबद्दलच्या शिफारसींचा मोठ्या उदारपणानें विचार करून एक वर्षभर इंग्रजांना व इतर सर्वच व्यापाऱ्यांना सर्व जकाती माफ करण्याचे हुकूम त्यानें लिहिले आहेत. पुढेंहि ½ जकात दरसाल माफ व्हावी असें कायमचें फर्मान मिळेल, अशी बरेचजण आशा देत आहेत. [*बंगालला लिहिलेल्या ३० एप्रीलच्या पत्रांत 'आपल्या शहरांतील व्यापाऱ्यांना उत्तेजन मिळावें व झाल्या नुकसानीची कांहींशी भरपाई व्हावी म्हणून एक वर्षाच्या जकाती औरंगजेबानें माफ केल्या आहेत'* असें लिहिलें आहे.]

इं. फॅ. ११ } (९८८) { श. १५८६ वैशाख शु. ३
पृ. ३४३ इ. } कारवार-सुरत { इ. १६६४ एप्रील १८

विजापूरचा आदिलशहा व बेदनूरचा राजा यांचा तह होऊन बेदनूर (राजधानीचें शहर) राजाच्या हवालीं करण्यांत आलें. परंतु तो राजा मेल्यानंतर त्याच्या दरबारांतील ब्राम्हणांनीं त्याच्या मुलाचा वध करून एक नवाच वारस उभा केल्यामुळें संतापून जाऊन आदिलशहानें बेदनूरच्या राज्यावर उतरेकडून बहलोलखान व खुद्द बेदनूरवर ६००० घोडेस्वारांनिशीं सय्यद इलियास सर्जाखान यांस पाठविलें आहे.

रुस्तुमजमा या मार्गानें भटकलवर जाणार असल्याची बातमी आल्यामुळें त्याच्या स्वागताची तयारी या शहरांत सुरू आहे. हेनावरशिवाय सर्व (ठिकाणें) पोर्तुगीजांचे हवाली करण्याच्या अटीवर पोर्तुगीज लोक व कानड्याचा राजा यांच्यांत तह झाला आहे. परंतु मलाप्पा माली अद्याप गोव्याहून परत आला नसल्यानें नक्की कांहीं सांगतां येत नाहीं.

खं. १५ ले. १०७ }
सु. १०६४ सवाल १४ } (९८९) { श. १५८६ वैशाख व. १
{ इ. १६६४ मे १

नरसो रामाजी देसकु. किले पनाळा— मोक. मौ. अंब्र डे का बालाघाट.

आमच्या मौक. मजकूच्या हकापैकीं दोन होन कमलनयन गोसावी यांस भंडारा व नंदादीप यासाठीं दिले आहेत.

डाग रजिस्टर १६६४ पृ. १६३ व }
पृ. १७४ मे १२ न्यू. } (९९०) { श. १५८६ वैशाख व. २
{ इ. १६६४ मे २

कोलाटरी राज्य हें, कॅननोरच्या किल्ल्याच्या उत्तरेस व दक्षिणेस सुमारें ७ मैल पसरलेली अशी जमीनीचे अंगानें रुंदावलेली एक पट्टी असून, झामोरीनच्या राज्याला कॉंजाली गावाशीं जोडतें. शिवाप्पा नायकाच्या राज्याला त्याची हद्द निरिचिरेन येथें लागते .[पृ. १७४]

शिवाजीच्या लुटीची बातमी सुरतेहून कॉरोमांडेल किनाऱ्याला पोंचली आहे. जलमार्गानें कारोमांडेलचा सुरतेशीं विशेष संबंध नाहीं. परंतु जमिनीवरून गोवळकोंड्याच्या मार्फतीनें चांगलें दळणवळण चालतें. [पृ. १६३]

डाग रजिस्टर १६६४ }
पृ. १६५ मे १५ न्यू } (९९१) { श. १५८६ वैशाख व. ५
{ इ. १६६४ मे ५

शिवाजीवर चालून गेलेल्या शाएस्तेखानाचा पराजय होऊन खुद्द त्याच्याच प्राणावर बेतलें होतें. पण थोडक्यांत बचावलें. आदिलशहा मोंगलांचा मांडलिक झाला आहे. शिवाजीचा यशःक्रम पूर्ववत् चालू असून त्यानें अचानक सुरतेवर हल्ला करून जाळपोळ व लुटालूट केली. अजूनपर्यंत थोडथोडी हकीकत कळली होती. आतां सविस्तर लिहितों:— [पुढचा वृत्तांत सारांशानें दिला आहे पहा. ले. ९६८ व ९७०]

ई. फॅ. ११ }
पृ. ३४४-४५ इ. } (९९२) कारवार-सुरत. { श. १५८६ वैशाख व. १४
{ इ. १६६४ मे १४

४००० घोडदळ व पायदळ एवढें सैन्य आदिलशहानें शिवाजीवर-

राजाकडे परत गेला नाहीं. यामुळें त्यानें काय ठरविलें हें सांगता येत नाहीं. [ गोव्याच्या १ एप्रिलच्या पत्रांत होनावर, बसरूर व मंगळूर या तीन किल्ल्यांचा उल्लेख केलेला आहे. पहा इं. फॅ. ११ पृ. ३४२.]

मॆ. व. २ पृ. १६० } (९८१) { श. १५८५ फाल्गुन शु. ९
शु. ६ हि. १०७४ साबान ७ } फर्मान फा. मु. व सी. { इ. १६६४ फेब्रु. २५

मुअज्जम बिन महमद आलमगीर ——!

उंबरे येथील मशीदीची चाकरी करण्याबद्दल अबदुला काजी यास दरमहा रु. ६ पगार नेमला आहे.

रियासत मा. १ पृ. २९४ } (९८२) { श. १५८५
मॉ. रि. } { इ. १६६३

शिवाजी (हस्ते नीलप्रभु)—मोगल अधिकारी.

आज तीन वर्षे बादशहाचे मोठमोठे सरदार व योद्धे आमचा प्रदेश काबीज करण्यासाठीं चालून येत आहेत, हें तुम्हा सर्वांस माहीत आहेच. बादशहा हुकूम फर्मावितात 'शिवाजीचे किल्ले व मुलूख काबीज करा.' तुम्ही जबाब पाठवितां 'आम्ही लौकरच काबीज करतों.' आमच्या ह्या कठिण प्रदेशांत नुसता कल्पनेचा घोडा सुद्धां नाचविणें कठिण आहे. मग तो प्रदेश काबीज करण्याची गोष्ट कशाला! मनस्वाच खोट्या बातम्या बादशहाकडे लिहून पाठविण्यास तुम्हांला लाज कशी वाटत नाहीं! कल्याणी व बेदरचे किल्ले उघड्या मैदानांत होते ते तुम्ही काबीज केले. आमचा प्रदेश अवघड व डोंगराळ आहे. नदीनाले उतरून आण्यास वाट नाहीं. अत्यंत मजबूत असे साठ किल्ले आज माझे तयार आहेत. पैकीं कांहीं समुद्र किनाऱ्यालगत आहेत. बिचारा अफजलखान जावळीवर फौज घेऊन आला आणि नाहक मृत्युमुखीं पडला, हा सर्व प्रकार आपल्या बादशहास कां कळवीत नाहीं! अमीरुलउमराव शाएस्तेखान आमच्या या गगनचुंबित डोंगरांत व पाताळास पोंचणाऱ्या खोऱ्यांत तीन वर्षे सारखा खपत होता. 'शिवाजीचा पाडाव करून लौकरच त्याला काबीज करतों' असें बादशहाकडे लिहून लिहून थकला. ह्या खोडसाळ वर्तनाचा परिणाम त्याला भोवला तो परिणाम सूर्यासारखा स्वच्छ सर्वांच्या डोळ्यासमोर आहे. आपल्या भूमीचें संरक्षण करणें माझें कर्तव्य आहे आणि तुम्ही बादशहाकडे कितीहि खोट्या बातम्या लिहून पाठविल्या तरी मी आपलें वर्तव्य बजावण्यास कधीं चुकणार नाहीं

फॅ. रे. सुरत मा. ८६ } (९८३) { श. १५८६ चैत्र शु. १
पृ. ६४ इ. } सुरत—चॅटम { इ. १६६४ मार्च १९

......(आमचे गलबतावरून इतर मदत झाली त्याबरोबरच) कांहीं पितळी तोफा आणून दरवाजावर व इतर ठिकाणीं मान्याच्या सोईनें बसवून दिल्या होत्या......

शहराचा बराच भाग त्यानें केला होता. केवळ पैसा उकळण्याखेरीज बाद-शहावर सूड उगविण्याचाहि त्याचा उद्देश होता.

खं. २० ले. २१७ }
सु. १०६४ रवल १५ श. }
(९८४=९५७ अ)
पोट पत्रे
{ श. १५८५ आश्विन व. २
{ इ. १६६२ आक्टो. ८

अमवादी कोनेरो विश्वनाथ ताटे वं बहिरो रत्नाकर थिटे, क्षेत्र पंढरपूर, यांनी अमदानगर येथील सभ्य स्मार्त महाजन महाप्रश्नीक या विघमाने केली तक्रीर ऐसी जे:– आपल्या पूर्वजाकडे पंढरपूरचें ज्योतीष व कुलकर्ण मिरासी चालत असतां ४० वर्षापूर्वी रखमाजी अनंत याचा मोकासा चालू असतां आराध्यानीं ताटे व थिटे यांवरोबर आपण तिसरा, असा तंटा मांडला. त्या वेळीं उदरव्यवसायास्तव आमचीं माणसें गांव सोडून गेलीं होतीं; यामुळें आराध्याच्या वकिलातीनें सरकारांत आमची दाद लागूं दिली नाहीं. पुढें दुष्काळांत माणसास माणूस खाऊं लागलें; अशा स्थितींत १०।१२ वर्षे ज्योतीष वृत्ति अमानत झाली. बरा काळ जाहल्या उपरी आपले बापभाऊ गांवावर आले व पंढरीपंत मोकासेदार असतां त्यांनीं आपली वृत्ति खादली. पुढें आराध्ये यांनीं हक पुकारा करून वृत्ति अमानत करविली. नंतर त्याचा मुकासा बरतर्फ होऊन जसवंतराऊ यास मुकासा जाला. त्यानें अंबेजोगाई हें स्थळ निवाड्यास नेमलें. पण आराध्ये आले नाहींत. त्यांनीं निवाडा करावा तंव **अफझलखानाची तसवीस क्षेत्रास लागली.** मोकासाई करनाटकास पाठविला. त्याकारतां निवाडा झाला नाहीं. हल्लीं मोकासाइ यांनीं त्रिपुरदासास पाठविलें. त्यांनीं निवाड्यासाठीं आम्हास अमदानगरास पाठविलें आहे.

पश्चमवादी– गोविंद नरसिंह आराध्ये याची तक्रीर पूर्वी राहीच्या बोरगावास पिलंभट ताटे यानें दिव्य केले तेव्हां तो खोटा ठरला; आणि नागण आराध्या जयपत्र घेऊन गावास आला. नंतर सांगोल्याच्या देशमुखाजवळ ताटे थिटे श. १४६४ पराभव मध्यें निर्णय करून घेत होते तो आराध्यानें कबूल केलें. तेव्हां, ताटे थिटे यांनीं आराध्यास घाय करून लुटलें. पुढें सेख जैददी नेवगेवत वकील करून ताज्यांनीं नागण आराध्यास धरून नेऊन खानाचा कागदहि करून घेतला. त्यावरी नागण आराध्ये मेला. पुढें ५ वर्षांनीं ताटे व थिटे यांनीं कासेगांवीं तिमण आराध्ये यास धरून नेऊन जुलमें नगविलें. ऐशी करकर होत असतां रखमाजी पंताचे कारकीर्दीस [श. १५२८ पिंगलमध्यें] तिमणा आराध्ये, कृष्णभट ताटे व थिटे यांनीं आपसांत समजोन मानपान वाटून घेतले व ते पंढरीपंताचे कारकीर्दीपर्यंत चालले. पंढरीपंताचे वेळेस माझी मिरासी ताटे खाऊं लागले व मन्मथ संवत्सरीं [श. १५७७] पंढरीपंतांनीं मिरासी अमानत केली. दुर्मुख [श.१५७८] फाल्गुनमासीं महिपतरायास मोकासा जाला. ५ महिन्यांनीं बहिरोबा थिटा यानें कृष्णभट

आराध्याच्या घरीं दरोडा घातला. त्यावरो जीगाईचे आवे मायधळ करून मातागळीस निर्णयाकरतां गेलो. पण ताटे व धिटे निघून गेले. म्हणून तेथल्या लोकांनीं पत्र देऊन आराध्यास पंढरपुरास पाठविलें. पण धिटे हे विठल आराध्यास मारून रात्रीं बाळंबाईस घेऊन पळून गेले. (अपूर्ण)

| | | |
|---|---|---|
| मे.व.२पृ. १६० <br> पु. ७ रम १ | (९८५) <br> फर्मान फा. मु. व सी. | श. १५८६ चैत्र शु. १ <br> इ. १६६४ मार्च २० |

!—— मुसद्दी मौ. जुमेरः— नवलास उंबरे येथील मशिदीचा काजी अबदुला यास दरमहा ६ रु. देत जाणें.

| | | |
|---|---|---|
| सं. २० ले. १५ <br> श. | (९८६) <br> कर्जखत | श. १५८६ चैत्र शु. ७ <br> इ. १६६४ मार्च २४ |

गोपाल बाबाजी—— पुताजीपंत आत्रेः— २२० रु. घेतले आहे. दर माहे दर सदे रु. १० पहिल्या महिन्यास, दर म. दर श. रु. ५ पुढला महिना. पैके नरसिंह-पंतापासून घेऊन दिघले.

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ. ११ <br> पृ. ३११ इ. | (९८७) <br> सुरत–कंपनी | श. १५८६ चैत्र व. ४ <br> इ. १६६४ एप्रील ४ |

सुरतेच्या लुटीबद्दल औरंगजेबानें फार खंत बाळगून शिवाजीवर मुद्द घेण्याचा निश्चय केला आहे. आमचे अर्जाचा व आमच्या बहादुरकीबद्दलच्या शिफारसींचा मोठ्या उदारपणानें विचार करून एक वर्षभर इंग्रजांना व इतर सर्वच व्यापाऱ्यांना सर्व जकाती माफ करण्याचे हुकूम त्यानें लिहिले आहेत. पुढेंहि ½ जकात दरसाल माफ व्हावी असें कायमचें फर्मान मिळेल, अशी वरेचजण आशा देत आहेत. [बंगालला लिहिलेल्या ३० एप्रीलच्या पत्रांत 'आपल्या शहरांतील व्यापाऱ्यांना उत्तेजन मिळावें व त्यांच्या नुकसानीची कांहींशी भरपाई व्हावी म्हणून एक वर्षाच्या जकाती औरंगजेबानें माफ केल्या आहेत' असें लिहिलें आहे.]

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ. ११ <br> पृ. ३४३ इ. | (९८८) <br> कारवार–सुरत | श. १५८६ वैशाख शु. ३ <br> इ. १६६४ एप्रील १८ |

विजापूरचा आदिलशहा व बेदनूरचा राजा यांचा तह होऊन बेदनूर (राजधानीचें शहर) राजाच्या हवालीं करण्यात आलें. परंतु तो राजा मेल्यानंतर त्याच्या दरबारांतील ब्राम्हणांनीं त्याच्या मुलाचा वध करून एक नवाच वारस उभा केल्यामुळें संतापून जाऊन आदिलशहानें बेदनूरच्या राज्यावर उत्तरेकडून बहलोलखान व खुद्द बेदनूरवर ६००० घोडेस्वारांनिशीं सय्यद इलियास सर्जाखान यांस पाठविलें आहे.

रुस्तुमजमा या मार्गानें भटकळवर जाणार असल्याची बातमी आल्यामुळें त्याच्या स्वागताची तयारी या शहरांत सुरू आहे. हॅनावरशिवाय सर्व (ठिकाणें) पोर्तुगीजांचे हवालीं करण्याच्या अटीवर पोर्तुगीज लोक व कानड्याचा राजा यांच्यांत तह झाला आहे. परंतु मलाप्पा माळो अद्याप गोव्याहून परत आला नसल्यानें नक्की कांहीं सांगतां येत नाहीं.

खं. १५ ले. १०७ } (९८९) { श. १५८६ वैशाख व. १
सु. १०६४ सवाल १४ } { इ. १६६४ मे १

नरसो रामाजी देसकु. किले पनाळा— मोक. मौ. अंबडे का बाळाघाट.

आमच्या मौक. मज.च्या इकापैकीं दोन होन कमलनयन गोसावी यांस भंडारा व नंदादीप यासाठीं दिले आहेत.

डाग रजिस्टर १६६४ पृ. १६३ व } (९९०) { श. १५८६ वैशाख व. २
पृ. १७४ मे १२ न्यू. } { इ. १६६४ मे २

कोलाटरी राज्य हें, कॅननोरच्या किल्ल्याच्या उत्तरेस व दक्षिणेस सुमारें ७ मैल पसरलेली अशी जमीनीचे अंगानें बंदावलेली एक पट्टी असून, शामोरीनच्या राज्याला कॉंजाळी गावाशीं जोडतें. शिवाप्पा नायकाच्या राज्याला त्याची हद्द निरिचिरेन येथें लागते .[पृ. १७४]

शिवाजीच्या लुटीची बातमी सुरतेहून कॉरोमांडेल किनाऱ्याला पोंचली आहे. जलमार्गानें कारोमांडेलचा सुरतेशीं विशेष संबंध नाहीं. परंतु जमिनीवरून गोवळकोंडयाच्या मार्फतीनें चांगलें दळणवळण चालतें. [पृ. १६३]

डाग रजिस्टर १६६४ } (९९१) { श. १५८६ वैशाख व. ५
पृ. १९५ मे १५ न्यू. } { इ. १६६४ मे ५

शिवाजीवर चालून गेलेल्या शाएस्तेखानाचा पराजय होऊन खुद्द त्याच्याच प्राणावर बेतलें होतें. पण थोडक्यांत बचावलें. आदिलशहा मोंगलांचा मांडलिक झाला आहे. शिवाजीचा पराक्रम पूर्ववत् चालू असून त्यानें अचानक सुरतेवर हल्ला करून जाळपोळ व लुटालूट केली. अजूनपर्यंत थोडथोडी हकीकत कळली होती; आतां सविस्तर लिहितो:— [पुढचा वृत्तांत सारांशानें दिला आहे पहा. ले ९६८ व ९७०]

इ. फॅ. ११ } (९९२) { श. १५८६ वैशाख व. १४
पृ. १४४-४५ इ. } कारवार-सुरत. { इ. १६६४ मे १४

४००० घोडदळ व पायदळ एवढें सैन्य आदिलशहानें शिवाजीवर

पाठविलें आहे. तें गोव्यापासून दोन दिवसाच्या प्रवासावर असलेल्या कडोली गांवापर्यंत आलें असून 'आपण अदिलशहाच्या हुकमानें चौलपर्यंतचा शिवाजीचा सर्व मुलूख घेण्याकरितां आलों आहोंत' असें ते लोक म्हणतात.

इति. ३५ }		(९९३)		{
पृ. २९४ }	श्येनवीजाति-धर्मनिर्णय. उल्लेख	{

· · अयं **शिवाजी राजा** राज्यं प्रशासन् स्वजनपदान् दिदृक्षया कदाचित् अटन्, सह्य-प्रदेशवासिनः श्येनवीति प्रसिद्धान् नानाविधानि उपायनानि आदाय राजदिदृक्षया समागतान् एतान् कौंकणान् दृष्ट्वा राजनिकटवासिनः सभ्यान् पंडितान् एतद्देशीयभूधर्माधिकारिणश्च 'एषां को धर्मः कीदृगाचारः' इति समपृच्छत्। तत्र सभायां स्थिताः पंडिताः। **गागाभट्ट**स्तत्नूचानो निगमागमविचमः॥ सभायां शुशुभे राज्ञः सुधर्मायां यथा गुरुः॥१॥ **दीक्षितः** शितिकंठश्च **रघुनाथो** बुधाधिपः। कवींद्रः **परमानंदो महादेव**श्च पंडितः। **प्रभाकर उपाध्याय**स्तथा **श्रीरंग**शास्त्रिणः। **नृसिंह**शास्त्रिणश्चाथ **भट्टविश्वंभरो**ऽपि च। **अयाचितमहादेवः** पंडिताग्रयो विनायकः। **सोमनाथो जगन्नाथो महाविष्णु**स्तथैव च॥ भृगोपालाभिधोऽनंतोपाध्यायः पंडिताग्रणीः। **शेषोपाख्य**-**महादेवः** काशीस्थाः पंडिता अमी॥ कृष्णागोदावरीनिष्ठाश्च बहवो बुधाः॥ स्थिता नृपसमे तत्र तथैतद्देशवासिनः। धर्माधिकारिणोऽन्यर्थ धर्मशास्त्रार्थकोविदः।

राजापुरप्रांते तु धर्माधिकारिणो गुर्जरोपनायकः शिष्टा विद्यंते। एते धर्माधिकारिणः, अष्टाधिकारिणश्च, गळवल्लीकरोऽनंतः उपाध्यायश्च, सर्वेऽप्येते अन्ये च बहवः पंडिताः समागताः समाजं कृत्वा विविधान् ग्रंथान् आलोक्य परंपरागतश्च एषां धर्मानवलोक्य **गागाभट्ट**प्रमृतयः निर्णयं कृत्वा राज्ञे न्यवेदयिषुः। तत्रत्यं सारमादाय किंचिदत्रापि लिख्यते।

इं. फॅ. ११ }		(९९४)		{ श. १५८८ ज्येष्ठ शु. ४
पृ. ३१२ इ. }	सुरत–मद्रास	{ इ. १६६४ मे १९

बादशहाचा दिवाण **जाफरखान** याजकडून शुद्ध बादशाही जबानीचें पत्र (हसब अल–हुकम) आलें. त्यावरून सुरतेची हकीकत वाचून बादशहाला अत्यंत समाधान होऊन तो म्हणाला 'माझ्या शत्रूशीं दोन हात करितील असे (इंग्रजी व्यापाऱ्यांसारखे) लोक माझ्या देशांत आहेत ही भूषणाची गोष्ट आहे.' ह्या वर्षाची संपूर्ण जकातीची सवलत संपल्यावर तो आम्हांला ( इंग्रजांना ) अर्ध्या जकातीची सूट कायमची देणार आहे. [ जिचे जकातीच्या सुटीचा उच्चार फिरून २६ नोव्हें. १६६४ च्या व २ जाने. १६६५ च्या पत्रांत असला तरी हा गैरसमज होता. केवळ ( आयात ) मालावर शेंकडा २½ चे ऐवजीं २ प्रमाणें जकात घेण्याबद्दलचा १४ मार्च १६६४ चा बादशाही हुकूम ह्या बाबतींत निःसं-

दिग्ध आहे. हीहि सवलत अल्पकाल म्हणजे इ. स. १६७९ पर्यंतच फशीवद्री टिकली. मह्रा. इं. फॅ. ११ पृ. ३१४-३१५]

सं. २० ले. ११३ }
श. } (९९५) फवूल-कतबा { श. १५८६ आषाढ शु. २ { इ. १६६४ जून १५

नारायणभट चित्राव वाई नरशीभट व शंकर

तुमचे आमचे दोन वाडे ब्रह्मसमेने ती ठायी वाटून दिल्हे. त्यानंतर आपण अदलाबदल केली आहे. तुमचा जागा घेऊन सुखें असणें.

इं. फॅ. ११ }
पृ. ३४५ इं. } (९९६) { श. १५८६ आषाढ शु. १३ { इ. १६६४ जून २६

सुरत-कारवार ( १४ मेच्या पत्रास उत्तर )

विलक्षण धाडसी असा दरोडेखोर म्हणून शिवाजीची इतकी ख्याती झाली आहे कीं, लोकांनी **'त्याचें शरीर हवामय असून त्याला पंखहि आहेत'** असें ठरविलें आहे. एऱ्हवीं तो एकाच वेळीं अनेक ठिकाणीं प्रगट होतो ह्या बातम्या शक्य तरी कशा होतात ! आज तो एका ठिकाणीं आहे असें खात्रीलायक समजावें, तर एकदोन दिवसांत तो दुसऱ्याच ठिकाणीं आहे असें कळतें. तर लगेच दूर दूर असलेल्या पांचसहा ठिकाणीं एकामागून एक अशा तऱ्हेनें अप्रतिहतपणें लुटालूट व जाळपोळ करतांना तो आढळतो ! यामुळें त्याचें नांव सर्वतोमुखी झालें असून त्याला भीमाचें (हर्क्युलिस) सामर्थ्य आहे असें लोक मानतात. सुमारें ६० एक गलबतें (कांहीं नवीं बांधून व सज्ज करून) घेऊन तो ह्या बंदरावर (सुरतेवर) अचानक हल्ला करून इराण व बसरा इकडून परत येणारी गलबतें लुटणार आहे अशी हूल उठल्यामुळें आमचे तोंडचें पाणी पळालें आहे ! कित्येक लोकांच्या मतें शिवाजी एवढी तयारी करून खंबायत नदीतून जाऊन सुरतेप्रमाणेंच अहमदाबादची जाळपोळ व लूट करणार आहे ! तो गोव्याला वेढा देईल हें आम्हांला मुळींच संभवनीय वाटत नाहीं. एकादा सक्त वेढा चालवीत बसणयाचें त्याच्या मनांतहि नाहीं. कारण, त्यांत त्याला कांहीं लाभ होणार नाहीं. बिनतटबंदीचीं नगरें धावतापळतांना जाळून लुटावीं; असा अनायासें मिळणारा लाभ त्याला नेहमीं पाहिजे असतो. तुमच्या येथपर्यंतहि तो येणार नाहीं. कारण पावसाळ्यांत घोडा किंवा मनुष्य यांना तिकडील प्रवास सुखाचा होणार नाहीं; आणि दुसरें असें कीं, विजापूरच्या शहानें त्याच्यावर सैन्य पाठविलें तर त्याला रिकामा वेळ फावणार नाहीं. तथापि आपण सुरक्षित आहों या विश्वासावर विसंबू नका. शिवाजीच्या पाळतीवर असा; आणि वेळ येताच सुरक्षित ठिकाणीं जातां येईल अशा तयारीनें रहा. हाच आमचा सल्ला आहे. हुबळी हें ठिकाण आम्हांला सुरक्षित वाटतें. तरी कंपनीची सर्व मालमत्ता तिकडे नेण्याची तजवीज करा.

डाग रजिस्टर १६६४ } (९९७) { श. १५८६ आषाढ व. ३
पृ. २७७ जुलै ११ न्यू. } { इ. १६६४ जुलै १

नागापट्टणकडून असें समजतें कीं, **सुरतेची** लूट झाल्याचें उदाहरण घडल्यापासून **शिवाजीचें** सैन्य असेल त्या त्या ठिकाणीं विश्वासू गुप्त हेर नेहमीं ठेवण्याची व्यवस्था केली जाणार आहे.

सावं. इ. जु. ले. ८ } (९९८) { श. १५८६ श्रावण शु. ७
सु. १०६४ मोहर ५ हि. १०७५ } फर्मान सु. { इ. १६६४ जुलै १९

अली अदिलशहा — अमलदार व देसाई पर० कुडाळ

**अजीजखान सरनोवत** यानी विदित केलें कीं, "**लखम सावंत सरदेसाई** पर. मज. हे फौजेमुद्दां बराबर येऊन मेहनत फार करून **शिवाजीच्या फौजेबरोबर लढाई करून** पर. मज. मध्यें बादशाही दौलत रुजू केली. त्यावरून मेहेरबान होऊन जारती बक्षीस मौ. मालवण पर. मज. निसबत अब्दुल कादीध सरदेसाई यांस सर्व हकासुद्धां दिला आहे. वंशपरंपरेने चालवणें. फर्मान हजर० बाद० महमदशहा विजापूर.

ई. फॅ. ११ } (९९९) { श. १५८६ श्रावण शु. ११
पृ. ३४६६. } कारवार-सुरत (१० जूनचें पत्रास उत्तर) { इ. १६६४ जुलै २३

**रुस्तुमजमा** विजापुरास असून आतापर्यंत आदिलशहाची त्याच्यावर बरी मर्जी आहे. कारवारचा सुभेदार **महमदखान** आणि अंकोला, शिवेश्वर, कडेरा वगैरे ठिकाणचे त्याचे दोस्त सुभेदार हे सर्व कामावरून दूर केले आहेत. पैकीं महमदखानानें आपल्या धन्याला ( रुस्तुमजमा ) सोडून, आदिलशहाचें पदरीं सैनापत्य पत्करलें. **शिवाजीवर** स्वारी करण्याकरितां कुडाळला येऊन राहिलेल्या ४००० घोडेस्वारांचा सेनापती **अजीज-खान** [मृत्यु १० जून, पद्य ले. १०११ ] याला **शिवाजीनें** विषप्रयोग केल्यामुळें, **रुस्तुमजमा** आतां त्याचे जागीं नेमला गेला आहे. नवीन सुभेदारांची संख्या तीन असून एक रुस्तुमजमाचा मुलगा हा सर्व किल्यांचा सुभेदार आणि इतर दोघे वरील शहरांचे सुभेदार नेमिले गेले आहेत. नोकरीचा तीन वर्षांचा करार करून त्या मुदतींत या शहरांचा व्यापार वाढविण्याचें त्यांनीं रुस्तुमजमाला अभिवचन दिलें आहे. व्यापारी लोकांत परिचय असल्यामुळें त्यांना यश येईल असें वाटतें...**सैद इलियास सर्जाखान** कानडाच्या राजाच्या पाठीस लागला असून **जेरा** आदिकरून त्याचे तीनचार मोठे व मजबूत किल्ले त्यानें जिंकून घेतले असून बेदनूरपासून तीन दिवसांच्या प्रवासाच्या अंतरावरील आणखी तीन किल्ले मलबारी नायरांनीं घेतले आहेत. गोव्याला

असतांना ताप आल्यामुळें मलिक मुल्ला मेला [ मृत्यु ३ जुलै-डागरजि० १६६४ पृ. ५७२]. आणि कानड्याच्या राजाशीं आज कांहीं बोलणें करावें आणि उद्यां त्याचा सर्वच मुलूख गमवावा असें होऊं नये म्हणून पोर्तुगीजांनीं कोणत्याहि प्रकारचें बोलणें निश्चित ठरविलें नाहीं. मलिकमुल्ला मेला नसता तर दुसऱ्या कोणत्याहि कारणानें झालेलें बोलणें मोडूं नये इतका पक्केपणा त्यांनि त्याला आणून ठेविला होता.

डच रे. (इं. ऑ.), हिंदु. पत्रें. मा. २७नं. ७११इ. आगस्ट ५न्यू. (१०००) श. १५८६ श्रावण शु. १२ इ. १६६४ जुलै २५

हिंदुस्थानांतील गवर्नर जनरल– डच ई. इं. कं. चे डायरेक्टर्स.

बंडखोर (out-law) दिवाजीनें ५ तारखेला सुरत लुटलें व जाळपोळ केली...... औरंगजेबानें सुरतेला तट बांधण्याची आज्ञा केली असून डच व इंग्रज यांसह सर्व व्यापाऱ्यांना एक वर्ष जकाती माफ केल्या आहेत. ही सूट या वर्षाच्या मार्च ६ पासून अमलांत यावयाची आहे. यामुळें या आपत्तींचें योगानें कंपनीला फायदाच होणार आहे !

सावं. इ. जु. ले. १ सु. १०६४ मोहर १५ हि. १०७५ (१००१) फर्मान श. १५८६ श्रावण व. १ इ. १६६४ जुलै २९

आदिलशहा— अमलदार व देसाई पर० कुडाळ

**पितांबर शेणवी** निसबत **लखम सावंत** सरदे० पर० मज० अर्जी केली कीं "सरदे० हे बरोबर चांगली फौज घेऊन **अजीजखान सरनोबत** सुभे० तळकोंकण यांजबरोबर हुजूरच्या चाकरींत असून त्यांनीं मुलखांत लावणी व आबादानी केली. याजकरितां पर मज०ची नाडगौडगी (१० गावांची) कृपा करून बक्षीस द्यावी. तरी दिली आहे. चालवीत जाणें. फर्मान अलीअदलशा बिन महमदशहा बाद० विजापूर.

डागरजिस्टर १६६४ पृ. ३२१ ऑग. १३ न्यू. (१००२) श. १५८६ श्रावण व. ६ इ. १६६४ आगस्ट ३

**शिवाजीजवळ गलबतांची** संख्या भरपूर असल्यामुळें तो सहज रात्रीं छापा घालून गलबत घेईल म्हणून जमिनीपेक्षां पाण्यावरच त्याचें भय अधिक बाळगिलें पाहिजे. त्यातून वखारींतून माल हालवितांना तर लुटीचें भय फारच आहे. केवळ **शिवाजी**च नव्हे; तर गरीब असल्यामुळें **लखम सावंतहि**, असला डल्ला मारण्यास कमी करणार नाहीं. वरें शिवाजी इतका विध्वंसक असूनहि आजपर्यंत मुख्यत्वेंकरून **वडे साहेबिणीला** खूप करण्याची वरवरची तरी त्याची इच्छा असल्यामुळें, शिवाजीनें वेंगुर्ल्याला धक्का लाविला नाहीं. आतांपर्यंत हा लुटारू आणि त्याचे कुडाळ प्रांतावरील अधिकारी

यांनीं आम्हांला निमंत्रणच दाखविलें आहे. **सरसुभेदार रावजी सोमनाथ पंडीत** यानें सांत [illegible] नावाच्या व्यापाऱ्याला अनेक वेळां आम्हांनें आपल्या भेटीस बोलाविल्यामुळें तो नोव्हें. २२ तारखेला कुडाळला जाऊन त्याला भेटला. राजापुराला शुभमुहूर्तावर सोतेनें येऊन रहावें असा आग्रह करून त्याबद्दल त्यानें वरिष्ठांच्या मंडळालाहि लिहून पाठवावें; असें त्याच्याकडून रावजी पंडितानें कबूल करून घेतलें. शिवाजीकरितां एक उच्च घोडा मिळावा ह्याहि त्याच्या मागणीला, कोणत्याहि तऱ्हेनें आडपडदा न ठेवतां, मार्गातील वाहतुकीच्या वगैरे अनेक प्रकारच्या अडचणी सांगितल्या-वर त्याची तम्यत गेली. तरी देखील 'इंग्रजांनीं पुनः राजापुराला येऊन राहण्याबद्दल त्याच्याकडे रदबदली व मध्यस्थी करावी.' असेंहि त्यानें सांगितलें. इंग्रजांच्या मतें रावजी हा बडा बदमाष असल्यामुळें त्यांनीं प्रसंगोचित सबबी सांगून या विनंतीला नकार दिला आहे.—'कुडाळावर वारंवार स्वाऱ्या झाल्यामुळें त्याची बहुत पायमल्ली झाली आहे' इ.— इंग्रज कंपनीकडून कांहीं माल आपण विकत घेतों, पाठवून द्यावा, ह्याहि रावजीच्या विनं-तीला इंग्रजांनीं वाटाण्याच्या अक्षता लाविल्या. पूर्वी लखम सावंताकडून घेऊन इनाम म्हणून दिलेलीं कित्येक खेडीं **शिवाजीनें सावंताला आतां परत दिलीं आहेत (?). शाहिस्तेखानाला परत बोलावून औरंगजेबानें आपला मुलगा सुलतान शहा याला शिवाजीवर** पाठविलें आहे. मक्केला पाठविलेल्या दोन लहान गलबतांचे व्यापारावर फारच फायदा झाल्यामुळें आतां रावजी आणखी ८।९ गलबतें मक्का, काँगो मस्कत, इराण यांकडे पाठविण्यासाठीं तयार करीत आहे. परंतु त्याला परवाने मिळणार नाहींत [पृ. ३२३]. आदिलशहानें कानड्यावर स्वारी करून त्याला बराच जेरीस आणिला. परंतु खंडणी वसूल करणें (दरोडा घालणें) हाच त्याचा मुख्य उद्देश असल्यामुळें नाय-कानें १५ लाख पॅगोडा (पॅगोडा = ५ गिल्डर्स) खंडणी दिल्यास आपण मुलूख सोडून देतों असा तह करून तो जानेवारींत विजापुरास परत गेला आहे. त्या प्रांतात **शिवाजीला मोठा मान असून लोक त्याच्यावर प्रेम करितात.** यावर्षी पिकें चांगलीं आहेत. तथापि वेंगुर्ला आणि कानडा येथें तांदूळ महाग विकतो. कानड्यातल्या लढाया, मलाप्पा मालूचा कायम मक्ता, शिद्दीच्या व सुरतेकडील मुलखांतला दुष्काळ आणि शिवाजीच्या सैन्यामुळें होणारा दैनिक खप यांमुळें असें होतें. त्यांतच वडे साहेबिणीच्या प्रवासाची तयारी म्हणून तांदूळ जमा करणें चालू आहे त्याचीहि भर पडली आहे. गोंवा प्रांतांत दर-वर्षी चौल, मुंबई, वसई या भागांतून त्यांना लागतो तितका तांदूळ लोक भरतात. परंतु मोंग-लांनीं तो भाग सर्वत्र उजाड करून टाकल्यामुळें त्यांनाहि येथूनच तांदूळ घेतला पाहिजे. • [पृ. ३२४]. वर उल्लेखिलेल्या १० गलबतांच्या आरमारानें शिवाजीवर चालून येणाऱ्या मोंग-लांचे सैन्यास थोपवून धरण्याकरितां आणि त्याला सतावून सोडण्याकरितां शेवटीं २३ आक्टोबर रोजीं वसईला शिवाजीचा पराजय करून, पोर्तुगीजांना भयमुक्त केल्यामुळें हें

आरमार लगेच परत फिरलें. शांततेमुळें व्यापाराला पुनः बरे दिवस येत आहेत. निरनिराळ्या प्रदेशाकडे जाण्याकरितां एकामागून एक अकरा गलबतें सुटलीं आहेत.

इं. फॅ. ११ } (१००३) { श. १५८६ श्रावण व. १२
पृ. ३४७ इ. } कारवार-सुरत (२६ जूनचें पत्रास उत्तर) { इ. १६६४ आगस्ट ८

**शिवाजीची इतका दहशत** बसली आहे, हें वाचून खेद होतो; आणखी कित्येक दिवस ही परिस्थिती अशीच रहाणार ! कारण त्याच्यावर पाठविलेले **औरंगजेबाचें सैन्य आतां परतलें** असल्यानें त्याला सर्वत्र स्वैरसंचार करावयाला मोकळीक झाली आहे. अहमदनगर त्यानें लुटल्याची खात्रीलायक बातमी असून शि. ची स्वारी दौलताबादेकडे खास झुकणार असें म्हणतात. परतु आम्हांला तसें मिण्याचें कारण नाहीं. कारण **रुस्तुमजमा, फाझलखान** आणि **सादतखान** शिवाजीवरच चालून येत आहेत. गोव्याहून **कानड्याच्या** राजाच्या बंदरांना वेढा घालण्याकरितां आरमार पाठविलें जात आहे अशी बातमी आहे. विजापुराहूनहि त्या राजाचे पारिपत्याकरितां सैन्य जात आहे. तेव्हां त्या मार्गांत खरेदी होणें अशक्य आहे. [**इ. १६६४ ऑगस्ट ११ चें कंपनीचें पत्र सुरतेला** आलें. त्यांत शिवाजीचे लुटीचे वेळीं मालमत्ता सुरक्षित ठेवल्याबद्दल आपल्या नोकरांची वाहवा केली आहे].

खं. २० ले. ११४ } (१००४) { श. १५८६ भाद्र. व. २
सु. १०६५ सफर १६ } मिसलों फा. मु. मज. सी. { इ. १६६४ आगष्ट २८

अज. दि. पर. वाई—— ता मोक. देहाय

नारायणभट गोपीनाथभट योस पसरणी, मुन्हे व बोहडे येथील इनाम जमीन चालविणें.

इं. फॅ. ११ } (१००५) { श. १५८६ भाद्र. व. २
पृ. ३४७ इ. } गिफर्ड, हुबळी--सुरत. { इ. १६६४ आगष्ट २८

**कानड्याच्या राजावर सर्जाखान** जोरानें हल्ला करीत आहे दिवाळीच्या सुमारास मोठी स्वारी काढण्याकरितां आदिलशहा, आपल्या सरदार लोकांच्या सैन्याशिवाय, आणखी १२००० घोडदळाची भरती करीत आहे. **रुस्तुमजमा** कुडाळपर्यंत आला असून लवकरच कारवारला भेट देईल असें वाटतें.

इं. फॅ. ११ } (१००६) { श. १५८६ भाद्र. व. ८
पृ. ३९६-९७ इ. } सुरत-हुगळी { इ. १६६४ सप्टें. ३

तुमचा नवाब **शास्ताखान** आणि त्याची लोभी स्वार्थी वृत्ति आमच्या चांगली परिचयाची आहे. त्याचें हें वर्तन नवीन नसून त्याची अशीच हीन परंपरा आहे. ज्या

युद्धांत त्या प्रबळ बंडखोरा (शिवाजी)नें त्याला कायमचा डाग लाविला आणि मग तेथून त्याची मानखंडनेनें हकालपट्टी झाली त्या दख्खनच्या युद्धांत त्याच्या सैन्याबरोबरच्या बाजाराचा कायम मक्ता (monopoly) त्यानें आपल्या स्वतःकडेच ठेविला होता!

सं. २० ले. ११५ } (१००७) { श. १५८६ आश्वीन शु. १
सु. १०६५ सफर २९ } मिसेली मु. व सौ. { इ. १६६४ सप्टें. १०

अज दि. पर याई —— ता मोक. मौ. बोरघल व किन्ही.
नरसोभट व एकनाथभट यांस इनाम जमीन चालविणे.

सं. २० ले. २४४ } (१००८) { श. १५८६ आश्वीन शु. २
सु. १०६५ सफर ३० } सुर्दखत मु. { इ. १६६४ सप्टें. ११

अजर. माणकोजी बङ्खाळ—— ता कार. व देसमु. व देसपां. पर. सुपे.
माहादाजी गोसावी सो मोरेश्वर यांस जो इनाम मोरेश्वरास आहे तो चालू ठेवणें.
[माणकोजी बङ्खाळ बंदह पातशाह अवरंगजेब, अलमगीर, अशी शिक्यांतील-अक्षरें आहेत.]

डाग रजिस्टर १६६४ } (१००९) { श. १५८६ आश्वीन शु. ४
पृ. ३७१ सप्टें. २३ न्यू. } { इ. १६६४ सप्टें. १३

**शिवाजीवर** जातीनें जाण्याच्या उद्देशानें **मोगल बादशहा** दरबारचा सर्व परिवार बरोबर घेऊन दिल्ली व शहाजहानाबाद येथेंच राहून, दख्खनकडे शिवाजीचा नाश करण्याकरितां, प्रत्यहीं सैन्यावर सैन्यें पाठवीत आहे.

[पृ. ३७२] शिवाजीवर चालून येणाऱ्या मोंगली सैन्यापासून संरक्षण करण्याकरितां पोर्तुगीजांनीं उत्तरेकडील आपलीं ठाणीं तटबंदीचीं केलीं आहेत.

[पृ. ३७४] गलबतांत जागा न मिळाल्यामुळें डचांचा माल आक्टोबरपर्यंत हिंदुस्थानांतच पडून राहणार. त्याला शिवाजी आणि इतर दरोडेखोरांपासून भय आहे.

डाग रजिस्टर १६६४ } (१०१०) { श. १५८६ आश्वीन व. ११
पृ. ४२३ ऑक्टो १५ न्यू. } { इ. १६६४ ऑक्टो. ५

सुरतेच्या नव्या सुभेदारानें ता. २८ ऑग. रोजीं डचांच्या डायरेक्टरास (मुख्याधिकाऱ्यास) बोलावून आणलें आणि मकेहून परत येणाऱ्या बादशाही गलबतांना सलामी देण्याकरितां व **शिवाजी मोंगलांविरुद्ध आरमारी हल्ला करण्याची तयारी करीत आहे** त्याच्यापासून त्यांचें संरक्षण करण्याकरितां, डचांनीं व इग्रजांनीं प्रत्येकीं एक याप्रमाणें दोन गलबतें १० सप्टेंबर रोजीं द्यावीं; अशाबद्दलचें बादशाही फर्मान आलें असल्याचें कळविलें. या उद्योगांत होणाऱ्या नुकसानीची

भरपाई रोखीनें अगर जकातीच्या व्यवहारांत सवलती देऊन केली जाईल असें सांगितल्या-वर इंग्रजांनीं कबूलीखत लिहून दिल्यामुळें डचांना दुसरा मार्गच राहिला नाहीं. आणि त्यांनीं सुरत व भडोच या बंदरांत आयात व निर्यात मालावर जकातीची संपूर्ण सूट मिळण्याच्या अटीवर कबूली दिली. मुसलमानांकडून रोखीची भरपाई होणें कठीण वाटल्या-मुळें त्यापेक्षां जकातीच्या सवलती घेणें डायरेक्टरला अधिक सोईचें वाटलें. ...शिवाजीनें आजपर्यंत समुद्रावरील कांहींच (धाडस) अंगावर घेतलेलें नव्हतें; यामुळें डायरेक्टरच्या मतें, आताची ही केवळ पोकळ हूल असावी. ह्या भानगडींत पडल्यानें शिवाजीचा आपल्यावर राग होईल खरा; परंतु त्यानेंहि आमचें बरेंच नुकसान केलें आहे. शिवाय [अशी मदत न दिल्यास] औरंगजेबाचे गलबतांना कांहीं जबर अपाय झाल्यास त्याचा परिणाम आमचेहि व्यापारावर झाल्याशिवाय रहाणार नाहीं. यापुढें झालेल्या बोलण्यांत, एक वर्षपर्यंत संपूर्ण जकातीच्या सवलती सर्वांनाच देण्याबद्दलचा व त्यानंतर दर शेंकडा ३ टक्का प्रमाणें डच व इंग्रज यांना कायमची सूट देण्याबद्दलचा फर्मानाचा तेवढा भाग त्या मुमेदारानें दाखविला [पृ. ४२४]. शिवाजीच्या हल्ल्यामुळें किंवा अदा न केलेल्या जकाती अशाबद्दल १११३४:१२ फ्लॉरेन्स (गिल्डर्स) इतकें (डच ई. इं. or brought on the coanting 'unpaid customs' ] कंपनीचें नुकसान झालें आहे. यांचा हिशेब एक वर्षाच्या जकातीच्या सवलतीच्या वेळीं करून घ्यावयाचा आहे.

| | | |
|---|---|---|
| डाग रजिस्टर १६६४<br>पृ. ४४८-४९, ऑक्टोबर १९ न्यू. | (१०११) | श. १५८६ आश्विन व. ३०<br>इ. १६६४ आक्टो. ९ |

८ मे रोजीं अजीजखान (आदिलशाही) याचें सैन्य बालाघाटांतून उतरून सुभेदार रावजी पंडित याचेवर चालून आल्यामुळें रावजी पंडित राजापुरावर माघारी जाऊन तेथें स्वसंरक्षण करीत राहिला आहे. देसाई लखम सावंत व अजीज-खान यांची भेट झाली. त्यांत कुडाळवर स्वारी करण्याचें ठरून तें काम सावंतांनीं एकट्यानेंच करावें व वेळ पडल्यास अजीजखानानें साहाय्यार्थ जावें असें ठरलें. आपला शब्द आणि शौर्य यांचा कस लागणार आहे हें ध्यानांत ठेवून लखम सावंत इतक्या शौर्यानें लढला कीं, थोडक्याच वेळांत तेथील लोक शरण आले. आपलीं हत्यारें व नेतां येतील तेवढ्या वस्तु बरोबर घेऊन लोकांनीं बाहेर पडावें व लखम सावंताचें व शिवाजीचें तीव्र वैर असल्यामुळें त्याचे लोकांच्या लुटीपासून रक्षण करण्यासाठीं अजीजखानाच्या २०० घोडेस्वारांनीं कुडाळच्या लोकांनीं सावंतवाडीच्या सरहद्दीवर नेऊन सुरक्षित पोंचवावें; अशा अटीवर मराठ्यांनीं अजीजखानाशीं तह केला. वेढा चालू असतांना लखम सावंतानें आमच्याकडून (डचांकडून) दारूगोळा मागितला. परंतु आम्हीं देण्याचें नाकारलें. त्यावेळीं त्यानें खूप धमक्या दिल्या पण आतां तो दोस्त झाला आहे! सेनापती अजीजखान व वेंगुर्ल्याचा सरसुभेदार विकाजी पंडित हे कांहीं दिवसांनीं वेंगुर्ल्यास आले. वेंगुर्ल्याबद्दल

त्यांना आदर वाटला. अर्जीजखान १० जून. ला मृत्यु पावल्यामुळें त्याचे जागीं रुस्तुमजमाची निवड झाली आहे. [ पहा ले. ९९९ ] तळकोंकण प्रांताबद्दल आदिलशहाला हकीकत सांगण्याकरितां विकाजी पंडित १ ऑगष्टला विजापुरीं निघून गेला आहे. तो परत आल्यावर त्याचे सांगण्याप्रमाणें बंडखोर शिवाजीशीं युद्ध करण्याचें पुढील धोरण ठरावयाचें असल्यामुळें रुस्तुमजमा हुकेरीला जाऊन तेथें त्याची वाट पहात राहील. पाटगांवच्या रस्त्यावर, घाटमाथ्यावरील प्रतापगडी (प्रतापगड) नांवाचा डोंगरी किल्ला प्रथम घेऊन नंतर क्रमानें खारेपाटण व राजापूर ह्यांचें रक्षण मुख्य हल्ल्याचा कार्यक्रम आहे.

वरवर मोठा गाजावाजा करून औरंगजेब व त्याचा वकील यांना खूष करण्याकरितां आदिलशहानें हें युद्ध चालू केलें आहे असें इच रेसिडेंटचें मत आहे. अलीकडे, 'तुम्हीं शिवाजीवर हल्ला करण्याकरितां सैन्य उभारलें तर तुम्हांला द्यावी लागते ती ३० हजार होनांची खंडणी माफ करितों; नाहींतर तुमच्या मुलखावर स्वारी करितों' असें निर्वाणीचें बोलणें औरंगजेबानें वारंवार केल्यामुळें कांहीं तरी करण्यापलीकडे या स्वारींत आदिलशहाचें खरें मन नाहीं असें दिसतें. अर्जीजखान तटस्थ राहून लखम सावंत कुडाळला बसून बेदा देत असतांना आंतील लोकांनीं अनेक वेळां बाहेर पडून छापे घातले. परंतु एकहि वेळीं आदिलशाही सैन्याला तोशीस लागू दिली नाहीं. लखम सावंताची थोडी दैना झाल्याचें दिसतांच कुमकेकरितां म्हणून जें विजापुरी सैन्य जाई तें एकहि गोळी न मारतां परत येई! आदिलशहाचें सैन्य टप्प्याखालीं आल्यास त्यांच्यावर बंदुकी न रोखतां सावंताचे लोकांनीं डोकें वर काढतांच त्यांच्यावर भयंकर सरबत्ती होई! प्रतापगडच्या लोकांनीं पाटगांवच्या लोकांना कितीहि त्रास दिला तरी सुलतानाचे लोक त्यांच्याकडे कानाडोळाच करीत!!

शिवाजीनें आदिलशहाकडे ३० हजार होन, २ हत्ती, ८० सुंदर घोडे इत्यादि अनेक नजराणे पाठवून युद्धांत आपल्यावर मेहेरनजर ठेवावी, आणि दरसाल आपल्याकडून ३० हजार होन खंडणी घेऊन मोंगलांचा स्नेह तोडावा इत्यादि मनधरणीचें बोलणें लाविलें आहे. उभयतांचा गुप्त तह झाला असावा असेंहि म्हणतात. औरंगजेबाला इच्छेच्याप्रमाणें एकसारखें फसवीत राहणें जमलें नाहीं तर आदिलशहा शिवाजीवर हत्यार धरण्यापेक्षां औरंगजेबाशींच बिघाड करील असें कित्येकांचें म्हणणें आहे.

शिवाजी मोठया परिश्रमानें किनाऱ्यावर ५० गलबतांचें आरमार तयार करवीत आहे. ऑगस्टअखेर तें समुद्रावर सफर करील. शिवाजीचा उद्देश काय आहे हें समजत नाहीं. सुरतेच्या लोकांच्या मतें मक्केकडे जाणाऱ्या मोंगली गलबतांवर तो हल्ला करील. परंतु हें समवनीय दिसत नाहीं. रावजी पंडित व विकाजी पंडित या उभय सुभेदारांनीं स्नेह व मदत यांची खात्री देणारी पत्रें आम्हांला लिहिल्यामुळें वेंगुर्ल्याबद्दल धास्ती वाटत नाहीं.

[पृ. ४५१] सुरतेच्या गव्हर्नराने लिहिलेल्या पत्रांत मोंगली गलबतांचें रक्षण फ्रेंच यांच्यापासून करावयाचें ह्रोतें असें लिहिलें; ती चूक असून शिवाजी तयार करवीत असलेल्या यांचे गलबतांबद्दल तो बंदोबस्त करावयाचा आहे, अशी आतां दुरुस्ती जरूर आहे. मात्र आजपर्यंत किनाऱ्यावर उपद्रव झाल्याची बातमी आलेली नाहीं. **विजापुरकर व गोवळकोंडेकर यांनीं शिवाजीला आधार दिल्यामुळें** सुरतेच्या नुकसानीची भरपाई त्यांचेकडून मोंगल करून घेणार आहे, अशी गोवळकोंड्याहून बातमी आली आहे. हें अमान्य असल्याचें या उभय सुलतानांनीं जाहीर केलें असून विजापुरांत तर मोंगलांच्या वकिलाला धक्के मारून हांकून लाविण्यांत आलें. शिवाजीच्या हल्ल्याच्या भीतीमुळें पुलीकतला तट बांधण्याचा आग्रह गव्हर्नरनें धरला आहे.

डाग रजिस्टर १६६४
पृ. ४६१ ऑक्टो. २१ न्यू. } (१०१२) { श. १५८६ कार्तीक शु. २
इ. १६६४ आक्टो. ११

मोंगलांकडून रक्षणाकरतां मागितलेलें गलबत देण्यांत आलें. शिवाजीचे हल्ल्यामुळें खजीना गोवळकोंड्यास पाठविण्याच्या बेतांत फरक करून तो समुद्रावरून पाठविण्याचें ठरलें.

इं. फॅ. ११
पृ. ३४८ इ. } (१०१३) कारवार–सुरत { श. १५८६ कार्तीक शु. ७
इ. १६६४ ऑक्टो. १६

तीन चार दिवसांपूर्वी कानड्याचे राजाकडून बार्सिलोर, मंगळूर इत्यादि ठाणीं घेण्याकरितां पोर्तुगीजांचें आरमार खालीं निघून गेलें आहे. करारांप्रमाणें हातीं यावयाचीं ठिकाणें प्रथम ताब्यांत घेतल्याशिवाय तहनामा पुरा करणार नाहींत असें म्हणतात. [गोव्याहून २४ ऑक्टोबरचे पत्रांत 'राजा हीं ठाणीं देण्याचें नाकारतो' असा मजकूर आहे].

खं. १५ ले १०८ व १०९
सु. १०६५ रसर १५ } (१०१४) मिसेली मु. व म. { श. १५८६ कार्तीक व. १
इ. १६६४ आक्टो. २५

अज. दि. पर. वाई—— ता मोक. मौ. निंब

सदानंद गोसाव्याचे मठानजीक कुंभार नवी जिकीर करून माती खणताती. तसें तरी त्यांस तसें करूं न देणें.

इं. फॅ. ११
पृ. ३४८ इ. } (१०१५) कारवार (टेलर)–सुरत. { श. १५८६ कार्तीक व. ५
इ. १६६४ ऑक्टो. २९

शिवाजीनें नुकतेंच वेंगुर्ला जाळून जमीनदोस्त केलें; आणि त्या व जुनें त्याच्यावर आलेल्या विजापुरी सैन्यास परतवून लाविलें, अशी आज बातमी आली. या दर्यामुळें तो खालीं येतो की काय हें समजत नाहीं...पोर्तुगीजांचें आरमार, बार्सिलोर वगैरे ठाणीं

-घेण्याकरितां गेलें होतें. त्याच्या ताब्यांत होनावर शिवाय इतर सर्व बंदरें देण्यांत आलीं आहेत. [पृ. ३१९-भटकलहून टेलरनेंच ८ नोवें. ला पत्र लिहिलें त्यांत, 'डच लोक कानडयाचा राजा लहान असेपर्यंत पोर्तुगीजांनीं त्याचीं ठिकाणें घेऊं नयेत, तो वयांत आल्यावर कोणाला देईल त्यानें तीं घ्यावीं; अशा काहीं प्रमाणांनीं पोर्तुगीजांना ठिकाणें 'मिळण्याला विरोध करीत आहेत' असा मजकूर आहे].

| | | |
|---|---|---|
| पिसुर्लें. शिवाजी पृ. १२ टीप ५ इ. न्यू. | (१०१६) पोर्तुगीज | श. १५८६ मार्ग. शु. ४ इ. १६६४ नोव्हें. ११ |

गोव्याचा व्हाइसराय-पेडणेकर देसाई केशव नाईक व केशव प्रभु.

आपणाकडून आलेलें पत्र पाहिलें; आणि त्यानंतर शिवाजी व खवासखान यांच्यामध्यें झालेल्या युद्धाची बातमी ऐकली.

| | | |
|---|---|---|
| शि. प्र. पृ. १९५ जुलूस ७ जवळ ४ | (१०१७) फर्मान-फा. मु. १ | श. १५८६ मार्ग. शु. ५ इ. १६६४ नोव्हें. १३ |

?—— देशाधि. व लेखक, देशमु. व देशपां. पर० पुणें

पर. मज. पैकी ४ गावीं योगक्षेमाकरितां माऊभट राजभट अग्निहोत्री रा. कसबे पुणे याकडे चालत आहे. तरी पूर्वीच्या सनदेप्रमाणें यांस उत्पन्न मिळत जावें.

१ मुद्रा— मिर्जा राजा, जयसिंग, बंदावाद, शाहा, आलमगीर.

| | | |
|---|---|---|
| सं. १५ ले. ११० मु. १०६५ जवळ १७ | (१०१८) मिसेली मु. व म. | इ. १५८६ मार्ग. व. ३ इ. १६६४ नोव्हें. २६ |

अज दि. ठाणें तारगाऊ —— ता हुदे. व मोक. मौजे निगडी किले सातारा

कमलनयन गोसावी याचे मौ० मज० येथें १५ होन इनाम आहे. ते त्यास आदा करीत जाणे.

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ. ११ पृ. ३१२-१३ व ३५८ | (१०१९) सुरत-कंपनी | श. १५८६ मार्गशीर्ष व. ३ इ. १६६४ नोवें. २६ |

सुरत शहर आणि आसपासचा प्रांत यांच्या वसुलाची चौथाई बादशहा आपल्याला बिनहरकत देणार नाहीं तर आपण सुरतेवर पुनः येऊं; अशी शिवाजी वारंवार धमकी देत असल्यामुळें, त्याबद्दल प्रत्यहीं आम्हांला व शहरांतील लोकांना भीती वाटत असते. दख्खनमध्यें सर्वत्र यादवी बोकाळल्यामुळें शिवाजीचें सामर्थ्य प्रत्यहीं वाढत आहे. त्यानें भटकलच्या बाजूला ४ गलबतें पाठविलीं असून तो जमीनीवरून त्वरेनें

घोडदळासमवेत जाऊन त्यांना मिळणार होता. तो अत्यंत चपल असून कष्ट सहन करतां यावे म्हणून विलक्षण परिश्रम करतो. त्याचे मुख्य मदतनीसहि तसेच तयार असल्यामुळें तो अतर्क्य त्वरेनें आपल्या हालचाली करूं शकतो. परंतु, मध्यंतरीं **आदिलशाही सैन्यानें त्याला गांठून** त्याचा पराजय करून त्याला किल्ल्याचा आश्रय करण्यास लावून तेथें वेढून टाकिल्याची बातमी आली. [ ही बातमी खरी नव्हती. पुढें १६६५ जाने. २ चें पत्र पहा.] परमेश्वर करो आणि ही खरी ठरो. कारण, शिवाजी आपले बेत दुसऱ्या कोणावर विश्वास न ठेवतां, आपल्याच डोक्यांत ठेवीत असल्यामुळें, तो गेला नाहीं तर त्याचे शिवाय कांहींच करतां येणार नाहीं; आणि त्याचे आरमाराची खेप फुकट होईल। मटकल आदिकरून प्रांत जिंकून घेण्याचा शिवाजीचा विचार होता असें म्हणतात. लूट सांपडेल तेथें विजापूरच्या मुलखांतहि शिवाजी अप्रतिहत संचार करून लुटतो आणि विजापूरकर त्याला अडथळा करीत नाहींत; त्या अर्थी त्या उभयतांचें संगनमत आहे असें समजून **हिंदुस्थानचे बादशहानें विजापुरावर मोठें सैन्य पाठविलें आहे.**

**राजापूर** अद्यापि **शिवाजीचेच** ताब्यांत आहे. कांहीं महिन्यांपूर्वी, शिवाजीच्या ताब्यांतील राजापूर, दामोळ, चौल इत्यादि १२।१४ शहरें घेण्याकरितां व खुद्द शिवाजीवरहि पाठविण्याकरितां आदिलशाहींत सैन्याची उभारणी झाल्याचें लोक बोलत; परंतु अद्यापि तसें कांहींच घडलें नसून हीं सर्व शहरें त्याचेच अमलाखालीं चालत आहेत; आणि त्याला कोणीं विरोध न करील तर लवकरच तो सर्व समुद्रकिनारा जिंकून घेईल.......शिवाजीचीं गलबतें अगदीं मिकार असून एकादें चांगलें गलबत तसल्या १०० गलबतांचा धुव्वा उडवून देईल । .........शिवाजीचे मनांत आमचा शेवटचा घांस करावा, असें असल्याचें समजून आम्हीं निकरानें आमचें रक्षण केलें....... असो. अशा तऱ्हेनें शिवाजीच्याच गोष्टी सांगून आम्हीं तुम्हांला त्रास दिला (असें वाटेल); परंतु इकडे सर्व देशभर आणि प्रत्येक राजदरबारीं **तोच सर्वांच्या संभाषणाचा विषय** होऊन राहिला आहे.

| | | |
|---|---|---|
| पिसुर्लेकर. शिवाजी टीप ५<br>पु. १२ इ. न्यू. | (१०२०)<br>पोर्तुगीज | श. १५८६ मार्ग. व. ११<br>इ. १६६४ डिसें. ३ |

आदिलशहाचा वकील—पोर्तुगीज व्हाइसरायः— **शिवाजी** व खवासखान यांच्यामध्यें झालेल्या युद्धांत खवासखान विजयी झाला.

| | | |
|---|---|---|
| ई. फॅ. ११<br>मू. ३५० इ. | (१०२१)<br>गोवा (पेटिट, टेलर)—सुरत. | श. १५८६ मार्ग. व. ३<br>इ. १६६४ डिसें. ५ |

कारवारच्या वखारवाल्यांना वाटत असलेली भीती आतां कमी झाली आहे. कारण

शिवाजी फोंडा किल्याकडे परतला किंवा तेथें येऊन थांबला असून त्याच्या या सफरीचें हेंच उद्दिष्ट होतें असें दिसतें....डचांना पोर्तुगीजांच्या हातीं बार्सिलोर इत्यादि ठिकाणें जातात याचें वाईट वाटत असल्याचें उघड दिसतें. कांहीं इलाज चालत नाहीं असें पाहून त्यांनी मंगळूरवर त्वरेनें जाऊन आपलें निशाण चढविलें. परंतु तें लोकांनीं लगेच उतरवून फाडून टाकलें.

इं.फॅ. ११
पु. ३५० इ.　　(१०२२)　　श. १५८६ मार्ग व. १४
इ. १६६४ डिसें. ६

गोवा (हेन्री गॅरी)—सुरत.

काल वेंगुर्ल्याचा मुख्याधिकारी व दुसरा एकजण एका मोठ्या होडींत माल घालून तो गोव्याला सुरक्षित ठिकाणीं ठेवण्याकरितां म्हणून घेऊन येतांना आढळला. हल्लीं शिवाजी विजापूरकरांच्या मुलखांत जाळपोळ व कत्तल करीत आहे; त्यापासून बचाव होण्याकरितां आणखीहि माल वेंगुर्ल्याहून ते आणून ठेवणार आहेत. शिवाजीबरोबर ८००० घोडदळ व १० हजार पायदळ आहे अशी विश्वसनीय बातमी आहे. त्यांतील सर्वच शिपाई ठेंगू आणि लहान बांध्याचे आहेत.

डाग रजिस्टर १६६४
पृ. ५६६. डिसें. १७ न्यू.　　(१०२३)　　श. १५८६ मार्ग. व. ३०
इ. १६६४ डिसें. ७

कुडाळचा किल्ला आणि सुभेदारीचा ताबा फत्तेखानाकडून घेण्याकरितां आपल्या मुलाला पुढें पाठवून रुस्तुमजमा मागाहून आला. फत्तेखानानें तें मान्य केलें नाहीं. पुढें विजापूराहूनहि फत्तेखानानें कुडाळ सोडूं नये असा हुकूम आल्यामुळें रुस्तुमजमा परत निघून गेला यामुळें प्रतापगडीवरील शिवाजीचे लोकांना आतां दरोडे घालण्यास चांगली संधी आली आहे. २३ सेप्टेंबरला रुस्तुमजमा अचानक वेंगुर्ल्याला आल्यावेळीं तेथील डच रेसिडेंट व मुसलमान सुभेदार त्याच्या स्वागतार्थ गेले असतां 'शिवाजीशीं तुमचा स्नेह आहे काय?' असें त्यानें रेसिडेंटला विचारलें. 'शिवाजीच काय परंतु देशांतील सर्वच राजांशीं' असें त्यानें उत्तर दिलें. 'मग तुम्ही शिवाजीला शत्रूसारखें समजून त्याला आपल्या वखारींत घेत नाहीं तें कां?' असें त्यानें विचारल्यावर 'शिवाजीला बंद केले नसून त्याच्या हुकमाविरुद्ध आमच्या वखारीजवळ येणाऱ्या त्याच्या शिपायांना आम्ही बंदी केली परवानगीशिवाय येणाऱ्या लोकांपासून स्वसंरक्षण करण्याचा अधिकार प्रत्येकाला आहेच.' असे रेसिडेंटनें उत्तर दिलें. नंतर त्याला रजा देण्यांत आली.

विजापूरचा सुलतान शिवाजीवर सैन्य न पाठवितां केवळ गोष्टी सांगतों असें पाहून, शिवाजीची हद्द सोडून देऊन मोगली सैन्यानें विजापुरापासून १॥ दिवसाच्या मुकाणावरील सोलापुरास वेढा घालून तें घेतलें. शिवाजीवर पुरेसें प्रबळ सैन्य अजूनहि

आदिलशहानें पाठविलें तर औरंगजेब त्याच्याशीं तह करण्यास तयार आहे. अशा तऱ्हेनें मोगली सैन्य फुटून गेलें ही संधी साधून, आपण १० वर्षांत २२ लाख होन देण्याच्या अटीवर मोंगलांशीं तह केला आहे, असें शिवाजीनें प्रसिद्ध केलें. त्यानें ५० हजार पायदळ व १० हजार घोडदळ इतकें सैन्य ठेविलें तें पावसांत गुप्तपणें ठेवून शिवाय खारेपाटण व राजापूर या बंदरांत ४० त्वरित गतीचीं गलबतें त्यानें सज्ज केलीं. आणखी ६० गलबतें त्यानें नव्यानें बांधविलीं. कोठेंतरी मोठा हल्ला मारण्याचा त्याचा विचार आहे. वेंगुर्ल्याचे जवळपासच्या एकाद्या बंदरावर त्याचा रोख असावा असें बोलतात. दुर्गे खेड्याजवळ त्यानें मजबूत किल्ला बांधला असून अद्यापि प्रतापगडीहि त्याचेच हातांत आहे. त्यामुळें लोकांना भय दाखवून तो स्वतःचा खुशाल फायदा करून घेतो. आणि जरी विजापुरचें बरेंच मोठें सैन्य कुडाळास असलें तथापि त्या प्रांतांतून शिवाजीला हांकून लावण्याइतकें सामर्थ्य त्या सैन्याचे अंगांत नाहीं.

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ. ११ | (१०२४) | श. १५८६ पौष शु. ७ |
| पृ. ३५१ इ. | गोवा (टॅलर व पेटिट)-सुरत. | इ. १६६४ डिसें. १५ |

वेंगुर्ल्याच्या डच अधिकाऱ्यानें बरवर तरी शिवाजीपासून सुरक्षित ठेवण्याचें कारण दाखवून मसालेहि गोव्याला आणिले आहेत. शिवाजीच्या धामधुमीमुळें आमच्या गलबतावरील कांहींच माल खपला नाहीं. शिवाजीनें हुबळी व इतर बरीच सधन शहरें लुटून बरेच प्रमुख व्यापाऱ्यांना कैद केल्याची खात्रीलायक बातमी आली. त्यामुळें कारवारच्या बाजूचे बाजार तसेच मंदीचे असणार. तो पुढें कोठें जाणार हें नक्की समजलें नसलें तथापि आमचे कारवारचे दोस्त शिवाजी संनिध येथेच माल हालविण्याची तयारी करीत आहेत.... १७ दिवसांपूर्वी दिसलेल्या धूमकेतूचे परिणाम काय होतात याबद्दल कित्येकांचीं मनें चूर होऊन गेलीं आहेत.... आम्हीं कारवारला असतांना आमचें गलबत राजापुरास नेऊन लाविल्यास तेथें कांहीं विक्री नक्की होईल असें रावजी पंडिताचें पत्र आलें.

| | | |
|---|---|---|
| हॅन्. २ | (१०२५) | श. १५८६ पौष शु. ८ |
| पृ. ३४५ डिसें. २६ न्यू. | | इ. १६६४ डिसें. १६ |

गोव्याचा गव्हर्नर—मुंबईचा इंग्रज गव्हर्नर.

तुमच्या पत्राचीं उत्तरें दिलीं नाहींत. याचें कारण पत्रांत केलेल्या मागणीस अनुसरून कृती करणें हेंच उत्तम उत्तर असें मला वाटलें. आतां उद्यां आम्ही एक इसम नेमतों तो जाऊन मुंबई तुमच्या ताब्यांत देईल. आपले लोक कोणत्या जहाजांतून जात आहेत हें आम्हांस समजलें पाहिजे; कारण या कामांत शिवाजीच्या आरमाराचा संबंध येत असल्यामुळें, इंग्रजांचा त्याच्याशीं सलोखा नसल्यास या जहाजांतून जाणाऱ्या लोकांच्या सुरक्षिततेची मला काळजी घेतली पाहिजे

स. २६ ले. २२ } (१०२६) { श. १५८६ पौष व. ४
हि. १०७५ जखर १७ जुलूस ७ } फर्मान { इ. १६६४ डिसें. २६

जसवंतसिंग बहादूर—देशाधिकारी पर० पुणें

पर० मज० चीं खतीबी व निमेकाजीपणा काजी सिलेमान यास मुकर होती. तो मेल्यावर महमद कासीम व महमद अवलाद सिलेमान यांस वरील गोष्टी मुकर केल्या आहेत. शिवाय मोतंब व तवलियत यांचेंहि वतन दिलें आहे. तें चालविणें.

इं. फॅ. ११ } (१०२७) { श. १५८६ पौष व. ४
पृ. ३३९ इ. } { इ. १६६४ डिसें. २६

गोव्याचा व्हाइसरॉय—पोर्तुगीज राजा (लिस्बन)

राजे साहेबांचा हुकूम बजावण्याकरितांच म्हणून मी इंग्रजांच्या ताब्यांत मुंबई देत आहें. परंतु यापासून शेजारचे पोर्तुगीजांना भयंकर त्रास होणार असून ज्या दिवशीं मुंबई बेटांत इंग्रजांचें वस्तान बसेल त्या दिवशीं हिंदुस्थानाला आपण मुकलों असें समजावें.

इ. फॅ. ११ } (१०२८) { श. १५८६ पौष व. ११
पृ. ३५९ इ. } सुरत-कंपनी { इ. १६६५ जाने. २

शिवाजीला चुकविण्याकरितां कासिदांना फार मोठा वळसा घ्यावा लागल्यामुळें आपलीं पत्रें आम्हांला उशिरां पोंचलीं. शिवाजी आणि त्याचे टेहळ्ये सर्व देशभर जाळ-पोळ, कत्तल आणि लूट करीत फिरतात. पर्वाच त्यानें चेंगुलें आणि जवळचें दुर्ग एक शहर लुटून अपार लूट नेली. यावरून मागच्या पत्रांत त्याला पायबंद बसल्याचें लिहिलें तें खरें नव्हतें हें आपल्याला समजेल. अशा अनेक बातम्या येतात; त्यांत खरी कोणती मानावयाची हें समजतच नाहीं. परंतु आतांची बातमी...खरी आहे. [या पत्रानें ले. १०१९ मधील फोंडमाऱ्याची बातमी रद्द होते.]

इं. फॅ. १२ } (१०२९) { श. १५८६ पौष व ३०
पृ. ७५-७६ इ. } कारवार-सुरत. { इ. १६६५ जाने. ६

हुबळीची लूट-शिवाजीनें ३०० घोडेस्वार पाठविले, शहर लुटलें व का... हीहि नेले; अशा रीतीनें हुबळीची लुटल्यासारखीच दैना झाली आहे. आलेल्या स्वार... मध्यें कांहीं रुस्तुमजमाचे होते असें म्हणतात. रुस्तुमजमा व शिवाजी, उभ... मिळून, दर्लीच्या सुलतानाला पदच्युत करून दुसराच गादीवर ब... ील असा लोकांचा समज आहे. येथील मालाच्या सुरक्षिततेकरितां व महमद खा... येणें आहे तें बिनधोक वसूल व्हावें म्हणून त्याला (रुस्तुमजमाला) कांहीं नजराणा ...ल्द आहे असें वाटतें...शिवाजी हुबळीस आला त्यावेळीं सुदैवानें इंग्रजांचें फारस तेथें नव्हतें. फक्त ११८५ होन रोख होते...

खं. २० ले. ११६
सु. १०६५ रजब १६

(१०३०)
खुर्दखत मु. व सी.

श. १५८६ माघ व. २
इ. १६६५ जाने. २३

अजर. शर्जाखान—बजा. कार. पर. वाई

गिरमाजी त्रिंबक यास वाई येथे १ चावर जमीन मशिराच्या खुर्दखतानुसार चालिली आहे. हाली पर. मज.साहेबास अर्जानी जाला आहे तरी गिरमाजींचे इनाम पूर्वीप्रमाणे चालविणें.

डाग रजिस्टर. पृ. २२८
इ. फेब्रु.५ न्यू.

(१०३१)

श. १५८६ माघ व. ६
इ. १६६५ जाने. २६

सुरत येथील पोर्तुगीज मातमींदार—(गोवा ?)

गेल्या वर्षी दुष्काळामुळें व्यापाराचे बेत जागच्या जागीं राहिले. त्यांतच शिवाजीनें येऊन सर्व शहर लुटलें व व्यापार मंदावला. तो गेल्यापासून व्यापाऱ्यांचा आग्रह असा आहे कीं, खरेदीचा करारनामा तिकीट लाऊन व्हावा; कारण सर्वत्र दुर्भिक्ष झालें आहे. लवंगाचा भाव मणाला १५० रुपये असा सुरत शहरांत आहे.

इ. फॅ. १२
पु. ७६ इ.

(१०३२)
कारवार-सुरत

श. १५८६ माघ व. ८
इ. १६६५ जाने. २८

राजा जयसिंग ३० हजार घोडदळानिशीं बऱ्हाणपुरापर्यंत आला असून त्याचे बरोबर फक्त ३ हजार सैन्यालाच शहरांत प्रवेश मिळाला. आदिलशहापासून ७० लाख होन खंडणी वसूल करण्याकरितां तो आला आहे असें म्हणतात. विजापूर दरबारकडून काय उत्तर मिळेल हें समजत नाहीं. शिवाजीचा माऊ आणि सय्यद इलियास सर्जाखान तेथेंच (विजापुरीं) असून बहलोलखान येण्याची (आदिलशहा वगैरे) वाट पहात आहेत. शिवाजी, रुस्तुमजमा व खवासखान अशा तिघांचीं तीन आदिलशाही सैन्यें मोंगलांवर जावयाचीं आहेत असें बोलतात त्यांत तथ्य आहे असें वाटत नाहीं. शिवाजी गोकर्णाकडे जाईल अशी बातमी आहे. त्या बाजूचा रुस्तुमजमाचा मुलूख तो लुटणार नाहीं हें खरें असलें तथापि त्याच्यावर विश्वास न ठेवतां आम्हीं स्वतःचें रक्षण करावें हें बरें. यावेळा आता ८ दिवसही राहिले नाहींत. तोंपर्यंत तो न आल्यास या वर्षी तरी ददात मिटली असें समजण्यास हरकत नाहीं.

सं. १५ ले. १११
सु. १०६५ सावान ३

(१०३३)
मिसेली मु. व म.

श. १५८६ फाल्गुन शु. ४
इ. १६६५ फेब्रुवारी ९

वीरो राम सुभेदार तर्फ जाउली— कार. पर. कुडाळ

सदानंद गोमावी याम रयतेकडून दरगावाम एक मण गला इनाम आहे. तरी सालाबादप्रमाणें देत जाणें.

खं. १५ ले. ११२ } (१०३४) { श. १५८६ फा. शु. ५
सु. १०६५ साबान ४ } ताकीद सु. (परसोजी महाडीक) व म. { इ. १६६५ फेबु. १०

अज सुमा रा. परसोजी राजे महाडीक सुभेदार नामजाद महालाहाय

ता मोक. मौ. निगडी कि. सातारा

मौ. मजा. सदानंदाचा इनाम आहे. त्यास पैसे लाविले आहेत; तरी त्यास एक-जरियाची तसवीस न देणें.

इं. फॅ. १२ } (१०३५) { श. १५८६ फाल्गून व. १२
पृ. ४७ इ. } कुक-लॉर्ड आर्लिंगटन { इ. १६६५ मार्च ३

**मोगलांच्या मुलखांत** किनाऱ्याच्या प्रदेशांत ठाण्याच्या पलीकडे **कल्याण** आणि **भिवंडी** अशीं दोन बंदरें असून दख्खन, गोवळकोंडा व कॉरोमांडेल किनारा या ठिकाणीं उत्पन्न होणारा व तयार झालेला सर्व प्रकारचा माल येथें आणविल्यास मुंबईला तो सुरतेपेक्षां शेंकडा १५ ते २० टक्क्यांनीं स्वस्त पडेल.

इं. फॅ. मा. ११ } (१०३६) { श. १५८६ फाल्गुन व. ३०
पृ. १४४ इ. } { इ. १६६५ मार्च ६

सरजॉर्ज ऑक्झेंडेन—लॉर्ड आर्लिंगटन

ॲब्राहम शिपमन प्रथम मुंबईला आल्यावेळीं, जेव्हां व्हाइसरॉय मुंबई बेट इंग्रजांच्या ताब्यांत देत नाहीं असें ठरलें, तेव्हां तेथील रहिवाशांनीं मुंबई व साष्टी येथील सर्वांच्या मतीनें एक ब्राह्मण पाठविला. त्याचे मार्फत त्यांनीं कळविलें कीं, मुंबईला इंग्रज येतील तर आपण **पोर्तुगीजांची हरकत न जुमानतां** बेट स्वाधीन करूं. एकहि मनुष्य दगावूं देणार नाहीं. या मदतीकरितां फक्त **तेथील रहिवासी स्वतंत्र रहावे एवढेंच त्यांनीं मागितलें.** त्यांना जाच आहे तो मुख्यत्वेंकरून पोर्तुगीजांच्या जुलमाचा. एकाद्या कुटुंबां-तील कर्ता पुरुष मेला कीं मागें राहिलेल्या मुलांबाळांना सक्तीनें ते जेसुइट शाळांत डांबून ठेवून परत आपल्या माणसांत जाऊं देत नाहींत ! ही **गुलामगिरी** त्यांना **फार असह्य होत्ये.** [*मुंबई बेट पोर्तुगीज लोकांनीं इंग्रजांच्या ताब्यांत ता. ८ फेब्रु. १६६५ रोजीं दिलें. इं. फॅ. १२ पृ. ३९–४०*]

पै. व. ६ ले. ७ } (१०३७) { श. १५८६
पृ. ७३ सु. १०६५ } दानपत्र फा. ही. { इ. १६६४–६५

रा. शिवाजी राजे–तीर्थस्व. रा. गणेस विठल दिक्षीत सो वणी:–थी (सप्तशृंगी) चे पूजाअभिषेकाबद्दल सुम्हास १४ रु. बदपात्रान देते आहे. धर्मकृत्य राग करीत जाणें.

हि. रे. क्र. ९ }
पृ. १११ इ. }

(१०३८)

{ श. १५८६
{ इ. १६६४

शिवाजीनें सुरतेवर हल्ला केला तेव्हां वसई येथील पोर्तुगीजांनीं त्याच्या हालचालीकडे कानाडोळा केला असावा. कारण, ही अफवा मोगलाकडे जाऊन त्यांचा सेनापती लोधीखान यानें पोर्तुगीजांच्या प्रदेशावर हल्ला करून कांहीं लोक धरून नेले व लूट केली.

भाटेकृत सज्जनगड. }
पृ. १०८ श. }

(१०३९ = ६८१ अ)

{ श. १५७६ मार्ग व. ५
{ इ. १६५४ डिसें. १८

दिवाकर गोसावी मु. चाकण—बहिर्मठ.

तुम्ही पत्र पाठविले ते वाचोन लेखनार्थ अवगत झाले. तुम्ही आम्हास येण्याविषयी लिहिलें तर श्रीसमर्थ दहा संवत्सरपर्यंत कोठें न जातां सर्व ग्रंथास आरंभ केला. आणि सांगितले कीं, श्रीकडील हरयेकविशी बोभाट येऊ नये म्हणून आम्हा सांगितले. आणि सर्व मंडळीस आज्ञा की, तुम्ही श्रीचे उत्सवाची (भिक्षा) करून आमचे स्वाधीन करावी. म्हणून सर्वांत सांगितलेल्याप्रमाणे सर्व मंडळी निघोन गेली; आणि आपण व कल्याण गोा व चिमणाबाई अका व अनंत कवी यास बराबर घेऊन एकांत स्थानीं शिवथरचे घळींत जाऊन बसले. तुम्ही श्री महाबलेश्वरचे देवालयाचे काम चांगले रीतीनें करावें. भास्कर गोा आले म्हणजे मी येक दिवसाचे अवकाशे येतो....हे आसीर्वाद.

भाटेकृत सज्जनगड }
पृ. १०९ श. }

(१०४० = ७६३ अ)

{ श. १५८० फाल्गु. शु. २
{ इ. १६५८ फेब्रु. १३

भास्कर गोसावी—श्रीगुरुभक्तपरायण मोक्षश्रिया विराजित दिवाकर गोसावी.

श्रीचे उत्साहा होनु पनास भिक्षेस मिळाले ते मानजी गोसावी बराबर पाठविले, पावतील. शिवाजी राजे यांच्याकडे भिक्षेस गेलो स्थानी + + रिले तुम्ही कोठील कोण कोणा टिकाणीं असता.त्यावरून आम्ही बोळलो की, आम्ही रामदासी; श्रीसमर्थांचे शिष्य चाफ-च्यास हों. मग ते बोलले की ते कोठे राहतात व मूळ गाव कोण. त्यावरून मी सांगितले की, गगातीरीचे जांबचे राहणो. प्रस्तुत चाफळास मठ करून श्रीदेवाची स्थापना करून उत्साव महोत्सव चालू करून आम्हा सर्वांस आज्ञा की, तुम्ही भिक्षा करून उत्साह करीत जाया. सांगितल्यावरून अम्ही हिंडत आहो. असे बोलता राजेश्रींनी दत्ताजीपंत वाकेनिवीस यास प्रतिवर्षीं श्रीउत्साहास दोनशे होनु देत जाणे म्हणून पत्र पाठविले ते हो+ +स येतील हे विनती.

शां. इ. सा. } (१०४१) { श. १५८६
ले. ६ ? } शिवाजी- { इ. १६६४-६५

चडिलांचे सेवेसी शिवाजी राजे याणी चरणावरी मस्तक ठेवून विज्ञापना ऐसी जे, बाजी घोरपडे मुधोळकर याणी स्वधर्मसाधणता सोडून यवन दुष्ट तुरुक ह्याचे कृत्यास अनुकूल होऊन दगाबाजीचे हुमरे करून विज्यापुरास येणे घडलें. तेथें गुजरला प्रकार निर्वाणचा तो तुम्ही समजलाच आहां. तोहि प्रसंग श्री तुमचा मनोरथ सिद्धीस नेणें व स्वधर्म राज्यवृद्धि करणें म्हणोन पार पडला. सांप्रत पुन्हां दुर्बुद्धि धरून खवासखान विजापुराहून फौजेसुद्धा रवाना जाहले. त्याची हरोळी बाजी याणी व लखम सावंत व खेम सावंत याणीं प्रतिज्ञापूर्वक जत(न) करून सेनासमवेत निघाले. ते तिकडे येत आहेत. तुम्हास श्री सांब व अंबे यश देणार पूर्ण आहे. ये समयीं त्यांचे बेढे घ्यावे. आण आमचे मनोदय सेवटास नेणार तुम्ही सुपुत्र निर्माण आहां. म्हणोन आज्ञा केली. त्यास बाजी घोरपडे पुढें मुधोळास घरीं काहीं जमेतीनसी आहे; हें कळतांच फौजेनसी आम्ही तेच क्षणी स्वार केली. त्यांचा प्रांत लुटून तळपट जान करून ठाणियास जेरदस्तीत आणिले. हें जाणोन त्याणीं सर्व जमेतीनसी लढाईस निघाले. युद्ध तारफेचें जहालें. बाजी मारिले व कितेक खासे लोक पडले. या प्रकारे तो प्रसंग करून लुटून फरत केले. मत्ता बहूत लागली. पुन्हां आपलेसे करून मुधोळ पंचमहाल आपलासा करून स्थापिले. यानंतर खवासखान पुढें आला पाहून त्याजवर चाल केली. ते मारीत लुटीत गर्दी केली. खटा होऊन पळू लागले; ते विजापुरास पावविले. यानंतर सावंताचा निशाच करावा म्हणोन त्या प्रांतांत शिरलों. तेहि येऊन पावले मुलूख तळपट करीत चाललों. ठाणी किल्ले तमाम घेतले. सावंत दमोन गेले. गोमतकराचा आश्रय निघोन फोंड्याचा किल्ला भांडू लागला. त्यास सुरुंग लावून बुरूज उडवून बळानें घेतला. याप्रमाणें एकंदर तें संवस्थान घेतलें. यानंतर फिरंगी याजवर शह देऊन त्याचा प्रांत मारीत चाललों. त्याणीं तह करून तोफा नजराणा पाठविला. सावंत यास तेथे दम न निघे. टोपीकार यास धार न पदे. त्याजवरून पितांबर शेणवी कारभारी वकील पाठविले. आपण सावंत भोसले कुळीचे, आपले पुत्र आहों, सर्फराज करून देसगतीच्या यतनाची सेवा घेऊन प्रांताचा ठराव निमे ऐवज फौजेनशी चाकरी करितों; त्यास निमे ऐवज व निमे ऐवज सरकारांत वसूल घ्यावा ऐसे करून घेतलें. त्याप्रमाणें स्वामीचें पुण्यप्रतापें करून आज्ञेप्रमाणें घडून आलें. तें कळावें म्हणोन लिा हे विज्ञापना. मोर्तब.

नागरी प्रचारिणी मा. } (१०४२) { श. १५८७
श. १८४५ } शिवाजी—जयसिंग { इ. १६६५

हे श्रेष्ठ सरदारा, तुझ्यामुळें रजपुतांची मान उन्नत आहे. तुझ्यामुळें बाबरवंशाची राज्यलक्ष्मी अधिक प्रबल झाली असून तुझें सहाय तिला मिळत आहे. हे प्रबल व प्रौढ

जयसिंहा! 'सेवाचा' (शिवाजीचा) प्रणाम व आशिर्वाद स्वीकार. परमेश्वरानें तुझें रक्षण करून तुला धर्माचा व न्यायाचा मार्ग दाखवावा. मीं असें ऐकिलें आहे कीं, मजवर हल्ला करण्यासाठीं व 'दख्खन' जिंकण्यासाठीं तूं आला आहेस. हिंदूंचें हृदय व नेत्र यांच्या रक्तानें तूं जगांत यशस्वी होऊं पहात आहेस. पण तुझ्या हें लक्षांत आलें नाहीं कीं, यानें तुझ्या तोंडास काळोखी फासली जात आहे. कारण, या कृत्यानें देशावर व धर्मावर आपत्ती ओढवली आहे. जर तूं क्षणमात्र अंतर्मुख होऊन आपल्या हाताकडे व झग्याकडे विवेक-दृष्टीनें पाहशील तर हा रंग कोणाच्या रक्ताचा आहे व या रंगाचा रंग इहपरलोकीं काय होणार हें तुला समजेल. जर तूं आपणहून दक्षिणदेश जिंकण्यास आला असतास तर माझें शीर व डोळे तुझ्या रस्त्यावर बिछान्याप्रमाणें पसरले असते; मी तुझ्या घोड्या-बरोबर मोठी सेना घेऊन आलों असतों आणि देशाच्या एका टोकापासून दुसऱ्या टोका-पर्यंतची भूमि तुला जिंकून दिली असती. पण तूं सज्जनांना फसविणाऱ्या औरंगजेबाच्या थापास भुलून इकडे आला आहेस. तेव्हां या वेळीं तुझ्याशीं कोणता डाव खेळावा हें मला समजेनासें झालें आहे. जर तुला सामील व्हावें, तर त्यांत मर्दपणा नाहीं; कारण मर्दलोक प्रसंगाची सेवा करीत नाहींत. सिंह कधीं भित्रेपणा दाखवीत नाहीं. बरें, जर मी तरवार व कुऱ्हाड यांचा उपयोग केला तर दोनहि बाजूंनीं हिंदूंचीच हानी होणार. मोठ्या दुःखाची गोष्ट ही आहे कीं, मुसलमानांचें रक्त पिण्याखेरीज इतर कामासाठीं माझ्या तरवारीस म्यानांतून बाहेर पडावें लागेल! जर या लढाईसाठीं स्वतः तुर्क आला असता तर आम्हां वीरपुरुषांना घरबसल्या शिकार लाधल्याप्रमाणें झालें असतें. पण जेव्हां अफजलखान व शाइस्ताखां यांच्या हातून काम झेपत नाहीं असें दिसलें तेव्हां तुला आम्हांशीं युद्ध करण्याकरितां नेमलें आहे. कारण स्वतः औरंगजेब आमचा मारा सोस-ण्यास समर्थ नाहीं. हिंदूलोकांत कोणी बळशाली राहूं नये आणि सिंहांनीं आपसांत लढून घायाळ व श्रांत व्हावें आणि गिधाडांना जंगलाचें स्वामित्व प्राप्त व्हावें, अशी औरंग-जेबाची इच्छा आहे. ही गूढ नीती तुझ्या ध्यानांत येत नाहीं. यावरून त्याच्या जादूनें तुला भूल पाडली आहे असें प्रत्ययास येतें. तूं जगांत बरे वाईट पुष्कळ प्रसंग पाहिले असशील; बागेंत तूं फुलें व कंटक या दोहींचाहि संचय केला असशील; पण आम्हां लोकांशीं युद्ध करून हिंदूंचें शीर धुळीस मिळविण्याचें काम मात्र तूं करूं नये. प्रौढ वयांत अल्लडपणा न करतां सादीच्या या वचनाचें स्मरण कर. "सर्वच ठिकाणीं घोडा फेकतां येत नाहीं. कधीं कधीं ढाल फेकून पळून जाणें योग्य असतें." व्याघ्र, मृगादि प्राण्यांवर व्याघ्रता करतो; पण सिंहाबरोबर गृहयुद्ध करण्यास प्रवृत्त होत नाहीं. जर तुझ्या तीक्ष्ण तरवारींत पाणी असेल व घोड्यांत दम असेल तर **हिंदु-धर्माच्या शत्रूंवर हल्ला करून इसलामाचें जड मूळ खोदून टाक.** जर या देशाचें राज्य दारा शिकोह यांस मिळालें असतें तर आम्हां लोकांवर त्यांनीं कृपा, अनुग्रह केला असता. पण तूं जसवंत-

सिंहास[1] दगा दिलास व उच्चनीच यांची पारख तुला करतां आली नाहीं. आजवर किर-कोळ शत्रूंशीं गांठ पडल्यामुळें तुझा दम कायम राहिला आहे. परंतु तूं आतां सिंहाशीं युद्ध करण्याची धिटाई करून आला आहेस. एवढ्या धावपळीनें तुला काय मिळत आहे! तूं मृगजळाच्या मागें धावत आहेस. एखाद्यानें फार परिश्रम करून एखादी सुंदरी हस्तगत करावी आणि ती आपल्या शत्रूच्या स्वाधीन करावी, अशा तुच्छ व्यक्तीसारखा तूं आहेस! तूं या नीचाच्या कृपेचा काय अभिमान धरतोस! जुझारसिंहाच्या कामाचा परिणाम काय तुझ्या लक्षांत नाहीं[2] ?

कुमार छत्रसाल[3] यांजवर तो कशा प्रकारची आपत्ती आणूं पहात होता, हें तूं जाणतोस. या खेरीज इतर हिंदुलोकांवर या दुष्टाच्या हातानें काय काय अनर्थ आले आहेत हेंहि तुला माहीत आहे. इष्ट हेतु साधण्यासाठीं तो बापाचा व भावांचा खून पाडण्यास भीत नाहीं. राजभक्तीची सबब सांगत असशील तर तूं शहाजहानशीं कसें वर्तन केलेस याचें स्मरण कर. जर विधात्यानें तुला अक्कलेचा अंश दिला असेल व मर्द-पणाची चाड असेल तर तूं आपल्या जन्मभूमीच्या संतापांत आपली तरवार तापीव व अत्याचाराच्या दुःखानें पडणाऱ्या आसवांनीं तिला पाणी दे. हा प्रसंग आम्हीं लोकांनीं आपसांत लढण्याचा नाहीं. कारण, हिंदुलोकांवर या वेळीं मोठें कठिण कार्य येऊन पडलें आहे. आमचीं पोरेंबाळें, देश, धन, देव व पवित्र देवपूजक या सर्वांवर त्याच्यामुळें पराकाष्ठेचें दुःख कोसळलें आहे; आणि हाच क्रम आणखी कांहीं दिवस चालेल तर आम्हां हिंदुलोकांचें चिन्ह देखील पृथ्वीवर राहणार नाहीं! **मूठभर मुसलमानांनीं आमच्या एवढ्या देशावर प्रभुत्व गाजवावें ही मोठ्या आश्चर्याची गोष्ट आहे. पण हें प्रभुत्व त्यांच्या पराक्रमाचें फळ नव्हे.** जर तुला अक्कलेचे

---

१ शहाजहानचा सर्वांत वडील मुलगा दारा शिकोह हा अकबराप्रमाणें हिंदुमुसल-मानांना समतेनें वागवावें या मताचा होता. जेव्हां त्याचा श्यामगडच्या लढाईंत पराभव झाला तेव्हां तो सिंध प्रांतांतून जसवंतसिंहाच्या संमतीनें अजमीरास आला. परंतु जय-सिंहानें पत्र पाठवून जसवंतसिंगाचें मन कलुषित केल्यामुळें दारास अजमीर येथें सहाय मिळूं शकलें नाहीं व औरंगजेबानें शेवटीं त्याचा पराभव केला.

२ ओडछाचा राजा झुझारसिंह बुंदेला यानें जहांगीर व शहाजहान यांची इतकी एकनिष्ठपणें सेवा केली होती कीं त्याला 'राजा' ही पदवी व चार हजारांची मनसब मिळाली. परंतु औरंगजेबानें पुढें त्यास क्षुल्लक कारणावरून पदच्युत केलें व जुझार-सिंहास जंगलांत वणवण करीत फिरावें लागलें!

३ छत्रसालाचा बाप चंपतराय यानें औरंगजेबास पुष्कळ सहाय दिलें होतें. परंतु पुढें किरकोळ कारणावरून वैमनस्य येऊन चंपतरायास आत्महत्या करावी लागली. नंतर छत्रसालानें शिवाजीची मदत मागितली.

डोळे असतील तर पहा. आम्हा बरोबर तो कसा गोड गोष्टी बोलतो; व चेहऱ्यावर कसकसे रंग आणितो; आमच्या पायांत आमचीच बेडी अडकावतो व आमच्याच तरवारीनें आमचीं शिरें कशीं कापतो तें लक्षांत घ्या. **आम्ही लोकांनीं या वेळीं हिंदु, हिंदुस्थान व हिंदूधर्म यांच्या संरक्षणार्थ फार जोराचे प्रयत्न केले पाहिजेत.** तरवारीस पाणी देऊन (जशास तसें या न्यायानें) **तुर्कांचा जबाब तुर्कीतच दिला पाहिजे.** जर तूं मारवाडचा राजा **जसवंतसिंग** व मेवाडचा राणा **राजसिंह** यांच्याशीं ऐक्य करशील तर फार मोठें काम होईल अशी आशा आहे. चोंहीं-कडून उठावणी करून तुम्हीं या सर्पाचें डोकें दगडांनीं ठेंचून टाका; म्हणजे काहीं काल-पर्यंत तरी त्याला दक्षिण प्रांतांत आपलें जाळें पसरतां येणार नाहीं. तेवढ्यांत 'मी व माझे मालेबहादर वीर विजापूर व गोंवळकोंडा येथील दोनहि बादशहांना जिंकतो. मेघा-सारखी गर्जना करणाऱ्या सैन्यानिशीं मुसलमानांवर तरवारीचा पाऊस पाडीन आणि **सर्व दक्षिण देशांच्या पटावरून इस्लामाचें नांव किंवा चिन्ह धुवून टाकीन.** त्या नतर कार्यदक्ष वीर व भाला चालविणारे घोडेस्वार यांना बरोबर घेऊन प्रचंड लाटा व कोलाहल माजविणाऱ्या नदीप्रमाणें दक्षिण देशांतील पहाडांतून बाहेर पडून मैदानांत येईन; आणि अत्यंत जलदीनें तुम्हा लोकांच्या सेवेस हजर होईन; व तुम्हांस हिशेब विचारीन. चोंहीकडून भयंकर युद्ध उपस्थित करून रणांगणांत दंगल माजवून आम्ही लोक आमच्या सैन्याच्या लाटा दिल्ली येथलि त्याच्या जर्जर झालेल्या घरांत पोहचवूं. ;म्हणजे त्याच्या नांवाचें **औरंग**हि (राजसिंहासन) राहणार नाहीं व **जेब** (शोभा)हि राहणार नाहीं. तसेच त्याची तरवार राहणार नाहीं व कपटाचें जाळेंहि राहणार नाहीं. **शुद्ध रक्तानें भरलेली नदी वाहवून आम्ही आमच्या पितरांच्या आत्म्याचें तर्पण करूं.** हें काम कांहीं फार कठीण नाहीं. फक्त **हृदय व डोळे आणि हात यांची आवश्यकता आहे.** दोन अंतःकरणें एक होतील तर पहाड तोडतां येईल व मोठ्या सैन्याच्या समूहाच्या ठिकऱ्या उडवितां येतील. या विषयासंबंधीं मला तुझ्याशीं फार बोलणें चालणें करावयाचें आहे; तें पत्रीं लिहिणें सयुक्तिक नव्हे. तूं म्हणशील तर मी समक्ष तुझ्या भेटीस येईन; माझा भेत तुला कळवीन. तरवारीची शपथ, घोड्याची शपथ, देशाची शपथ व धर्माची शपथ घेऊन मी सांगतो कीं, असें करण्यानें तुझ्यावर आपत्ती येणार नाहीं. अफझलखानाचा शेवट कसा झाला हें लक्षांत आणून तूं शंकित होऊं नको. त्यानें बाराशें लढवय्ये हबशी माझा घात करण्यासाठीं ठेवले होते. त्याच्यावर मी प्रथमच हात चालविला नसता तर या वेळीं हें पत्र तुला कोणी लिहिलें असतें ? मला तुझ्यापासून अशी भीति नाहीं. कारण, तुझ्या माझ्यांत कांहीं शत्रुत्व नाहीं. जर मला माझें उत्तर अनुकूल आलें तर रात्रीं मी एकटा तुझ्या भेटीस येईन. **शाइस्तेखानाच्या खिशांतून मीं जें पत्र काढून घेतलें आहे तें गुप्त पत्र मी तुला दाखवीन.** तुझ्या डोळ्यावर संशयाचें पाणी शिंपडून तुझी सुखनिद्रा नाहींशी करीन. तुझ्या स्वप्नाचा

खरा खरा फलादेश करून नंतर तुझा जबाब घेईन. जर या पत्राचें उत्तर माझ्या मनाजोगें न येईल तर मी आणि माझी तीक्ष्ण तरवार आहे व तुझी सेना आहे. ज्यां सूर्य आपलें मुख संध्याकाळांत लपवील तेव्हां माझा अर्धचंद्र (तरवार) म्यानांतून बाहेर पडेल. बस्स. कल्याण असो.

इं. फॅ. १२
पृ. ३, ४, १० इ.　　(१०४३)
सुरत—कंपनी　　श. १५८७ चैत्र शु. ६
इ. १६६४ मार्च १२

शिवाजीनें हुबळी लुटल्यामुळें मिऱ्यांचा व्यापार बसला आहे. दख्खनचा सुल्तान कुलवान् अगर शूरहि नाहीं; शिवाय तो शिवाजीला आपल्या मुलखांत काडीचाहि विरोध न करितां स्वैरपणें लूट करूं देतो; त्यांत याचाहि हिस्सा असला पाहिजे असा तर्क करण्यास लोकांना फावावें अशा त्याच्या ह्या अस्वाभाविक वर्तनामुळें त्याला कोणीच मानीत नाहीं. व्यापारी वर्ग स्वसंरक्षणाकरितां इतस्ततः पळत सुटल्यामुळें सर्वत्र अंदाधुंदी माजून व्यापार नष्टच झाला आहे.... शिवाजीची सत्ता व सामर्थ्य वाढत असून सर्वांना त्याचें भय वाटतें. सुरतेच्या पाठोपाठ अनेक ठिकाणीं त्यानें लुटालूट केली असून आज त्याच्या ताब्यांत कांहीं नाहीं तरी ८।९ महत्त्वाचीं बंदरें आलीं आहेत. या प्रत्येक बंदरांतून इराण, बसरा, मक्का या बाजूला त्याचीं निदान २।३ गलबतें व्यापारानिमित्त बाहेर पडतात. ही एक आपल्याला चांगली संधी असून १५० टनांचीं दोनचार गलबतें समुद्रावर सोडल्यास त्यांकरवीं यांना पकडून आमच्या हक्कांची भरपाई करून घेतां येईल. याचा विचार केला पाहिजे.

इं. फॅ. १२
पृ. ७७-७९ इ.　　(१०४४)
कारवार (मास्टर)—सुरत प्रेसिडेंट.　　श. १५८७ चैत्र शु. ८
इ. १६६५ मार्च १४

फेब्रुवारीच्या आरंभीं ८५ लहान व ३ मोठीं गलबतें घेऊन शिवाजी मालवणांतून बाहेर पडला, तो गोव्यावरून कांहींहि विरोध झाल्याशिवाय बार्सिलोरपर्यंत जाऊन, तें बंदर लुटून, गोकर्णाला परत आला. तेथें तीर्थयात्रा संपादून ४००० पायदळासह तो अंकोल्याला गेला. तेथून सर्व आरमार पाठवून देऊन, जमिनीवरून स्वदेशांत जातांना वाटेंत लागणाऱ्या नद्या तरून जाण्यापुरतीं १२ छोटीं तारांडीं त्यानें राखून ठेविलीं. २२ फेब्रुवारीला तो कारवारला आला; परंतु हेरांकडून आधींच बातमी कळल्यामुळें आम्हांला सावध होऊन एका गलबतावर माल भरून सुरक्षित राहतां आलें. शिवाजीचें मोठें आरमार आदल्या दिवशींच निघून गेलें होतें. आणि तशीच जरूर वाटल्यास गलबत हाकारून आम्हांला वाटेल त्या बंदरांत नेऊन सोडण्याचें त्या गलबतवाल्या मस्कतच्या इसमानें आम्हांला वचन दिलें होतें. आम्हीं गलबतावर चढलों, त्याच रात्रीं बहलोलखानाचा दुय्यम शेरखान तेथें आला. त्याला शिवाजीबद्दल आधीं खबर नव्हती. तो

बहलोलखानाच्या आईला मक्केला जाण्यासाठीं सुरतुमजमार्चें एकादें गलबत माझ्यानें ठरवून देण्याकरितां आला होता. त्यानें खार्डीचें रक्षण करण्याची कामगिरी आम्हांला सांगून थोड्या वेळांत जमलों तितकी आत्मरक्षणाची तजवीज केली; व शिवाजीला आपल्या येण्याची बातमी देऊन शहरांतून न जाण्याबद्दल ताकीद पाठविली. शेरखानाचें घन्यार्शी असलेलें वजन व बहलोलखानाची त्या प्रांतांतील जबरदस्ती लक्षांत घेऊन नाइलाजानें शिवाजीनें त्याचें सांगणें मान्य करून तो शहरांत न जातां खाडीच्या मुखाशींच येऊन उतरला. आमचें गलबत व कोंगदेशचें एक गलबत अशीं दोन गलबतें त्याला विरोध करण्याच्या तयारीनें खाडींत नांगरून पडलीं आहेत, ही बातमी समजतांच शिवाजीनें 'आपण शहर सोडून देऊन लूट घेण्यास मुभा करून द्यावी. नाहीं तर हीं गलबतें आमचे स्वाधीन करावीं.' असा शेरखानास निरोप पाठविला. तो त्यानें आमचेकडे कळविल्यावर आमचे गलबतांत फक्त दारूगोळा आहे असें आम्हीं सांगून पाठविलें. हें ऐकून रागास येऊन, निघून जाण्याचे पूर्वी समाचार घेण्याची गोष्ट तो बोलूं लागला. हें सुभेदाराचे कानावर जातांच त्यानें सर्व व्यापाऱ्यांकडून त्याला नजराणा देववून लावून देण्याचें ठरविलें. त्यांत आम्हांलाहि आमचा वांटा भरणें इष्ट, असा मालमत्तेच्या रक्षणाकरितां विचार करून, जवळ जवळ ११२ पौंड देण्याचें आम्हीं कबूल केलें आहे. ही खंडणी घेऊन 'माझी होळीची शिकार शेरखानानें घालविली' अशी कुरकुर करीतच तो २४ फेब्रुवारीला निघून गेला. बहुधा होळीच्या सुमारला तो अशी लूट करितोच.

हुबळीला देखील शिवाजीचें भय आहे अशीं पत्रें आलीं आहेत. हुबळी किंवा कारवार यांपैकीं कोठेंच सुरक्षितपणा नसून आम्हीं वंकापूरला सरसुभेदार शेरखान याचा कौल घेऊन जाऊन रहाणार आहोंत. कारण (१) शेरखान वचनाला जागतो अशी त्याची कीर्ति आहे; (२) तो पैसे देण्यांत चोख आहे अशीहि त्याची ख्याती आहे; (३) आणि वंकापूर मोठें मजबूत स्थान असून तेथील अधिकारी बहलोलखान हाहि सर्व राज्यांत महाप्रबळ सरदार आहे.

शिवाजी येथून २५ मैलांवर भीमगडला [खानापूरचे नैर्ऋत्येस १६ मैल] आहे. मोंगलावर तो चालून जाईल असें म्हणतात मोंगल दर दिवशीं विजापुरच्या जवळ जवळ जात असून तेथील शाहा फार भेदरून गेला आहे.

| | | |
|---|---|---|
| सं. इ. सा. ले. १० <br> ग्र. १०६५ दि. १०७५ रम९ | (१०४५) <br> फर्मान | श. १५८७ चैत्र शु. १२ <br> इ. १६६५ मार्च १७ |

विजापूर बादशहा—लखम सावंत भोसले सरदे. पो कुडाळ

तुमचा वकील पितांबर शेणवी दयानंदराव मजलिसी याजबरोबर आला. त्याचे अर्जावरून तुम्हास वस्त्रें पाठविलीं आहेत. वतनमिरासहि लवकरच पावाल.

हि. रे. क. ९ }
पृ. ११२ इ. न्यू }
(१०४६)
पोर्तु. व्हाइ.— वसईचा कप्तान
{ श. १५८७ चैत्र शु. १४
{ इ. १६६५ मार्च २०

शिवाजीच्या लोकांना पोर्तुगीज प्रांतांत येऊं देऊं नका; किंवा त्यांना कोणत्याहि सवलती देऊं नका.

पिसुर्ले. शिवाजी }
पृ. १०–११ इ. मार्च ३१ न्यू. }
(१०४७)
पोर्तुगीज
{ श. १५८७ चैत्र शु. १५
{ इ. १६६५ मार्च २१

गोव्याचा व्हाइसराय—राजा जयसिंग

पोर्तुगीजांचे राजे व औरंगजेब यांच्यांतील संबंध शांततेचे व स्नेहाचे आहेत. पण गेल्या वर्षी लोदीखानानें हे संबंध तोडले [लि.१०३८] आमच्या मुलखांतून शिवाजीला केव्हांहि मदत अगर सवलत देण्यांत आली नाहीं. शिवाजीच्या नोकरींत कांहीं पोर्तुगीज लोक आहेत यावरून त्याला माझी संमति आहे असें म्हणतां येणार नाहीं. कारण माझ्या परवानगीवांचून मोंगलांच्या, गोवळकोंड्याच्या, कानड्याच्या आणि आदिलशहाच्या मुलखांत देखील पुष्कळ पोर्तुगीज आहेतच.

इं. फॅ. १२ }
पृ. ५२ इ. }
(१०४८)
गॅरी–लॉर्ड आर्लिंग्टन
{ श. १५८७ चैत्र व. २
{ इ. १६६५ मार्च २२

मुंबई व आंतील बंदरें यांमधील मालाच्या वाहतुकीवर पोर्तुगीजांनीं जकात घेऊं नये असा बंदोबस्त केला पाहिजे. तन्निमित्त प्रथम त्यांच्या गलबतांना आमच्या आखातांत वावरण्यास बंदी करावी. आमच्यापासून जवळच किनाऱ्यावर शिवाजीच्या ताब्यांत पुष्कळ बंदरें असून आपण तेथें मोकळेपणानें जाऊं शकूं; एवढेंच नव्हे तर शिवाजीला थोडीशी जकात भरली असतां हिंदुस्थान व दख्खन या उभय मार्गांतूनहि त्यांचे तांडेहि पोर्तुगीज सत्तेच्या कक्षेत सांपडल्याशिवाय सुखानें येऊन उतरूं शकतील. परंतु त्याच्या लुटारूपणाबद्दलच्या प्रसिद्धीमुळें त्याच्या मुलखांतून मालाची ने आण करण्यास व्यापारी तयार होतील किंवा नाहीं याची शंका आहे. त्यानें एकदां कोणतीहि शपथ घेतल्यावर ती तो धर्मबुद्धीनें पाळील असेंहि कित्येकांचें म्हणणें आहे. औरंगजेबानें त्याच्यावर सुमारें एक लक्ष घोडेस्वार पाठविले आहेत. मोंगलांचा जय होऊन आमचे बेटापासून चौलपर्यंतचा शिवाजीचा मुलख ते घेऊं शकले तर ह्या बेटाचे दृष्टीनें तें चांगलेंच होईल. तसें झालें तर सर्व प्रकारचा माल वाटेल तितका आमच्याकडे येऊन व्यापार वाढून मुंबई बंदराची भरभराट होईल.

इं. फॅ. १२ }
पृ. ७७ इ. }
(१०४९)
सुरत–कारवार.
{ श. १५८७ चैत्र व. ७
{ इ. १६६५ मार्च २७

गेल्या सर्व पावसाळ्याभर शिवाजीची भीती वाटत होती. ती पुढें नाहींशी

झाली. अजूनपर्यंत आम्हीं भीतीपासून मुक्त आहों. तुमच्या बाजूकडे तो कांहीं करण्याचा संभव आहे तरी खबरदारी घ्यावी. राजा जयसिंग, अनेक उमराव व मोठें सैन्य यांचेसह येत आहे (are on their way). रुस्तुमजमा कुटीची लज्जत चाखूं लागला आहे. लवकरच त्याला ती संवय लागून जाईल! शिवाजी इतकाच तो विश्वासास अपात्र समजला पाहिजे. कंपनीचें येणें वसूल होण्याची कांहीं आशा दिसत असली तर तुम्हांला वाटेल त्याप्रमाणें रुस्तुमजमाला नजराणा द्यावा....

ई. फॅ. १२ पृ. १२-१३ इ. | (१०५०) सुरत—कंपनी | श. १५८७ चैत्र व. १० इ. १६६५ मार्च ३१

**अँटनी स्मिथ** इतका धर्मलंड नीच वृत्तीचा इसम या भूतलावर दुसरा असणें शक्य नाहीं...**शिवाजी** येथें आला असतांना तो त्याच्या हातीं सांपडला होता. तेथून सुटून आल्यावर, तुमची वखार, मालमत्ता आणि सर्व नोकर लोक तो विश्वासघातानें त्याच्या हवालीं करणार होता! शिवाजीकडे पत्र पाठविण्याचें काम ज्याच्याकडे (त्यानें) सोंपविलें होतें त्यानें ह्या सर्व गोष्टी कबूल केल्या आहेत. [ सदर पृ. १० इत्यादींवर अशाच प्रकारचीं स्मिथच्या गैरविश्वासूपणाचीं आणखीं उदाहरणें दिलेलीं आहेत ].

जयसिंग पत्रें ११७ ए मॉ. रि. भा. २ पृ. ४ टीप. | (१०५१) जयसिंग—औरंगजेब. | श. १५८७ चैत्र इ. १६६५ मार्च (!)

प्रथम तळकोंकणच्या मार्गानें आपल्या तळाकडे जावें असा माझा बेत होता. परंतु ह्या प्रांतांत आल्यावर, **विजापूरकरांचें व शिवाजीचें आंतून सख्य आहे** असें समजलें. तळकोंकणचे रस्त्यानें गेलें तर विजापूरकरांचा मुलूख लांब राहून, विजापुरकर आणि शिवाजी एकत्र मिळण्याचा संभव होता. तसें झालें तर सर्व सावधगिरी निरुपयोगी झाली असती. यामुळें सैन्य सासवडलाच ठेवण्याचें ठरविलें. शिवाजीचा पुरंधरगड आणि इतर मुलूख याला हें ठिकाण जवळ असून शिवाय विजापुरकरांच्या मुलुखालाहि दूर नाहीं.

पिसुर्ले. शिवाजी. पृ. १५ इ. एप्रि. १६ न्यू. | (१०५२) पोर्तुगीज | श. १५८७ वैशाख शु. १ इ. १६६५ एप्रील ६

पोर्तुगीज व्हाइसराय—शिवाजी

पूर्वापार वहिवाटीप्रमाणें गोव्याकडे येणाऱ्या बैलांना तुमचे अधिकारी बंदी करतात; या त्यांच्या गैरवर्तनाविषयीं मीं पूर्वी तुम्हांस लिहिलेंच आहे. यानंतर कानडा प्रांतांतून गोव्याकडे येणारा तांदूळ ताब्यांत घेण्यासाठीं तुमचीं ९ जहाजें मुरगांव बंदराकडे आलीं व परत जाऊं लागलीं; यामुळें आम्हांस कांहीं लढाऊ जहाजें तेथें पाठविणें भाग पडलें;

-त्यांनीं तुमचीं जहाजें धरून आणून या बंदरांत ठेवलीं. परंतु तुमच्या स्नेहसंबंधाकडे -लक्ष देऊन मीं तीं जहाजें जाळण्याचा हुकूम न सोडतां त्यांना परत जाण्यास मोकळीक दिली.

जयसिंगपत्रें— मॉ. रि. भा. २ पृ. ४ टीप } (१०५३) जयसिंग—औरंगजेब { श. १५८७ इ. १६६५

जावळीचा जुना जमीनदार चंद्रराय आणि त्याचा भाऊ यांना मीं बोलावणें पाठविलें आहे. ... त्यांना पुष्कळ अभिवचनें देऊन पायेयाचीहि तजवीज केली आहे. अंबाजी, खारकुली (मोरे?) व त्यांचे दोन भाऊ हे सर्व पुरंदरावर शिवाजीनें तोफा ओतण्याकरितां ठेविले असून त्यांना ३००० ची मनसबदारी आहे. त्यांच्याकडेहि माझे दूत गेले आहेत. अफजलखानाच्या मुलाला 'बापाचा सूड उगविण्याकरितां मोंगली नोकरीत ये' असें कळविलें आहे. कदाचित् शिवाजीचे कांहीं जोडीदारहि आमच्याकडे फुटून येतील. आतां या लोकांना मनसबा आणि जहागिरी द्याव्या लागतील. त्याबद्दल तुमचें मत काय आहे?

जयसिंगपत्रें ११९ बी–१२० बी. मॉ. रि. भा. २ पृ. ५ } (१०५४) जयसिंग–औरंगजेब. { श. १५८७ इ. १६६५

सैन्यांतील लोकांचें बरें वाईट करणें सेनापतीच्या हातीं पाहिजे. शाहिस्तेखान सुभेदार झाल्यापासून सैन्याचे पगार, नेमणुका, व बदल्या कारकुनांच्या हातीं गेल्यामुळें शिपायांना युद्धभूमी सोडून त्यांच्याकडे धावावें लागतें. शिपायाची हजेरी व काम सेनापतीला माहीत असावयाचें; परंतु त्याचे हातीं बक्षीस देणें किंवा शिक्षा करणें यापैकीं कांहींच नाहीं! ...तरी हे सर्व अधिकार, जहागिरी बहाल करण्याचें सुद्धां माझे हातीं असावे.... नेहमीं शहाजाद्याकडे जावें लागतें तें बंद व्हावें. तसें झालें म्हणजे सर्वांची चेंडी माझे हातीं आहे याची जाणीव होईल आणि सर्वजण मनासारखीं कामें करूं लागतील. हें करणें तुम्हांला मान्य नसेल तर हें पत्र गुप्त ठेवावें. नाहींतर माझा आब जाईल.

हि. रे क. ९ पृ. ११२ इ.ए.१८ ग्यू. } (१०५५) पोर्तु. गव्ह.– वसईचा कप्तान. { श. १५८७ वैशाख शु. २ इ. १६६५ एप्रील ८

मोंगलाचें प्रकरण सध्यां मोठें गुंतागुतीचें झालें आहे. त्यांत आज जरी सकट नसलें तरी त्याचा बराबाईनें विचार केला पाहिजे. त्यांचा संबंध तुटतां कामा नये किंवा आमच्या मनांत संशय आहे हेंहि दिसूं देऊं नये. आम्हीं शिवाजीला मदत करतों असें त्यांना वाटतें तो संशय घालवावा. पण संशय येऊं न देतां तुम्ही पैसे घेऊन शिवाजीला दारू व अन्न पोंचवाल तर बरें. कारण मोंगलानीं शिवाजीचा मुलूख व्यापणें इष्ट नाहीं. पण शिवाजीशीं ठेवावयाचा संबंध फार गुप्त प्रकारचा असावा. तुम्ही शिवाजीसहि असें

कळवा कीं, तुम्हांस आमच्या आश्रयास यावयाचें असेल तर चौलास न येतां गोव्याकडे यावें; यांत सुरक्षितपणा अधिक आहे.

फिंच सॅन्यु. मा. १ } (१०५६) { श. १५८७ वैशाख शु. १०
पृ. ३६६ इ. } { इ. १६६५ एप्रिल १४

कॉन्सल लॅनॉय (आलेपो)—अर्ल ऑफ विंचिलशिया.

सुरतेच्या प्रेसिडेंटचें पत्र आलें आहे कीं, शिवाजीपासून सुरत सुरक्षित आहे. परंतु मोंगलांच्या मुलखांत तो स्वैर संचार करून कित्येक शहरें लुटीत आहे. बादशहाचें मोठें सैन्य त्याच्यावर आलें असतांहि वाटेंत शत्रुविरुद्ध नाकेबंदी करीत करीत तो थेट गोव्यापर्यंत किनाऱ्यानें जाऊन आला. मोंगल विजापुरावर मोठें सैन्य पाठवीत आहे. प्रथम शिवाजीच्या त्रासाला कंटाळून विजापूरकरांनीं हिंदुस्थानचे बादशहाला साहाय्यार्थ बोलाविलें असतां त्यानें शिवाजीपासून आदिलशाही भयमुक्त केल्यामुळें आतां आदिलशहानें मोंगलांच्या बंधनांतून आपली सुटका करून घेऊन उलट शिवाजीला मदत देण्यास सुरवात केली आहे. रणांगणावर प्रत्यक्ष सैन्य न पाठवितां शिवाजीला गुप्त रीतीनें द्रव्य साहाय्य देऊन, शिवाजी म्हणजे मोंगली सत्तेला थोपवून धरणारी सत्ता आहे अशा भावनेनें, शिवाजी आणि मोंगल यांचें युद्ध जुंपवून देण्याची आदिलशहाची कारवाई पाहून मोंगल फिरून विजापूरकरावरच उठला आहे. बादशाही सैन्य न जाणों आपल्यावर घसरेल अशा भीतीनें गोवळकोंडेकरानेंहि सरहद्दीवर सैन्याची मोठ्या प्रमाणावर जमवाजमव केली आहे.

सां. इ. सा. ले. ११ } (१०५७) { श. १५८७ ज्येष्ठ व. ७
इ. १०६५ हि.१०७५जिल्काद२० } विजा. बाद. फर्मान { इ. १६६६५ मे २६

लखम सावंत सरदेसाई परगणे कुडाळ यास.

पितांबर शेणवी तुमचा वकील यानें दियानतराव याचे विद्यमानें येऊन अर्ज केला कीं, तुम्ही पुरातन बादशहाचे चाकर आहां व हरएक सुभेदार होऊन तळ कोंकणांत येतात त्यास मिळून त्याच्या आज्ञेप्रमाणें शिवाजीपाशीं लढतां. पेशजी शिवाजीनें परगणे मजकूर येथें आपला अमल बसवून तुम्हांस परागंदा केलें. आणि सरदेसकतीचें काम कृष्ण सावंत करीत आहे. त्यास कृपा करून आज्ञा व्हावी म्हणून एक महमद इखलासखां वजीर यांस परगणे मजकूर व महालानिहाय येथील सरसुभेदारी श्रीपतराव मजलसी यास कारभार देऊन पाठविलें आहेत. त्यास तुमच्या कामाविषयीं सरसुभेदार व मजलसी यास आज्ञा जाहली आहे. तर तुम्ही कोणे गोष्टीविषयीं दिकत न घेणें. मिरास करार करून दिली असे. सरसुभेदार यास भेटून परगणे मजकुराचा बंदोबस्त करून चाकरीस हजीर राहणें. तुम्हांवर कृपा होईल आणि तुम्ही आपले लष्कर घेऊन सरसुभेदार यांजक

येणें. दर असामीस रोजमुरा ३ तीन होनु, मजलास होईपर्यंत दरमहा देत जाणेविषयीं त्यांस ताकीद असे. आज्ञापत्र बरहुकूम चालणें.

| | | |
|---|---|---|
| ऐ. व. ६ पृ. ७४ ले. ८<br>सु. १०६६ जिल्हेज ६ फसली १०७५ | (१०५८) | श. १५८७ आषाढ शु. ८<br>इ. १६६५ जून १० |

जाधवराऊ राजे गणेश विठ्ठल दीक्षित तीर्थोपाध्ये सप्तशृंग तुम्ही प्रत्यहीं श्रीस सप्तशतीचें एक आवर्तन करीत जाणे. तुम्हास प्रतिवर्षी २० रु. देत जाऊं.

| | | |
|---|---|---|
| स. १४२ ले. ३०<br>जेधे शका. | (१०५९)<br>उल्लेख | श. १५८७ आषाढ शु. १०<br>इ. १६६५ जून १२ |

महाराज राजश्री **थोरले कैलासवासी** स्वामीनीं मिरजा राजास भेटले, ते समयी मौ. पांगरे तर्फ नीरथडी प्रांत पुणे येथें १ चावर जमीनीची आपली व मिर्जा राजाचीं पत्रें करून दिलीं.

| | | |
|---|---|---|
| डाग रजिस्टर<br>पृ. १४२ जून २२ न्यू. | (१०६०) | श. १५८७ आषाढ. शु.१०<br>इ. १६६५ जून १२ |

आमचें मागलें पत्र रवाना झाल्यानंतर शिवाजीनें डचांचा माल लुटला व काशीया आणि संतुबा शेणवी-यांना पूर्वी शिवाजीनें कौल दिला होता-यांचें जहाज लुटलें, व तो आतां खारेपाटणांत जाऊन बसला आहे. तो लुटीतच आतो; पण अधिक पैसा देऊं केल्यास कौल देऊन आपणास बांधून घेतो. विजापूरच्या बादशहानें लखम सावंत याजकडे वेंगुर्ल्यांच्या संरक्षणाचें काम सोंपविलें; पण त्यानें शिवाजीपेक्षां लोकांवर अधिक जबरदस्ती व दांडगाई केली. यामुळें सुरक्षितपणासाठीं डच रेसिडेंटला माल घेऊन गोव्यास जावें असा सल्ला मिळाला व पोर्तु. व्हाइसरॉनें यासाठीं जागाहि दिली.

| | | |
|---|---|---|
| डाग रजि. जून २२ न्यू.<br>पृ. १४१ व पृ. १४३ | (१०६१) | श. १५८७ आषाढ शु. १०<br>इ. १६६५ जून १२ |

(पृ. १४१) शिवाजीच्या भीतिमुळें व्यापार मंदावला व सुरक्षितपणा वाटेना म्हणून डच अधिकाऱ्यानें सुरतेहून वेंगुर्ल्याकडे कांहीं माल व खजीना (५ हजार होन) रवाना केला.

(पृ. १४३) डच रेसिडेंटनें वेंगुर्ला येथील वखारांची जागा मजबूत करण्यासाठीं जास्ती ९ डच व ९ इतर शिपाई नोकरीस ठेविले आहेत. हे शिपाई, कांहीं आरबी व्यापारी, थोडे खिरती व कांहीं इतर रहिवासी इतक्यांना मिळून शिवाजीच्या हल्ल्यास तोंड देता येईल अशी त्यांची समजूत आहे.

शि. प्र. पृ.१७ }
सु. १०६६ जिल्हेज १६ }
(१०६२)
कबूलकतबा.
{ श. १५८७ आषाढ व. ३
{ इ. १६६५ जून २०

चिलोजी कोपर्डा प्रज कसबे वाळवे—— संभट गोसावी (ले. ३३७ प्रॉ).

डाग राजि. १६६५ }
जुलै ९ न्यू. }
(१०६३)
{ श. १५८७ आषाढ व. १२
{ इ. १६६५ जून २९

[पृ. १६५] सुरतेच्या बंदरास जाण्यासाठीं इस्पहानहून गंबून बंदरांत जाण्यास युरोपियन प्रवासी तयार होते. पण ही बातमी शिवाजीला कळली असती तर तो त्यांना पकडून लूट म्हणून धरून नेऊं शकला असता.

[पृ. १६६] रेसिडेंट सॅंडर्स (बॅंगुर्ली)—वरेन्द्रिया. शिवाजीचा लूटमारीचा क्रम पूर्ववत् चालू आहे. मागलें पत्र रवाना झाल्यानंतर त्यानें कानडा प्रांतावर हल्ला करून ८० हजार गिल्डरची लूट मिळविली. त्याचप्रमाणें डच कंपनीसाठीं माल खरेदी करावा म्हणून काचीवा व संतुवा शेणवी या वेंगुर्ल्यांच्या प्रसिद्ध व्यापाऱ्यांनीं पाठविलेले ५०० होनहि त्यानें लुटले.

मांडार. कॉमे. व्हॉ. }
सरकार-पृ. २९५ }
(१०६४)
जयसिंग—औरंगजेब.
{ श. १५८७ आषाढ
{ इ. १६६५ जून

मीं एकहि किल्ला सोडण्याचें कबूल केलें नाहीं. बराच वेळ वाद झाल्यानंतर शिवाजीच्या तहाचे बाबतींत खालील कलमें ठरलीं:–(१)त्याचे तेवीस किल्ले आणि त्यांच्या खालचा चार लक्ष होन वार्षिक उत्पन्नाचा मुलूख मोंगलांना मिळावा; व (२) राहिलेले राजगड आदिकरून बारा किल्ले आणि त्यांच्या खालचा एक लक्ष होनांचा मुलूख शिवाजीकडे रहावा. आणि त्याबद्दल त्यानें औरंगजेबाची एकनिष्ठेनें चाकरी करावी. [हफ्त अंजुमान बनारस, ५५ अ, ६६ ब; सरकार पृ. १२८]

रियासत }
पृ. ३०१ }
(१०६५)
दिलीरखान—शिवाजी.
{ श. १५८७ आषाढ
{ इ. १६६५ जून

महालदाराबरोबर तुमचें पत्र आलें तें पावलें. मजकूर कळला. तह करण्याची तुमची इच्छाहि कळून आली. लढण्याच्या पूर्वींच तुम्ही तहाचें बोलणें करतां हें आश्चर्य आहे. अशा बोलण्याकडे लक्ष देणें, हें आमच्यासारख्या बादशाही अधिकाऱ्यास शोभत नाहीं. तुमच्या या डोंगराळ प्रदेशांत शिकार व नाच करण्यासाठीं आम्ही हिंदुस्थानांतून इतके दूर आलों आहों. आमची एवढीच इच्छा आहे कीं, तुम्ही एकदां येऊन आमच्याशीं सामना करावा. तुमच्या मुलखांत आम्ही पाहुणे आलों असतां पुढें येऊन आमचा समाचार घेण्याऐवजीं तुम्ही दूर राहतां हें योग्य नाहीं. तुमचे ते मजबूत किल्ले, गगन-

चुंबित पर्वत आणि पाताळास पोंचविणारी खोरी प्रत्यक्ष पाहण्याची आमची इच्छा असतां, तुम्ही तर कोठें दिमत नाहीं आणि वर तहाचें बोलणें लावता! हा विचार तुम्ही प्रथमच केला असता तर बरें झालें असतें; आतां तरी हा विचार सुचला हें चांगलें झालें.

मांडार. ॲमि. व्हॉ. } (१०६६) { श. १५८७ आषाढ
सरकार-पृ. २९६ } जयसिंग-औरंगजेब. { इ. १६६५ जून

शिवाजीनें मोंगलांच्या प्रत्यक्ष नोकरींतून स्वतःची सोडवणूक करून घेऊन संभाजीला पाठविण्याची परवानगी घेतली. जयसिंगाला तो म्हणाला "माझ्या हातून अविचाराची आणि गैरनिष्ठेची बरींच कृत्यें इतक्यांत झालीं असल्यामुळें मला बादशाहापुढें येण्यास तोंड राहिलें नाहीं. मीं माझ्या मुलाला नोकर व बंदा होण्याकरितां पाठवितों. त्याला पांचहजारी मन्सब व खर्चाकरितां जागीर मिळेल.... मी पापी असल्यानें मनसब घेण्यास किंवा बादशाही नोकरी करण्यास नालायक आहें. परंतु दख्खनमध्यें केव्हांहि काम निघेल तेव्हां माझेवर एकादी कामगिरी सोंपविली तर ती चोख पार पाडीन."..............................आणखी शिवाजीचें बोलणें झालें तें:— "तळकोंकणांतील चार लक्ष होनांचा आणि विजापुरी बालाघाटपैकीं पांच लक्ष होनांचा मुलूख बादशहानें आपल्यास द्यावा. मोंगली सैन्य विजापुरावर चाल करून जात आहे ती कामगिरी झाल्यावर त्या प्रांताचा ताबा माझेकडेच राहील, असें बादशाही फर्मान आपल्या नांवचें मिळावें. असें होत असेल तर आपण बादशहाला १३ वार्षिक हप्त्यांनीं ४० लक्ष होन देण्यास कबूल आहों.".....

यावर जयसिंगाचें म्हणणें:— "या करारामुळें तीन प्रकारांनीं फायदा होईल. एक, आपल्याला ४० लाख होन म्हणजे दोन कोट रुपये मिळतील; दुसरा, शिवाजी आणि विजापुरकर यांच्यांत वैमनस्य वाढेल; आणि तिसरा, शिवाजी हा डोंगराळ जंगली मुलखांचा ताबा पत्करीत असल्यामुळें विजापुरी लोकांशीं लढून तो मुलख मोकळा करण्याची बिकट जबाबदारी त्याला पत्करणें भाग आहे. [हफ्त अंजुमान-बनारस ७०, सरकार पृ. १२८-२९]

रियासत पृ. ३०८ } १. (१०६७) { श. १५८७ आषाढानंतर
मॉ. रि. } शिवाजी—औरंगजेब { इ. १६६५ जून

मी आपला गुन्हेगार व अपराधी आहें; आपणास शरण येऊन जीव व धनदौलत रक्षण करण्याची इच्छा धारण करीत आहें. इतःपर आपली नोकरी इमानानें बजावण्यास मी सदैव तत्पर राहीन; आणि आपला हुकूम पाळण्यांत मोठें भूषण मानीन. बंडाळी करून मी आपल्या सर्वस्वाचा घात कधीं करून घेणार नाहीं. मिर्झा राजा जयसिंग यांनी सर्व वर्तमान आपणास तपशीलवार कळविलेंच आहे. मला सर्व अपराधांची क्षमा करून

जीवदान द्यावें, एवढेंच या दासाचें आपल्या चरणापाशीं मागणें आहे. बादशाही शिक्का व पंजा यांनीं अलंकृत झालेलें आपलें कृपापूर्ण फर्मान घेऊन दाखल झालें, ही आनंदाची बातमी मिर्झा राजा **जयसिंग** यांनीं आम्हांस कळविली. यायोगें बादशहांनीं मला जीवदान दिलें आहे. बादशहाकडून पोशाख आला, हें मला अत्यंत भूषण वाटत आहे. या पापी दासाचे अपराध क्षमेस पात्र नसताहि बादशहांनीं केवळ उदार अंतःकरणानें ही कृपा मजवर केली हें त्यांस मोठें भूषण आहे. फर्मान आल्याप्रमाणें मी आपले हुकूम पाळण्यास सदैव तत्पर राहीन. आतां मिर्झा राजाची रजा घेऊन घरीं जातों; आणि लढाईची तयारी करून फौज घेऊन विजापुरावर जाण्यासाठीं त्याच्या मदतीस येतों. या युद्धांत विशेष पराक्रम दाखवून पूर्वीचा कालिमा धुऊन काढावा अशी आशा बाळगीत आहें; आणि येणेंकरून आपल्या अनंत उपकारांची अल्प तरी फेड माझ्या हातून होईल अशी उमेद आहे.

रियासत
पृ. ३०८

(१०६८)
दिलीरखान-शिवाजी

श. १५८७ आषाढानंतर
इ. १६६५ जून

तुम्हांस कळविण्यास संतोष वाटतो कीं, आम्हीं विनंति केल्याप्रमाणें तुमच्या राजनिष्ठेचा बादशहांनीं स्वीकार केला आहे. इतकेंच नाहीं तर, सहा हजारांची मनसब, दोन लाख रुपये बक्षीस आणि निशाण व नौबत घेण्याची परवानगी तुमच्या पुत्रास देण्याचा हुकूम सोडला आहे. तरी हें पत्र पावतांच **संभाजीला** ताबडतोब इकडे पाठवून द्यावें. म्हणजे हुकुमाप्रमाणें त्याजला या वस्तू देण्यांत येतील. यासबधानें तुमच्या वकिलास बादशहाचें परभारें पत्र गेलेंच आहे. हा आपला स्नेह व ऐक्यभाव परस्परांशीं कबूल केल्याप्रमाणें जगाच्या निदर्शनास यावा एवढीच इच्छा आहे.

-ग रजि. १६६५
पृ. १७६ इ. जुलै १८ न्यू.

(१०६९)

श. १५८७ अ. श्राव. शु.६
इ. १६६५ जुलै ८

सुरतेचा सुभेदार **गयासदीनखान** यानें डच कंपनीच्या व्यवस्थापकास असें कळविलें आहे कीं, **शिवाजीची** समुद्रावरील सत्ता नष्ट करण्यासाठीं डचांनीं खटपट करावी. त्यावर डायरेक्टरनें कळविलें कीं, एक तर हें काम कंपनीला झेपण्यासारखें नाहीं; आणि दुसरें असें कीं, हा खर्चाचा प्रश्न आहे. दमणला वेढा दिला त्यात कंपनीला पुष्कळ खर्च आला, त्यापैकीं १ पैसाहि भरपाई मिळाली नाहीं. तथापि सुरत व भडोच या बंदरांत कायमचा जकातमाफीचा फर्मान मिळत असेल आणि **शिवाजीला** नष्ट करण्याच्या कामीं लागणारा सर्व भत्ता मिळत असेल तर मी आमच्या बादशहाला अनुकूल सल्ला देईन. तेव्हां, 'एक महिन्यांत फर्मान आणवितों' असें डायरेक्टरला सुभेदारानें टेकी लावलें आहे.

डाग रजि. १६६५ पृ. २२७ इ. आगस्ट १८ न्यू. (१०७०) श. १५८७ श्रावण शु. ८. इ. १६६५ आगष्ट ८

सुरत व इराण येथून आलेल्या पत्रांतील मुद्यांचा विचार करण्यासाठीं उच्चांची सभा भरून ठराव झाला. त्यांतलें एक कलम असें होतें:—मुसलमानांनीं नुकसान भरपाईचें बोलणें चालू ठेविलें आहे; त्याप्रमाणें त्यांनीं आमची भरपाई केली नाहीं तोंपर्यंत त्यांचा माल नेण्यासाठीं वगैरे आमच्या जहाजांची मदत मुसलमानांना देण्यांत येऊं नये; आणि **शिवाजी**विरुद्ध मदतीची मागणी करण्यांत आली होती ती (कांहीं सबब सांगून) 'आम्हांस देतां येत नाहीं' असें डिरेक्टरनें सांगितलें हें योग्य झालें.

डाग रजिस्टर १६६५ पृ. २२९ इ. आगष्ट १८ न्यू. (१०७१) श. १५८७ श्रावण शु. ८ इ. १६६५ आगष्ट ८

गेल्या वर्षी बटेव्हियाहून **सुरतेस** आलेल्या मालाचा कांहीं भाग जकातनाक्यावर तपासणीसाठीं अधिकाऱ्यांनीं अडकवून ठेविला होता. इतक्यांत **शिवाजी** जवळ आल्याची बातमी आली. त्या धांदलींत डच कंपनीच्या डिरेक्टरनें तो सर्व माल नाक्यावरून कंपनीच्या वखारींत आणून ठेविला. थोड्या दिवसानंतर डिरेक्टरनें आमचा माल कोठें आहे अशी चौकशी केली; तेव्हां (नाक्यावरच्या अधिकाऱ्यांनीं) उत्तर पाठविलें कीं "तुमचा माल **शिवाजीनें** नेला". पण वर सांगितलेल्या कारणामुळें **शिवाजीच्या** लुटीनें डच कंपनीच्या मालाचें वस्तुतः नुकसान झालें नाहीं व जकातहि भरावी लागली नाहीं ! पण कंपनीच्या डिरेक्टरनें आपल्या राजाकडे काय लिहून पाठविलें आहे तें मला माहीत नाहीं. [सुरतेहून ५ जानेवारीला पाठविलेल्या **पोर्तुगीज पत्राचे** डच भाषांतरावरून हा उतारा घेतला आहे.]

खं. २० ले. ११७ शु. १०६६ सफर ७ (१०७२) मिसेर्ला फा. मु. मज. सी. श. १५८७ श्रावण शु. ९ इ. १६६५ आगस्ट ९

अज दि० पर० वाई—ता। मोक० मौ० खेड वगैरे

आपदे विरणु चिमाव याचा मरील गावीं असलेला इनाम पूर्वीप्रो चालविणें.

हि. रे. क. ९ पृ. ११४ इ. आगष्ट २२ न्यू. (१०७३) तालिमनामा श. १५८७ श्रावण शु. १२ इ. १६६५ आगष्ट १२

वसई येथील पाद्यास **जयसिंगाकडे** वकीलीसाठीं जाण्यास पोर्तु. गव्हर्नरानें सांगितलें तेव्हां त्याला दिलेला तालिमनामा. त्यापैकीं एक कलम असें आहे:— 'शिवाजीचें व आमचें युद्ध चालू नव्हतें; यामुळें मला त्याचीं गलबतें अडकवितां येतना. परंतु शिवाजीनें आमच्या देशाकडे येण्याचा बहाणा करून बाहदूरकीकरितां गलबतें नेनी होतीं

र्ही सर्व मोगल सेनापतींच्या (जयसिंग) सांगीप्रमाणें मीं परत मागविलीं. तसें केल्यानें किल्यांत रसद पोंचविणें शक्य न झाल्यामुळें, रसद पोंचून शिवाजीचे किल्ले अधिक वेळ लढले असते ते न लढतां, युद्धामध्यें ते एकामागून एक त्वरेनें हस्तगत झाले. परंतु या मित्रत्वाबद्दल उपकार मानण्याऐवजीं उलट जयसिंग तक्रार करितो ! हें बरें काय ?'

ई. फॅ. १२
पृ. १९-२० इ.
(१०७४)
सुरत कन्सल्टेशन
श. १५८७ श्रावण शु. १४
इ. १६६५ ऑगस्ट १४

शिवाजीच्या लुटीमुळें कंपनीची गरज भागविणारे व्यापारीच आतां टेकीस आले आहेत. यामुळें येथें व्याजानें रकम मिळणें दुरापास्त झालें आहे. ज्याला त्याला स्वतःचा व्यवहार सावरण्याकरितां पैसा पाहिजे असून परस्परांतील विश्वास साहजिकच उडाला आहे.

खं. १७ ले. १२
सु.[१] १०६६ सफर १४
(१०७५)
महजर (देशमुखीची अदलाबदल)
श. १५८७ श्रावण व. १
इ. १६६५ आगस्ट १६

देशमुख तर्फ वडगांव—— बकाजी येसजी मोक. मौजे वडगाव

मौ. वडगांवचे मोकदमीस कोण्ही मिरासदार नाहीं. तरी मकाजीस आपले खुशीनें मिरासी करून दिधली असे.

ई. फॅ. १२
पृ. ८०-८३ इ.
(१०७६)
कारवार-सुरत.
श. १५८७ श्रावण व. १०
इ. १६६५ ऑगष्ट २५

आपल्या एका मुलानें घोडदळ टमारावें अशा अटींवर रुस्तुमजमानें आपल्या मुलखाचा खालचा भाग त्याच्या हवालीं केला आहे. त्याला घोडे खरेदी करण्याकरितां पैशाची टंचाई भासल्यामुळें प्रत्येकाकडून खंड आगाऊ वसूल करणें इत्यादि अत्याचार त्यानें चालविले आहेत. शिवाय महमदखानहि मिरजनचें बंड मोडण्याकरितां सैन्य घेऊन येत असल्यामुळें त्याची मागणी टाळण्याकरितां व्यापारी लोकांत पळापळी सुरू झाली आहे. आम्हींहि कोठेंतरी जावें म्हणतों. परंतु हुबळीचे सुभेदारावर गैरवर्तनामुळें सध्या गैर-मर्जी आहे; बंकापूरचा बहलोलखान मेला असून शेरखानाला अदिलशहानें विष देऊन मारविला, विजापूरवर मोंगल चालून येत असतांहि तेथील हुद्दी कमी होत नाहीं; इत्यादि विचार करून रुस्तुमजमालाच आम्हीं ३१० होनांचा मोठा नजराणा देण्याचें ठरविलें. त्यानेंहि उलट १२५ होन किमतीचा एक जातिवंत घोडा देऊन शिवाजीनें केलेल्या लुटीच्या भरपाई दाखल १२५ घोटे होन आपल्या जकातींतून आम्हांला देऊन, यापुढें

१ यांत कालाचा उल्लेख हा सीत सितैन अलफ शके १५८४ नंदननाम संवछरे असा आहे. सीत सितैनला शके १५८७।८८ येतात, १५८४ येत नाहीं. शिवाय नंदन संवत्सर १५८४ हा नसून १५७४ हा आहे. एकंदरीत पत्राच्या खरेपणाविषयीं शंका आहे.

षष्ठ्यांश जकातीची सूट कायमची दिली आहे. महमदखानालाहि त्यानें 'तुम्हा घोडा विकावा लागला तरी चालेल परंतु इंग्रजांचें कर्ज दे;' असा कडक संदेश पाठविल्यामुळें तोहि गयावया करूं लागला आहे. आपल्या मुलाला व सर्व लोकांना आम्हांला तोशीस न देण्याबद्दल बजाऊन, आमच्या वखारी बांधून देण्याकरितां त्यानें एक अमलदारहि पाठविला आहे. त्यानें आमच्या हावेरीच्या मुक्कामांत व सर्व प्रांतभर आपल्या पेशव्याचा मुलगा बरोबर देऊन, मेजवान्यांची झोड उठवून आमचा उत्तम सत्कार केला.......
बहलोलखानाला कर्नाटकच्या लढाईवरून बोलावणें गेल्यामुळें तो विजापूरला आला. परंतु ८ दिवसांत आजारी पडून मेला. त्यावेळीं त्याचा मुलगा व पुतण्या स्वतःचे ९।१० हजार घोडेस्वार घेऊन विजापुरांत होते; त्यांचा हेवा वाटून त्यांच्यांत कलागत लावण्याचा आदिलशहाचा प्रयत्न शेरखानाच्या धोरणामुळें यशस्वी होईना. तें पाहून शेरखानावर विषप्रयोग करण्यांत आला !...पुढचा पांच न राहून हे दोघे बहलोलखान (मुलगा व पुतण्या) आतां आपसांत भांडत असतात. आदिलशहाहि त्याचा फायदा घेऊन त्यांचा देश हळू हळू काबीज करीत आहे. परंतु फार धाडस त्याला करतां येत नाहीं. कारण तेहि फार तेजस्वी स्वभावाचे आहेत. सेनापती सैद इलियास सर्जाखान याचा त्यांनीं बेमुर्वतपणें एक हत्ती मारला. आमचा जुना आणि आवडता मित्र शिवाजी कांहीं संकटांत आहे असें वाटतें. तो मागें रेटला जाऊन राजापुरापासून उत्तरस सात गांवावर तळ देऊन राहिला आहे. [ त्याचा दक्षिणेकडील सर्व मुलुख ] खवासखानाचा भाऊ इसलासखान यानें त्याच्यापासून जिंकून घेतला आहे. शिवाजी आणि नेताजी राजा जयसिंगाला (Rajah Jeswans) भेटावयास जाऊन त्यांनीं शिवाजीचा मुलगा ओलीस म्हणून त्याच्या स्वाधीन केला हें निश्चित आहे. कोणत्या अटीवर हें कांहीं कळलें नाहीं; परंतु शिवाजीनें २३ किल्ले द्यावयाचे ठरलें असून ४ किल्ले त्यानें ताब्यांत देऊनहि टाकले आहेत. राजा जयसिंगानें दहा मैल घेराच्या पुरंधर या मोठ्या किल्ल्याला समोवार वेढा घालून आंतील लोकांना ४।५ दिवसहि टिकाव धरतां येणार नाहीं असा बंदोबस्त केला. पुढें त्यानें नेताजीला व शिवाजीच्या मुलाला आग्र्याकडे रवाना करून शिवाजीला रजपुती कावा दाखविला असें कित्येक म्हणतात. परंतु, आपला देश इतक्या गरीबीनें शत्रूच्या हवालीं शिवाजी करितो त्या अर्थी कांहीं विशेष घडलें असलेंच पाहिजे. विशेष माहिती काढण्याकरितां त्याच्या पुण्याच्या छावणीकडे आम्हीं एक इसम मुद्दाम पाठविला आहे. राजा जयसिंग आतां विजापुरावर निघाला असून तेथील राजा कर्नाटकांतील पेलगुंडा या किल्ल्यावर पळून जाणार आहे मीरजनचा वेढा चालू असून थोडक्याच वेळांत मीरजन पडेल असें वाटतें....

आगष्ट २९. ताजा कलम— वरील पत्र लिहिल्यानंतर नऊ सहा होन देण्याचे अटावर विजापूरकराचा व राजा जयसिंहाचा तह झाल्याचें समजलें आहे. हें खरें असेल तर शिवाजीची आतां धडगत दिसत नाहीं.

मॉ. रि. मा. २० } (१०७७) { श. १५८७ श्रावण
पृ. १० } जयसिंग—औरंगजेब { इ. १६६५ आगस्ट आरंभ

"बादशहांनीं मला विचारलें कीं, शिवाजीनें अशी कोणतीं वचनें दिलीं, करार केला, किंवा शपथा घेतल्या कीं, ज्या योगानें त्याच्या अविश्वसनीयतेबद्दल विचार न करितां तुम्हीं त्याला जाऊं दिलें ?' ज्या वेळीं मीं शिवाजीला जाऊं दिलें त्या वेळीं, ज्या शपथा मोडून आपण शापित होतों किंवा नरकाचें साधन करितों अशी हिंदूंची भावना आहे, अशाच शपथा शिवाजीनें घेतल्या. आमच्या अटी येणेंप्रमाणें ठरल्या. (१) बादशाही कृपेचें द्योतक म्हणून मीं त्याला दिलेले १२ लहान मोठे किल्ले आणि एक लाख होन (५ लाख रु.) उत्पन्नाचा मुलूख दुवल्यावर शिवाजीनें संतुष्ट राहून बादशाहाची अवज्ञा अगर बादशाही मुलखाची लूट करूं नये. (२) दख्खनच्या सुभ्याच्या अमलांत हुकूम होईल तेव्हां कामगिरीवर हजर व्हावें. (३) पांच हजार स्वारांची मनसब घेऊन संभाजी आणि 'दुसरा शिवाजी' म्हणून प्रख्यात असलेला नेताजी या उभयतांनीं दख्खनच्या सुभेदाराबरोबर असावें. (४) तळकोंकणांतील ४ लाख होन उत्पन्नाचा आणि विजापुरी बालाघाटांतील ५ लाखांचा मुलूख जर बादशहानें शिवाजीला दिला, आणि विजापुरकरांचा मुलूख जिंकल्यावर ह्या मुलखाचा ताबा बादशाही फर्मानानें कायम शिवाजीकडे करून दिला, तर मग दरसाल तीन लाखांच्या हप्त्यानें शिवाजीनें बादशहाला ४० लाखांची खंडणी द्यावी. (५) शिवाजीचे २३ किल्ले, आणि बालाघाट आणि निजामशाही तळकोंकण मिळून चार लाख होनांचा मुलूख शिवाजीकडून घेऊन मोंगली साम्राज्याला जोडण्यांत यावा. [हस्त अंजु. बनारस हस्त. ६६ ब; ६७ ब.]

मॉ. रि. मा. २० } (१०७८) { श. १५८७ श्रावण–भाद्रपद
पृ. ११ } जयसिंग—औरंगजेब { इ. १६६५ आगस्ट–सप्टेंबर

बादशहांनीं शिवाजीच्या मागण्यांबद्दलच्या माझ्या शिफारसींना मान्यता दिली.... तो माझ्या छावणींत २७ सेप्टें. १६६५ रोजीं बादशाही फर्मानाचें स्वागत करण्याकरितां आला. विजापूरच्या स्वारीवर संभाजीच्या मनसबीचें सैन्य व अधिक ७००० निवडक पायदळ घेऊन मजबरोबर येण्याचें त्यानें वचन दिलें आहे......

विजापुरी तळकोंकणांत आदिलशहाच्या विरोधामुळें रयतेची पांगापांग झाल्याकारणानें आणि बालाघाटांत स्वारीच्या पूर्वी शिवाजीला मुलूख ताब्यांत घेणें शक्य असलें तरी, स्वारी चालू झाल्यावरोबर रयतेंत गोंधळ माजून लागवड होणार नाहीं यामुळें शिवाजीला त्याच्या मुलखांतील शिल्लक ठेवलेला एक लाख होनांचा मुलूख पयदाच उत्पन्नाचा भाग रहातो ! म्हणून निजामशाही मुलखांतील एक लक्ष होनांचीं खेडीं व महाल आपल्यास मिळावे, अशी शिवाजीची विनंती आहे. परंतु चौकशी करतांना

पूर्वीचा आणि आतांचा निजामशाही मुलखांतील धारा यांमध्यें पुष्कळच तफावत असल्याचें कळलें. यामुळें खरोखर उत्पन्न काय आहे तें समजण्यासाठीं शिवाजीचे १२ किल्ले वगळून राहिलेल्या सर्व निजामशाही मुलखाची एक वर्षपर्यंत बादशाही जमिनीच्या खात्याकडून वहिवाट करून घेउन, मग त्या हिशेबानें शिवाजीला एक लक्ष होनाचा मुलूख देण्यांत येईल. मध्यंतरीं विजापूरचे युद्धात बरोबर येणाऱ्या त्याच्या सैन्याच्या खर्चाकरितां रोकड २ लाख रुपये, त्याला त्याच्या जहागिरीचे बदल्यांत देण्याचें मीं कबूल केलें आहे.

शिवाजीनें यात्रयाच्या ४० लाखांच्या खंडणीचा हप्ता नक्की मिळत नसल्यास संभाजीला कांहीं मिळणार नाहीं असें मीं सांगितलें आहे. त्यावर शिवाजीनें नम्रपणें असें उत्तर दिलें कीं, 'जरी ठरल्याप्रमाणें मोबदल्यांत मिळावयाची जमीन माझ्या हातीं आलेली नाहीं, आणि जरी तिच्यापासून मिळणाऱ्या उत्पन्नाचा नक्की अंदाज करणें आज जमीन हातीं येण्यापूर्वी अशक्य असलें, तरी माझ्या मुलाच्या मनसबीचें सैन्य मीं पुरवीन. मात्र त्या सैन्याच्या पगाराची रकम ही माझ्या खंडणीच्या हप्त्यादाखल समजण्यांत यावी.' शिवाजीकडून भावी युद्धांत महत्त्वाची मदत होण्यासारखी असल्यामुळें मीं ह्या त्याच्या सूचनेला संमति दिली. [हाफ्त अंजुमान, बनारस, ७४ ब; -७६ अ]

| | | |
|---|---|---|
| मॉ. रि. मा. २० <br> पृ. १०-११ | (१०७९) <br> जयसिंग—औरंगजेब. | श. १५८७ श्रावण-भाद्र. <br> इ. १६६५ आगष्ट सप्टें. |

बादशहाचे लिहिण्यांत "शिवाजीला विजापुरी तळकोंकण दिलें आहे. परंतु विजापुरी बालाघाटाबद्दल कांहींच हुकूम देणार नाहीं. त्याला सामर्थ्य असेल तर त्यानें आदिलशहापासून तो मुलूख हिसकून घ्यावा." असें आलें. बादशहांनीं असें लिहिणें म्हणजे हुकूम दिल्यासारखेंच असलें तरी आज्ञाधारक शिवाजी प्रत्यक्ष सनद मिळाल्याशिवाय कांहीं करण्यास धजणार नाहीं. ह्या महालाचें कमाल उत्पन्न ९ लाख होतें तें यापुढें देशांत शांतता झाली तथापि उतरतच राहणार. शिवाजी आपल्या पुतण्याला विजापुरीं सेवा करण्यास पाठवीत असेल तर हा मुलूख त्याला देण्याबद्दल विजापुरकरांकडून शिवाजीकडे अनुसंधान आलें होतें. परंतु शिवाजीनें माझ्या वचनावर आणि बादशहाच्या उदारपणावर विसंबून त्याला नकार दिला आहे. तेव्हां ठरल्याप्रमाणें हप्तेबंदीनें ४० लाख रुपये खंडणी देण्याच्या अटीवर ९ लाख होनांच्या मुलखाचें फर्मान शिवाजीला देण्यांत यावें. [हफ्त अंजुमान बनारस, ७० अ व ब.]

| | | |
|---|---|---|
| फाग रजि. १६६५ <br> पृ. २६५ इ. सप्टें. १४ न्यू. | (१०८०) | श. १५८७ भाद्र. शु. ६ <br> इ. १६६५ सप्टें. ४ |

वेंगुर्ल्याचा गव्हर्नर— ?:—वेंगुर्ल्यावर ( विजापूराकडून ) आलेले अधिकारी

शिवाजीच्या दरोडखोरीकडे दुर्लक्ष करतात. याचें कारण त्यानें मिळविलेल्या लुटींतला भाग त्यांनाहि मिळतो. शिवाजीमुळें कंपनीस जें नुकसान आलें तें शिवाजीच्या नांवें कीर्दीत लिहिलें पाहिजे. कंपनीला पुरविण्यासाठीं म्हणून हिंदी व्यापाऱ्यांनीं खरेदी केलेला माल शिवाजीनें लुटला, त्याअर्थी त्यांची भरपाई करून देत नाहीं हें म्हणणें न्यायाचें होणार नाहीं. पण शिवाजीविरुद्ध कडक उपाय योजणें पुरवणार नाहीं, यासाठीं शिवाजीनें कबूल केलेली तटस्थवृत्ती स्वीकारावी.

डाग रजि. १६६५
पृ. २६६ इ. सप्टें. १४ न्यू. (१०८१) श. १५८७ भाद्र. शु. ६
इ. १६६५ सप्टें. ४

वेंगुर्लो येथील डच रेसिडेंट—(बटेव्हिआ ?)

डचांच्या मालास जकात माफ असावी व याबद्दल एक ठरीव रकम विजापूर-दरबारांत भरावी, ही सूचना मान्य करतां येत नाहीं. याचें कारण वेंगुर्ल्यास ही माफी मिळविण्यासाठीं लागणारी रकम फारच वाढणार आहे.

डाग रजि. १६६५
पृ. २६६ इ. सप्टें. १४ न्यू. (१०८२) सुरत-बटेव्हिया. श. १५८७ भाद्र. शु. ६
इ. १६६५ सप्टें. ४

शिवाजीची समुद्रावरील सत्ता नष्ट करण्याच्या सुभेदाराच्या सूचनेस [वेंगुर्ल्याच्या डच] डिरेक्टरानें चांगलें(?) उत्तर पाठविलें आहे.

खं. ८ ले. १४ प्रभात ले. ८
हि. १०७६ जुलूस ८ रवल ५ (१०८३) श. १५८७ भाद्रपद शु. ७
इ. १६६५ सप्टें. ५

औरंगजेब——शिवाजी

शिवाजी राजे यांणीं बादशाही कृपेचे उमेदवार होऊन जाणावे कीं, सांप्रत तुमचें पत्र बहुत नरमाईचें राजे जैसिंग यांचे भेटीबद्दल कळलें. कृत्य माफ व्हावें म्हणून घेतले याचें पाहून गोड ध्यानास आला. या पूर्वी तुमचे मनांतील हाशील सरकार कामगारांनीं समजाविलें होतें कीं, तुम्हीं आपले कर्याचा पश्चाताप करून, या दौलतीचे आश्रयास येऊन, तीस किल्ले आपणांकडील इक-डील कामगारांचे स्वाधीन करून, बारा किल्ले व त्यांजखालील मुलूख एक लक्ष होनांचा निजामशाहीचे किल्ले व मुलूख पैकीं त्याच प्रकारें आणखी चार लक्ष होनांचा मुलूख तळ कोंकणांतील विजापुरकरांचे इलाख्याचा जो हालीं तुम्हांकडे चालू आहे व पांच लक्ष होनांचा मुलूख बालेघाटपैकीं, विजापूरचे इलाख्यापैकीं, येणेंप्रमाणें एकंदराचा फर्मान बादशाही मागता व चाळीस लक्ष होन दरसाल तीन लक्षाप्रमाणें पेशकसीबद्दल देऊं म्हणतां. ऐशियास, तुमच्या गोष्टी ज्या

तुम्हीं तूट अंदेशा न पाहतां केल्या त्या माफी जोग्या नाहींत. तथापि राजे जैसिंग यांनीं लिहिल्यावरून तें सर्व माफ करून तुमच्या मनोरथाप्रमाणें बारा किल्ले -(देतों). त्यांचा तपशील खालीं लिहिला आहे-व त्यांच्या खालचा मुलूख देऊन आणखी हुकूम केला आहे कीं; जो मुलूक नऊ लक्ष होनांचा त्यापैकीं चार लक्ष होनांचा तळकोकणपैकीं विजापुरकरांचे इलाख्यापैकीं हालीं तुम्हांकडे चालत आहे तो बंदोबस्ताकरितां इकडील सरकारांत आला. सबब बालेघाटीं पांच लक्षांचा मुलूक, विजापूर आमचे हातीं येईल त्या आधीं तुम्हीं त्यांजकडून घेतल्यास व चांगले फौजेसुद्धां राजे जैसिंग यांस मिळोन बादशाही कामांत यांचे मर्जीप्रमाणें कोशीस केल्यास, विजापूर फत्ते झाल्यानंतर, तुम्ही पेशकसीचे ऐवजाचा भरणा केल्यास, तुम्हांकडे बहाल ठेवूं. हालीं आमचे चिरंजीवास पांच हजारी मनसब व पांच हजार स्वार-की एकेकाचीं दोन दोन तीन घोडीं असावीं-याप्रमाणें देऊन, तुम्हांकरितां पोनाख पाठवून. [1]हा फरमान आपले पंजाच्या चिन्हासुद्धां पाठविला आहे. तरी तुम्हीं इकडील लक्षांत वागोन, बादशाही काम लहानमोठेंसुद्धां करून, हें सर्व आपले ऊर्जितार्चीच गोष्ट समजावें. रबिलावल सन ८ जुलूस मुा सन १०७६ हि.

किल्ल्यांचा तपशील राजे जैसिंग यांचे लिहिल्याप्रमाणें:--

| | | |
|---|---|---|
| १ राजगड | १ तोरणा | १ लिंगमगड |
| १ घोरप | १ अलवारी | १ महागड |
| १ घोसाळा | १ तळेगड | १ पाल (गड) |
| १ उधेदुर्ग | १ रायगी | १ कुंवारी |

सा. ले. १६१
सु. १०६६ रवल १५
फ. १०७५

(१०८४)
मिसेली

श १५८७ माह. व. १
इ. १६६५ सप्टें. १५

अज दि. सुपे-ता मोक. महा सेटि. खोत वगैरे कस. सुपेः- महा. रा. साहेब यांचे (मागको बक्काळ) खुर्दखतप्रमाणें गणो निमाजीनें माहादोबा गोसावी सो मोरेश्वर यांस दिलेलें इनाम त्याकडे चालू ठेवणें.

इं. फॅ. १२
पृ. ८५ इ.

(१०८५)
कारवार-सुरत.

श. १५८७ माद्र. व. ७
इ. १६६५ सप्टें. २१

राजापूरला गेलेला आणि जयसिंहाच्या छावणीकडे गेलेला असे दोन्ही बातमीदार

[1] हा घेण्याकरितां शिवाजी जैसिंगाचे तळाकडे २७ सप्टेंबरला आला होता (सरकार पृ. ४२१).

परत आले आहेत. छावणीकडील बातमीदाराच्या सांगण्यावरून संभाजी तेथें खात्रीनें असून शिवाजीहि आपले उत्तम किल्ले मोंगलांना देऊन औरंगजेबाच्या भेटीला जाण्याची तयारी करीत आहे. शिवाजीचे घरची मंडळी रायगडला [?] आहेत. राजापुराहून आलेल्या माणसानें महमद इखलासखानानें दाभोळ आणि त्याच्या सभोंवतालचा मुलूख जिंकून घेतल्याची खबर आणिली आहे. राजापूरचा आदिलशाही सुभेदार, आम्हीं राजापूरला यावें असें बोलावणें करीत आहे. इचांनीं तेथें वखार घालण्याबद्दल परवानगी मागितली होती. परंतु इंग्रजांची मर्जी पाहून त्याचा निकाल करण्यांत येईल असें त्यांना उत्तर मिळालें. चौल समोर मोंगलांचें ६००० घोडदळ आहे. विजापूरच्या राजानें मोंगलांशीं तह केला असून खंडणीची रकम घेऊन मुल्ला अहमद आग्र्यास जात आहे. मीरजन अजून टिकाव धरून आहे. परंतु लवकरच पाडाव होईल. रुस्तुमजमाला नेहमीं सुलतान बोलावीत असतो. परंतु ह्याचीच जाण्याची छाती होत नाहीं.

सां. द. रा. ले. १२
सु. १०६६ रबर११
हि. १०७६

(१०८६)
फर्मान

श. १५८७ आश्वीन शु. १३
इ. १६६५ आक्टो. ११

विजापूर बादशहा——हवालदार व कार. पर. कुडाळ.

महमद येखलासखा यानें सांगितलें, लखम सावंताची पर. मज. ची देसकत असतां कृष्ण सावंतानें गैरसमजुतीनें आपल्या नांवें करून घेतली आहे. तरी कृष्ण सावंतास दूर केला आहे. पर. मज. ची देसकती पूर्वीप्रमाणें लखम सावंताकडे चालविणें. कृष्ण सावंत यास लखम सावंताचे हातीं दिल्हे नाहीं व ह्याबद्दल लखम सावंतानें देऊं केलेले २५ हजार होन सोडले आहेत.

डाग रजि. १६६५
पृ. ३२२ इ. नोवें. ४ न्यू.

(१०८७)

श. १५८७ आश्वीन व. १२
इ. १६६५ आक्टो. २५

राजा जैसिंग यानें शिवाजीचा एक उत्तम किल्ला घेतला आणि शिवाजी ४१५ हजार घोडेस्वारानिशीं डोंगरी मुलखांतून काहीं तरी धाडसाच्या विचारानें बाहेर पडला आहे अशी लोकवार्ता आहे. आमच्या (डचांच्या) मदतीनें शिवाजीचीं जहाजें नष्ट करावीं अशी जी सूचना सुरतेच्या सुभेदारानें केली होती [ले. १०६९] तिचें पुढें कांहीं होईल असें दिसत नाहीं. सुरतेस लहानमोठीं कांहीं जहाजें बांधण्यासाठीं कांहीं इंग्रज कामकरी जाणार आहेत; त्या जहाजांचा उपयोग शिवाजीविरुद्ध करण्यांत येईल.

भांडार. कॉमे. न्हॉ.
सरकार. पृ. २९७

(१०८८)
जयसिंग–औरंगजेब.

श. १५८७ आश्वीन
इ. १६६५ आक्टोबर (!)

[औरंगजेबाकडून तहाची मान्यता व शिवाजीकरितां कृपेचें पंजाचें फर्मान व

पोशाख आला-सप्टेंबर]. शिवाजी त्या वेळीं आदिलशाही तळकोंकणांत होता. त्याला (फर्मानाची) बातमी कळतांच त्वरेनें २७ सप्टेंबरला तो माझे छावणींत येऊन पोंचला. लगेच ३० तारीख रोजीं माझा मुलगा किरातसिंह आणि जानीखान या दोघांना बरोबर देऊन बादशाही खलित्याला सामोरें जाण्याकरितां त्याला पाठवून दिलें!

खं. २० ले. ११८ }
सु. १०६६ जवल १५ }
(१०८९)
खुर्दखत फा. मु. व सी.
{ श. १५८७ कार्तीक व. १
{ इ. १६६५ नोव्हें. १३

अजर. रायाजी राजे घोरपडे— ता हुदे व मोक. मौ. येरोळ पर. करहाड.
सदानंद गोसावी याचा येरोळ येथील इनाम त्याचे हवाल करावा.

खं. १५ ले. ११३ }
सु. १०६६ जवल १५ }
(१०९०)
खुर्दखत मु. व सी.
{ श. १५८७ कार्तीक व. १
{ इ. १६६५ नोव्हें. १३

अजर. शर्जाखान— कार. पर. वाई
मोकदम मौ. गोवे हे गोविंदगिरी मुरीद कमळनयन याच्या गोवे येथील मळ्यास पूर्वीप्रमाणें कालव्याचे पाणी मिळूं देत नाहींत. फकिराचे इनामास तसवीस होणें अजब आहे. तरी असें न करणें.

खं. १५ ले. ११२ }
सु. १०६६ जवल १६ }
(१०९१)
{ श. १५८७ कार्तीक व. २
{ इ. १६६५ नोव्हें. १४

अजर. नरसोजी अंबाजी राजे घोरपडे—ता हुदे व मोक. मौ. चिंचणी किले ताथोडा कमळनयनगिरीचे मठास चिंचणी येथून पाच कुडो गला धर्मादाय देत जाणें.

खं. २० ले. ११९ }
सु. १०६६ जवल १६ }
(१०९२)
खुर्दखत फा. मु. व सी.
{ श. १५८७ कार्तीक व. २
{ इ. १६६५ नोव्हें. १४

अजर. खंडोजी अंबाजी राजे घोरपडे— हुदे. मोक. मौजे निगडी कि. सातारा.
कमळनयन मानभाव यांस निगडी येथें १५ बिघे इनाम दिलें असतां इस्कील करितां. तरी इनामतीचे वांटे न जाणे व साल्युदस्ती घेतलेले पैके फिराऊन दीजे.

डाग रजिस्टर १६६५ }
पृ. ३७२ इ. नोव्हें. ३० न्यू. }
(१०९३)
{ श. १५८७ कार्तीक व. ८
{ इ. १६६५ नोव्हें. २०

कंपनीचा डिरेक्टर फान आड्रिकन मरण पावला. आणि दरोडेखोर शिवाजी मोगलांना शरण जाऊन त्यांचा सहकारी म्हणून मान्यता पावला; अशी बातमी (His grace Coulster) फुल्स्टरकडे आली; असें सुरतेहून आलेल्या एक बनिया नोकराकडून समजलें.

राम. अं. ६५ ले. ११ }
श. जवल २५ }

(१०९४)
धर्मपत्र

{श. १५८७ कार्तिक व. १२.
{इ. १६६५ नाव्हें. २३

सुवाईआवा, खेलोजी, सुमानजी, रेखोजी, व माहादाजी राजे भोसले महादभटबिन तिमणभट सो येलूर श्रीघुश्मेश्वराची पूजा व अभिषेक याबद्दल ४० रुपये.

इं. फॅ. १२ }
पृ. २८-२९ इ. }

(१०९५)
सुरत-कंपनी

{श. १५८७ कार्तिक
{इ. १६६५ नोव्हें.

येथील सुभेदार आजपर्यंत आमचे हिशेब पुरे करून देण्याला तयार होत नसला तथापि बादशहा व दिवाण यांच्या वचनाप्रमाणें एक वर्षभर आयात व निर्यात मालावरील जकातींच्या माफीबद्दल आम्हांला शंका वाटत नाहीं. या वर्षभर शेंकडा ½ टक्क्याप्रमाणें सूट मिळेलच. परंतु आम्हांला निमे जकातीची माफी मिळावी असेंच आमचें मागणें आहे.

पिसुर्लें. शिवाजी. }
पृ. १४ इ. डिसें. ७ न्यू. }

(१०९६)
गोव्याचा व्हाइसराय-पोर्तुगीज राजा

{श. १५८७ मार्ग. शु. १
{इ. १६६५ नोव्हें. २७

आदिलशहाचा एक सेनापति खवासखान हा दोन हजार घोडेस्वार व पायदळ यांसह आमच्या मुलखाच्या (= गोव्याच्या) शेजारीं असतो; त्याच्या प्रदेशांत शिरून शिवाजीनें त्याच्याशीं सहज युद्ध केलें आणि कोंकण सोडून घाटावर चढून जाण्यास त्यास भाग पाडलें. एवढ्या विजयावर संतोष न वाटून शिवाजी आदिलशाही मुलखांत बराच आंत घुसला. आदिलशहाचे सेनापती शिवाजीशीं आंतून सलोख्याचे संबंध ठेवतात आणि मदत करतात ही गोष्ट सर्वश्रुत आहे. मजकडे आदिलशहा व शिवाजी या दोघांनींहि वकील पाठविले आहेत; आणि आपल्या पक्षास मी मिळावें अशी प्रत्येकाची इच्छा आहे. पण कोणत्याहि एका पक्षास सामील होण्यांत पोर्तुगीज सरकारचें हित साधत नाहीं. त्या अर्थीं मी दोघांशींहि संबंध न तोडतां मोघम बोलणें केलें.

इं. फॅ. १२ }
पृ. ८६-८७ इ. }

(१०९७)
कारवार-सुरत

{श. १५८७ मार्ग. शु. १
{इ. १६६५ नोव्हें. २७

आपली ही वखार चालू राहिली तर रुस्तुमजमा आमच्या विरुद्ध डचांच्या मागण्यांचा विचार करणार नाहीं. कदाचित् आदिलशहाच्या मनांत त्यांना अनुकूल असे विचार आले तरी रुस्तुमजमावर आजकाल यहाल मर्जी असल्यामुळें त्याचा आपल्याला खास उपयोग होईल. महमदखान आपल्या सैन्याचा पगार देण्याच्याच अडचणींत असून त्याकरितां या गरीब बिचाऱ्या देशाला जादा कर द्यावे लागत आहेत... मिरजन किल्ला त्याचे स्वाधीन झाला आहे.... राजा जयसिंगाचे छावणींत मनुष्य पाठवूनहि शिवाजीचें काय झालें हें आम्हांला नक्की समजूं शकलें नाहीं! मोगला (सेनापती)ला

भेटून त्यानें कित्येक किल्ले आणि आपला मुलगा ताब्यांत दिला याबद्दल शंका नाहीं.... विजापुरी सेनापती महमद इखलास इच्छीं ससैन्य कुडाळला आहे. शिवाजीचा घेतलेला सर्व मुलूख त्याला पुनः सोडावा लागला असून या क्षणापर्यंत अनेक महत्त्वाचे अमलदार आणि सांचें २००० सैन्य खर्ची पडलें. त्यामुळें सर्जाखान महमद इखलासखानाच्या मदतीला चालून येत आहे. रुस्तुमजमा आदिलशहाच्या मर्जीतला होऊन विजापूरला राहिला आहे. पण इतर अनेक चांगल्या दर्जाचे सरदार जाऊन मोंगलाला मिळाले आहेत. आदिलशहा, आपल्या बायकांमाणसांना सुरक्षिततेकरितां इतर किल्ल्यांवर पाठवून, मोंगलाच्या आगमनाची वाट पहात आहे. आपल्या हस्तकांची निष्ठा पक्की करण्यासाठीं हा विजापूरचा सुलतान सर्व सरदारांच्या बायकांना आपल्या ताब्यांत घेत असून नकार देणाऱ्यांना कैद करीत आहे. राजा जयसिंग कदाचित् विजापूरकरांशीं तह करण्यास तयार झाला असता परंतु दिलीरखान नांवाच्या त्याच्या बरोबरच्या प्रख्यात आणि फौजबंद सेनापतीनें परत जाण्यापूर्वी विजापुरांतलें पाणी पिण्याची अभेद्य प्रतिज्ञा केली असल्यामुळें त्याचा नाइलाज आहे. या बाजूच्या शिवाजीच्या किल्ल्यावरील शिबंदीचे लोक वेळोवेळीं किल्ल्यांतून बाहेर येऊन आसपासचीं लहान लहान शहरें लुटून नेतात. हे लोक एकंदर २००० च्या वर खास नाहींत. (मीरजनचा किल्लेदार) मूर्तजाबेग आतां (किल्ला हातांतून गेल्यावर) २०० लोक बाळगून (लुटीकरितां) बाहेर पडला आहे!

इं. फॅ. १२ } (१०९८) { श. १५८७ मार्ग. व. ४
पृ. ६९६. } मुंबई, गॅरी—लॉर्ड आर्लिंग्टन. { इ. १६६५ डिसें. १६

शेजारच्या किनाऱ्याची पट्टी जयसिंगानें जिंकून घेतल्यामुळें पूर्वीची दळणवळणाच्या बाबतींतील धोक्याची परिस्थिति नाहींशी होऊन आतां राजकीय दृष्ट्याहि सुधारणा झाली आहे. मुंबई बेटाला अद्यापपर्यंत याचा फायदा झाला नाहीं हें खरें आहे. तथापि माझे सल्ल्याप्रमाणें कुकनें जयसिंगाशीं या बाबतींत बोलणें केलें असतें तर आजपर्यंत जयसिंगानें बादशहाकडे शिफारस करून मुंबईच्या समोर व्यापाराकरितां मोठें बंदर वसवून इराण, बसरा, मक्का आणि दक्षिण सागरांतील इतर बंदरें यांचेशीं जंगी व्यापार सुरू झाला असता व बालाघाटाजवळील मुलखांतून व्यापारोपयोगी अनेक जिनस उपलब्ध होतात त्यांचा फायदा किती तरी बेतां आला असता.

सं. ८ छे. १५ प्रमाद दिल्ली. ले. १ } (१०९९) { श. १५८७ मार्ग. व. १४§
( हि. १०७६ रजब ७ ? ) } { इ. १६६५ डिसें. २५

औरंगजेब—शिवाजी

---

§ सं. ८ व प्रमान यांत छापिलेल्या भाषांतराच्या या पत्रांतील अखेरचा कालनिर्देशात्मक भाग चुकीचा आहे. त्या ठिकाणीं जु. ८ जमादिलाखर २७ अशी तारीख पाहिजे, हें मूळ फारसी फर्मानावरून ठरतें.

तुम्ही फौजेसुद्धां बादशाही लष्करांत आहांत, आणि **ताथवडा फलटण** हे **किल्ले** विजापुरकरांकडील होते ते घेऊन त्यांची फौज तळकोकण प्रांतीं होती. तेथें रात्री पोहोचविली, म्हणोन राजे जैसिंग मार्गे लिहिल्यावरून तुमचे शाबासकीस कारण जालें. सबब तुम्हांकरितां उत्तम पोषाख व जडायाची कटयार पाठविली आहे. या लाभाचा संतोष मानून इतःपर या स्वारींत जितके कोशीस कराल तितकें पहिल्यापेक्षां अधिक लोभास कारण होईल.

खं. ८ ले. ९ } (११००) { श. १५८७ मार्ग.
१ जबर } खबर { इ. १६६५ डिसें.

**निळो सोनदेऊ** व रखमाजी शिवदेऊ— राजश्री साहेब

केसो नारायण सबनीस किल्ले **राजगड** याची वर्तणूक पहिलेपासून पाहतां, कारमार माकूल नाहीं. ऐसियासी, पहिलेच भलते गोष्टीचे तहकीक करावे तरी कितेक गोष्टी-करितां करिता येत नसे. त्या उपरि, साहेब राजगडीहून **मिर्जा** राजाचे भेटीस गेलियावर राजगडी हवालदार नाहीं, अगर पद्मावतीस सरनोबत नाहीं. राजगडचा कारभार केसोपंताचे शिरीं आला त्यावरी बारीक नजरेनें पाहतां, राजगडचे तनखापैकीं, लारी ३००० तीन हजार अंबाजीपंताकरन व राघोपंताकरन आलियासी, केसोपंतीं तीन हजार लारीपैकीं लारी १४०० चौदाशें गोविंद राउताचे हवाला केली. आणि उरली लारी १६०० सोळाशें आपल्या हवालगिरापाशीं ठेविली. त्यावरी घालमेली करून या प्यादियापासून त्यापाशीं, त्यापासून आणिका प्यादियापाशीं, ऐसे दोघा चौघाजवळी देती. ऐसे **पघरा** रोज घालमेली करून सोळाशे लारीपैकीं साते लारी तोडविली, आणि हजार लाहारी एका नाईकवाडियापाशीं ठेविलीं. ही खबर आम्हास कळतांच आम्ही रखमाजीपंतास सांगितलें कीं, तहशीलेस कोण गेले होते ते नाईकवाडियासी बोलावून आणणे. त्यावरी रखमाजी-पंतीं कुल नाईकवाडियासी बोलावून कोण तहशिलेस गेले होते वगैरे खबर घेतां बादजी व गुंडा नाईकवाडी यापाशीं हजार लारी ठेवली ते आढळली. चौकशी करितां बहुत घालमेली केली. त्यावरी आम्ही नाईकवाडियासी सांगितलें कीं, हजार लारी तुजपाशी आहे ते आमचे बगर रजा खर्च न करणें. ऐसें केलें तो प्यादियापाशीं तहकिकी केली. हे खबर केसो नारायणास कळली.

ओ. कॉ. मा. २९ } (११०१) { श. १५८७ पौष शु. ३
नं. ३१४२ इ. } { इ. १६६५ डिसें. २९

फिलिप गिफर्ड, कारवार— रँडॉल्फ टेलर

राजा जयसिंगानें **शिवाजीला** पकडलें असेंच अनेक ठिकाणीं व पुष्कळ लोकांचें तोंडून ऐकूं येतें. काल वेंगुर्ल्याहून मला पत्र आलें त्यावरून **रावजी** पंडितजवळ राजा-

पुरास २००० सैन्य असूनहि, त्यानें कुडाळच्या सुभेदाराकडे (फक्त ५०० घोडदळ आणि १००० पायदळ इतकें थोडेंच सैन्य असतांना ) कौलाकरितां मागणी केली आहे; असें समजतें. महमद इखलासखान एक महिन्यापूर्वीच विजापुरास गेला आहे. शिवाजीला गोत्यांत घालण्याकरितां जयसिंहानें युक्ति केली असें म्हणतात. 'आपण विजापुरावर स्वारी करणार असल्यामुळें तुम्हीं सुरतेला आणि भटकलला गेलेलें आपलें चांगलें सैन्य आणावें' असें शिवाजीला सांगितलें. मग त्याप्रमाणें आलेल्या सैन्याची पहाणी करून विजापूरकडे त्यानें ४ मुक्कामपर्यंत कूच केलें आणि एकदम त्या सर्वांना कैद केलें ! अशी बातमी बरेच दिवस आम्हीं ऐकत आहों [ ह्याबद्दल विश्वसनीय पुरावा नाहीं ]. मोंगली सैन्य विजापुराकडे ५।६ दिवसांच्या मुक्कामापर्यंत आलें असून विजापूरला मोठा धोका आहे. आदिलशहानें वाटेंतील कित्येक शहरें जमीनदोस्त करून २।३ गांवांच्या पट्ट्यांत पाण्यांत विष घातलें आहे. परंतु या सर्वांचा कांहीं उपयोग होईल असें वाटत नाहीं.

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ. १२<br>पृ. ३६–३७ इ. | (११०२) | श. १५८७ पौष शु. ३<br>इ. १६६५ डिसें. २९ |

प्रेसिडेंट ऑक्झिडेन, सुरत——कॉन्सल, आलेपो.

गेल्या ३१ मार्चला पत्र पाठविलें होतें त्यांत मोंगलांचें सैन्य दख्खनमध्यें आल्याची बातमी लिहिली होती. तोंपर्यंत युद्धाची कांहींच बातमी नव्हती. त्यानंतर मोंगलांनीं शिवाजीच्या महत्त्वाच्या किल्ल्यांना वेढे घालून दोन किल्ले घेतले, आणि त्याला इतका जेरीस आणला कीं त्यानें तहाचें बोलणें लाविलें; आपले कित्येक महत्त्वाचे किल्ले व मुलगा स्वाधीन केला आणि आता तो बादशहाच्या भेटीस जाण्याची तयारी करीत असल्याचीहि बातमी आहे. दुसऱ्या बाजूनें आदिलशहानें त्याच्याकडून राजापूर, दामोळ वगैरे मुलुख परत मिळविला. मोंगलांचें ६००० सैन्य पोर्तुगीजांचें तटबंदी बंदर चौल, त्याच्याजवळ आहे. दख्खनच्या राजानें [आदिलशहानें] ९ लक्ष होन देऊन मोंगलांशीं तह केला असून आग्र्यालाहि खंडणी पाठविण्याची तजवीज तो करीत आहे.

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ. १२<br>पृ. ६४ इ. | (११०३)<br>सुरत–कंपनी | श. १५८७ पौष शु. ६<br>इ. १६६६ जाने. १ |

तुम्हीं एकदम सुरतेहून मुंबईला वखार हालविली [मुंबई १६६५ फेब्रु. ८ ला इंग्रजांचें हातीं दिली. इं. फॅ. १२ पृ. १३९–४० ] तर येथून गलबतें भरण्यास मालच मिळणार नाहीं. कारण बादशहाशीं व येथील लोकांशी शत्रुत्व उत्पन्न होऊन येथून किंवा मोंगली मुलखांतून कोठूनहि माल नेण्यास बंदी होईल. आतांच मोंगलांनीं अनेक सैन्यें पाठवून शिवाजीला जर्जर केल्यामुळें मोंगली मुलुख मुंबईच्या दक्षिणेस चौलपर्यंत वाढला आहे. शिवाजीनें २० च्यावर महत्त्वाचे किल्ले व त्यांखालील मुलुख मोंगली सेनापतीच्या

स्वाधीन करून मोंगलांची ५००० स्वारांची मनसबदारी पत्करली आहे. पण तो आपण स्वतः स्वाधीन झाला नसून थोडे अत्यंत मजबूत किल्ले स्वतःकरितां शिल्लक ठेवून त्यानें वरील प्रकारचा तह केला आहे असें कळतें. या जयानें विजापुरावर स्वारी करण्याचा मार्ग मोकळा झाल्यामुळें बादशहाला आनंद झाला आहे. वास्तविक विजापूरचें राज्य हें मोंगलांचें मांडलीक असून तें खंडणी देत असे; परंतु पुढें शिवाजी प्रबळ झाला. आणि त्याच्या दंग्यामुळें आदिलशहाला कित्येक वर्षे खंडणी देण्याचें टाळतां आलें. आतां शिवाजीच जेर झाल्यामुळें आदिलशहा राहिलेल्या खंडणीची भरपाई करण्यास तयार आहे. पण यांतहि शिवाजीचा आणखी कांहीं डाव असेल असें लोक बोलतात.... मुंबईला प्रथम शाखा–वखार स्थापन करून मुख्य ठिकाण सुरतेलाच ठेवावें. कोणाच्याहि डोळ्यावर न येतां हळूहळू दख्खनचा सर्व व्यापार तिकडेच आकर्षण करावा.

ई. फॅ. १२
पृ. ८८ इ.

(११०४)

कारवार ( गिफर्ड व चेंबर्लेन )–सुरत { श. १५८७ पौष शु. ६ इ. १६६६ जाने. १

शिवाजीला जयसिंगानें पकडलें आहे अशी उडती कळलेली बातमी, आतां विजापुराहून बहलोलखानाचा हस्तक आला आहे त्याच्या सांगण्यावरून, पक्की झाली आहे. ती खरी आहे असें मानण्यास आणखी एक कारण असें आहे कीं, महमद इखलास-खान कुडाळ सोडून गेला; त्याला एक महिन्याचेवर दिवस झाले असूनहि, राजापुरास रावजी पंडित २००० सैन्यानिशीं केवळ बसून राहिला आहे. त्यानें या मुदतींत कांहींच केलें नाहीं. शिवाय ५०० स्वार व १००० पायदळ यापेक्षां जास्त सैन्य कुडाळचे सुभेदाराचे ताब्यांत नसतांनाहि त्याचेकडे त्यानें कौल ( परवाना ) मागविला आहे ! कांहींच तड-जोड न होईल तर राजा जयसिंगाविरुद्ध टिकाव धरतां येईल तेवढा धरण्याचा विजापूर-करांचा कृतनिश्चय आहे. या निश्चयानेंच विजापूरच्या आसपासचा ४।५ मैलांतील प्रदेश सर्व उध्वस्त करून व पाण्यांत विष टाकून दिलें आहे. तेथील सर्व व्यापारी घाबरून पळून गेले असून सरदारांनी आपलीं बायकामुलें दूरच्या किल्ल्यांवर नेऊन ठेविलीं आहेत. इतकें झालें तथापि तहाबद्दलची आशा अद्यापि नष्ट झाली नाहीं.

भांडार. कॉमे. व्हॉ.
सरकार-पृ. ३००

(११०५)

जयसिंग—औरंगजेब. { श. १५८७ पौष व १ इ. १६६६ जाने ११ (?)

माझ्या विनंतीला मान देऊन बादशहानीं ( २५ डिसें. रोजीं ) शिवाजीला पोशाख आणि हिरेजडीत खंजीर पाठविला. शिवाजी विजापुराला वेढा घालण्यासाठीं मदत करावयास तयार होता. परंतु......मलाच तें शक्य वाटलें नाहीं. शिवाजी म्हणाला पन्हाळ्याची मला विचंबातमी असल्यामुळें तिकडे मला पाठविल्यास शिबंदी गरसावध

शि. प. सा. सं. २०

असतांना मी तो किल्ला मोंगलांना मिळवून देईन. आणि त्या प्रांतांत नंतर इतका धुमाकूळ घालीन कीं मग्रो बंदोबस्ताकरितां त्यांना मोठें सैन्य पाठवावें लागेल. [ हाफ्त अंजुमान, बनारस, ८४ ब; सरकार पृ. १३६.]

इं. फॅ. १२ }
पृ. २०१ इ. } (११०६) { श. १५८७ पौष व. ५
{ इ. १६६६ जाने. १५

फिलीप गिफर्ड व सीसा चेंबरलेन, कारवार—सुरत.

मुलखातील गोंधळामुळें कांहींच विक्री झाली नाहीं. मोंगली सैन्य विजापुरापासून ३ कोसांवर आलें असल्यामुळें शहरांतील सर्व व्यापारी पळून गेले आहेत आणि राजधानीचा एक दरवाजा वगळून बाकीचे सर्व दरवाजे दगडविटांनीं भरून काढिले आहेत. अद्यापपर्यंत एकच लढाई झाली. तींत आदिलशाहींतील पुष्कळच महत्त्वाचे अमलदार पडले; आणि सुमारें ७०० लोक जखमी झाले. मोंगल येण्यापूर्वीच विजापूरचे सभोंवतालीं ४१५ गांवाच्या पट्ट्यांतील शहरें उध्वस्त करून टाकिलीं होतीं. आतांच मांदेमर गाण्यास पाव होन पडूं लागला आहे. रस्तुमजमाचे समवेत सुलतान बाहेर छावणींत रहात असून ३५००० स्वार आणि ५००० पायदळ इतकें सैन्य त्याचेबरोबर आहे. सुलतानाच्या मनांतून आपला जनाना दूर ठिकाणीं पाठवावयाचें होतें. परंतु त्या प्रांताचे वजीर त्याला मान्यता देईनात म्हणून त्यांचेशीं लढाई देण्याची तो तयारी करीत आहे.... शिवाजीचें काय झालें असावें हें कांहींच समजत नाहीं. घाटाखालील ( तळकोंकणातील ) त्याचे लोक स्तब्ध आहेत. वेंगुर्ला आणि कुडाळ येथें आदिलशाही सुभेदार असून राजापूर आणि खारेपाटण येथें शिवाजीचे सुभेदार आहेत. वेंगुर्ल्याला डच व मुसलमान यांचें वैमनस्य आलें असून; सुभेदार डचांचा दलाल आपल्या स्वाधीन करावा असें म्हणतो; तें डच लोक मान्य करीत नाहींत. या भांडणाचें मूळ असें झालें कीं, शिवाजीनें डचांच्या दलालाचें गलबत धरून ठेविलें, तें महमद इखलासखानानें सोडवून स्वतःच घेतलें. पुढें तो ( महमद ) विजापुरला गेला असें पाहून, डचांनीं तें पुनः हिरावून घेतल्यामुळें सुभेदार चिरडीला जाऊन डचांची खोड मोडण्याचा बेत करीत आहे.

हि. रे. क. १ }
पृ. १११ इ. जाने. २८ न्यू. } (११०७) गोव्याचा ग.-पोर्तुगीज बाद. { श. १५८७ पौष व. ८
{ इ. १६६६ जाने. १८

सुरतेच्या हल्ल्यानंतर शिवाजी मुखाल आपल्या राज्यांत परत आला व प्रसंग पडल्यास आमच्या राज्याचा आश्रय करावा या हेतूनें आमच्या प्रदेशाजवळ येऊन पोचला.

प्रपि. कर्ना. १० }
पृ. ७४ ले. २२७ }
श. व राव. (दक्षिणी) }

(११०८)
शिलालेख
उत्तुरची वेस, कोलार

{ श. १५८७ पौष व. १०
{ इ. १६६६ जाने. २०

शके १५८८ विश्वावसुसंवत्सर पौष व. १० या पुण्यकाळीं श्रीमत् कौशिक गोत्र भोसलानिल शिवाजी (शहाजी ?) राजाचे पुत्र संभाजी राजे यांची कुलश्री जैताबाई इनें मावूजीपंतास उत्तूर (होतूर) गाव अग्रहार दिला.

मै. व. ६ पृ. ७४ले. ९ }
फ. १०७५ श. }

(११०९)
फा. मु.

{ श. १५८७ माघ व. १
{ इ. १६६६ फेब्रु. १०

धनाजी धारराऊ राजे-वेदमू० गणेश दीक्षित समशृंग.
आपण अगर आपले वंसीचे लोकांस तुम्ही तीर्थगुरु.

इं. फॅ. १२ }
पृ २०२-३६. }

(१११०)

} श. १५८७ माघ व. ९
} इ. १६६६ फेब्रु. १७

सर जॉर्ज ऑक्सिंडेन, सुरत—इंग्लिश कान्सल, आलेपो.

आदिलशहानें मोंगलांशी तह करून खंडणीची रकम पाठविली असें मार्गे लिहिलें होतें. परंतु खंडणी अमान्य करून मोंगलांनीं आपलें सैन्य विजापुरावर पाठविलें. विजापुरापासून १२ मैलांवर दक्षिणी सैन्याची मोंगली सैन्याशीं गांठ पडून मोंगलांचें १४००० सैन्य व उच्च दर्जाचे अमलदार गारद झाले आणि मोंगली सैन्याला मार्गे हटावें लागलें. शिवाजीनें विश्वासघात करून सरळ मार्गानें नेऊन मोंगली सैन्य आदिलशाहाचे तोंडीं दिलें आणि त्यामुळे असें झालें; या सबबीवर मोंगलांच्या सेनापतीनें, शिवाजीचे डोक्यावर या अपयशाचें खापर फोडून, त्याला गिरफदार केल्याची बातमी आहे.

मै. व. ६ पृ. ७४ ले. १० }
सु. १०६६ सावान २५ }

(११११)
फा. सी.

{ श. १५८७ माघ व. १२
{ इ. १६६६ फेब्रु. २१

रा. हिंदूरावराजे कल्याणकर तळकोकण
ती. स्व. वेद रा. गणेश वलद विठल दीक्षित

तुम्ही आमचे व आमचे वंसीचे तीर्थगुरु प्रतिवरसीं ससस्तीचे ७ सते करीत जाणें; १४ रु. प्रतिवरसी देत जाऊ.

भांडार. कॉमे व्हॉ. }
सरकार-पृ. ३०१ }

(१११२)
जयसिंग — औरंगजेब.

{ श. १५८७ माघ ?
{ इ. १६६६ फेब्रु.(?)

आतां आदिलशाह व कुतुबशाह आमच्या विरुद्ध एक झाले आहेत; तेव्हां कसेंहि करून शिवाजीचें मन आपल्याकडे वळवून घेतलें पाहिजे. बादशहाची भेट घेण्याकरितां म्हणून त्याला उत्तरेकडे पाठवून देणें जरूर आहे ! [हाफ्त अंजु. ९४ अ; सर. पृ १३८]

र. फॅ. १२ } (११११३) { श. १५८७ फाल्गुन शु. ११
पु. १६९ इ. } कंपनी—सुरत. { इ. १६६६ मार्च ७

## शिवाजी आणि कंपनी यांचे सहानुभूतीचे संबंध:—

शिवाजीनें अनेक ठाणी घेऊन लढाईचाहि त्याचा क्रम चालू आहे, इत्यादि गोष्टी आम्हांला समजल्या. (परंतु) वाईट बेतानें त्याचेपाशीं कित्येक ठिकाणीं रयतेच्यावर होऊन त्याबद्दल हि तो व्यवस्था करील हें लक्षांत घेऊन त्याच्याशीं सामोपचाराचे संबंध ठेवावे; म्हणजे संधि येतांच आपल्याला फायदा करून घेतां येईल. आज त्याच्या आरमाराचा प्रतिकार करण्याइतकी आम्हांला मदत पाठवितां येत नाहीं; तरी परिस्थिति लक्षांत घेऊन त्याच्या कडून आपल्याला अधिक तोशीस न पोचेल अशा बेतानेंच आपलें वर्तन ठेवावें.

सं. १५ ले. ११५ } (१११४) { श. १५८७ फाल्गुन व. २
सु. १०६६ रम १५ } मिसली. सी. { इ. १६६६ मार्च १२

?—ता मोक॰ मौ॰ इदमिहे तपे कन्हाड

जोगींदर गोसावी यांस इदमिहे येथें ३० बिघे इनाम आहे तें चालविणें.

सं. १५ ले. ११६, ११७ } (१११५) { श. १५८७ फाल्गुन व. २
सु. १०६६ रम. १५ } मिसली सी. { इ. १६६६ मार्च १२

?——मोक॰ मौ॰ गोवे व नींब पर. वाई

जोगींदरनाथ गोसावी यांस मौ. गोवे येथील नीम चावर जमीन पूर्वीप्रमाणें चालू ठेवणें.

शि. प्र. पु. १०९ } (१११६) { श. १५८७ फाल्गुन व. १२
सु. १०६६ रम २६ } जाबिता { इ. १६६६ मार्च २२

हुदे. व मोक. व सेटिये यांच्या सहीचा सरकार कामाच्या जमाखर्चाचा जाबता.

खं. १८ ले. १२ } (१११७) { श. १५८७ फाल्गुन
सु. १०६६ फ. १०७५ } कतबा { इ. १६६६ मार्च

?—मोक. व समस्त रया मौ. मोजिरी साहेबाचे बंदगीस साहेबी साल मजकुराची जमाबंदी फर्मावि़ली. तरी साल गुद्रा पर॰ मज॰ नामजादी चा साहेब सुभा आले. ते वख्ती रयतीवरी वही होउनु लुटिली, गांव जाळिला यावरी गाव खराब होऊनु प्रजा पोट भरावयासी देसावरी गेलिया. यावरी गनिमाचा तह होउनु भेटला. तव मौजे मज॰ जागीरदारी आपला तपवास घेउनु खंडिला. ५०० रु. कौल देउनु गावावरि आणिले. आपण जुजवी कीर्दी केली. सालगुदस्त रु० १०० जमाबंदी. गाव लुटिला, जाळिला,

खराब पडिला. यात्री कौल देउनु गावाप्ती आणिले आहेती. ८०० रु. सालउगवणी करणें.

सि. प्र. पृ. १०८ }
शु. १०६६ }
(११११८)
{ श. १५८७
{ इ. १६६५-६६

देश० इवाल० सव० देस० चौगु० माहाज० व मोक० कस० वालवे संमट बिन लक्षुमण भट.

तुम्हास सिदेस्वर देवाचा इनाम पाव चावर होता. मेलगिरीपंडिताच्या सालगुदस्ताच्या इनामतीस्तव तो भेरीस पडला. तरी तुम्हास कोपर्डी करीत असलेला पाव चावर दिला आहे.

स. पृ. ११९ ले. १० }
श. }
(११११९)
उल्लेख
{ श. १५८७
{ इ. १६६५-६६

वेदमूर्ती भैरवनाथ व गोकुळनाथ बिन बालकराम तिवारी, गंगापुत्र वास्तव्य क्षेत्र श्री वाराणसी, यांच्या वडिलांस तीर्थपुरोहितपण महाराज राजश्री थोरले कैलासवासी स्वामी यांणीं शके १५८७ विश्वावसुनाम संवत्सरी लेहून दिल्हे आहे. तें पत्र मनास आणून हल्ली महाराजांनीं भोगवटियास पत्र करून दिल्हे पाहिजे म्हणून विनंती केली. यावरून पहिलें पत्र सदरहू संवत्सरीचे होतें तें मनास आणून, त्याप्रमाणें हल्ली तीर्थपुरोहितपण दिल्हें असे. स्वामींचे वंशीचे जे कोण्ही येतील, क्षेत्रीं राहतील, ते तुम्हांस तीर्थपुरोहितपण देतील. तुम्ही आपले पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें तीर्थपुरोहितपण अनुभवून सुखरूप राहणें. येविशीं त्यांचे नांवें पत्र १.

जयसिंग पत्रें १२९ बी }
मॉ. रि. मा. २ पृ. ४ }
(११२०)
जयसिंग—औरंगजेब.
{ श. १५८७
{ इ. १६६५ ?

आतां पश्चिम किनाऱ्याकडे सर्व काळजी दूर झाल्यामुळें शिवाजीचें दुर्लक्ष झालें आहे. जर गुजराथेंतील गलबतांनीं या वेळेस तिकडे स्वारी केली तर चांगली लूट मिळेल.

ई. फॅ. १२ }
पृ. १९२ इ. }
(११२१)
दख्खनचें राजकारण
{ श. १५८८ चैत्र शु. २
{ इ. १६६६ मार्च २७

सर विल्यम थॉमसन—लॉर्ड आर्लिंग्टन.

शेजारच्या राजसत्तांची—डचांविरुद्ध लढाईच्या प्रसंगीं—मदत मिळविण्याची आशा करण्यांत अर्थ नाहीं. मोंगली बादशहाच्या प्रजेला समुद्रावर डचांची फार दहशत वाटत असल्यामुळें त्यांची मदत होणें अशक्य वाटतें. कोणत्याहि तऱ्हेनें पोर्तुगीज युद्धांत सामील

झाले तरी त्यांचें नुकसानच होत जाणार. त्यांवून त्यांचें सामर्थ्य अस्त असल्यामुळें त्यांनाहि सोडून दिलें पाहिजे. आम्ही शिवाजीशीं स्नेह केला तर मोंगल बादशाह आनि मदुतकरून विजापूरकर या उभयतांचा आपल्याशीं बेबनाव होण्याचा संभव आहे. ऐसेंदरींत ह्यांनीं प्रबळ सैन्य पाठविण्याम पाहेरून कोणाष्याहि मदतीनें मुंबईची यसाहत बांचविता येईल असें वाटत नाहीं.

श. पृ. २६ ले. २३ व २४ | मु. १०६६ सफाल ७ | हि. १०७० (१०७६ ?)　　(११२२) फर्मान　　श. १५८८ चैत्र शु. ९ | इ. १६६६ एप्रील ३

बादशाह विजापूर—देशमु. देशपां. मोक. रयत प. मान मा. महमदपूर

सयद इखलाय ( इखलास ? ) पर्जाशान यांनीं विनंती केली कीं, रताजी बलद नरसिंगराव माने. देशमुख व सरदेशमुख यांणी राजा जयसिंग यांचें युद्धांत शौबादारम्य पराक्रम केला. तरी म्हणून स्वामींनीं ४ गांव त्यास इनाम यावे. तरी माने यांस चार गांव दिले आहेत. परवा. नुस्खाशान

खं. ८ ले. १६ व प्रभात- | दिल्ली ले. १० हि. १०७६ | जुल्म ९ सवाल १०　　(११२३) औरंगजेब—शिवाजी　　श. १५८८ चैत्र शु. १२ | इ. १६६६ एप्रील ६

तुमचें पत्र मिर्जा राजे जैसिंग यांणीं ठरविल्याप्रमाणें हकदील प्रांतीं रवाना जालें तें पावून बहुत संतोष जाला. ऐशियास इकडील लोभ तुम्हांवर पूर्ण आहे म्हणोन अदकार न करितां खातरजमेनें मजल दर मजल निघोन यावें. म्हणजे भेटीअंतीं बहुत सत्कार पावून माघारे जाण्याविषयींचा निरोप दिल्हा जाईल. सांप्रत तुम्हां करितां पोशाख पाठविला आहे तो घ्यावा.

स. ले. ४० पृ. १५२ | सु. १०६६ सवाल ११　　(११२४) सनद　　श. १५८८ चैत्र शु. १३ | इ. १६६६ एप्रील ७

शिवाजीराजे भोसले—गोवर्धन भट व मकरंदभट मथुरावासी. तुम्हास मथुरा-तर्थिचे तीर्थगुरुपण लिहून दिधले होते त्यावेळेस आठनव वर्षे जालीं. तुम्ही आले नाहीत. मग आणीक एक ब्राह्मण राजाराम चोमा हा मथुरावासी आला. त्यास आम्ही तीर्थ-गुरुपण लिहून दिल्हें, म्हणऊन तुम्ही पहिला कागद तुम्हापाशीं होता तो घेऊन आलेत. मग राजश्री भट गोसावी बैसोन तह केला कीं, जे अलीकडे लिहिले तें रद्द, पहिलें लिहिलें तें खरें, ऐसा तह दिधला. त्यास जरी कांहीं मथुरातीर्थीचें तीर्थ-गुरुपण आमच्या वडिलांनीं आणीक कोणास, तुम्हास आम्ही कागद लिहून दिधला आहे त्याचे आर्धी;

लिहून दिधलें असेल तरी तोच तीर्थगुरु. तुम्हासी निसबती नाहीं. जरी तुमच्या कागदाच्या आधीं आमच्या वडिलाचा लिहा अगर आमचा लिहा आणिकापाशीं नसेल तरी तुम्हीच आमचे तीर्थगुरु. राजाराम चोमा याणें न कळत आम्हांपासून कागद लिहून घेतला आहे तो रद्द असे.

इं. फॅ. १२
पृ. १५२ इ. (११२५) श. १५८८ चैत्र व. १०
इ. १६६६ एप्रील १८

प्रेसि. ऑक्झिंडेन, सुरत-कॉन्सल, आलिपो.

पूर्वी कळविलें त्याशिवाय **दुसरें एकादें युद्ध** मोगल सैन्य व आदिलशहा यांच्यामध्यें **झालेलें** माझ्या ऐकिवांत **नाहीं**. बाकी, एकसारखें झटून काम करणें सैन्यांतील लोकांना आवडतच नाहीं. त्यांच्या पूर्वापार पद्धतीप्रमाणें ते आजहि वागत आहेत: **दूर दूर राहून युद्धाची मुदत ते लांबवीत राहतात.** कारण, जर कां युद्धाचा एकदां सोक्ष मोक्ष झाला तर विजापूर स्वाधीन होऊन मग आपल्याला कोणी विचारणार नाहीं अशी त्यांची भावना आहे.

इं. फॅ. १२
पृ. २०४-२०६ इ. (११२६) श. १५८८ चैत्र व. ३०
**'दख्खनमधील बातमी'** इ. १६६६ एप्रि. २४

कारवार–सुरत

[पृ. २०३-२०४] फोंड्याच्या वेढ्यामुळें गोव्यामध्यें अन्नाची महर्गता झाली आहे.

[पृ. २०४-२०६] शिवाजीला फिरून कैद केल्याचें मागचे पत्रीं लिहिलें; तें आतां खोटें ठरलें आहे. विजापूर शहर दहा दिवसांत मोंगलांना घेऊन देण्याचें **दिलेरखाना**-पाशीं कबूल करून वीस हजार स्वारांनिशीं तो अघाडीवर चालून गेला असतां, त्याचा एकुलता एक मुलगा (?) **सर्जाखानाच्या** हातानें मारला जाऊन त्याला मार्गे ह्यावें लागलें. यामुळें **दिलेरखान** आपला शिरच्छेद करील या भीतीनें तो मोंगल व विजापुरकरांचें युद्ध चालू असतांना पळून गेला असें आतां समजलें आहे. आपण लिहिलें तें युद्ध हेंच होय असें आम्हांला वाटतें. मोंगलांचे फक्त ३०० लोक मारले गेले.

**शिवाजी** पन्हाळ्याकडे पळून गेला आणि त्यानें वाटेंतलि पुष्कळ **आदिलशाही** शहरें जाळलीं *'आदिलशहा स्वतः येणार आहे तरी दरवाजे उघडे ठेवा'* असा रात्रीं निरोप पाठवून युक्तीनें पन्हाळा किल्ला ताब्यांत घेण्याचा डाव फसल्यामुळें **शिवाजीनें** दुसऱ्या दिवशीं हल्ला केला. परंतु त्यांतहि ५०० लोक मृत्युमुखीं पडून अपयश आल्यामुळें राजापुरापासून ५ गांव किंवा ३० मैल लांब असलेल्या **खेळण्याकडे तो गेला.** तेथें **नेताजीचें आणि त्याचें भांडण झालें** असें म्हणतात. हें भांडण खरोखरच होतें कीं त्यांत आणखी कांहीं गोम आहे हें सांगतां येत नाहीं. परंतु एवढें खरें कीं **नेताजी**

तेथून निघाला तो विजापुरदरबाराकडे जाऊन तेथील शहाला खुष करून त्याचेकडून त्यानें दरसाल तीन लक्ष होनांची नेमणूक व मोंगलांच्या सरहद्दीवरील कांहीं मुलूख मिळविला; आणि त्याच्या संरक्षणाकरितां म्हणून तो आदिलशहाच्या हुकमावरून तिकडे गेला आहे. हा मुलूख ताब्यांत आल्याबरोबर त्यानें आपली राजनिष्ठा व्यक्त करण्याकरितां राजा जयसिंगाकडे पत्र लिहून मुलखाच्या रक्षणार्थ म्हणून कांहीं लोकांची मागणी केली. राजा जयसिंगानें लोक पाठविले. परंतु त्यांना नेताजीला पकडून आणण्याचा हुकूम दिला. त्याप्रमाणें त्यांनीं नेताजीला पकडून मोंगली छावणींत आणिलें. तेथें त्याचा शिरच्छेद झाला असें फ्रियेकजण बोलतात. परंतु तो अद्यापि पक्क्या कैदेत म्हणजे हयात आहे; असेंहि फ्रियेकाचें म्हणणें आहे. नेताजी सोडून गेल्यावर शिवाजीनें फोंडा किल्ल्याला वेढा देण्याकरितां २००० लोक पाठविले. दोन महिने वेढा चालून आणि शिवाजीचे ५०० लोक दगावल्यानंतर, आंतील लोकांनीं आपल्या वस्तू घेऊन जाण्याला परवानगी देण्याच्या अटीवर किल्ला शिवाजीच्या स्वाधीन केला. शिवाजी मोंगलांकडून पळून निघाला हें ऐकून आदिलशहानें त्याच्यावर सिद्दी मसाउद (सिद्दी जोहारचा जावई), सिद्दी जोहरचा मुलगा आणि रुस्तुमजमा अशा तिघांना पाठविलें. त्यांच्याबरोबर ५००० स्वार आणि १००० पायदळ होतें. शिवाजी यावेळीं आपल्या देशांत डोंगरावर (बालाघाट) होता. सिद्दी मसाउदला हें कळतांच रुस्तुमजमाला बरोबर घेऊन साधल्यास अचानक हल्ला करण्याकरितां तो निघाला. रुस्तुमजमाची या गोष्टीला मनापासून संमति नव्हतीच; म्हणून जवळ येतांच त्यानें आपले नगारे व तुताऱ्या वाजवून लांबूनच शिवाजीला सावध केलें. तरी देखील सिद्दी मसाउदनें निवडक ६०० स्वारांनिशीं शिवाजीचा इतक्या शिताफीनें पाठलाग केला की त्यांत शिवाजीचे ५०० स्वार व १०० शिपाई पडले. पाठलागाहून परत येतांना वाटेंत शिवाजीचीं पत्रें रुस्तुमजमाकडे नेणारा जासूद मसाउदनें पकडून आदिलशहाकडे रवाना करून दिला. त्यावर 'मिर्झाच्या रदबदलीमुळें एकवार माफी होत आहे. पण पुढें संभाळून रहा. आतां तूं फोंड्याचा वेढा उठविला पाहिजे. नाहींतर तुला कामावरून दूर केलें जाईल' असा सुलतानाचा रुस्तुमजमाला खलिता आला. या पत्रानें मिऊन जाऊन रुस्तुमजमानें फोंड्याचा वेढा उठविण्याचे प्रयत्नांची कमाल करण्याबद्दल महमदखानाला सांगून पाठविलें. महमदखानानें लगेच किल्ल्यापासून दोनतीन मैलांवरील रुस्तुमजमाच्या एका गांवीं मुकाम करून आपण फक्त आपल्या मुलुखाची व्यवस्था पहाण्याकरितां आलों आहें असें शिवाजीच्या (वेढा घालणाऱ्या) सेनापतीला कळविलें. शिवाजी व रुस्तुमजमा यांचा स्नेह असल्याचें त्याला माहीत असल्यामुळें महमदखानाबद्दल कोणताहि संशय न येऊन, दुसऱ्या दिवशीं सणानिमित्त खुदबा पढण्याकरितां म्हणून तो एक मैलावर असलेल्या टेकडीवर आपले सर्व मुसलमान लोक घेऊन गेला असतां, ही संधी साधून महमदखानानें ठिकाणावर राहिलेल्या लोकांवर त्वरेनें हल्ला करून प्रार्थनावाले लोक मदतीला येण्यापूर्वीच प्रथम त्यांचा व नंतर प्रार्थनेहून परत

येणाऱ्या लोकांचा असा निरनिराळ्या वेळीं पराजय केला आणि वेढा उठविला. पूर्वी लिहिल्याप्रमाणें हाच दिवस किंवा शिवाजीच्या स्वाधीन करण्याचा असा ठरलेला होता. वेढ्यांत सांपडलेल्या गरीब लोकांना गेले ३ दिवस पाला खाऊनच आपली उदरपूर्ति करावी लागली होती. महमदखानाला अशी युक्ति लढवून देखील प्रथम दोन तीन वेळ तरी हार खावी लागली. ह्या गोष्टीमुळें रुस्तुमजमा आणि शिवाजी यांचा दीर्घकालीन स्नेह पार विघडला असेंच सर्वत्र समजत आहे. आतां रुस्तुमजमानें शिवाजीपासून फोंडा, कुडाळ, बांदा, संकले (?) आणि डिचोली हीं पांच ठाणीं घेतलीं. तो 'आज येईल' अशी प्रत्येकाची अपेक्षा आहे. पण तो अजून घाटाखालीं उतरला नाहीं. आदिलशहानें राजापुरापर्यंतचा मुलूख त्याच्या हवालीं केला असें म्हणतात. तें खरें असलें तर तो लवकरच मोठा मनुष्य होईल. सिद्दी मसाउद कोल्हापूरच्या आजूबाजूच्या मुलुखाचा बंदोबस्त करीत आहे. वीस दिवसांखालीं सर्जाखानानें मोंगल छावणीच्या एका भागावर हल्ला केला असतां आपल्या मुलाला पडलेला शत्रूचा वेढा उठवून त्याचा जीव वांचविण्याच्या खटपटींत स्वतः तोच मारला गेला. मोंगलांना तोंड देणारा एवढाच खंदा वीर होता. तो गेल्यामुळें आदिलशहाचें भयंकर नुकसान झालें यांत शंका नाहीं. औरंगजेबाकडे मोठे नजराणे घेऊन शिवाजी गेला आहे असें ऐकतों तें कितपत खरें आहे कोण जाणें ? फोंड्याचा वेढा चालू असतांना आमच्यापासून ३० मैलांवर सैन्यांच्या हालचाली चालू असल्यामुळें आम्हांला फार भय वाटत होतें.

| | | |
|---|---|---|
| सं. २० ले. ११९<br>पृ. ३००, ३०१ शु. ९<br>फ. १०७६ जिल्हेज १ | (११२७)<br>सरकारी नोकर व जमीदार | श. १५८८ ज्येष्ठ शु. ३<br>इ. १६६६ मे २६ |

धरमगदास दिवाण सरकार तळकोकण

मुत्सद्दी, सरदेशमु. देसपां. महाज. वगैरे कसबे कल्याण मामले मुरंजन सरकार तळकोकण निजामुन्मुलकी सुभे औरंगाबाद.

त्रिंबक नरस प्रभु औरंगाबादेस जाऊन खिलाफ मालुमात करून वजारतपन्हा धाजी सफीखान यांची सनद धरमंगदास दिवान यास घेऊन आला. त्यास, धरमंगदास दिवान यांनी त्रिंबक नरस प्रभु यास सनद दिल्ही. त्यांत पटवारी अगर कुळकर्णी ऐसें नाहीं. कदम चालत आलें आहे तेन्हेंप्रमाणें चालवणें, त्यास नविसिंदगिरी व हुदेदारी सरकारांतून सुधारा घेऊन दिवानतर्फेनें चाकरी करावी, ऐसें होतें. तें [दिवाईतील श. १५५३ मधील] पंचाइतांच्या मतें तहकीक जालें कीं त्रिंबक नरस प्रभु नविसिंदे व हुदेदार सरकारतर्फेचा नौकर होता. कुळकर्णीसी तालुक नाहीं; दिवाणतर्फेचा

चाकर. अजी सबब त्यास ताकीद की दामदीरम सरकारचा तफावत न करणें. जमीदार असता, तर ऐसी सनद हासील न होती. ऐसा पंचाइताचे मतें निवाडा जाला.

इं. फॅ. १२ पु. १६१ इ. | (११२८) सुरत–कारवार. | श. १५८८ ज्येष्ठ व. २ इ. १६६६ जून ८

या बाजूला इतकीच बातमी आली आहे कीं, शिवाजी बादशहापुढें गेल्यावेळीं त्याचें वर्तन बादशहाला पसत न पडल्यामुळें शिवाजीला कठोरपणानें वागविण्यांत आलें. इतर उमरावांप्रमाणें, मुत्सद्याप्रमाणें हात बांधून दूर अंतरावर आदबीनें ( उभें ) राहण्याचा अपमान सहन न होऊन त्याचा संताप झाला. असें ऐकल्यावरोवर बादशहानें बढती करण्याचीं वचनें देऊन त्याच्या समाधानाकरितां माणसें पाठविलीं. त्याला काबूलकडे पाठविल्याची बातमी आहे. परंतु त्या प्रांताचा कारभार करण्याचा उमरावी अधिकार त्याला दिला आहे की प्रसंग पडेल त्याप्रमाणें दूर करण्याचा बादशहाचा इरादा आहे; हें समजण्यास, आम्हीं दरबारापासून बरेच दूर असल्यामुळें, आम्हांला मार्ग नाहीं.

भांडार. कॉमे. व्हॉ. सरकार–पृ. ३०२ | (११२९) | श. १५८८ ज्येष्ठ–आषा. इ. १६६६ जून–जुलै(?)

मिर्झा राजा जयसिंग याचा गुमास्ता—

" शिवाजी भेटीला आला त्यावेळीं दरबारी शिष्टाचाराचें उल्लंघन केल्यामुळें थोडे दिवसपर्यंत बादशहानें त्याला दरबारला येण्याची बंदी केली होती. परंतु नंतर त्याचा सन्मान करून व कृपा दाखवून त्याला परत पाठवावा असा औरंगजेबाचा बेत होता. " [ हाप्त अंजुमान पृ. २३८ अ., सरकार–पृ. १४७–४८ ]

भांडार. कॉमे. व्हॉ. सरकार–पृ. ३०२ | (११३०) जयसिंग—रामसिंह | श. १५८८ ज्येष्ठ–श्रावण इ. १६६६ जून–ऑगष्ट (?)

'प्रथम, शिवाजीबद्दल जामिनकी व जबाबदारी तुझ्याकडून बादशहानें काढून घेतली होती असें कळलें. त्यावरून, ' तुझा त्यांत कांहीं संबंध नव्हता ' असें जें मीं पत्र पूर्वीं पाठविलें होतें त्याचा उपयोग झाला; आणि तुझ्यावरील जबाबदारी संपली; असें मी समजत होतों. परंतु आतांच बादशाही पत्र मिळालें त्यावरून शिवाजीला तुझ्याच ताब्यांत देण्याचा इरादा दिसतो! आजपर्यंत वाट पाहिली तशीच आणखी थोडी पहा. इतक्यांत माझे अर्जाचें उत्तर येईल आणि त्याचे अनुरोधानें शिवाजीबद्दल काय विनवावयाचें तें ठरवितां येईल. मीं असा अर्ज केला आहे कीं " एकतर मला दख्खनच्या सैन्याचा संपूर्ण अधिकार सोंपवून द्या आणि भरपूर कुमक पाठवा; किंवा तसें जमत नसेल तर दरबारकडे परत तरी बोलवा. ". तुला आग्रयाचा फौजदार नेमून पुनः

शिवाजीला तुझ्याच ताब्यांत ठेवण्याचा बादशहाचा विचार आहे असें तूं लिहितोस; त्यावर आपल्याला बादशाही दौरा सोडून कधींच रहावें लागलें नसल्यामुळें यावेळींहि बरोबर घ्यावें असें बादशहाला म्हणावें.

जर बादशहा स्वारीवर निघत असतील, तर शिवाजीला आमच्यालाच ठेवणें सोईचें पडेल. त्याची समजूत करून त्याला असें आश्वासन दिलें पाहिजे कीं, दरबार दख्खनमध्यें पोंचतांच त्याला तिकडे बोलाविण्यांत येईल. तूं मात्र, नित्याचें धोरण म्हणून बादशहाबरोबरच राहणें इष्ट आहे. नाहींतर तुझे अनुयायी निराश होऊन त्यांची निष्ठा पक्की राहणार नाहीं. [ हाफ्त अंजुमान १६७ अ. ]

भांडार-कॉमे. व्हॉ.
सरकार-पृ. ३०२

**(११३१)**

जयसिंग–भोजराज कछवा

श. १५८८ ज्येष्ठ-श्रावण
इ. १६६६ जून–ऑगष्ट ?

**शिवाजी** आग्र्यास आहे त्या बाबतींत ( कुमार रामसिंहाला असें कळवा कीं ) बादशाही सत्तेला कोणत्याहि प्रकारचा अपाय न होतां माझ्या व तुझ्या शब्दाची किंमत राहील असें वर्तन ठेवावें. [ हाफ्त अंजुमान, पृ. २३* अ; सरकार पृ. १४८ ]

भांडार. कॉमे. व्हॉ.
सरकार–पृ. ३०३

**( ११३२ )**

जयसिंग—औरंगजेब.

श. १५८८ ज्येष्ठ–श्रावण
इ. १६६६ जून–ऑगष्ट.

" पूर्वी शिवाजीला परत जाऊं द्यावें असें मी विनविलें होतें. तेव्हां दख्खनमधील परिस्थिति थोडी निराळी होती. आतां ( मोंगलांची परिस्थिति ) थोडी बिकट झाली असल्यामुळें शिवाजीला इकडे सोडणें शहाणपणाचें होणार नाहीं. परंतु तेथें ठेवण्यांत सावधगिरी राखिली पाहिजे. नाहींतर त्याचें जीवित व स्वातंत्र्य धोक्यांत आहे अशी कल्पना झाली म्हणजे त्याचे (दक्षिणेंतील) अमलदार निराशेनें आदिलशहाला मिळतील, आणि मग सर्वत्र अंदाधुंदी माजून बखेडा मात्र होईल." [ हाफ्त अंजुमान–१६४ अ. ]

" शिवाजीवर मला खुद्द बादशहांनीं पाठविलें......अगदीं थोड्या वेळांत मला यश प्राप्त झालें. आणि नंतर **हजारों युक्त्या करून** त्याला आणि त्याच्या मुलाला दोघांनाहि मीं बादशहासमोर पाठवून दिलें. बादशहांना या गोष्टी माहीत आहेत. असें असून दरबारी लोक आतां म्हणतात ' शिवाजी हा असा होता, हें तुला माहीत असतांना त्याला कशाला दरबारला पाठविलें ? '.........असें ऐकतो. जेव्हां मीं त्याला पन्हाळ्यावर पाठविलें तेव्हांहि 'जयसिंगानें त्याला आपल्या काबूंतून पळून जाण्यास संधी दिली' अशीहि लोकांनीं टीका केली. आणि आतां त्याला ( ताब्यांत आणून देण्याकरितां ) बादशाही मुलखांतील पाठविलें तरीहि ' कशाला पाठविलें ? '

-म्हणून म्हणणें आहेच. या प्रकारांनीं एवढेंच झालें कीं, अर्धवट राहिलेलें विजापूरचें प्रकरण मात्र अधिक घोटाळ्यांत पडलें आहे." [ हाप्त अंजु. १५४-१५५ अ. ]

| | | |
|---|---|---|
| सा. ले. १६२<br>सु. १०६७ सफर १४ | (११३३)<br>मिसेली फा. सी० | श. १५८८ श्रावण व. २<br>इ. १६६६ आगस्ट ६ |

रा० शंकराजी रत्नाकर हवाल० कार० पर० सुपे-रायाजी रत्नाकर हुदे० व मोक० व खोत कसबे सुपेः- १३ मोहरमचें खुर्देखत महादाजी गोसाव्याचे इनाम चालविण्याबद्दल आलें आहे. तरी गणो तिमाजीनें गोसावी यास दिलेलें इनाम चालविणें.

| | | |
|---|---|---|
| आंडार. कॉमे. व्हॉ.<br>सरकार. पृ. ३०४ | (११३४)<br>जयसिंग- | श. १५८८ श्रावण<br>इ. १६६६ आगस्ट |

शिवाजीला दरबारीं पाठविण्याकरितां केलेल्या युक्त्याप्रयुक्त्या व्यर्थ होऊन माझे देवीं सरतर आपत्ति आली आहे... माझ्या शत्रूंनीं चिथावून दिल्यामुळें, शिवाजीच्या पदरचे ब्राह्मणांनीं, शिवाजीचे सुटकेची सर्व जबाबदारी रामसिंगावर घातली. रामसिंगाचे सांगण्यावरून, आणि रामसिंगाच्या पहाऱ्यांतील ढिलाईमुळें शिवाजीला जातां आलें; अशी त्यांनीं समजूत करून दिल्यामुळें रामसिंगाची मनमब व जहागीर काढून घेण्याचें घाटत आहे. माझ्या मनांत असे बेमानीचे विचार आले असतील तर मला मरण येवो ! मीं शिवाजीला जेरीस आणिलें; त्या माझे शब्दांवर विश्वास न ठेवतां शिवाजीचे ब्राह्मण जास्त खरें कां मानावे !

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ. १२<br>पृ. २०६-२०७ इ. | (११३५) | श. १५८८ माद्र. व. २<br>इ. १६६६ सप्टें. ५ |

गिफर्ड ॲंड चॅंबरलेन, हुबळी—सुरत

रुस्तुमजमाला शिवाजी विरुद्ध सेनापत्य मिळाल्यानंतर त्याच्या नेहमींच्या वहिवाटीप्रमाणेंच शिवाजीशीं संधान ठेवून आणि आपण शत्रूविरुद्ध शक्य ती खटपट करीत आहों, असें आदिलशहाला भासवून, कुडाळच्या हद्दीवरील रांगणा या नांवाचा मजबूत किल्ला अंतरस्थपणें त्यानें रावजी पंडिताचे हवालीं केला. ह्यामुळें आदिलशहानें चिडून जाऊन सर्व इस्तकांसह त्याची कत्तल करण्याचा हुकूम दिला. परंतु मित्रांच्या मध्यस्थीमुळें विजापुरास जातीनें जाऊन खुलासा करण्याची संधि त्याला देण्यांत आली आहे. आतां विलक्षण दैवानें त्याला हात न दिला तर तो यांतून सुटणें कठीण आहे.

फौंड्याखालीं रुस्तुमजमाचे २००० सैन्याचे तनख्याची तजवीज करण्यासाठीं साधेल त्या उपायानें पैसा उभारूनहि जेव्हां सागेना तेव्हां रुस्तुमजमाला आमचें स्मरण होऊन त्यानें आपल्या मुलाला सुचविल्यामुळें त्या मुलानें आमचेकडे हजार होनांची

मागणी थोडीशी अधिकाराचे शब्दांत केली. नकार दिल्यास होणाऱ्या जबरदस्तीचा आणि दरबारचे इतराजीमुळें रुस्तुमजमाच्या वाढत्या अविश्वसनीयतेचा विचार करून आम्हीं २३ तारखेला कारवार सोडून ६ दिवसांत **हुबळी** गांठली. येथील देसाई येथेंहि लूट करण्याची भीति दाखवीत आहे.

इं. फॅ. १२
पृ. १६१ इ. } सुरत-कंपनी (आफ्रिकन बोटीनें गेलेलें पत्र) (११३६) { श. १५८८ आश्वीन शु. ८
इ. १६६६ सप्टें. २५

शिवाजी, अखेरीला त्याच्यासारख्याच मोठीं वचनें देऊन घात करणाऱ्या बादशहाच्या कचाटींत सांपडला! खुद **शिवाजीकरितां ६००० घोड्यांची** मनसब, आणि **मुलाकरितां ३०००** घोड्यांची मनसब अशीं बढतीचीं मोठीं वचनें आपल्या सेनापतीचे मार्फत देऊन, आणि वरती गत अपराधांची क्षमा करून कृपा करण्याबद्दल लेखी पत्रें पाठवून, बादशहानें वारवार आमंत्रण केल्यामुळें भाळून गेलेला **शिवाजी** स्वतःला सुरक्षित समजून बादशहाला कुर्निसात करून राजनिष्ठा व्यक्त करण्याकरितां म्हणून गेला. परतु दरबारांत गेल्यावर आपल्यापेक्षां कमी दर्जाचे उमरावांचे खालीं उभें केल्यामुळें, बादशहाची पर्वा न करितां तो निधड्या छातीचा वीर संतापून तिरस्कारानें दरबाराचा त्याग करून निघून गेला. बादशहानें त्याच्या समाधानाकरितां अनेक सरदार पाठविले; तरी देखील तो परत येईना, कीं दरबारची निर्भर्त्सना करण्याचें थांबेना. 'आपण युद्धांत जिंकलेले कैदी नाहीं! तह होऊन भेटीस आलों आहों' असें तो म्हणाला; व बादशहापुढें येण्यास पुनः कधींच तयार झाला नाहीं. बादशहानें नंतर **शिवाजीनें** बरोबर आणलेल्या सर्व लोकांस रजा देऊन, त्याला फक्त हालचालीची मोकळीक ठेवून त्याच्या घरावर आपल्या लोकांचा इतका कडक पहारा ठेविला कीं बहुतेकांच्या मतानें त्याला स्वदेशाकडे परत जाण्यास किंवा येथून सुटका करून घेण्यास सवड दिली जाणार नाहीं. 'शिवाजीपासून आपली आतां मुकता झाली' असेंच सर्वजण समजत होते.

[पृ. १६५] सेंट जॉर्ज बोटीनें गेलेलें पत्रः— **शिवाजीवर** इतका कडक पहारा ठेवूनहि अखेरीला तो आणि त्याचा मुलगा असे दोघे **दोन पेटाऱ्यांत बसून** (conveighed in two baskets) निसटून गेले (got away) अशी खात्रीलायक बातमी नुकतीच आली आहे. त्याचा कोठेंच तपास लागत नाहीं. या बाजूच्या प्रांतांत (शिवाजीच्या सुटकेमुळें) सर्वत्र भीति आणि संशय यांचें साम्राज्य पसरलें आहे.

ओरि. कॅरे. मा. २९
नं. ३११० इ. } (११३७) सुरत–कारवार { श. १५८८ आश्वीन व. १०
इ. १६६६ आक्टो. १७

जमिनीवर किंवा समुद्रावरहि तुम्हांआम्हांला आतां जपून राहिलें पाहिजे. कारण मोंगलाच्या दरबारांतून **शिवाजी सुटून आला** हें नक्की आहे. त्याची युक्ति यशस्वी

झाली. आतां तो स्वदेशीं पोंचल्याची बातमी आली आहे. दरबारामध्ये त्याच्या अपेक्षेप्रमाणें स्वागत न झाल्यामुळें संतापून जाऊन भयंकर सूड उगविण्याची त्यानें प्रतिज्ञा केली आहे. ४५ हजार स्वारांनिशीं तो सुरतेनजीक आल्याची बातमी आल्यामुळें सर्वत्र अनिश्चितता आणि अंदाधुंदीचें साम्राज्य झालें. आतां ही बातमी कदाचित् खोटी ठरली तथापि शिवाजी मोकळा असे तोंपर्यंत व्यापारी वगैरे लोकांना स्वतःच्या बायका-मुलांच्या रक्षणाच्या काळजीपुढें व्यापाराकडे लक्ष देणें फावणार नाहीं ! तुमचेकडेहि हीच परिस्थिती होईल !

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ. १२<br>पृ. २५१ इ. | (११३८)<br>रजपूत = हिंदुशिपाई | श. १५८८ कार्तिक शु. १०<br>इ. १६६६ आक्टो. २७ |

फॉक्सक्रॉफ्ट—सुरत

विंटरनें स्वसंरक्षणाकरितां पोर्तुगीज आणि रजपूतहि ठेविले होते.

['रजपूत किंवा शिपाई' असा स्पष्ट पर्याय इंचिसननें आपल्या वृत्तांतात दिला आहे. अशाच अर्थानें हा शब्द इं. फॅ. भा. १० पृ. १०५ व भा. ११ पृ. ३६ व ३८५ यांवर वापरला आहे. पहा– इं. फॅ. १२ पृ. २५१ टीप.]

| | | |
|---|---|---|
| भांडार. कॉमे. व्हॉ.<br>सरकार. पृ. ३०५ | (११३९)<br>जयसिंग– | श. १५८८ कार्तिक व. ४<br>इ. १६६६ नोव्हें. ५ |

माझा काल फिरला आहे आणि माझी काळजी सतत वाढत आहे. हे खोटे विजापूरकर उगाच कालहरण करीत बसले आहेत. पळपुट्या शिवाजीचीहि कांहीं खबर लागत नाहीं....अनेक वेषांतर केलेले विश्वासू हेर शिवाजीची खबर घेण्याकरितांच पाठविले आहेत. [हफ्त अंजु. २०० अ].

| | | |
|---|---|---|
| सं. ७ पृ. ७१ ज्ञु. ९<br>हि. १०७७ जवल २८ | (११४०) | श. १५८८ कार्तिक व. ३०<br>इ. १६६६ नोव्हें. १६ |

औरंगजेब बादशहा———सयाजी परसोजी भोसले.

पूर्वीपासून नांदनज हा गाव तुम्हास इनाम आहे. आतां अलमगीरपूर नांवाचा नवा गांव पर. करोडी सर. अहमदनगर सुभे औरंगाबाद हा तुम्हीं वसविला तो तुम्हास इनाम दिला.

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ. १२<br>पृ. १७५–७६ | (११४१)<br>(अनामी लेखक) सुरत–इंग्लंड. | श. १५८८ कार्ति. मार्ग.<br>इ. १६६६ नोव्हें. |

दहा महिन्यांपूर्वी आपलें जीवित सुरक्षित राखण्याच्या अटीवर शिवाजी राजा जयसिंगाच्या हवालीं झाला. पण बादशहापुढें जातांच बादशहानें त्याचा घात करण्याचें

ठाविल्याबरोबर राजा जयसिंगानें शिवाजी मेला तर बादशहाच्या समक्ष आपण स्वतःचा प्राणघात करूं; असें शपथेवर सांगितल्यामुळें बादशहानें त्याचा जीव न घेतां जयसिंगाच्या मुलाच्या (रामसिंग) ताब्यांत त्याला कैदी म्हणून दिलें. शिवाजीला बादशहापुढें नम्र होण्यास भाग पाडणें अशक्य असल्यामुळें रामसिंग व त्याचा बाप यांनीं त्याला मित्रत्वानें वागविण्याचें वचन देऊन औरंगजेबाकडे पाठविलें होतें. परंतु जेव्हां बादशाह आपला स्वतःचा शब्द मोडून त्यांच्या वचनाला हरताळ फांसूं लागला तेव्हां या त्याच्या नीचपणामुळें मुलगा आणि बाप (किंवा बापाच्या सहाय्यानें मुलगा) शिवाजीला पळून जाण्याची संधि देण्यास तयार झाले. बादशहाच्या कानावर ही गोष्ट आल्यावर रामसिंग (६००० चा मनसबदार) ला कामावरून दूर करून व त्याच्या बापाला पुष्कळ सैन्य देऊन शिवाजीला परत घेऊन येण्याकरितां पाठविलें. इतक्यांत इराणच्या शहानें बादशहाच्या मुलखांत स्वारी केल्यामुळें बादशहानें जयसिंगाला परत बोलाविलें. सुरतेला अशी विश्वसनीय खबर कळली कीं, त्यानें येण्याचें नाकारलें. जयसिंगाचें सैन्य बहुतांशीं हिंदूंचें बनलेलें असल्यामुळें जयसिंगाच्या शत्रुत्वापासून औरंगजेबाला फारच भय आहे. शिवाजी सुरतेवर येण्याची हूल व पळापळ ..पण जर तो यदाकदाचित् आला तर मक्केहून गलबतें परत येण्याच्या वेळेवर (लुटीची चांगली संधि असते म्हणून.) येईल...विजापुरचा आदिलशहा आणि गोवळकोंडेकर असे उभयतां औरंगजेबाच्या पिछाडीवर हल्ला करणार आहेत अशीहि बातमी आहे.

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ. १२<br>पृ. १७१-७२ इ. | (११४२)<br>सुरत—कंपनी | श. १५८८ मार्ग. शु. ९<br>इ. १६६६ नोव्हें २८ |

शिवाजीच्या सुटकेबद्दल खात्रीलायक बातमी आल्यामुळें आतां बादशाही मुलुखावर आणि प्रजेवर भयंकर सूड घेतला जाईल अशी लोक अटकळ करीत आहेत. सुरतेवर शिवाजी येणार अशी हूल उठल्यामुळें सर्वत्र पळापळ सुरू झाली. तो केव्हांहि येवो, येथें एकहि कोणी शहरांत रहाणार नाहीं. त्याचेशीं सलोख्यानें वागण्यास तुम्ही सुचवितां; पण दरोडेखोरापाशीं कसला स्नेह राखावयाचा? चार पावलें दूर रहाणें हेंच चांगलें.

| | | |
|---|---|---|
| औ. कॉ. भाग २९<br>नं. ३२०३ इ. | (११४३)<br>सुरत, रँडॉल्फ टेलर-जॉन स्टॅन्यन | श. १५८८ मार्ग शु. ९<br>इ. १६६६ नोव्हें. २८ |

शिवाजी मोंगली दरबारांतून सुटून स्वदेशांत आला आहे अशी बातमी आल्यामुळें सर्व दख्खनभर भीतीचा संचार झाला आहे. शिवाजी अजून बराच दूर आहे तोंच त्याच्या नांवानें कित्येक ठिकाणी दरोडे पडण्यास सुरुवात झाला आहे

हि. रे. क. ९ पृ. ११४ इ. १५ डिसें. न्यू. | (११४४) | श. १५८८ मार्ग. व. ४ इ. १६६६ डिसें. ५

जयसिंगाचा वकील-गोव्याचा गव्हर्नरः-औरंगजेबाविरुद्ध बंड करणाऱ्या लोकांना पोर्तुगीजांनी आश्रय देऊं नये. (या कलमाचा रोख शिवाजी विरुद्ध असावा. कारण तो आमयाहून सुटल्याची वार्ता आली होती.)

मोडार. कॉमे. व्हॉ. सरकार-पृ. ३०५-३०६ | (११४५) | श. १५८८ मार्ग-पौष- इ. १६६६ डिसें.

उदयराज ( जयसिंगाचा गुमास्ता )—

" शिवाजी ( राजगडला ) परत आला आहे; परंतु मुलगा बरोबर आला नाहीं म्हणून तो फार काळजींत आहे. **बादशाही सत्तेला शरण जाण्याबद्दल तो उघड बोलत** आहे. परंतु त्याचे मनांत काय आहे हें कोण जाणणार ? शिवाजीचा जावई फल्टणकर बजाजींचा मुलगा **महादजी निंबाळकर** पुण्याच्या आसपास धुमाकूळ घालीत असतो. माझा धनी ( जयसिंग ) यानेंहि त्या बाजूला बंदोबस्ताकरितां त्या प्रांताचे जहागिरदार वगैरे नेमिले आहेत. ते असेः— बाबाजी भोसले वगैरे लोक सुपें येथें; हुलालखान इंदापूरचे बाजूला; घलीत्रखान चांभारगोंद्याकडे; हुसनखान, अबदुल रसूल आणखी कांहीं दक्षिणींहि इतरत्र ठेविले आहेत. त्रिंबकजी भोंसले वगैरे लोक रोसिनकडेहि पाठविले आहेत. सर्वांच्या आधीं बाबाजी भोंसले आपल्या जहागिरींत पोंचून त्यानें महादजीवर हल्ला करून त्याचे पुष्कळ लोक मारले; व त्याचा झेंडा, तोडा, १५० घोडे, बाण इत्यादि पकडून तो परत आला. तोडा व झेंडा परक्याच्या हातीं राहूं देऊं नये अशी समजूत असल्यामुळें महादजी शरण आला. परंतु बाबाजीनें त्या वस्तू दिल्या नाहींत. पुढें चार दिवसांनीं त्याला विजापुरकरांची मदत मिळाली व त्यानें बाबाजीवर अचानक छापा घातला. बाबाजी या हल्ल्यांत पडला. दत्ताजी देशमूख पंढरपुरानजीक पडला. महादजीलाहि जखमा झाल्या.........जयसिंग त्याच बाजूला ह्या अपयशाचें परिमार्जन करण्याकरितां जाणार होता. परंतु आपण तिकडे गुंतलों तर विजापूरकर मध्येंच उचल खातील या भीतीस्तव तो बेत त्यानें रद्द केला व तिकडच्या बाजूला ५००० लोकांनिशीं अबदुल हमीदला रवाना केलें. [ हाप्त अंक० २११ ब. ]

खं. २० ले. १२० मु. १०६७ जखर ३० | (११४६) फा. मु. मज. सी. | श. १५८८ पौष. शु. २ इ. १६६६ डिसें. १७

अजदिवाण पर० वाई-ता मोक० देहाय प० वाई

अऊमट बिन नारायणभट सेकि. वाई पांच पसरणी, पळसी, तळिये, मुन्हे, बोर-

खल या गांवांतून ५ होन तुटपटी सादिलवार येणें आहे. सु. १०६६ सफर १४ ची मिसेली आहे; तरी देत जाणें.

ई. फॅ. १२. } (११४७) { श. १५८८ पौष व० १२
पृ. १७७ इ. } कॉन्सल लेनॉय, आलेपो-सर जॉन फिंच. { इ. १६६७ जाने. १२

विजापूरची वडेसाहेबीण मरकत्च्या यात्रेहून परत येतांना बसऱ्याला आली. तेथें तिच्याकडून ९ इ. तोमा किंवा ३० हजार पौंड घेण्यांत आले...... औरंगजेब दिल्ली राजधानी सोडून, दख्खनच्या लढाईकरितां उभारलेल्या सैन्याकडे नाण्यासाठीं निघाला.

डच रेकॉर्डस्. मा. २८ } (११४८) { श. १५८८ माघ शु. १
नं. ७३४ इ. जाने. २५ न्यू. } डच ग. ज.– डच कंपनी { इ. १६६७ जाने. १५

वेंगुर्ला– सुप्रसिद्ध शिवाजी गेल्या मेमध्यें पुष्कळ नजराणे घेऊन आग्र्यास गेला होता. परंतु तेथें त्याचें चांगलें स्वागत झालें नाहीं. अगदीं अलीकडील खबर अशी आहे कीं, त्यानें नवीन सैन्याची उभारणी करून बऱ्हाणपुराजवळ झालेल्या युद्धांत बादशाही सैन्याचा पराजय केला!

सं. १६ ले. २२ } (११४९) { श. १५८८ माघ शु. १०
श. व सु. १०६७ साबान ९ } महजर { इ. १६६७ जाने. २४

जिजाबाईच्या उपस्थितींतः– बाबाजी झुंझारराव देशमुख कानदखोरे व भाऊ मलोजी पतंगराव यांमध्यें वृत्तीचा कथळा होता. मागें गोतानें वृत्ती वाटून दिली होती. यासिवाय नवीन वाटा २५० टके मलोजी यास बाबाजीकडून देवविला.

डच. रेकॉर्डस्. मा. २८ } (११५०) { श. १५८८ फाल्गुन व. ११
नं. ७३७ इ. मार्च २० न्यू. } वेंगुर्ला,—डच कंपनी. { इ. १६६७ मार्च १०

देशांतील परिस्थितीबद्दल सुलतानालाहि अज्ञानांत ठेविलें जातें. नवा सेनापती आतां शिवाजीवर पाठविला आहे. तथापि तो, प्रजेला लुटून पूर्ण नागविल्यावर, फार तर शिवाजीला कांहींसा मागें हटवून पुनः परत जाईल; आणि पूर्ववत् सर्व चालून गरिबांचे कष्ट कांहीं चुकणार नाहींत.

का. इ. सा. ले. १३ }　　(११५१)　　{ श. १५८८
पृ. १०६७ }　　उल्लेख　　{ इ. १६६६

कुडाळ विलायेती शिवाजी राजे यांनीं घेतलेवरी विलायेतीचे गांव मिळून झुमा कुडाळ केला. एकंदर गाव २०१.

मॉडर्न. कॉमे. व्हॉ. }　　(११५२)　　{ श. १५८८
सरकार. पृ. २०६-७ }　　जयसिंग—जाफरखान　　{ इ. १६६६

"विजापूर, गोवळकोंडा आणि शिवाजी या सर्वांच्या विरुद्ध माझें सर्व सामर्थ्य एकवटून मीं प्रयत्न केला आहे व करीतहि राहीन. शिवाजीनें कसें तरी मला एकदां भेटावयास यावें अशा तजविजींत मी आहें. म्हणजे येतां जातांना केव्हां तरी संधी साधून माझे हुजार लोक त्याचा नाश करितील ! हा बादशहाचा बंदा लोकांच्या निंदास्तुतिकडे न पाहतां बादशाही कार्य फत्ते करण्याकरितां कांहींहि करण्यास तयार आहे. बादशहांनीं संमति दिली तर त्याच्या कुळाशीं शरीरसंबंध जोडण्याचें म्हणजे माझ्या मुलाला त्याची मुलगी करण्याचें मोलणें लावण्यास मी तयार आहें. त्याचें घराणें आणि जातकुळी माझ्या-पेक्षां इतकी हीन आहे कीं, आम्ही त्याचा स्पर्श झालेलें अन्नहि खाणार नाहीं; मग लग्न-संबंधाची गोष्ट कशाला ! त्याची मुलगी पकडून आणली गेली तरी मीं तिला आपल्या जनानखान्यांतहि ठेवणार नाहीं ! पण तो हीन कुळांतला असल्यानुळें हें आमिष गिळून हुकाला अडकेल ! हा बेत फार गुप्त राखला पाहिजे. उत्तर त्वरित पाठवावें." [हास्त अंक. पृ. १३९ अ]

राम. अ ६५ ले. १२ }　　(११५३)　　{ श. १५८८
? }　　{ इ. १६६६

चलजी संबाजी मोसले—महादभट सेडगे कसबे येदूर
तीर्थपुरोहितपण व अभिषेक याबद्दल वर्षासन १७ होन दिले.

स. पृ.१४० }　　(११५४)　　{ श. १५८८
? }　　उल्लेख　　{ इ. १६६६

जे वख्ती मिर्जा राजे जैसिंग येहि शिवाजी राजे मोसले यासी सलाह करून तर्फ कर्याती मावळ देह २६ त्याचे तसरूफ टाकले ते वख्ती खिरिरितयामध्यें देह ३६ दरोबस्त शिवाजी मरडूम याच्या नांवें लिहिले.

इं. फॅ. १२ }　　(११५५)　　{ श. १५८९ चैत्र शु. ११
पृ. २६६ इ. }　　सुरत-कंपनी.　　{ इ. १६६७ मार्च २६

औरंगजेबाचा हिंदूंवर जुलूम : वनिये लोकांनीं शेकडा ५ टक्के जकात सोरेदीच्या प्रांतांत देऊन तेथून सुरतेला दाखला आणून दाखवावा असा बादशहानें नियम

केला आहे. कित्येक वेळां तेथील अधिकारी तो दाखला न मानतां पुनः जकात भरण्यास लावितात. शिवाय त्यांना दस्तुरीचा म्हणून पुष्कळच पैसा भरावा लागून त्यांच्या मालाची किंमत भरमसाट वाढते ! आम्हांला ( इंग्रजांना ) सर्व मार्गांतील दस्तुऱ्या माफ असून बंदरांतून माल हालवितांना फक्त शेकडा ३ एकंदर जकात द्यावी लागते.

इं. फॅ. १२ }
पृ. २६८-९ इ. }
(११५६)
सुरत—कंपनी
{ श. १५८९ चैत्र शु. ११
{ इ. १६६७ मार्च २६

शिवाजी पूर्ण सुटून स्वदेशांत येऊन विजापूरच्या राज्यांत जाळपोळ आणि लुटालूट करूं लागल्यामुळें आणि सुरतेला पुनः एकदां येण्याचा त्याचा निश्चय जाहीर असल्यामुळें येथील लोकांना त्याचें भय उत्पन्न होऊन ते सर्वजण देशावर पळून जाण्याची तयारी करीत आहेत. जमीन आणि समुद्र अशा दोन्ही बाजूंनीं तो हल्ला करणार असून ५०।६० गलबतें त्याकरितां त्यानें सज्ज केलीं आहेत.

शि. प्र. (९) सेन }
इ. एप्रील २९ न्यू. }
(११५७)
गोवा व्हाईसरॉय-मिर्झाराजा जयसिंग
{ श. १५८९ वैशाख शु. ६
{ इ. १६६७ एप्रील १९

'मराठ्यांच्या विरुद्ध मोंगलांशीं गोव्याचें आरमार सहकार्य करील. मात्र युद्धाचा खर्च मोंगलांनीं करावा'. [बिकर ४-पृ. १३१-१३२; पृ. १३४ वर याच मजकुराचें औरंगजेबाचे नांवचें इ. १६६८ मे ८ चें पत्र आहे.]

लं. रॉ. ए. फारसी. }
रिया. पृ. ३३५ }
(११५८)
शिवाजी—औरंगजेब
{ श. १५८९ वैशाख शु. ९
{ इ. १६६७ एप्रील २२

हा बंदा गुलाम आपली नोकरी करून हुकूम पाळण्यांत मोठें भूषण मानीत आहे. हिंदुस्थानच्या बादशहाची मोठी फौज मजवर चालून येत आहे. या फौजेशीं टक्कर देण्याचें सामर्थ्य पृथ्वीमध्यें कोणास तरी आहे काय ? म्हणून माझी अशी नम्र विनंती आहे कीं, माझा मुलगा संभाजी यास चार हजार स्वारांची मनसब बादशाही फौजेंत मिळावी. मनसब न मिळाली तरी ही फौज घेऊन नेहमीं तो बादशहाची नोकरी करीत राहणार. माझ्या ताब्यांत किल्ले होते ते सर्व मी बादशहाकडे सोंपून दिले आहेतच; आणि अद्यापि जे कांहीं किल्ले माझ्याकडे आहेत ते व माझी सर्व जिंदगी, आपल्या सेवेस अर्पण आहे. [हें पत्र वाचून बादशहानें दिवाणाजवळ दिलें.]

इं. फॅ. १२ पृ २७३-७४ }
जुलूस १० मोहर ११ }
(११५९)
फर्मान
{ श. १५८९ आषाढ शु. १४
{ इ. १६६७ जून २४

औरंगजेब-सुरतेचे सुभेदार आणि अमलदारः डचांच्या मालावरील जकातीचा

दर शें. ३½ वरुन शें. २ वर उतरविला आहे. इंग्रजांनीहि विनंति केल्यावरुन त्यांच्या मालावरील जकात शें. ३ होती ती २ केली; देशभर कोठेहि इंग्रजांपासून दस्तुरी घेऊं नये आणि दरोडेखोरांचें पारिपत्य करुन चोरीचा माल इंग्रज मालकांचे स्वाधीन करावा, असा ठराव केला.

पिसु. शि. पृ. १६ } (११६०) { श. १५८९ आषाढ व. १०
न्यू. जुलै १५ } गोवा व्हा.—शिवाजी राजे. { इ. १६६७ जुलै ५

रामोजी शेणवी कोठारी याजकडून असें कळलें होतें की "(आग्रा येथील कैदेच्या) संकटांतून सुटून आपण आपल्या राज्यांत सुखरूपपणें पोंचला असून मनोहरगड येथें रहात आहां." पोर्तुगालहून इकडे येतांच मी आपली माहिती मिळविली व मनोहरगड येथें आपण असतांनाच वकील पाठविण्याचें योजिलें होतें. परंतु रामोजीकडून समजलें कीं, त्या किल्ल्यावर जाण्याची वाट फार अडचणीची आहे; व आपण तेथून निघून रायगडावर जाऊन राहणार. यास्तव मनोहरगडावर असतां आपल्याकडे वकील पाठविला नाही. पण आपण रायगडावर आतां मुक्काम केला आहे, असें कळल्यावरुन हें अभिनंदनपर पत्र पाठवीत आहे.

गो. इ. सा. ले. २८ } (११६१) { श. १५८९ आषाढ व. १३
मु. १०६८ मोहर २५ } फर्मान { इ. १६६७ जुलै ८
हि. १०७८ }

विजापूरचा बादशहा—अजीजखान सरनोबत व सरहवालदार व पीरखान माणिकखान हवाल० व कार० मामेल गोवा:-अनंत बिन भट जोसी यांस सरजोतिषीबद्दल ७५ होनांची मिरास व दरमहा २ होन मुशाहिरा अंतरुज महालाच्या उत्पन्नापैकीं चालत आले आहेत. ते पूर्वीप्रमाणें चालविणें.

त्रै. व. २ पृ. १६० } (११६२) { श. १५८९ आषाढ व. १४
सु. १० मोहर २७ } फर्मान फा. मु. व सी. { इ. १६६७ जुलै १०

नुसरता, ताजविबी व फातबिबी मक्रेस आणार. सबब उंबरे येथील २५ बिघे जमीन व आंब्यांची झाडें अब्दुल गफूर वगैरेस दिलीं आहेत. [ त्रैमासिकांत मूळ फर्मान दिलें नसून फक्त सारांश दिला आहे ].

खं. १८ ले. १३ { (११६३) { श. १५८९
फ. १०७७ { कबुलायत { इ. १६६७

गुमास्ते सरदेशमुख व देशमुख व देशपांडे पर० पुणें सर. जुन्नर सुभे आंर० (दस्त).

पर० मज० च्या जमाबंदीच्या २९० गांवांपैकीं तग़ीफ राजश्री शिवाजी राजे वजा गावे० तर्फ पुणें २० व तर्फ मावळ ३६=५६ बाकी २३४ गांवांची जमाबंदी २२५८९॥०। रु.– राघो बल्लाळ गुमास्ते सरदेशमूख.

सा. ले. २४० } (११६४) { श. १५८९ श्रावण व. २
सु. १०६८ सफर १५ } खुर्दखत फा. मु० व सी० { इ. १६६७ जुलै २७

१—कार० व देसमु० पर० कऱ्हाड—

निलकंठ अमण अग्निहोत्री सो। कऱ्हाड यांस गावगना धर्मादाय जमीन व नख्त जें कांहीं चालत आहे तें देत जाणें. हाली पर० मज० अमानत हवाले साहेबासी जाहले आहे.

खं. १८ ले. १४ सु. १०६८ } (११६५) { श. १५८९ श्रावण व.
फ. १०७७ सफर } तुमार { इ. १६६७ आगष्ट

तुमार वासलाती अज ता। गुमास्ते प्रा पुणे

बा खेळोजी भोसले रु. ५२४॥॥=॥ (नरसिंगराऊ व विठोजी सितोळे; मोरो विश्वनाथ व बाबाजी राम देशपांडे पुणे यांच्या शेवटीं सह्या आहेत.)

सा. ले. ५१ } (११६६) { श. १५८९ भाद्र. व. ९
सु. १०६८ रवल २२ } कर्जे कतबा { इ. १६६७ सप्टें. २

गुणाजी अडवल व बापुजी निगडे मौ. अजनूज पर. सिरवल

माहादाजीपंत देसकु. पर. सिरवल.

तुम्हापासून ५१ होन कर्ज घेतले. मुदतीस पैके नेदी तरी कर्जांतर होनास रुके ॥० देऊ.

खं. २० ले. १२१ } (११६७) { श. १५८९ आश्विन शु. ८
सु. १०६८ रवर ६ } खुर्दखत फा. मु. व सी. { इ. १६६७ सप्टें. १५

अजर. सैद मखदूम सर्जाखान—— कार. व देशमू. पर. वाई.

नरसीहभट व एकनाथभट चित्राव यांस बोरखळ व किण्ही येथें १॥ चावर जमीन दुकामुद्रा इनाम चालत आहे० ती चालविणें.

खं. २० ले. १२२ } (११६८) { श. १५८९ आश्विन शु. ८
सु. १०६८ रवर ६ } खुर्दखत फा. मु. व सी. { इ. १६६७ सप्टें. १५

अजर. सैद मखदूम सर्जाखान—— कार. व देशमू. पर. वाई.

नरसीहभट चित्राव यास पसरणी येथें इनाम जमीन नीम चावर व वाई येथे नख्त १० होन हे दुकामुद्रा चालविणें.

सं. २० ले. २२३ } (११६९) { श. १५८९ आश्विन शु. ८
सु. १०६८ रबिर ६ } खुर्दखत फा. मु. व सी. { इ. १६६७ सप्टें. १५

अजर. सैद मखदुम सर्जाखान— कार. व देशमु. पर. वाई
गिरमाजी त्रिंबक यास वाई येथे १ चावर इनाम जमीन हकामुद्दा चालविणें.

डच रेकॉर्डस् भाग २८ } (११७०) { श. १५८९ आश्विन व. ३
नं. ७३५ इ. आक्टो. ५ न्यू. } डच ग. ज.-डच कंपनी { इ. १६६७ सप्टें. २५

वेंगुर्ला-देशांत यादवींचा धुमाकूळ अद्यापिहि चालू आहे. सुलतानाचे सेनापति मनापासून काम न करतां गुप्त रीतीनें शिवाजीलाच मदत देतात अशी लोकांची समजूत असून मधच्यामध्यें गरीब प्रजा मात्र उभयपक्षांकडून लुटून नागविली जात असते.

सं. २० ले. ५१ (६) } (११७१) { श. १५८९ आश्विन
सु. १०६८ फ. १०७७ रबिर. } उल्लेख { इ. १६६७ सप्टें. आक्टो.

महजर दर बाबे मोकदमी, मौ. माळशिरस, बो रामाजी व बापोजी यादव दर अमल अनसोजी घाटगे फौजदार व सिगमल मनसबदार.

सा. ले. ५२ } (११७२) { श. १५८९ कार्तिक व. ५
सु. १०६८ जवल १९ } फा. सी. { इ. १६६७ आक्टो. २७

कृष्णाजी भास्कर सुभेदार— बहिरजी वाघ हवाल० व. कार० रोहिडखोरे
नाइकजी जेधा यांनें टके ६० घेतले. द्यावयास मातल करीत आहे. तरी ताकीद करणें.

सं. २० ले. १७७ } (११७३) { श. १५८९ कार्तिक व. ६
सु. १०६८ जवल २० } खुर्दखत फा. मु. व सी. { इ. १६६७ आक्टो. २८

अजर० हैबतराऊ घ्यानतराव साहेब—हुदे० व मोक० कस० उंबरज.

बहिरोजी बिन अबाजी जाधव यांनीं लढाईमध्यें बहुत खस्त केला, अखेर ठार पडिला. म्हणून अबाजीस रांडरोटीबदल ३० बिघे जमीन इनाम दिली आहे. चालविणें.

इं. फॅ. १२ } (११७४) { श. १५८९ कार्तिक व. १०
पृ. २७५ इ. } आँजिअर, स्वाली–रँडाल्फ टेलर, सुरत. { इ. १६६७ नोव्हें. १

(शिवाजीच्या बंदरांतील गलबताला पास द्यावा किंवा नाहीं अशा प्रश्नाला उत्तर–) प्रेसिडेंटचीं पासाविषयीं गंभीरपणें चर्चा करून, आम्हीं असें ठरविलें कीं, पाच

दिल्याचुळें आम्ही दिलजमाई करण्याला अनुकूल आहोंत, असा भाव दिसण्याचा संभव आहे, हें ह्या वेळीं इष्ट नसल्यामुळे पास देऊं नये. परंतु दुसऱ्या कोणापेक्षां तुमचाच संबंध विशेष येत असल्यामुळें, पास देण्यापासून संभवणारे दुष्परिणाम आपण स्वीकारणार असाल, तर तो पास देण्यास तयार आहे. मात्र पास द्यावयाचा तो दर्या सारंगाला किंवा शिवाजीचा संबंध असलेल्या कोणालाहि न देतां सालीम नायकाच्या नांवानें दिला जाईल. प्रेसिडेंटची आणखी अशी सूचना आहे कीं, सालीम नायकाला मित्रत्वानें सांगून त्याच्याकडून शिवाजीनें किंवा रावजी पंडितानें आमचीं गलबतें येण्यापूर्वी आमच्याशीं सुविचाराचें, सामोपचाराचें आणि आमचें समाधान होईल अशा तऱ्हेचें बोलणें लावावें, असें त्यांना सांगावें. तुम्हीं त्यांना असें खात्रीलायक सांगावें कीं आतां तह बहुतेक पुरा झाला असूनहि जर योग्य वेळीं तडजोड करून आमचें समाधान केलें जाणार नाहीं तर शिवाजीकडून इंग्रजांना पोंचलेल्या नुकसानीबद्दल त्याच्या बंदरांवर आणि गलबतांवर सूड घेण्याच्या मार्गाला आतां प्रेसिडेंट लागेल. पास द्यावाच असें आपलें मत ठरल्यास मि. ग्रेकडून लिहवून घेऊन सहीकरितां त्वरेनें इकडे पाठवून द्यावा.

पिसु. शिवाजी पृ. २४ } (११७५) { श. १५८९ मार्ग. शु. ४
इ. १९ नोव्हें. न्यू. } पोर्तु० व्हाइस०-शिवाजीराजे { इ. १६६७ नोव्हें. ९

पाद्री गोसांलु मार्तीस या मार्फत आपण पाठविलेलें पत्र व तहाचीं कलमें मान्य करून पाठविलीं तीं पोंचलीं. पाद्री गोसांलु यास चांगल्या रीतीनें वागविल्याबद्दल व (गोव्यांतून नेलेले) कैदी बंधमुक्त केल्याबद्दल मला फार आनंद झाला.

पिसु. शिवाजी. पृ. १७ } (११७६) { श. १५८९ मार्ग. शु. ८
इ. नोव्हें. २३ न्यू. } पोर्तु० व्हाइस-शिवाजीराजे. { इ. १६६७ नोव्हें. १३

मी येथें आल्यापासून आशियाखंडांतील सर्व राजे लोकांशीं सलोख्याचे संबंध ठेवण्याचें ठरविलें आणि आपणाकडे तर सर्वांत प्रथम वकील पाठविला; असें आपले शिपाई आमच्या राज्यांत शिरल्या वेळीं आपणाकडून एक पत्र आलें. त्या खेरीज आपणाकडून पत्र आलें नाहीं.

पिसु. शिवाजी पृ. १८ } (११७७) { श. १५८९ मार्ग. शु. ९
इ. नोव्हें. २४ न्यू. } पोर्तु० व्हाइस-शिवाजीराजे. { इ. १६६७ नोव्हें. १४

रामोजी शेणवी कोठारी यास आपणाकडे पाठविला आहे. त्याजपाशीं आपलें म्हणणें कळवावें.

पिसु. शिवाजी पृ. १८ }
इ. २७ नोव्हें. न्यू. }
(११७८)
व्हॉइसराय-शिवाजीराजे.
{ श. १५८९ मार्ग. शु. १२
{ इ. १६६७ नोव्हें. १७

**रामोजी** शेणवी कोठारी यामार्फत पाठविलेलें पत्र पोचलें; त्यावरून आपली सलोख्याची इच्छा असल्याचें समजून आलें. तरी आपला वकील पाठवावा. रामोजी शेणवी यास आपणाकडे पुनः पाठविला आहे. त्याच्याशीं याविषयींचें बोलणें करावें.

खं. १६ ले. २३ }
सु. १०६८ जखर १२ }
हि. फं.१०७७ }
(११७९)
कौलनामा.
{ श. १५८९ मार्ग. शु. १४
{ इ. १६६७ नोव्हें. १९

?-बाबाजी झुंझारराऊ देशमु० तर्फ कानदखोरे

नफर मजकुरानें सांगितलें कीं, "आपण **शिवाजीच्या** दहशती करून पळून साहेबाशीं आलों आहे. तर गडाखालीं रहावया जागा दिधली पाहिजे." यावर गरीबी-वर नजर देऊन सोनमेटी राहावयास जागा दिधली असे.

शि. पृ.(११) सेन {
इ. डिसें.१ न्यू. {
(११८०)
गोवा व्हॉइसरॉय—संभाजी.
{ श. १५८९ मार्ग. व. १
{ इ. १६६७ नोव्हें. २१

आम्ही गोव्यास सुखरूपपणें येऊन पोचलों. [ शिष्टाचाराचें पत्र. ]

शि. प्र. (२) सेन. ३ }
इ. डिसें. १ न्यू. }
(११८१)
{ श. १५८९ मार्ग. व. १
{ इ. १६६७ नोव्हें. २१

गोवा व्हॉइसरॉय——**गिरमाजी पंडित**, डिचोलीचा सुभेदार.

**शिवाजीचा वकील पितांबर शेणवी** गोव्याला वारंवार येईल, त्याला बिनहरकत येऊं देण्याबद्दल परवाना.

खं. २० ले. १२४ }
सु. १०६८ जखर १७ }
(११८२)
खुर्दखत मु. व सी.
{ श. १५८९ मार्ग. व. ४
{ इ. १६६७ नोव्हें. २४

अजर. नरसोजी राजे घोरपडे हुदे. व मो. मौक. निगडी कि. सातारा.

जोगींद्रगिरी यास मौ. निगडी येथें १५ बिघे जमीन इनाम आहे ती चालविणें.

पिसु. शिवाजी पृ. १९ व २० }
इ. डिसें. ५ न्यू. }
(११८३)
पो. व्हा.-शिवाजीराजे
{ श. १५८९ मार्ग. व. ५
{ इ. १६६७ नोव्हें. २५

आपला **वकील रा. सकोपंत** याजमार्फत तहाचीं कलमें ठरविलीं त्यावर मीं सही केली आहे. या सकोपंताबरोबर रेव्ह. पाद्री गोसालु मार्तीस याश आपणाकडे पाठ-

विला आहे. रा. सकोपंतानीं आपली कामगिरी मोठ्या शहाणपणानें बजावली.... तद्नवर आपली सही घेऊन येण्यासाठीं आपणाकडे पाद्री गोमांलु हा वकील पाठविला आहे. त्यावरून माझी सलोख्याची इच्छा आपणास कळेल.

पिसुर्लें. शिवाजी. परिशिष्ट १ डिसें. ६ न्यू. } (११८४) शर्तनामा { श. १५८९ मार्ग. व. ६ इ. १६६७ नोव्हें. २६

शर्तनामा सलाह व दोस्ती राजे अजम **सिवाजी** राजे व कोंदी बिजुरई.

विजुरई (=व्हाइसराय) अजमी शर्तनामा पाठविला तेथे मजमून की, कितेक मरतबे राजे अजम **सिवाजी** राजे इजानेबाची यखतव जाहीर करून लिहिले होते जे आपण आपले लोकासहित बारदेशामधे पेसकस बाब जे देसाई तेथे होते म्हणोऊन व आपले नियत येसे होते जे गाहेज सलाह हमेशा चालावे म्हणोऊन. त्यावरि इजानेब खातिरेसी आणून येक-रार केले जे कदीम दोस्ती चालिले होते तेणेंच प्रकारी मागुत्यानें दृढ चालावे. याचे तपशील :

हाली राजे अजम **सिवाजी** राजे याही दोस्तीचे रवेशीने त्वरेनें आमच्या पादशाही मुलकातील बारदेशीचे रयत लोक खेलखाना मर्द व औरता न कमेबचे तेरीख १९ माहे नोवेंमु सक १६६७ ते रोजी आ राजे अजमाच्या लोकीं जे बंद धरोन नेली आहेत; त्या पासी एक रुका न घेता सोडून धावी व बारदेशाची गुरेढोरे जे काही अढळोन जमा जाहली असतील ते धावी म्हणोउन विरजई अजमी तपासिले लिहिले. तरी विजरई अजमाचे लिहिलेप्रमाणें जो बंद धरिला होता तो येक रुका न घेता सोडून पादरी गोशाल याचे हवाला केले असे.

लखम सावंत व केशव नायक देसाई इजानिबाच्या मुलकामधे राहिले आहेती. त्यासी येसे हुकूम फर्मास जे, इजानेबाच्या पातशाही मुलकामधे असता आ राजे अजमासी लढाई व गरगशा न करावे; आ राजे अजमाच्या मुलाकासी व रयत लोकासीं तसवीस व अजार नेदावे; म्हणोऊन येसेयासी ते इजानेबाचे हुकुमेसी खिलाफ करोन चालतील येसे इजानेबाची जाहीर होताचि अणी राजे अजम लिहितील तेच वख्ती त्यासी इजानेबाच्या मुलकातून बाहीर घालोन जैसे मार इजानेबाच्या मुलकामधनु अपुले विलायतीमधे वतनासी जावोन आ राजे अजमासी व राजे अजमाच्या रयत लोकांसी लढाई व गरगशा करतील येसे तहकीक खबर इज्यानेबास रोशन होतांचि मागुति फिरोन येऊन राहावयास ज्यानीबाच्या मुलकात जागा देणार नाहीं. नार सावंत व मल सेणवई इज्यानेबाच्या मुलकात + + असतील तरी त्यासी रा + + + हुकुम फर्माऊन देसायानी मजकूर जवपरयतेर आमच्या पादशाही मुलकात असतील तरी त्यांनीं जंजिरे गोवे यामधे रहावे. सारटी बारदेसा विलायतीमधे राहो देणार नाहीं म्हणोऊन विजाई अजमी लिहिले. तरी देसाई मजकुरास जंजिरे मजकुरी हालखुद ठेऊन आमच्या मुलकामधे रयतीस अगर हर-

येक बाबे येकजरियाची तसवीस दिघलियांने जंजिरे मजकुरीहून बाहेर घालावे. बालेघाटा होऊन स रे व सु त चे बैल जंजिरे गोव्यासी व विलायती सास्टी बारदेशची येतील-त्यासी आं राजे अजमाच्या लोकीं कैद व मना न करावें व तेणेच प्रकारी इजानेबाच्या पातशाही मुलकातील ये तर्फेचे बैल बालेघाटासी व आणिकी तरफेस जातील त्यास रवाजिमा रवेश चरहुबुम ध्यावे अगर माहोम इजरत पादशाः आदिलशाः व आं राजे अजम गरगशाचे सह असेल तरी सौदागरी अमलासी फर्क पडो नेदिता हमेशा चालिले आहे तैसेचि राह गुजरी करोन सौदागरी अमल बेकुसूर चालो घावा म्हणोउन विजरई अजमी लिहिले. तरी सदरहूप्रमाणे आपण आपले शिरस्तेप्रमाणे जकाती घेऊन चालऊन. माहेद दोस्ती मराइम व दृढ होऊन दरियामधे व खुष्कीमधे चालावी येसेयासी दरम्यानें गैरवाका अमल होऊन कुसूर पडेल तरी ते बाबे आ राजे अजम आपले तरफेने विजरई यांसी जाहिर करावे; तेणेचि प्रकारी विजरई यांही आपले तरफेने आं राजे अजमासी रोशन करावे; सरंजामीचे स्वाल जबाव मा हो न जाहालेया वेगले हरयेक तरफेने सल्याचे व दोस्तीचे बंद न तोडावे हे शर्तनामेवरी आं राजे अजमाचे व इज्यानिबाचे निशान व सिके असावे म्हणोऊन विरजई अजमी लिहिले. तरी सदरहू लिहिलेप्रमाणें इजानेबानी कबूल केले असे. राजे अजम **सिवाजी** राजे यांचे मुदा रयेत मसलहतीस कोंदी विरजई यांसी इतिफाक करोन घ्यावयाचे असले तरी ये बाबे येतबारी शख्स पाठऊन रदबदल करून जो माहोन लस्कर इतिफाक होऊन जे तरफेसी बरें दिसोन येईल व फाइदा ज्यानी होत असेल त्याचे सरंजाम देखावे. निविस्ते गोवा तारीख फिरंग ६ माहे डिजेंबु सन येक हजार साहासे सतशष्टि म्हणोऊन विजरई अजमी लिहिले. सदरहू लिहिलेप्रमाणे इज्यानबानीं कबूल केले आसे. बतेरीख २५ माहे जमादिलाखर सूर सन समान सितैन अलफ*
(मर्यादे. षट. पाठीमागें प्रतिप. मुद्रा.)

खं. २० ले. २३८ सु. १०६८ } (११८५) { श. १५८९ मार्ग. व. ६
फ १०७७ जखर १९ } { इ. १६६७ नोव्हें. २६

अज माहाल खालिसा शरीफ—सेखदार व कार. व देस. व देसपां. पर. पुणें.

माहादाजी गोसावी यांचें इनाम त्याजकडे चालविणें. हाली पर. मज. पातशाही **खालिसा** जालें आहे. (मुद्रा—मिर्झा राजा, बंदा, अवरंगजेब अलमगीर.)

---

*हा तहनामा पोर्तुगीजांनीं इ. १६६७ दिसें. ६ रोजीं मान्य केला; ही तारीख न्यू स्टाइलची असल्यामुळें तिचें ओल्ड स्टाइलमधलें रूप नोव्हें. २६ हें मथळ्यांत दिलें आहे. पोर्तुगीजांनीं मान्यतेची तारीख घातल्यानंतर मराठ्यांनीं आपल्या मान्यतेची तारीख २५ जमादिलाखर (म्हणजे मार्ग. व १२=२ दिसेंबर) अशी मांडली आहे.

इं. फॅ. १२ } (११८६) { श. १५८९ मार्ग. व. १०
पृ. २८६ इ. } गोव्याहून पाठविलेलें पत्र { इ. १६६७ नोव्हें. ३०

गोव्याच्या व्हाइसरॉयनें रोमन कॅथोलिक धर्म वगळून इतर धर्मांच्या माणसांना हद्दपारीचा हुकूम काढल्यामुळें अत्यंत क्रुद्ध होऊन **शिवाजीनें** गोव्यानजीक **बारदेश**-च्या सरहद्दीवर स्वारी केली. व तेथील चार पाद्री लोकांनीं स्वधर्मीयांव्यतिरिक्त इतरांचा प्राणनाश करण्याचा आज्ञा दिला होता, (हें लक्षांत ठेवून) त्यांनीं स्वतः शिवाजीचा **मराठा (हिंदू) धर्म स्वीकारण्याचें नाकारल्यामुळें** [that refused to turne Moretto's (Marathas) of his owne persuasion] शिवाजीनें त्यांचा शिरच्छेद केला. ह्यामुळें घाबरून जाऊन व्हाइसरॉयानें आपला क्रूर आणि कडक हुकूम परत घेतला ! शिवाजीनें आसपासच्या सर्व मुलुखात जाळपोळ करून १५० लक्ष होनांची लूट नेली.

इं. फॅ. १२ } (११८७) { श. १५८९ पौष शु. ६
पृ. २८६ इ. } वसईचें पत्र { इ. १६६७ डिसें. १०

औरंगजेबानें **मुसलमानांना** जकातींची पूर्ण **माफी** दिली असून **हिंदूंवर पूर्ववत्** ठेविल्या आहेत. ख्रिस्त्यांनीं अर्ध्या भरावयाच्या आहेत. ह्या त्रासामुळें मुंबईची वस्ती खास अधिक वाढेल. [मुसलमानांना माफी इ. १६६७ मे ९ रोजीं मिळाली—सर. औरं. भाग ३ पृ. ३१३; इ. डॉ. पृ. २९३]

खं. १५ ले. ११८ } (११८८) { श. १५८९ पौष व. ६
सु. १०६८ रजब २० } मिसेली शु. व सी. { इ. १६६७ डिसें. २६

अज दिवाण ठाणे पर. कऱ्हाड–ता। मोक. मौ. इडामिडे

कमलनयन गोसावी याचे मौ. मज. पाउण चावर जमीन इनाम आहे. तीपैकीं उचापती न करणें.

खं. १५ ले. २७७ } (११८९) { श. १५८९ माघ शु. १
सु. } नकल { इ. १६६८ जाने. ४

मोक. पाटील. व कुळ. मौ. पसूर–मोक. पाटील व कुळ. वेलवंडी ता। वेलवंडखोरे.

तई आवा होर देशमु. यास जीवमान पावेतो मौ. जतपड येथील जमीन च्यार पैसे मानजीबाबा देशपांडे व गांवकु. यांनीं आपले इनामापैकीं दिली. परंतु सई आवास तुमचे सांभाळी केले आहे. तेव्हां जमीन तुम्ही करणें. [ सु. १०६९ आपाजी सुभेदार यांनीं महाराजांचे आज्ञेवरून राजगड येथें पंचाइत करून वरील जमीन देशपांड्यास परत द्यावयाची असें ठरविलें.]

कोर्टमिनिट्स ई. १६६८-७० } (११९०) {श. १५८९ माघ शु. ५
पृ. ५ इ. } डचांचे नकाशे {इ. १६६८ जाने. ८

पकडलेल्या मालाच्या कमिशनरनें विकावयास काढलेले **डचांचे हिंदुस्तान विषयक नकाशे** कंपनीच्या उपयोगाचे आहेत किंवा कसे याची चौकशी करून ते केवढ्याला विकत मिळूं शकतील याचा तपास करावा.

खं. २० ले. २१७ } (११९१) {श. १५८९ माघ व. १
सु. १०६८ साबान १५ } उल्लेख {इ. १६६८ जाने. २०

आराधे, ताडे व थिटे यांमध्यें पंढरपूरचे जोतिष, व कुळकर्ण यांबद्दल भांडण लागलें असतां निकाल झाला कीं उक्त वृत्ती आराधे यांच्या आहेत.

पंढरीपंत तबीब मोकाशी पंढरपूर, **"क्षेत्रास अफजलखानाची तसवीस लागली"** वगैरे उल्लेख आहेत.

इं. फॅ. १२ } (११९२) {श. १५८९ माघ व. ३
पृ. २८१ इ. } सुरत-कंपनी {इ. १६६८ जाने. २२

**दख्खनची** स्थिति कष्टमय असून, **शिवाजी** सुटून स्वदेशीं परत आल्यामुळें शांततेची सर्व आशा नष्ट झाली आहे. शिवाजी आपला उपयोग इतक्या चतुराईनें चालवितो कीं बादशहाच्या संतापाची त्याच्यापुढें कांहीं मात्रा न चालतां शेवटीं अपमानानें **शिवाजीशीं त्याला नमतें घ्यावें लागलें!** आतां शिवाजीच्या साहाय्यानें विजापुरचा मुलूख पादाक्रांत करण्याच्या आशेनें बादशहा त्या राज्यावर त्वरेनें सैन्य पाठवील असें म्हणतात. ह्या आणि इतर दुहीमुळें दख्खनमधील व्यापार बसला आहे.

[ पृ. २८३ ] थोड्याच दिवसांपूर्वी शिवाजीनें **पोर्तुगीजांना** थोडा हात दाखविला. अनेक घोडेस्वारांचा अमलदार असलेल्या, थोड्या मोठ्या अशा गोव्याजवळील प्रांतांतील एका जमीदाराबरोबर शिवाजीचें कांहीं भांडण निघून शिवाजीशीं टिकाव धरतां न आल्यामुळें, तो जमीनदार बारदेश प्रांतांत असावाजवळ पोर्तुगीजांच्या आश्रयार्थ गेला.

व्हाइसरॉयकडे अनेक वेळां तक्रार करूनहि जेव्हां तिकडे लक्ष दिलें गेलें नाहीं, तेव्हां शिवाजीनें त्या जमीनदारावर हल्ला करून त्याला जर्जर केल्यामुळें तो आणखी मागें हटला. पुढें शिवाजीनें त्याचा पाठलाग करीत बारदेशांत प्रवेश केला, त्यांतील बराच भाग जाळला, व लूट करून गोव्याच्या व्हाइसरॉयला आणि त्याचे आरमाराला न जुमा-

नतां त्यानें १३०० कैदी आपल्याबरोबर नेले. याचा निकाल कसा लागेल तें अजून समजलें नाहीं. परंतु हें भांडण लवकर मिटलें नाहीं तर समुद्रावर आणि जमिनीवर दोनहि ठिकाणीं शिवाजीपुढें **पोर्तु० चा टिकाव लागणार नाहीं.**

[पृ. २८४] या **बादशहाचें धर्मवेड** एकसारखें वाढत असल्यामुळें देशांत सर्वत्र अशांतता माजली आहे. विशेषतः बनिये लोक, हिंदू लोक आणि सामान्यतः मुसलमानेतर धर्माचे लोक यांचेवर इतका **कठोरपणें जुलूम** होतो कीं त्यामुळें आपसांतील संबंधांत मोठा अडथळा उपस्थित झाला आहे. एकाद्या हिंदूनें घेतलेलें कर्ज बुडवावयाचा सोपा मार्ग म्हणजे सावकार हिंदूनें, महमद व मुसलमानी धर्म यांना शिव्या दिल्याची खोटीच तक्रार काजीकडे करण्याची धमकी द्यावी म्हणजे झालें. कारण अशी तक्रार येतांच, दोनचार खोटे साक्षी घेऊन, लगेच त्याची सुंता करून मुसलमान करण्याची शिक्षा भोगावी लागे. या भीतीनें सावकार बिचारा गप्प बसे. आपला कैवार घेतला जातो अशा खात्रीमुळें मुसलमानांचें सिकार इतकें बेसुमार वाढलें आहे कीं ते बेलाशक बनियांच्या घरांत शिरतात आणि आपल्याला काय पाहिजे तें मिळाल्याशिवाय बाहेर पडत नाहींत. राज्याचा इतर सर्व कारभार सोडून बादशहानें हिंदुना बाटविण्याचा आणि **देवळें पाडून मशिदी बांधण्याचा** धोसा लाविला आहे. टॉमस रोच नांवाच्या इंग्रजावर कैद, जाच, धमकी आणि शेवटीं लांच यांचा प्रयोग करूनहि जेव्हां तो धर्मांतराला कबूल होईना तेव्हां मग बादशहानें त्याला सोडून दिलें.

| | | |
|---|---|---|
| जर्नल बॉ. रॉ. ए. सो. १९१७ पृ. १४२–१४३ रसजान ५ | (११९३) फारशी शिलालेख | १५८९ फाल्गुन शु. ६ १६६८ फेब्रु. ८ |

जेव्हां १०३२ हि. (इ. १६२२–२३) यावर्षी, आपली जिंदगी व परिवार, अशीरगडचा (किल्लेदार) राजा गोपाळदास गोर याच्या स्वाधीन करून शहाजहान पूर्वेकडे गेला; तेव्हां त्या राजानें जवळ जवळ दोन वर्षे सुलतान पर्वीझ याच्याशीं अशीरगड लढविला. कांहीं दिवसांनीं शहाजहान तेथून निघून दख्खनकडे परत गेला. त्यामुळें राजा गोपाळदासानें उत्तम सेवा केल्यामुळें, शहाच्या कृपेचें निदर्शक म्हणून त्याला राजा मांधाता हा किताब आणि पांच हजारांची मनसब मिळाली. त्याप्रमाणें राजा मांधाता व त्याचा धाकटा मुलगा कुंवर बलराम यांनीं युद्धाची तयारी केली नंतर हि. १०३६ सालीं (इ. १६२६–२७) हजरत शहाजहान दिल्ली येथें तख्तावर बसला. हि. १०६२ सालीं (इ. १६५२) राजा मांधाताचा पुत्र राजा मनोहरदास किल्लेदारीवर नेमला गेला. तेथपासून सहा वर्षे त्यानें हें काम विश्वासूपणानें केलें. हि. १०६८ (इ. १६५७–५८) सालीं शहा औरंग बादशहा तख्तनशीन झाला. हि. १०७५ सालीं (इ. १६६४–६५) राजा मनोहरदासाच्या किल्लेदारीविषयक विश्वासूपणाच्या आणि नेकीच्या कामगिरीबद्दल खूप

होऊन (औरंगजेबानें) त्याला माहुली इत्यादि अनेक किल्ल्यांची कामगिरी सांगितली. तेव्हां त्या राजाच्या कारकीर्दीत माहुली व पळसगडाचा तट व अंबरखाना यांची डागडुजी आणि भांडारदरंग(दुर्गे)च्या पाखाडीच्या पायऱ्या दुरुस्त करण्याचें काम झालें. जुलूस ११ रमजान ५.

पिसुर्लेकर, शिवाजी पृ. २५ } (११९४) { श. १५८९ फाल्गुन शु. १४
इ. फेब्रु. २६ न्यू. } { इ. १६६८ फेब्रु. १६

पोर्तुगीज व्हाइसराय—— रायाजी गंगादास सुभेदार

मलई फेळनई तर्फ भिवगड उर्फ रायगड ! आपण पुष्कळ वेळां मला लिहिलें आहे कीं 'गोव्यांतील देसाई शिवाजीच्या राज्यांत दांडगाई करितात.' तरी देसाई लखम सावंत व केशव नाईक यांना माझ्या राज्यांतून निघून जाण्यास आज्ञा केली आहे. यामुळें तरी सदर देसायास इकडून मदत मिळते अशी आपली समजूत झाली आहे ती खोटी असल्याचें आपणास कळेल.

गो. इ. सा. ले. २९ } (११९५) { श. १५८९ फाल्गुन व. ३
मु. १०६८ रम १७ } महजर गोवें येथें फा. मु. { इ. १६६८ फेब्रु २०

फट बिन विठल जोसी याची मामले गोवा येथील सरजोतिसी मिरासी असता दुर्गा जोसी याने गैरवाका समजाऊन आपले नावे फर्मान घेऊन आला. यावर फट जोतिसी यानें फर्मान आणले कीं, सरजोतिसी मिरास फट जोसी याची बाकी लोकांचे कागद बातिल.

शा. ले. १६३ सु. १०६८ } (११९६) { श. १५८९
फ. १०७७ } मिशेली { इ. १६६७

अज दि० ठाणे झुंपे

मोरो नरसिंह खोत व मल्हार काकाजी खोत इजारदार सायेर पर० मज०:— हुजरून खुर्दखत आले. महादजी गोसावी यास गणो तिमाजीनें दिलेलें उत्पन्न पूर्वीप्रमाणें त्याकडे चालू ठेवणें.

खुर्दखतांत 'हाली पर० मज० जागीर साहेबास अर्जानी जाहाला आहे' असा उल्लेख आहे.

खं. २० ले. ५५, ५६ } (११९७) { श. १५८९
? } उल्लेख { इ. १६६७

कारकीर्द रा. शिवाजीराजे साहेब राजश्री मोरो त्रिमल प्रधान यानी पा शिरवळची मगाहती करून कीर्दी जमिनीस धारा बायोन दिल्हा.

-खं. १८ ले. ५७ } (११९८) { श. १५८९
सु. १०६८ } कौल उल्लेख { इ. १६६७

नबाब इमाम बिरदीखान किलेदार-गोपाळसेट व चाउजी चौधारी
रयत जमा करून पेठची आबादी करणे याविसी.

खं. २० ले. १८ } (११९९) { श. १५८९
-सु. १०६८ } तकरीर { इ. १६६७

मल्हार बाबाजी व तिमाजी मल्हार व त्रिंबक गोमदेऊ व रामाजी बाबाजी देसपांडिये पर० सुपे तकरीर कर्दे

सामराम काटे व संभाजी काटे देसमु० व मोक० कस. सुपे मांडो लागले. आपणास सफत घालून पुसता याकुदखानाचे वेळी काटे, मंबाजीराजे व असतखान यांचे वेळीं कसबेकर त्यावर काटे अशा फर्माने देसमुखी काम झाले आहे. यावर शहाजीराजे व सीवाजीराजे जागीरदार जाले ३१४ वर्से मोहर केली आहे.

खं. ८ ले. १७ सु. ११ } (१२००) { श. १५९० चैत्र शु. ७
हि. १०७८ सवाल ५ } { इ. १६६८ मार्च ९

औरंगजेब बादशहा——शिवाजी राजे

आमचा बहुत लोभ तुम्हावर आहे. याजकरितां तुम्हास **राजेपणाचा किताब** दिला आहे. पेशजी पेक्षा अधिक काम करून दाखवावे म्हणजे सर्व मनोरथ पूर्ण होतील. तुमचे कार्याविषयीं विनंति लिहिली तेहि बंदोबस्त यथास्थित घडोन येईल. खातरजमा ठेवावी.

दि. लेटर बुक भाग ४ } (१२०१) { श. १५९० चैत्र शु. ७
पृ. २२४ इ. } लंडन—सुरत कौन्सिल. { इ. १६६८ मार्च १०

सपत्नीक शिपाई आणि कित्येक कारागीर पाठविले आहेत. त्यांपैकीं अविवाहित स्त्रिया असतील त्यांना शेतकामाशिवाय अन्य काम यांच्या मर्जीप्रमाणें व तुमच्या सोईप्रमाणें देऊन एक वर्षपर्यंत योग्य अन्नाची तरतूद करावी. त्यांनीं इंग्रजांशींच किंवा प्रॉटेस्टंट असलेल्याच अन्य राष्ट्रीयांशीं विवाह करावा.

**इंग्रजलोक** आणि अन्यराष्ट्रीय **प्रॉटेस्टंट** एवढ्यांनाच हत्याराची परवानगी असावी...शिपायांनीं हातकाम करावें. मत प्रकारच्या व्यापाऱ्यांना रहाण्याकरितां बोलावून आणावे. **मोंगल आतां धर्मच्छळ** करीत असल्यामुळें तुम्हांला हें सुलभ जाईल. मूळ करारप्रमाणें बेटांत सर्व धर्मांना मोकळीक ठेवावी.

इं. फॅ. १२ } (१२०२) { श. १५९० चैत्र व. ४
पृ. ४१ इ. } हेन्री गॅरी—लॉर्ड आर्लिंग्टन. { इ. १६६८ मार्च २२

बादशहानें मुसलमानांना जकाती माफ करून हिंदूंवर ठेवल्या ठेविल्या असें मीं मागें लिहिलें तें त्यावेळेपुरतें खरें होतें. आतां शहाजहानच्या कारकीर्दीतल्या प्रमाणें जकाती देण्यांत याव्या असा हुकूम काढून त्यानें हिंदू व मुसलमान यांना समान जकाती ठरविल्या आहेत. शिवाजीचा पिच्छा औरंगजेब पुरविणार आहे. आणि पुनः जर शिवाजी त्याच्या हातीं सांपडेल तर त्याची इतक्या सहज सुटका होणार नाहीं.

[इं. फॅ. १२ पृ. २८९ वरील टीप व वरीलचें पत्र, ले. ११८७ पाहिलें असतां जकाती बद्दलची ही माहिती विश्वसनीय वाटत नाहीं.]

इं. फॅ. १२ } (१२०३) { श. १५९० चैत्र व. १०
पृ. ३१२ इ. } इं. राजाचें आज्ञापत्र letter patent { इ. १६६८ मार्च २७

मुंबईबेटाचा ताबा ईस्ट इं. कंपनीचे हवालीं करण्यांत आला. व वार्षिक खंडणी १० पौंड मुकर केली.

खं. १८ ले.२२ } (१२०४) { श. १५९० वैशाख शु. १
पृ. ४५ म. } { इ. १६६८ एप्रील २

आपाजी नामदेऊ लढे—बाबाजी रामहोनप देसपां. पर. पुणा

आपला बाप तुमच्या कर्यातीं मावळच्या देसकुलकर्णीवर गुमास्ता असतां तुम्हाय तुमचा हक लाजिमा देत असे. आपण नजर बदलून हक लाजिमा दिघला नाहीं. त्यावरी सिंहगडीचे उदेभान राठवड किलेदार यार्णी कर्यातीचे देसमुख, मोकदम कुळकर्णी व आपणांस बोलाविले. आपण पूर्वीप्रमाणें वागणेस कबूल जालो. बाजद फितूर मुलुक बदस्त सिवाजी राजे भोसले रयती बैरान परेशानी परागंदा मुलुक बैरान बेचिराख सबब पातशाही दौड एऊन (अपूर्ण]

इं. फॅ. १२ } (१२०५) { श. १५९० वैशाख शु. १
पृ. २८३ टीप ४ इ. } मुंबई, जोसेफ हिमर्स— { इ. १६६८ एप्रील २

विजापूरच्या आदिलशाहीचा बंडखोर शिवाजी (Sabbagee) गोव्यापासून ३ लीग (९ मैल) अंतरावरील बारदेश बेटांत ६००० लोकांनिशीं शिरून त्यानें ३ दिवसांत १६ च्यावर खेडीं बेचिराख केलीं. पण गोव्याच्या व्हाईसरॉयनें वकीलामार्फत त्याला विनंती केल्यामुळें आणि त्याच्या सर्व अटी मान्य केल्यावर मग तो निघून गेला.

खं. १७ ले. १३ } (१२०६) { श. १५९० वैशाख शु.३
सु. १०६८ जिल्काद ३ } कौलनामा { इ. १६६८ एप्रील ४

रा. जिजाबाईसाहेब— ता विठोजी हैबतराऊ देसमु. तर्फ गुंजणमावळ

हैबतराऊ व बालाजी नाईक देसमूख. त. मज. यांनीं, 'आपण आपल्या जिवाचे दहशतीकरितां तोंडे चुकावून बाहेर गेले आहे. मुतालिकाच्या हाते देसगतीचे काम घेतले पाहिजे. म्हणौन मोरोपंत पेसवे यांजपाशीं लेहून पाठविले. त्यावरून त्यास कौल पाठविला आहे. त्यांचिप्रमाणें तुम्हीहि आपला मुतालीक पाठविणें.' त्याच्या हाते देसगतीचे काम घेऊं व तुमचा हक तुमचे हुमाले करूं; खातिरजमा असो देणें; तुम्ही सुखे आपली देसगती चालवणे. आमचे तर्फेनें तुमचे वाईट सर्वथा होणार नाहीं.

.सा. ले. २५२ } (१२०७) { श. १५९० वैशाख शु. ४
सु. १०६८ जिल्काद ३ } { इ. १६६८ एप्रील ५

कृष्णाजी भास्कर सुभेदार व कार० माहालानिहाय तर्फ मावल

हैबतराऊ नाईक सिलिंबकर देसमु० तपे गुंजणमावळ:-घरोबियाचे लिहिले त्याबरेन कलोन आले. आम्हास तुम्ही आवश्यकच आहा. तुमच्या कार्यास आम्हापासून सहसा अंतर पडणार नाहीं. बेशक मुतालीक पाठवून देणें. तुमचें सनसबा प्रमाणें चालवूं. साहेबी विनंती करून कौल करून देऊ. फौदांच्या हंगामात मुतालीक पाठविणें. (मु. श्री, चरणी तत्पर कि, कर कृष्णाजी भास्कर )

खं. १७ ले. १४ } (१२०८) { श. १५९० वैशाख व. ५
सु. १०६८ जिल्काद १९ } कौलनामा { इ. १६६८ एप्रील २१

अजर. रा. शिवाजी राजे साहेब दामदौलतहू.

ता विठोजी सिलंबकर देसमूख ता गुंजनमावल

कौलनामा ऐसा जे, तुमचे बाबे मा। गोमाजी नायक एही मालूम केले जे, विठोजी सिलंबकर [illegible] आहेती; साहेबी कौल मरहमत केलिया गावावरी येऊन [illegible] म्हणून मालूम केले. तरी बिलादरा माळूमात मनास आणून तुम्हास कौल मरहमत केला आहे व तुमचेविसी गोमाजी नाइकाचे खोरेवरी हात ठेविला आहे. तुम्ही कोणेविसी काही दग न धरिता गावास येऊन सुखे असणे. कौल असे.

राम. अं. १७ ले. ३ } (१२०९) { श. १५९० वैशाख व. ७
सु. १०६८ जिल्काद १ } दिवाणपत्र { इ. १६६८ एप्रील २३

अज दिवाण ठाणे मनूर—मोकदम मनूर.

१० उकादिम रोजे फर्दहद २१ जिलकादरा सादर जाले. त्यांत कासीमट बिन अहमद [illegible] २० [illegible] मनूर देणे इनाम जमीन सा फर्दहद

कैलासवासी महाराजे साहेब चालत आले आहे. या इनामास कधी निसापटी घेतली नाही. ती आता कारकून मागतात. महाराज धर्मपरायण आहेत. तेव्हां निसापटीची तसवीस लागू नये....पा हुजूर. रा मा बा राजश्री गंगाजी दादाजी पंडित वेदवे. रजे बरहुकूम इनाम चालवावे.

खं. १५ ले. १७ } (१२१०) { श. १५९० ज्येष्ठ शु. २
सु. १०६८ जिल्हेज १ } कौल { इ. १६६८ मे ३

मोरो त्रिमल—विठोजी हैबतराऊ सिलिंबकर देसमु. तर्फ़ ग्रंभनमावल.

तुम्ही जिवाची दहशत धरून बाहेर पडिला आहां. त्यास मागती कौल जालिया वतनावरि येऊ म्हणौन तुमचे बाबे हवालदार तर्फ मजकूर यानी मालूम केले. तरी तुम्हास रा. साहेबाचा कौल पहिलेच पाठविला आहे. तो पावला असेल. आमचाहि कौल आहे. वरकड मिरासीदाराची विले जाली आहे तेच रवेसीने तुमचीहि विले करू. बेशक भेटीस येणे. येथे आलियावरि रा. साहेबाच्या पायावरी घालुन तुमचा बरेपणाच होये ऐसे करू. कौल असे.

खं. १५ ले. २७८ } (१२११) { श. १५९० ज्येष्ठ शु. ९
सु. १०६८जिल्हेज ८ } उल्लेख { इ. १६६८ मे १०

राजश्री थोरले कैलासवासी याणी चिमणाजी बापूजी यांस पत्र दिल्हे त्यामध्ये मकसूद लिहिला आहे कीं, मो. सखोजी भिकाजी यामध्यें व तुम्ही व बाळाजी बापूजी यामध्यें कसबे खेड व पेठ शिवापूरच्या कुळकर्णाचा मिरासीचा कथला आहे. याबद्दल सखोजी भिकाजी तुम्हास निवाडा करावयाबद्दल एका स्थलाम बोलावितात तो तुम्ही जात नाहीं. तेव्हां असे दिसते कीं, तुमच्या बापानें व मावानें साहेबीच्या बळे त्यागमून कुळकर्ण झोंबून घेऊन खात आहा. परंतु तुमचे कुळकर्ण नव्हे, असे दिसते. तरी हाली सखोपंत व तुम्ही एका थळास जाऊन कुळकर्णाचा निवाडा करणें.

पिसु. शिवाजी पृ. २५ } (१२१२) { श. १५९० ज्येष्ठ व. १३
इ. ८ जून न्यू. } पोर्तु. व्हा.-वीरा पंडित सुभे. { इ. १६६८ मे २८

सर्व देसायांना पोर्तुगीज प्रांतातून बाहेर घालविलें आहे.

खं. २० ले. १२५ } (१२१३) { श. १५९० अ. आषाढ शु. ३
सु. १०६९ मोहर १ } खुर्दखत { इ. १६६८ जून २

अजर. सैद मखदूम शर्जाखान—बजा. कार. व देसमु. पर. वाई.

नारायणभट बिन गोपीनाथभट चित्राव यांस पसरणीं, उडतरे व एकसर या गावी १ चावर ३२ बिघे जमीन पूर्वीपासून चालत आहे ती त्यांजकडे चालू ठेवणें.

.फॅरिस्ट. होम. मा. १ } (१२१४) { श. १५९० श्रावण व. ३
.पृ. २२२-२२३ इ. } { इ. १६६८ ऑगस्ट १४

रॅण्डॉल्फ टेलरची नेमणूक व त्याला दिलेल्या सूचना.

डचांशी युद्धें करावीं लागलीं त्यामुळें अद्यापपर्यंत शिवाजीच्या त्रासापासून आम्हीं आमची सुटका करून घेऊं शकलों नाहीं. तेव्हां किनाऱ्यावरील त्याच्या अनेक बंदरांपैकीं एकाद्या बंदरचें गलबत तावडींत सांपडल्यास तें पकडण्याचा किंवा त्याचा नाश करण्याचा कसून प्रयत्न करावा. मक्का, एडन, मस्कत, इराण, बसरा इकडून पुष्कळ गलबतें परत येण्याची वेळ हीच असल्यामुळें त्यांपैकीं कांहीं तरी तुम्हांला भेटतीलच.

[पृ. २२३] राजापूर बंदराकरितां १२ दिवस राखून ठेवून, जणूं काय तो आपल्याच कामाकरितां जात असतां तुम्ही नाखुशीनें त्याला सोडलें असा बहाणा करून, वेलजीला जैतापुराशीं सोडून द्या. पुढें राजापूरला जातां येईल तसा जाऊं दे. तेथें जाऊन तेथील लोकांचे उद्देश शांततेचे व सलोख्याचे आहेत किंवा कसें, ते तह कोणत्या अटीवर करण्यास तयार आहेत हें अजमावून पाहून मग जरूर वाटल्यास त्यांचा इसम त्यांनीं बोलणें करण्याकरितां आमच्याकडे पाठवावा, असें त्यांना सुचवावें. आम्हांला त्याची जरूर आहे असा त्यांना कोणत्याहि प्रकारें संशय येतां कामा नये. [इं. फॅ. १२ पृ. १०४-१०५]

सं. २० ले. १२६ } (१२१५) { श. १५९० श्रावण ब. ८
'सु. १०६९ श. } निर्णयपत्र { इ. १६६८ आगस्ट १९

निहुजूर रा. केसवजी नाईक देसमु. पर. वाई.

नरसीभट आणि नारायणभट व शंकरभट विभाव यामधें इनामाच्या गागरा लागला. वडिलोंची जमीन होती ती विभाग करून घेतली. त्यावर नरसीभटें अपुले कष्टें करून वरील सर्व इनामाच्या पत्र्या माफ करून घेतल्या तरी वरकडांना वाटा मागावयास संमंध नाहीं. पटियाचे उतपन नरसिहभटीं खावे.

इं. फॅ. १३ } (१२१६) { श. १५९० श्रावण व. १३
पृ. १२ इ. } सुरत कन्सल्टेशन { इ. १६६८ आगस्ट २५

बेंटम गलबताचे अधिकाऱ्यास हुकूमः– इंग्रजांचा पास नसलेलीं गलबतें विशेषतः सुरत आणि गोवा या बंदरांचे दरम्यानचे भागांतील पकडतां आल्यास पकडून इकडे घेऊन यावीं. कारण या मर्यादेंतील बरींचशीं बंदरें आमचा शत्रु शिवाजी याचीं असून, गेल्या कित्येक वर्षें त्याच्यावर आमचें कर्ज राहिलें असल्यामुळें, त्याची कैद करून घेण्याची संधी आल्यास आम्हांला आनंदच होईल.

खं. २० ले. १६
( खं. २० पृ. ४८ )

(१२१७)

हरि दिनानाथ--पंताजी गोपिनाथ

श. १५९० श्रावण
इ. १६६८ आगस्ट

बहिरो नारायणास बरोबर घेऊन हरी दिनानाथानें येण्याबद्दल व अंबाजीपंतास कागद पावते करण्याबद्दल पंताजी गोपिनाथानें लिहिलें होतें. त्यास हरी दिनानाथानें उत्तर लिहिलें कीं बहिरोपंत व अंबाजीपंत यास बोलावणें पाठविलें आहे. पत्र पोंचल्यावर ते शीघ्रच येतील.

इं. फॅ. भा. १३
पृ. १०७ इ.

(१२१८)

कारवार ( टेलर )-सुरत.

श. १५९० भाद्र. व. २
इ. १६६८ सप्टें. १२

**वडी साहेबीण मकेला मृत्यु पावली**, तिचा परिवार परत आला. त्या विवंचनेंत असल्यामुळें स्वतः सुभेदार आम्हांला सामोरा येऊं शकला नाहीं.

इं. फॅ.१३
पृ. १०९-११० इ.

(१२१९)

कारवार-सुरत

श. १५९० भाद्र. व. ६
इ. १६६८ सप्टें. १६

आदिलशहानें [!] वर्षांत [!] लक्ष होन देऊन, **सोलापूर** नांवाचा मजबूत किल्ला व त्या खालील १८० हजार होनांचा मुलूख घावा, या अटीवर **औरंगजेब** आणि **विजापूरकर** यांमध्यें तह झाला आहे. **देशांत** सर्वत्र **शांतता** आहे. **शिवाजी** राजगडला स्तब्ध राहिला आहे; आणि यद्यपि **शिवाजी** आणि **आदिलशहा यांचा तह झालेला नाहीं**, तथापि परस्परांविरुद्ध शत्रुत्वाचें वर्तन त्यांनीं थांबविलें आहे.

इं. फॅ. १३
पृ. ६५-६६ इ

(१२२०)

मुंबई-सुरत

श. १५९० आश्विन शु. ११
इ. १६६८ आक्टो. ६

**कल्याण भिवंडीचा** सुभेदार अबदुल्लाखान आणि दिवाण मिर्झा करीम बेग यांच्याशीं कॅप्टन गॅरीनें स्नेहाचा संबंध ठेविल्यामुळें, त्यांनीं औरंगाबादेस **राजपुत्र सुल० मुआइझम** याजकडे, गॅरीला या आखाताचे पलीकडे असलेलें, आणि हिंदुस्तान आणि दख्खन या उभयतां मुलखाशीं चांगल्या रस्त्यांनीं संबंध जोडणारें, **उत्तम बंदर पेण** हें देण्याबद्दल शिफारस केल्याचें कळलें आहे. हें **शिवाजीच्या** अमलाखालीं आहे हें खरें असलें तरी **शिवाजी औरंगजेबाचा ताबेदार झाल्यामुळें** शहाजादा आज्ञा करील त्याप्रमाणें त्याला वागणें भाग आहे.

डच रे. मा. १९
नं. ७४० इ.आक्टो. १८न्यू.

(१२२१)

डच ग. ज.-डच ई. इं. कं.

श. १५९० आश्विन शु.१४
इ. १६६८ आक्टो. ८

वेंगुर्लाः— **शिवाजीनें पुनः आदिलशहाशीं तह केला आहे**. त्यानें कबूल केलेली ६ लाखांची खंडणी अर्थातच तो गरीब बिचाऱ्या रयतेकडून उकळील !

कित्येक वर्षेपर्यंत पोर्तु-च्या ताब्यांत असलेल्या **वारदेस बेटावर** हल्ला करून त्यानें विनाविरोध कित्येक खेडीं हस्तगत करून घेतलीं आहेत. विजापुरकरांच्या मालकी हक्काची सबब सांगून तो **साष्टी बेटावरहि** ताबा सांगत आहे. पोर्तुगीजांना त्याची फार भीति वाटते. **शिवाजी** किनाऱ्यावरील मुलखाचा **सुभेदार** झाल्यामुळें, शिरस्त्याप्रमाणें डच रेसिडेंटला २५२ होनांचा नजराणा देणें भाग पडलें. **शिवाजी** डच कंपनीला अनुकूल असल्याचें पुष्कळ तऱ्हांनीं दाखवितो. 'पोर्तुगीजांशीं तुमचें युद्ध सुरू झाल्यास तुम्हीं (डच) मला कळविलें असतां पोर्तुगीजांची कायमची हकालपट्टी करण्यास मीं तुम्हांस मदत करीन,' असें त्यानें आम्हांस कळविलें आहे. **पोर्तुगीजांविरुद्ध त्याची ही भावना** अगदीं मनापासूनची दिसते. तिचा आपल्याला फायदा होण्याचा संभव आहे.

सा. ले. २२० }
सु. १०६९ जवल १३ } (१२२२) { श. १५९० आश्विन व. १
{ इ. १६६८ आक्टो. १०

मसहुरल हजरत राजश्री **कृष्णाजी** भास्कर सुभेदार व कारकून सुबा ताा मावळे प्रति राजश्री **शिवाजी राजेः—** दंडवत सर्जाराऊ जेधे देसमूख ताा भोर ताा रोहिडखोरे हुजूर येउनु आर्जे केला जे, आपला हक व इनाम गाऊ कुल अमानत केलें आहे. आपणास काहीं पावत नाहीं. याकरितां आपला अवकात चालत नाहीं. बहुत जबून वस्त तंगमुरासी जाहाली आहे. तरी साहेब मेहेरवान होऊन आपला अवकात चालेल आणि साहेबाचे चाकरीस हजर राहो यैसें केलें पाहिजे. म्हणून त्यावरून याचे इनाम व हक कुल मनास आणून,त्यापैकीं सालमजकुरापासुनु दुवाले केले असे.

सं. ७ पृ. ७२ }
सु. ११ जवल १६ } (१२२३) { श. १५९० आश्विन व. ४
{ इ. १६६८ आक्टो. १३

औरंगजेब पादशहा—— मुतसद्दी पा करोली सर. अहमदनगर.

मजकूर ले. ११४० फर्मानाप्रमाणें.

इं. फॅ. भा. १३ }
पृ. ७२-७३ इ. } (१२२४) मुंबई-सुरत { श. १५९० आश्विन व. ११
{ इ. १६६८ आक्टो. २१

आम्हीं येथील लोकांच्या मुलांना **इंग्रजी शिकविण्याकरितां** एक दोन शाळा-मास्तर ठेवावे अशी बेटावरील लोकांकडून मागणी आली आहे. परस्परांत स्नेह वाढा-वयास व **ख्रिस्ती धर्माचा प्रसार होण्यास** या योगें उत्तम आरंभ होणार आहे. कल्याणचा दिवाण मिर्झा करीम बेग **फांटी** नांवाचें जवळचें बंदर देत आहे. मुअज्जमचें पत्र आल्यावर मगच तें घेण्याचें करावें असा खोजा अलादिनचा सल्ला आहे.

इं. फॅ. १३ }
पृ. ११० इ. }

(१२२५)
कारवार-सुरत

{ श. १५९० कार्तीक शु. ३
{ इ. १६६८ आक्टो. २८

आदिलशहानें हा प्रांत एका उमरावाला दिला आहे तरी येथील लोकांनाहि आपल्या वर्तनाबद्दल प्रेम वाटत आहे. परंतु, **शिवाजीचें** सैन्य आणि त्याच्या छाप्या यांना मात्र हे सर्व लोक भीत असतात. **शिवाजी** अलीकडे इकडे येण्याचा संभव नाहीं.

इं. फॅ. १३ }
पृ. ७३-७४ इ. }

(१२२६)
मुंबई-सुरत

{ श. १५९० कार्तीक शु. ५
{ इ. १६६८ ऑक्टो. ३०

**वरच्या चौलचा** सुभेदार शहाकरितां जी जकात वसूल करतो **तिचा एक दशांश घेण्यासाठीं** शिवाजीचा एक अमलदार तेथें असतो त्यानें **गिरिधर** (गर्धर)ला चांगल्या तऱ्हेनें वागवून सोरा, मिरी इत्यादि योग्य दरानें मिळवून देण्याची खटपट केली आणि तेथून १२ मैलांवर अष्टमी येथें **शिवाजी** होता त्याला भेटून जाण्यास सांगितलें. परंतु तसा हुकूम नसल्यामुळें गिरिधर परत आला.

खं. २० ले. १२७ }
श. }

(१२२७)

{ श. १५९० कार्तीक शु. १०
{ इ. १६६८ नोवें. ३

( ले. १२१५) लेखांतील गरगशाचे बावत ब्रह्मसभेनें केलेला निर्णय. नर्सीभटे पटिया व तूप याची माफी साधिली. त्यास दोनी अंश व वरकड समस्तांस एक अंश. मग वरदी बोलिले आपणास मानत नाहीं. मग त्रिवर्गी स्वमुखी नेम केला जे एक अंश नरसीभटास व दोनी अंश त्रिवर्गास यावे. त्याप्रमाणें सभेनें केलें.

इं. फॅ. १३ }
पृ. ११३-११४ इ. }

(१२२८)
कारवार-सुरत.

{ श. १५९० कार्तीक व. ४
{ इ. १६६८ नोवें. १२

गोव्याचा व्हाइसरॉय मेला असून, आतां त्याचे जागीं तीन अधिकारी काम करितात. व्हाइसरॉय मरण्यापूर्वी त्यानें बारकाईनें तपास केला असतां, सर्व शहरांत मिळून शिवाजीचे ४१५ शें लोक लपून राहिलेले आढळले. तेव्हां स्वहस्तानें **शिवाजीच्या** वकिलाच्या दोन तीन थोबाडींत देऊन त्याला आणि या सर्व कैद्यांना त्यानें गोव्यांतून हद्दपार केलें. हें ऐकून शिवाजीनें ८११० हजार पायदळ आणि १ एक हजार घोडेस्वारांनिशीं गोव्यावर स्वारी करण्याचें जाहीर केल्यामुळें पोर्तु नींहि आपल्याकडून कडेकोट तयारी केली. **शिवाजी** राजापूरचे उत्तरेकडे आहे तो या बाजूला येईल किंवा कसें याबद्दल सुभेदार व व्यापारी लोक यांचेपाशीं तपास करून पहातां, स्वारी करून आदिलशाहीचा तह मोडण्याचें, किंवा या प्रांताचा जागीरदार **मुस्तफाखान** (हा आदिलशहाचा मोठा आवडता असून औरंगाबादेस वकील म्हणून राहिला आहे.) याचेविरुद्ध

वाण्याचें, धाडस शिवाजी करील असें कोणालाच वाटत नाहीं....तथापि शिवाजीच्या हालचालींबद्दल बातमी ठेवून आम्ही सावध रहात आहों.

ता. क. या प्रांताच्या मालकाचें नांव पूर्वी शा अबदल हसनखान (commana) असें होतें. परंतु आदिलशहानें नबाब मुस्तफाखान असा नवा किताब खास दिला.

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ. मा. १२ पृ. ८७-८८ इ. | (१२२९) मुंबई—सुरत | श. १५९० कार्तिक व. ४ इ. १६६८ नोवें. १२ |

पेण व मुंबई यांच्यामधील जलमार्गाची खोली घेतली. राजापूर येथें शिवाजीच्या दोन गलबतांची व कॅप्टन रिमथची लहानशी चकमक झाली.

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ. १३ पृ. ४४ इ. | (१२३०) गोंब्रुन—सुरत | श. १५९० मार्ग. शु. ३ इ. १६६८ नोवें. २६ |

मस्कतहून ताजी बातमी अशी आली आहे कीं १९ मोठीं आणि ५१६ छोटीं गलबतें मिळून ४००० लोक असलेलें एक अरबी आरमार हिंदुस्थानचे किनाऱ्याकडे निघून गेलें. कांहींच्या मतें हें आरमार मुंबईवर जावयाचें आहे. इतरांच्या मतें शिवाजीला मदत करण्याकरितां म्हणून तें जात असावें. सिंधचे मार्गानें कॉंगोकडे बातमी आलेली खरी असेल तर तीप्रमाणें शिवाजीनें पोर्तु० पासून चौल घेतलें असें समजतें.

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ. १३ पृ. ११४-१५ इ. | (१२३१) कारवार-सुरत | श. १५९० मार्ग. व. ८ इ. १६६८ डिसें. १६ |

शिवाजीची भीती आतां राहिली नाहीं. कारण तो परत फिरला आहे. अनेक लहान लहान तुकड्या करून आणि निरनिराळ्या सबबींवर शिवाजीनें सुमारें चार-पांचशें लोक गोव्यांत घुसडून दिले होते. थोड्याच वेळांत ही संख्या दुप्पट झाली असती. आणि त्या नंतर एका रात्रीं एकदम उठाव केला असता तर कोणताहि एक दरवाजा ताब्यांत घेऊन, पोर्तु०नीं पुरेसें सैन्य रणांगणावर उभें करण्याचे पूर्वीच, शिवाजीचे लोक आंत शिरून त्यांनीं गोवा काबीज केलें असतें यांत शंका नव्हती. परंतु गोव्यापर्यंत आल्यावर, आपला कट उघडकीस आला; आपले लोक पकडले गेले; आणि पोर्तु० लोकहि सज्ज होऊन राहिले; हें पाहून, मूळचा बेत बदलून, त्या भागांतील आपल्या किल्ल्यांची शिवाजी पाहणी करूं लागला. त्यानें या वेळीं कित्येक ठिकाणची शिबंदी बदलून रसद आणि दारूगोळा यांची तरतूद केली. पुढें इकडील सर्व मुलखांत सर्व ठिकाणीं कडेकोट बंदोबस्त झाला असून आपल्याला प्रवेश मिळणें शक्य नाहीं असें पाहून राजगडला कांहीं जरूरीचें काम आहे

असा वहाणा करून आपलें सैन्य घेऊन तो परत वळला. परत जातांना सैन्याचा तनखा स्वतःचेच सुभेदार व नोकर यांजकडून उकळीत स्वारी गेली. त्याचे येण्याची इतकी दहशत बसली आहे कीं, तो परत गेल्याची बातमी खरी मानावयास कोणीच तयार नाहीं. [ से. फ्रॅ. रे. सुरत मा.१०५ पृ. ७८-७९]-पत्राचा पुढील भागः-फ्रेंचांनीं राजापूरला वसाहत केली. शिवाजीच्या भेटीला गेल्यावेळीं त्यानें त्यांना वस्त्रें दिलीं व सर्व राज्यांत व्यापार करण्याचें फर्मान दिलें. भेटींत इंग्रजांच्याबद्दल 'ते कां येत नाहींत?' वगैरे त्यानें पुष्कळ चौकशी केली. ते आले तर आपण राजापूरच्या नुकसानीबद्दल भरपाई करून देऊं असें तो बोलला. परंतु तद्देशीय व्यापाऱ्यांनीं 'त्यांना रोख पैसा पाहिजे' असें सांगितलें. तेव्हां त्यानें नुसतें डोकें हालविलें. पुढें तो कांहींच बोलला नाहीं. [ इं. फॅ. मा. १३ पृ. ११६ ]

खं. १८ ले. १५ | सु. १०६९ साबान ३ — (१२३२) — श. १५९० पौष शु. ४ | इ. १६६८ डिसें. २७

रा. शिवाजी राजे—बाबाजी राम देशपांडे प्रा पुणें.

हुजूर खबर मालूम जाली कीं, मुकुंद कान्हो देशपांडिये प्रा। मजकूर याचे तकसिमेचा कारबार यांसि न देवा आणि अवघा कारबार आपणच करावा असा हेतु आहे. तरी हे कोण गोष्टी! तुम्ही पहिलेपासून सालाबाद हैबतखान व मलिक अंबर व माहाराज साहेबाचे कारकीर्दीस व हालीचे कारकीर्दीस जैसे चालिले तेणेंप्रमाणे वर्तनूक करणें. नवे कचाट करून कारबारास खलेल करणे है गैरमाकुल गोस्टी आहे व नवे कारबार कांहीं चालनार नाहीं. तरी तुम्ही आपले तकसिमेचा कारबार करीत जाणे. मुकुंद कान्होचे तकसिमेचा कारबार मुकुंद कान्हो कारीत जाईल. तुम्ही मुकुंद कान्होच्या ताच्या कारबारासि बजबज घालवयासि गरज नाहीं. हे समजोन वर्तनूक करणे. नवे खलेल सर्वथा न करणे. कराल तर ते कांहीं चालणार नाहीं. सालाबादप्रमाणें दुरुस वर्तनूक करणे. नवे खलेल केले म्हणजे साहेबास बोल नाहीं. ऐसे समजोन वर्तणूक करणे.

पिसु. शिवाजी. पृ. २७ | इ. जाने. ७ न्यू. — (१२३३) पोर्तुगीज गव्हर्नर—पोर्तु. राजा. — श. १५९० पौष शु. ६ | इ. १६६८ डिसें. २८

आमच्या कारकीर्दीस प्रारंभ होतांच यंदा बार्देश व साष्टी हे प्रांत घेण्याची शिवाजीची इच्छा होती; पण आमचा बंदोबस्त असल्यामुळें त्याला आपला हेतु तडीस नेतां आला नाहीं.

खं. १८ ले. ११ | सु १०६९ साबान ४ — (१२३४) — श. १५९० पौष शु.६ | इ. १६६८ डिसें. २८

राजश्री जिजाबाई—बाबाजी रामदेश कु० पर० पुणें.

मुकुंद कान्हो देशकु० याचे तकसिमेस तुम्ही खलेल करतां तरी सालाबादप्रमाणें चागणें. नसते कथले केल्या, चिरंजीव कांहीं कोन्हाचा मुलहाजा करणार नाहींत. ऐसे समजोन घसघस न करणे. पेस्तर बोभाट आला म्हणजे बोल नाहीं.

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ. १३<br>पृ. १२३ इ. | (१२३५)<br>मि. मास्टर—सुरत. | श. १५९० पौष शु. ९<br>इ. १६६८ डिसें. ३१ |

**राजापूरला** फ्रेंचांनां एक दलाल पाठविला होता. परंतु शिवाजीनें त्यांना इंग्रजांचें घर देण्याचें नाकारलें.

| | | |
|---|---|---|
| वत. पत्रें पृ. १३<br>सु. १०६९ साबान १२ | (१२३६)<br>पोटपत्र | श. १५९० पौष शु. १४<br>इ. १६६९ जाने. ५ |

"अजरूतखाने राजश्री शिवाजी राजे साहेब दाम दौलतहू यजानेबू मोकदमानी व रयानी समस्त प्रजा मौजे सोनोरी परगणे पुर्णे, बिदानद गोविंद विश्वनाथ पानशी जेतिषी व कुळकर्णी मौजे मजकूर यासी व रामाजी कृष्ण गावखंडेराऊ वस्ती कसबे सासवड यासीं कुलकर्णाबद्दल भांडण लागलें होतें. याचा निवाडा होऊन महजर झाला ऐसा जे, रामाजी कृष्ण गांवखंडेराऊ हुजूर येऊन मालूम केलें जे, आपले कुलकर्ण मौजे सोनोरी तर्फ कऱ्हेपठार परगणे पुर्णे आपली मिरास आहे. यासीं गोविंद पानशी आपणासी लाईणी कुळकर्णाबद्दल भांडत आहे. तरी साहेबीं गोविंद विश्वनाथ यास हुजूर आणून आपली व त्याची बरहक्क मुनसुफी करून निवाडा केला पाहिजे. म्हणून मालूम केलें. ह्यावरून गोविंद विश्वनाथ यास तलब करून आणून दोघा जणांची हकिकत मनास आणून तकरिरा घेतल्या.

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ. १३ पृ. २०९<br>(ओ. कॉ. ३४०५)इ. | (१२३७)<br>मुंबई–कंपनी. | श. १५९० माघ शु. ३<br>इ. १६६९ जाने. २४ |

अरब आणि शिवाजी यांच्याशीं पोर्तुगीजांचें आधींच वैर चालू असल्यामुळें, त्यांतच मोंगलांनींहि विरोध करण्याचें निश्चित मनावर घेतल्यास पोर्तुगीजांची धडगत नाहीं. **परंतु वादामध्यें व विशेषतः युद्धप्रसंगीं गंभीर विचार करण्याची पौरस्त्यांची पद्धति** लक्षांत घेतल्यास उमरजण (शत्रु) कांहीं विचार करतील असें वाटलें. ओ. कॉ. नं. ३३१९, १६६९ जाने. १४ चें सुरतेचे प्रेसिडेंटास पत्रः—बादशहाकडून अहादी (जासूद) सर्व **पोर्तुगीजांना सुरतेंतून हांकून लावण्याबद्दल हुकूम** घेऊन आला. शहराच्या रक्षणाकरितां पहारे ठेवले. बादर (बहादर)खान दमणला वेढा घालण्याकरितां, दुसरा एक उमराव **दीवकडे** आणि आणखी २२ सरदार इतर पोर्तुगीज मुलखावर,१ असे पाठविण्यांत आले. औरंगाबादेहून सुलतान मुअझ्झमनें त्यांना मदत करावयाची

आहे. या हुकमाच्या भाषेवरून बादशहा राहिलेल्या तिघां ख्रिश्चनांना वगळील असें दिसत नाहीं ( And there are a few words in the husbull hukum which seem to threaten the three other Christian nations, to say, the King will care or take order for them allso. ). या गोष्टीचा विचार करण्याकरितां बादशाही 'नाखुदा' उमामाई दरबाराकडे बोलावला असून या वर्षी बादशाही किंवा व्यापाऱ्यांचीं गलबतें समुद्रावर फिरकणार नाहींत.

खं. २० ले. १९९ पृ. ३०२ } (१९३८) { श. १५९० माघ शु. ४
सु. १०६९ रम २ } { इ. १६६९ जाने. २५

मशरूल अनाम राजश्री नारो भिकाजी सुमेदार व कारकून सरदेसमुखी सरकार महालहाय तलकोकण व देशमु० व दोडे कल्याण मामले यास—

प्रती राजश्री शिवाजी राजे त्रिंबकजी नरसप्रभु हुजूर येऊन मालूम केलें की कसबे कल्याणचे कुलकर्ण व हुदेदारी आपली मिरास सालाबाद माहात कदम कारकीर्द मलिकंबर बाजे कारकीर्द दर कारकीर्द चालत आलें असे. हाली मोगलाचे कमाविसीमधें देसमूख व देसपांडियानी कसूर करून चालों देत नाहीं, चिटणीस व नाइकवाडी यांचा मुशारा सरकारी पोते खर्च पडत होता तो हाली मिरासदारानीं रयतेनिसबत लावून त्यांचे चालवितात आणि आपणास हुदेदारीचा मुशारा दरमाहे टके १० व कागद बाब दरमाहे टका १ एकून टके ११ होते हें चालवीत नाहीं, तर आपलाहि मुशारा सदरहू रयतेनिसबतीनें लावून चालवीत व कुलकर्णहि बिला कुसूर चालवीत ऐसे केले पाहिजे. म्हणून मालूम केलें. तर बाजे मिरासदारांच्या मिरासीच्या मिरासी चालवाया आणि यासी कुसूर करावयास काय गरज आहे? हाली तुम्ही देसमुखदेसपांडियासी ताकीद करून त्रिंबक प्रभु मजकुराचे कुलकर्ण व हुदेदारी सालाबादप्रमाणें हुदेदारीचा मुशारा बाजे मिरासप्रमाणें रयतेनिसबतीनें देत तें करणें, बोभाट येऊं न देणें.

स. पृ. ११९ } (१९३९) { श. १५९० माघ शु. ७
स. } { इ. १६६९ जाने. २८

रा. पिराजीराव राजे घाटगे सर्जेराव वजीर गोसावी यांसः—

म. ह. मातमीदौलत राजमान्य प्रत महाराज शिवछत्रपती. तुम्हांकडील पत्र, सर्व सविस्तर मजकूर राजश्री मल्हारपंत नाडगौडे यांणीं श्रुत केला, तो दिलांत आणून तुम्हांस हजरत पादशहा यांणीं मेहेरबानी होऊन वजिरी, मोर्चेला, चवघडा, वतनदारी, जहागीर कागल परगणा, कर्याती ६ गांव सुमार ६७॥ तुम्हांस इनाम करून दिले बरहुकूम अनुभव केला, वतनदारीचे कागदपत्र ध्यानांत आणोन तुम्हांस राजपत्रें करून दिल्हीं आहेत. सिवाय कलम–

१ तुम्हीं समक्ष मेटीस याल (ते) समई मानमरातब कलम.

१ चादर, खडा, कंठी व शिरपेंच, पोशाख ५ सनगे फलाबुती निरोप समयीं, ताजीम समक्ष बसका बरोबर, घोडे २ [एकूण ६]

१ सदरहू वतनदारी व जहागीरी पूर्ववतप्रमाणें पुर्टीसानक तुमचे वंशपरंपरा भोगवटा करून सुखरूप असावें.

२ एकूण कलमें दोन सदरहूप्रमाणें तुमचे परगणेंत खून, खराबी वगैरे पूर्वीपासून तुम्हीं मुखत्यार. आम्हांकडून कांहीं दरोगा पाहणेंच कारण नाहीं. बहुत काय लिहिणें.

| | | |
|---|---|---|
| वतन पत्रें. पृ. २३<br>सु. १०६९ फ. १०७८ श. | (१२४०)<br>अजीज पत्र | श. १५९० माघ व. १<br>इ. १६६९ फेब्रु. ६ |

रामजी कृष्ण गाव खंडेराऊ सासवड.–गोविंद विश्वनाथ पानशी, सोनोरी.

आपणास तुमचे चुलते हुखो परशराम यांनीं मुतालीक ठेविले असतां बेइमान झाले. हालीं तुम्ही आम्ही मांडत महाराज साहेब (शिवाजी) याजवळ आलों. त्यांनीं गोताच्या व पांढरीच्या साक्षी मनास आणतां दोन्ही गांव मौ. सोनोरी व दिवे गिधवे यांनीं पानशास दान दिल्हे असें ठरलें. त्या वेळीं जानोजी काळा यानें लटकी साक्ष दिली. त्यावरून महाराज साहेबी दिव्य नेमून दिलें. मौ मोहरी तर्फ गुंजनमावळ येथें दिव्य होऊन आम्हीं खोटें ठरलों. खालीं गोहीमध्यें विठल पीलदेव सुभेदार प्रांत मावळ; मुकुंद कान्हो देशपांडे पा पुणे इत्यादि १२ सह्या आहेत.

| | | |
|---|---|---|
| स. पृ. १२१ ले. १३<br>सु. १०६९ सवाल ३ | (१२४१)<br>सनद | श. १५९० फाल्गुन शु. ४<br>इ. १६६९ फेब्रु. २४ |

मोरो त्रिमल पेशवे—हवाला. कार. देशमु. देश. पर. शिरवळ.

राजश्री साहेबांचे आज्ञापत्र साबान छ ४ चें आलें तेथें आज्ञा जे, बनाम पंताजी गोपिनाथ वोकील भले ब्राह्मणाचे मक्त आहेत. या निमित्य यावरी साहेब मेहेरवान होऊन इनाम जमीन अवल चावर २ मौजे मांडिकी जमीन चावर, मौ. मवाळी जमीन, १ चावर मेहेरवान होऊन दिधली असे.

| | | |
|---|---|---|
| इं. फॅ. १३<br>पृ. २६९ इ. | (१२४२)<br>कारवार–सुरत. | श. १५९० फाल्गुन व. २<br>इ. १६६९ मार्च ९ |

यापुढें इतक्या उशिरां बाहेर पडण्याची शिवाजीची पद्धति नसल्यामुळें यावर्षी आतां त्याची भीती संपली असें दिसतें. पाऊस संपून तो येणार त्याचे आधीं आमचीं गलबतें भरून निघतील यांत शंका नाहीं! शिवाजीचें महत्त्व प्रत्येक दिवशीं कमी होत आहे असें आम्हीं ऐकतों. तसेंच तुमचेंहि मत आहे हें

वाचून बरें वाटलें. ...शिवाजी राजगडला असून तो स्वतः व देशांत सर्वत्र शांत आहे.

खं. २० ले. २८७ } (१२४३) { श. १५९० फाल्गुन व. ३
पृ. ४१९ श. } उल्लेख निवाडापत्र { इ. १६६९ मार्च १०

रखमाजी, बाबाजी, शिवाजी, गोमाजी बाप बापूजी विंबक विश्वनाथ

मौ. सोनवरीच्या कुलकर्णाचें भांडण रामाजी गावखंडेराऊ यासी लागले होते. दिव्य केले, खरा जाला. वाद सांगता पैसे पडले. आपणास घावयास नाहीं. म्हणून सोनवरीचे कुळकर्ण व ज्योतिष तुम्हांस खुषीने दिधले.

खं. १७ ले. १६ } (१२४४) { श. १५९० फाल्गुन व. ८
सु. १०६९ सवाल २२ } { इ. १६६९ मार्च १५

अजर. रा. जिजाबाई साहेब. विठोजी हैबतराऊ सिलंबकर देशमु. तर्फ गुंजनमावल

तुम्हीं आपली कन्या गोमाजी नाईकाच्या लेकास दिधली. लग्न सिधी कारणे तुम्हास हुजूर बोलाविले. तुम्हीं सांगितले कीं सांप्रत रोजीचे खावयास नाहीं आणि लग्नसिधी कैसी होईल. त्यावरून तुम्हास होन २५ व ५०० माणसाची जेवणाची सामान दिधले असे. लग्न सिध करणें.

ई. फॅ. १३ } (१२४५) { श. १५९० फा. व. १०
पृ. २१९–२१ इ. } मुंबई-सुरत. { इ. १६६९ मार्च १७

शिवाजीशीं दोन हात करण्याची आमची इच्छा असली तथापि आज आपण तसे समर्थ नाहों, हें लक्षांत घेऊन शिवाजीनें आपल्या नोकरामार्फत केलेली ३०० रु-ची मागणी फारशी मोठी नसल्यामुळें आम्हीं ती विश्वास दाखविण्याचें उद्देशानें पुरविली. चुना पाडण्याकरितां लागणारें लाकूड आणि बहुतेक इतर वस्तु त्याच्याच मुलखांतून आम्हांला मिळत असल्यामुळें किनाऱ्यावरील त्याच्या लोकांशीं सलोख्याचे संबंध ठेवणें आम्हांला इष्टच आहे.......आमच्या देखत मलबाऱ्यांनीं कित्येक मच्छमार लोकांस धरून नेलें. आमचे पाशीं प्रतिकारक्षम जलयानें नसल्यामुळें आम्हीं त्यांना मदत करूं शकलों नाहीं. शिवाजी किंवा दुसऱ्या कोणाशीं युद्ध करण्याकरितां तशा गलबतांची जरूरी आहे.

ई. फॅ. १३ } (१२४६) { श. १५९० फाल्गुन व. १४
पृ. २२२ इ. } मुंबई-सुरत { इ. १६६९ मार्च २०

१८ तारखेला नजीकच्या एसाजी [?] राजानें मला एक खाजगी निरोप पाठविला कीं, "आपल्या अमलाखालील दर्यांतील पोर्तुगीजांच्या कांहीं गलबतांवर शिवाजी हल्ला

करून तीं घेऊन त्यानंतर साष्टीवरही जाणार आहे.' शिवाजीचें साष्टींतील सान्निध्य आप-त्याला इष्ट नसल्यामुळें त्याला शक्य ती मदत देण्याचें मीं कबूल केलें आहे.

सा. ले. १९ मु. १०६९ } (१२४७) { श. १५९०
फ. १०७८ } महजर { इ. १६६८-६९

मानसिंग राणा रजपुतानें पुणा येथील रयते पासून जमाबंदीच्या ४३८॥॥≈ रुपयांमधून रु. २६८ घेतले. बाकी १७०॥॥≈ जागीरदारांनीं घेतले. असे असून रयतेनें तकार केली की, आपणापासून दुबार पैके घेतले तर तसें झालें नाहीं.

खं. १८ ले. १६ } (१२४८) { श. १५९०
फ. १०७८ } महजर { इ. १६६८-६९

गोंदसेटी हुलवला पेठ शापूर का। पुणे व गणसेटि शेटे यामधे घराचें भांडण होते. निकालांत घरठाणे गोंदसेटीचा लेक दुलवा हुलवला त्यास दिधले. गणसेटीस कांहीं निसबती नाहीं.

इं. फॅ.१२ } (१२४९) { श. १५९०
पृ. २८४ टीप १ इ. } आलेपोचे पत्र– { इ. १६६८

बादशहाचें धर्मवेड, अडचणींत पकडून धर्मांतर करणें भाग पाडण्याकरितां त्यानें नेमलेले हस्तक, आणि पुढें नाइलाजानें करावें लागणारें धर्मांतर, हीं हिंदूंना व बनियांना जाचक होत आहेत. स्वर्गामध्यें अशा कत्यांनीं महमदाच्या बरोबर मान्यता मिळेल; असें खूळ त्याच्या मुल्लांनीं त्याच्या डोक्यांत भरून दिलें आहे. त्याच्याहतके जे कर्मठ नाहींत अशा सरदारांनाहि हा त्याचा जाच सहन करावा लागतो आणि लवकरच ते बंड करून उठतील असा कयास आहे. [रिपोर्ट ऑन फिंच मॅन्यु. पृ. ५०६]

ग्रै. व. २ पृ. ६५, ६६ } (१२५०) { श. १५९०
सु. १०६९ फ. १०७८ } { इ. १६६८-६९

!——सरदेश. देश. देशपां. मोक. व रया. सुवे

मोरोबा गोसावी चिंचवड याचा इनाम पूर्वीप्रो चालविणें.

खं. २० ले. १८७ } (१२५१) { श. १५९१ चैत्र व. ३
श. } यादी { इ. १६६९ एप्रील ९

करवीर क्षेत्रीं रा गोविंदराव दत्तात्रय यांनीं प्रतिग्रहा प्रताप १ प्रमाणें वाटणी केली. प्रताप दिलेल्या १८५ महाहृंदांची यादी.

इं. फॅ. १३ ) (१२५२) { श. १५९१ चैत्र व. १२
पृ. २२३ इ. ) मुंबई-सुरत. { इ. १६६९ एप्रील १७

शिवाजी राजाला एकदां आम्हीं सवलत दिली म्हणजे आम्हीं आपले हक्क गमावले असें होत नाहीं. त्याचे बाबतींत केलेला हा त्याच्यापुरताच अपवाद असून तो सामान्य आधार समजला जावा अशी आमची इच्छा नाहीं. तथापि अपरिहार्य पणें करावी लागणारी गोष्ट करून ( जें आम्हीं राखूं शकलों नसतों तेंच देऊन ) आम्हीं फक्त आमचा आब राखिला आहे. त्यानें उधी फेडीबद्दल नकार दर्शविला तर आम्हीं त्याच्याकडून जबरीनें वसूल हि करूं शकत नाहीं. त्याचून त्याच्या सीमनस्यावर आमचें स्वास्थ्य पुष्कळच अवलंबून आहे. आज आपल्याला पुरेसें लांकूड वगैरे मिळूं शकतें तें एकदां भांडण उकरून काढल्यावर मिळणार नाहीं. वेळ आलीच आणि त्याच्याशीं भांडण करायचेंच म्हटलें तर ह्याच किंवा दुसऱ्या अनेक सबबींवर करतां येईल।

[ दि – G. G. C. १ भा. ९ पृ. १०७ ( १६६९ मार्च १७ ) या पत्रांत 'मुंबई बंदरांत येणाऱ्या मालावर शेंकडा ३ टक्के जकात घेण्याचा नवीनच नियम करण्यांत आला. परंतु शिवाजी जबरदस्त, ही जकात देण्याचें हरप्रयत्न करून टाळणार; हें जाणून, जें शर्ती येणारच नाहीं त्यांत उदारपणा दाखवायला कां सोडा; असा विचार करून इंग्रजांनीं शिवाजीला ही जकात बहाल केली.' इत्यादि हकीकत आहे. या गोष्टीचा खुलासा आणि समर्थन या उताऱ्यांत केलें आहे. ]

फॅ. रे. सुरत भा. १०५ ) (१२५३) { श. १५९१ चैत्र व. १४
पृ. १२१-१२२ इ. ) कारवार-सुरत. { इ. १६६९ एप्रील १९

मोठें सैन्य घेऊन शफतीखान [शाहिस्तेखान] शिवाजीवर चालून येत आहे. दंडाराजपुरीच्या सिद्यानें त्याच्या कांहीं किल्ल्यांना वेढा दिला आणि त्याच्या ऱ्याच प्रमुख हस्तकांनीं त्याच्याविरुद्ध कट केल्याच्या संशयावरून त्यानें कित्येकांना कारागृहांत टाकिलें. व बाकीचे पळाले. ह्या गोष्टी खऱ्या असल्या तर शिवाजी आतां फार वेळ टिकून राहणें कठीण दिसतें.

नुकतेंच मोठें वादळ होऊन त्यांत तांदूळाचीं वगैरे शिवाजीचीं पुष्कळ गलबतें गमाविलीं. [इं. फॅ. भा. १३ पृ. २६९.]

फॅ. रे. मुंबई ) (१२५४) { श. १५९१ वैशाख शु. ८
भा. १ पृ. ७० इ. ) सुरत—मुंबई { इ. १६६९ एप्रील २८

तांदूळ, नारळ यांवरील जकातींबाबत, आणि शिवाजी व तुमचे संबंध सलोख्याचे राखण्याकरितां, जें तुम्हीं वरितां त्याला आमची संमति आहे. कारण त्याला आपण तेवढी रकम बहाल केली नसती तर त्यानें ती परत केली नसती असें तुमच्यासारखेंच आम्हांला वाटतें.

स. पु. १२० ले. १२ } (१२५५) { श. १५९१ वैशाख व. १
१ जिल्हेज १५ } { इ. १६६९ मे ६

रा शिवछत्रपति—— पिराजीराव राजे घाटगे देशमु. जहा. फौज पा कागल.
आपला इनाम आम्ही पूर्वीप्रमाणें चालवूं.

इतिह. ३४ पृ. ५६ } (१२५६) { श. १५९१ ज्येष्ठ शु. ७
हि. १०८० मोहर ५ } मिरासी पत्र { इ. १६६९ मे २६

समस्त दाहांजन मौ. कवीठे पर. नीवास सर. अहमदनगर त्रिंबक जोसी बिन मोरजोसी कसबे मिंगार

मौ. कवीठे येथील कुळकर्ण तुम्हस ६०१ रुपयास विकत दिधलें असे. पूर्वीचा मिरासदार दुकाळा काळे बुडाला. कोण्ही वारीसदार नव्हता. नरसोजी ताकिया याचे घरवाडी ही मिरासी दिधली असे.

इं. फॅ. १३ } (१२५७) { श. १५९१ ज्येष्ठ व. ६
पृ. २२८ इ. } मुंबई-सुरत { इ. १६६९ जून ९

'शिवाजी राजा आपल्या देशांत शिरला आहे. त्यानें पुष्कळ त्रास दिल्यामुळें येथील लोक आश्रयाकरितां मुंबईकडे पळून गेले तर त्यांस मुंबईत प्रवेश मिळावा ' असें दंडा राजपुरच्या सिद्दीचें पत्र आलें; त्यास शक्य ती व्यवस्था करण्याचें वचन मी दिलें आहे.

ख. २० ले. १९ } (१२५८) { श. १५९१ ज्येष्ठ व. ११
श. सु. १०७० मोहर २४ } { इ. १६६९ जून १४

तिमाजी मल्हार व त्रिंबक गोमदेऊ देसपां० पर० सुपे असकर्णजी साहूकार आम्ही पनास रुपये घेतले त्यास दरमहा व्याज दरशेकडा रु. ६ प्रमाणें.

राम. अं. ६५,६६ ले. १३ } (१२५९) { श. १५९१ आषाढ शु. ४
सु. १०७० सफर ३ } फा. सी. { इ. १६६९ जून २२

त्रिंबकजीराजे भोसले-रघुनाथ व पाद्र भट सेडगे येवूर ( श्रीवुलणेश्वरचे ) पूजेस श्रावणमासचे रुपये १५ दिले.

इं. फॅ. १३. } (१२६०) { श. १५९१ आषाढ शु. ४
पृ. २२० इ. } सुरत-मुंबई { इ. १६६९ जून २२

आम्हांला स्वतःच्या संरक्षणाकरितांच करण्यासारखें पुष्कळ आहे. अशा वेळीं दुसऱ्याच्या भांडणांत पडणें शक्य नाहीं त्यांतून कोणाहि व्यक्तीला आणि विशेषतः आमच्याशीं उघडपणें [illegible] आमचे काफिले आगे मागे लुटलीं आहेत

आणि तिळमात्र भरपाई केली नाहीं; अशाला आपण आश्रय द्यावा अशी मुंबईच्या स्थिंदोची परिस्थितिहि नाही. तेव्हां शिवाजीशीं वैर करण्याची आपली आज तयारी नाहीं हें समजून त्याला खिजविण्याला कारण होईल असें कांहींहि करूं नका. मुंबई आणि दंडा या दोन्ही ठाण्यांचा बंदोबस्त करतां येण्याइतकें सैन्य व दारूगोळा आपल्याजवळ असता तर सिद्दी आणि शिवाजी या उभयतांवरहि चांगला सूड घेण्याची ही संधि होती. परंतु हें बोलणें सोपें आहे तितकेंच करणें कठीण आहे.

सा. ले. २२१ } (१२६१) { श. १५९१ आषाढ व. १
सु. ११७० सफर १५ } { इ. १६६९ जुलै ४

रा. शिवाजी राजे——म. अ. रा. माजी सर्ज्याराऊ जेधे देसमूख ता भोर ता रोहिडखोरे

तुम्ही अर्दास पाठवून तपसिले लिहिले कीं, आपली मागाची सेते सिवाजी जेधे करितात त्यांत अपणांत कथला होईल म्हणून. तरी त्याचा तुमचा निवाडा होऊन गेला असतां मागुते कथला कराया काये गरज आहे. सेते ही द्याना घरही द्याना म्हणजे हे गोष्टी केसी चाले पाहते ? इतकिया उपरि सेताविसीं कथला न करणें. जेणेप्रमाणें निवाडा जाला आहे तेणेप्रमाणें सेते ते व तुम्ही तकसीम प्रमाणें करून निसूर असणें कथलियात फाइदा नाही जाणिजे.

इं. फॅ. १३ } (१२६२) { श. १५९१ आषाढ व ३०
पृ. २७०इ. } { इ १६६९ जुलै २७

विजापुरकरांच्या मुलखाला शिवाजीचा मुळींच त्रास होत नसून या बाजूला शांतता आहे.

सा. ले. २६९ } (१२६३) { श. १५९१ श्रावण शु. ५
सु. १०७० रबल ४ } कौलनामा-'प्रति' सु. { इ. १६६९ जुलै २३

अज रख्तखाने राजश्री शिवाजीराजेसाहेब दामदौलतहू ता मुसहुरल अनाम दताजी बिन केशवजी नाईक पिसाल देसमुख पा वाई.

बिदानदके दादे कौलनामा येसा जे तुम्चे मुतालीक केदाजी मुरो येऊन अर्ज केला जे केशवजी नाईक कदीम साहेबाचा दरतर्फी टेमेच त्यामागे हाली दताजी त्यांचा पुत्र साहेबांचे पायाची बहुत उमेद धरितात. येसे असता दताजी केशवजी याचे कारीस-दार व गंगाजी व दताजी याची पाटी पा मजकूरचे सुबेदार व बांधून राखनात आणि दताजी केशवजीचे मुतालिकस दरत करून टेऊन देशमुखीस कुसूर केला आहे तरी साहेबी दो गोष्टीने दताजी केशवजीची पलाटी राखिली पाहिजे की आपणापासून येक भला माणूस पा मजकूरचे सुबेदारांपासी पाठऊन त्यांसी मकूल करावे की, [illegible] व

दताजी याची पाटी न राखणे. ते पहिलेपासून जे खात आले आहेत तेणेप्रमाणें खाऊन हालखुद राहती ते करणें आणि दताजी केशवजीची देसमुखी चालत आली आहे तैसी बिलाकुसूर चालविणें. ऐसें जरी न करा तरी दताजी केशवजी दावा करील, विलायेतीस तसदी देईल, मुलुक ओस पडेल, मग आम्हांस बोल नाहीं. ऐशा गोष्टी बोलोन दादपटे देऊन हेजिबाहेजिबी आपले पारपत्य होये ते केले पाहिजे. जरी या गोष्टी ते नाइकोन, पारपत्य न करीत तरी दताजी केशवजीस साहेबी आपले मुलकात हरयेक जागा राहावया जागा दिल्हा ( पाहिजे ). म्हणजे दहावीस घोडी करून शर्तीनसी दावा करून पा। मा। विलातीस आजार देऊन लुट्टून नागऊन कलेल तो इलाज करून आपले पारपत्य करून घेतील. येस्या दो गोष्टीनें साहेबी मदत केलिया साहेबाचे सेवेसी पेसकसी होनु पा। २००० दोन्ही हजार उसूल चौं साला हरसाला होन पा। ५०० प्रमाणें देऊन. तरी ये-विसी कौल मरहमत जाला पाहिजे म्हणून अर्ज केला. तरी सदरहू अर्ज मनास आणून तुम्हास ये बाबें कौल मरहमत केला असे. तुमचे बाबे पा। मजकुरास सुबेदार व कारकु-नासीं रदबदल करून खटपट कराया भले माणूस हेजीब पाठऊन त्या हातीं सांगोन पाठऊन, कीं दताजी केशवजीचे वारिसदार गंगाजी व दताजी याची पाठी तुम्ही राखता यात फायदा नाहीं. येणेंकरून मुलकास आजार पावेल. तरी ऐसे न करणें. नेणेंप्रमाणें पेशजीपासून चालत आले आहेत तेणेप्रमाणें दताजी केशवजीची देसमुखी बिलाकुसूर चालवणें. मुतालिकास कैद केलें आहे ते सोडून देणें. वस्तभाव कोही जे घेतले असेल ते परतोन देणे. गंगाजी व दताजी वारिसदार पहिलेपासून जे खात आले आहेत ते खाऊन हालखुद राहेत ते करणें. कुसूर होव नेदणे. येस्या दादपटीच्या गोष्टी हेजिबाहातीं करऊन तुमचे पारपत्य होये ते करून. जरी या गोष्टी सुबेदार व कारकून नाइकेत आणि पारपत्य न करीत तरी मग तुम्ही आमचे विलायेतीस हरयेक जागा येउनु सुखे असणे; आणि दहावीस स्वार फावतील तितके करून शर्तीनसी दावादरवडा करून पा। मजकूर विलायतीस आजार देवईल तैसा देऊन आपले पारपत्य होऊन ये ते करणें. सदरहू दोन्ही गोष्टीने आम्ही तुमची पाठी राखावी याबदल पेशकसी होनु पादशाही २००० दोनी हजार उसूल च्यार साला इा साल मजकूर सन सबैन पासून हरसाला होन पा। ५०० पावसेंप्रमाणें चो वर्षांनीं होनु दोनी हजार घावें म्हणून केदारजी दुरो तुमचे मुतालि-कानीं कतबा लेहून दिल्हा असे. तेणेंप्रमाणें पेसकसीचा उसूल ता। जाउलीचे सुबा करणे. येविसी कौल असे. छ ४ रबिलावल. तुमचे वारिसदारास असिरा नसे. ये बाबे कौल असे. मोर्तब सूद. (मर्यादेयं विराजते) रुजु सुरुनिवीस सुरु सुद

| | | |
|---|---|---|
| सं. १५ ले. ११९<br>सु. १०७० रबल २३ | (१२६४)<br>ताकीद मु. व सो. | श. १५९१ श्रावण व. १०<br>इ. १६६९ आगष्ट ११ |

खान अजब सिताब खान सरनाईकवाडी किले सातारा वगैरे— ता। बाजी पटेल

मोक० मौजे निगडी किले सातारा:—मौ० मज० सदानंद मठीचे इनाम बिघे ५ आहे. इनामाचा ऐवज जरावजरा मठास पावता करणें.

फॅ. रे. सुरत मा. १०५ } (१२६५) { श. १५९१ भाद्र. व. ८
पृ. १३६ इ. } मुंबई–सुरत { इ. १६६९ सप्टें. ७

काल शिवाजीचें एक गलबत आदनहून, बहुतेक रिकामेंच या बंदरांत आलें आहे. [ इं. फॅ. मा. १३ पृ. २३५ ]

खं. १८ ले. १७ } (१२६६) { श. १५९१ भाद्र. व. १३
सु. १०७० रखर २५ } कौलनामा. नकल { इ. १६६९ सप्टें. १२

अज दि. खास

बजा. फडतोजी बिन हिरोजी महाजन व सेटिया मु. पेठ मुर्तजावाद पर० किले पुरंदर

पूर्वी शाहाजी भोसले परमुलकी एऊन पेठ जाली. फितरती करितां प्रजा परागंदा होऊन गेलिया येत नाहीं. मुदा आहे कीं पेशजी रायाराव याचे तसविसी करितां मुलुख खराबा जाला. त्यावर आपण कौल देऊन आणिले. कर्ज घेऊन दुकाने केली ती शहाजीचे फितरीत जाली. मागती परागंदा जालो. सा वर्षांचा कौल जाल्यास येतो. यावे. कौल असे.

खं. १५ ले. १२० } (१२६७) { श. १५९१ आश्विन व. ११
सु. १०७० जवल २४ } मिसेली मु. व सी. { इ. १६६९ आक्टो. १०

आज सुभा पर वाई—ता मोक० मौजे निंब

फकीर मठ सदानंद याचे इनामतीस उचापती न करणे व इनाम दुमाला करणे.

फॅ. रे. सुरत मा. १०५ } (१२६८) { श. १५९१ कार्तीक शु. २
पृ. १४१ इ. } मुंबई–सुरत. { इ. १६६९ आक्टो. १६

शिवाजीला दंडाराजापुरी किल्ला हस्त करून घेतां येत नाहीं. तथापि आंतील लोकांची उपासमार करण्याचा त्याचा विचार असल्यानें सिद्दी टेकीस आला. शिवाजीनें वेढा काढावा असा मोंगलाचा हुकूम तो मानीत नाहीं. तेव्हां शेवटपर्यंत टिकाव धरून, कल्याणजवळ लोदीखानाचे हाताखालीं मोंगलांचें सैन्य आहे त्याचे हवालीं किल्ला करावा असा सिद्दीनें बेत केला.

शिवाजीशीं आतां तह केला तर तो केवळ स्वार्थापायीं आम्हांला गुंतवूं पाहील. तेव्हां त्याच्याशीं बोलणें करणें आज इष्ट नाहीं. म्हणून कांहीं आजच्या फायद्यावर किंवा कांहीं पुढच्या नफ्यावर लक्ष देऊन जरूर पडेल त्याप्रमाणें वागण्याचे इरादानें, दोन तीन गलबतें येथें येऊं शकलीं आणि आपली परवानगी मिळाली तर तीं घेऊन दंडाराजापुरीपुढें जातें असें मनांत येतें. कांहीं नाहींतरी त्या ठिकाणाची माहिती मिळेल.

[से.] चौलचे पोर्तुगीज अधिकाऱ्यानें विश्वास देऊन त्याचें एक गलबत पकडलें. यामुळें सिद्दी आतां त्याचेवर विश्वास न ठेवितां आमचे मित्रत्वाची इच्छा करीत आहे. यामुळें आपल्याला किफायत असून नकार देण्यांत मितरेपणा दिसतो. खुद्द सिद्दीव त्याला तरीहि कांहीं धोका नाहीं अशी आमची समजूत आहे.

[सदर पृ. १५०] याच बाबतींत हेन्री यंगचें खाजगी पत्रः—'मुंबई बेटाची तटबंदी वगैरे पुष्कळ खर्चाचीं कामें करीत बसण्यापेक्षां कांहीं खटपटीनें **दंडाराजपूर विकत मिळालें तर बरें.** मग शिवाजी आणि मोंगल यांपासून भिण्याचें कांहीं कारण नाहीं.' [इं. फॅ. १३ पृ. २४३–४४]

खं. १५ ले. १२१
ह. १०७० जखर १

(१२६९)
ताकीद ह. व सी.

श. १५९१ कार्तिक शु. ३
इ. १६६९ आक्टो. १७

खान जजम सिताबखान सरनाइकवाडी किले सातारा व इतर ता मोक. मौजे निगडी सदानंद मठाचे मौ. निगडी येथील इनामास तोसीस न देणें.

इं. फॅ. १३
पृ. २४४–४५ इ.

(१२७०)
सुरत–मुंबई

श. १५९१ कार्तिक व. ४
इ. १६६९ नोव्हें. १

**दंडाराजपूरच्या सिद्दी** किंवा मोंगलांचे ताब्यांत देणार असेल तर त्यापासून कंपनीचा कांहींच फायदा नाहीं. उलट त्याचे लोक मुंबईस येण्यानें आमचा प्रबळ आणि निधड्या छातीचा शेजारी **शिवाजी** आमच्यावर चिडून जाईल. तेव्हां जर सिद्दी **किल्ला कंपनीला देत असेल** तर तसें तुमच्याकडून कळल्यावर त्याला आश्रय देण्याचे बाबतींत कांहीं ठरवूं. तत्पूर्वी कांहींच वचन न देतां त्याला झुलवीत ठेवावा.

इं. फॅ. १३
पृ. २४५ इ.

(१२७१)
मुंबई–सुरत

श. १५९१ कार्तिक व. ८
इ. १६६९ नोव्हें. ६

**शिवाजी** राजानें पोर्तुगीजांचीं कांहीं गलबतें धरून ठेविलीं. त्यांनींहि त्याचें **इराणाहून आलेलें** एक गलबत पकडलें. येथून जवळच **पेण** येथें शिवाजीचा **पेशवा** आला असून **शिवाजी** तेथेंच आसपास आहे. **शिद्दी** अजूनहि अडचणींत आहे.

फॅ. रे. सुरत भा. १०५
पृ. १८१ इ.

(१२७२)
मुंबई कन्सल्टेशन

श. १५९१ कार्तिक व. १३
इ. १६६९ नोव्हें. ११

'कल्याणचा दिवाण आणि शिवाजी आपलीं गलबतें येथें मरम्मतीकरितां आमच्या ताब्यांत देणार आहेत. हें आपलें कपनी आणि हें बेट यांना फायदेशीर आहे. पोर्तुगीज व अन्य लोक यांपासून त्याचें रक्षण व्हावें म्हणून प्रत्येक गलबतावर दोनतीन इंग्रज ठेवावे असो मान त्यांची मागणी आहे. तो [illegible] इर, फॅर,

जर्मन, व इंग्रज यांपैकीं कोणीहि चालतील अशी वस्तुस्थिती असल्यामुळें दोन तीन इंग्रज आणि बाकीचे इतर राष्ट्रांचे लोक घ्यावे असें ठरलें.

खं. १५ ले. १२२ } (१२७३) { श. १५९१ कार्तिक व. १४
सु. १०७० जखर २७ } मिसेली फा. मु. मज. व सी. { इ. १६६९ नोव्हें. १२

अज दि. पर. वाई—ता मोक. मौजे निंब व गोवे

जमादिलाखरचे खुर्दखत आले आहे. कमलनयन गोसावी यांचे वरील गावचे इनामास चौथाईची तोसीस न देणें. माफ आहे.

स. पृ. ७६ ले. ५२ } (१२७४) { श. १५९१ कार्तिक व. ३०
सु. १२ हि. १०८० जखर २८ } फर्मान { इ. १६६९ नोव्हें. १३

मोंगल बादशाह मुतसद्दी व कार. पा शेवगाव

पर. शेवगाव मौ. काटे खामगाव येथील एकंदर ५ चाहुर जमीन अबदुलनबी, व आताउल्लाचे वंशज यांकडे काजीपणा वगैरेबद्दल पूर्वीपासून चालत आल्याप्रमाणें चालवीत जाणें.

(दि.) ओ. कॉ. ३३७३ } (१२७५) { श. १५९१ मार्ग. शु. १४
इ. } सुरत-ई. इं. कंपनी. { इ. १६६९ नोव्हें. २६

राजकर्त्या मुसलमानांकडून त्यांच्या धर्मवेडामुळें बनिया व्यापारी वर्गावर असह्य जुलूम होत असतो. आपलीं मंदिरें भ्रष्ट होऊं नयेत किंवा व्यक्तिशः स्वतःला मुसलमानी द्वेषामुळें जाच होऊं नये म्हणून बनिये लोक अपार लांच भरतात. त्याची गोडी लागल्यानें काजी व इतर अमलदार हे लोभामुळें इतक्या वारंवार आणि क्रूरपणानें हिंदूंचा छळ करितात, कीं त्या दुःखभारानें वांकून ह्या प्रांतांतून पळून जाण्याचा हिंदूंनीं निश्चय केला. एका इसमानें ५ वर्षांपूर्वी काजीनें खाल्लेल्या टरबुजाचा एक भाग खाल्ला या सबबीवर त्याला जबरीनें मुसलमान करण्यांत आल्यामुळें त्यानें जीव दिला. यानें बनिया समाजांत खळबळ उडून हा देश सोडून जाण्यापूर्वी त्यांतील पुढाऱ्यांनीं आमच्याकडे येऊन मुंबईत जागा मागितली. आम्हीं त्यांना अहमदाबादेस जाऊन बादशहाकडे गाऱ्हाणें करण्यास सांगितल्यामुळें गेल्या २३।२४ सप्टेंबरला येथून सुमारें ८००० लोक आपलीं बायका-मुलें सुरतेंत ठेवून निघून गेले. काजीच्या संतापाला न जुमानतां सुभेदारानें त्यांना जाऊं दिलें..... बरेच लोक बाहेर गेल्यामुळें सुरतेंत दुकानदारांचा हरताळ पडला आणि लोकांचे हाल झाले. व्यापारी निघून गेल्यापासून येथील व्यापाराला मंदी आहे. या प्रकारानें सुरतेचा नाश होईल असें लोक बोलतात.

खं. २० ले. १२८ } (१२७६) { श. १५९१ मार्ग. शु. १४
सु. १०७० रजब १२ } मिसेली– फा. मु. मज. सी. { इ. १६६९ नोवें. २६

अज दि. पर.वाई—मौक. मौजे पसर्णी, एकसर, ओझरडे पां. वाई

सुनारदार (चिप्राव) यास १ चावर ३२ बिघे जमीन पूर्वीपासून चालत आहे. तरी आताहि चालविणे.

खं. २० ले. ५५,५६ } (१२७७) { श. १५९१ मार्ग. व. ९
सु. १०७० रजब २२ } उल्लेख. { इ. १६६९ डिसें. ६

(रकमालापैकी) रा. मोरो त्रिमल प्रधान यांचे खुर्दखत आहे की, मौजे माडकी पा शिरवळ येथें पेठ संभापूर करून वसाहत करण्यास जागा दिल्ही.

(दि) ओ. कॉ. ३३८५ } (१२७८) { श. १५९१ पौष शु. ११
इ. } सुरत–ई. इं. कंपनी { इ. १६६९ डिसें. २३

पुष्कळ दिवस **मुसलमानांच्या धर्मच्छलापासून** रक्षण करण्याच्या विवंचनेंत हिंदु समाज असतांना गेल्या २५ सेप्टेंबरला हिंदू कुटुंबांचे पुढारी आपली मुलें-माणसें सुरतेंत ठेवून **भडोचला निघून** गेले; व तेथून त्यांनी बादशहाकडे गान्हाणें मांडलें आहे. त्यांच्या निघून जाण्यानें सर्वत्र मंदी झाली असून आपसांतल्या दुहीमुळें होणारे सर्व दुष्परिणाम झाले आहेत. त्यांतच **अरबी** आणि **पोर्तुगीज** शत्रूंकडून व्यापाऱ्यांची मोठमोठीं गलबतें पकडलीं गेल्यामुळें आणि वसऱ्याला शांततामंग झाल्यामुळें व्यापाऱ्यांना कल्पनेच्या बाहेर ठोकर बसली आहे. शहर बहुतेक ओसाड झालें आहे. सदर गान्हाणें सांगण्याकरितां निघालेले व्यापारी ता. २० डिसेंबर रोजीं समाधानकारक उत्तर मिळाल्यामुळें परत सुरतेंत आले व सर्वांनाच समाधान वाटलें. [इं. फॅ. भा. १३ पृ. २०५]

मि. डेलन } (१२७९) { श. १५९१ पौष. व. १०
पृ. ५५–५७ इ. } उल्लेख { इ. १६७० जाने. ६

मी राजापूर बंदरांत आलो. येथें **इंग्रजांची** एक वखार होती. पण तेथून मराठ्यांनीं त्यांना काढून लाविलें आहे. अलीकडे थोड्या वर्षांपासून येथील उन्हाळ्यापाशीं **फ्रेंचांनीं** वखार स्थापिली आहे.

**शिवाजी** मोठा प्रबळ राजा असून, सामर्थ्यवान् अशा अनेक शत्रूंना न जुमानतां त्यानें सर्व कारभार इतक्या धोरणानें चालविला आहे कीं, पोर्तुगीजांचीं कांहीं थोडीं बंदरें सोडली तर **सुरत** ते **गोवा** ह्यांचे दरम्यानच्या सर्व मुलखांत त्यानें आपलें बस्तान कायमचें बसविलें आहे. सुरत, गोवा येथील लोकांना त्याची अतिशय भीती

वाटते. परंतु युरोपियनांशी वागतांना तो जरा जपून वागतो असें दिसून आलें आहे. त्याच्या पाठीशी असलेल्या राज्यकर्त्याकडून आपल्याला जाब विचारला जाईल अशी भीती वाटत असल्यामुळें कदाचित् तो पाश्चात्यांना अनुकूलता दाखवीत असावा. नाहींतर इतर हिंदी लोकांच्या प्रमाणेंच त्याच्याहि वखारी लुटण्यास त्याला कठीण गेलें नसतें.... त्याचे सर्व किल्ले डोंगरावर बांधलेले आहेत. त्याची प्रजा त्याचे सारखीच मूर्तिपूजक असली तथापि **तो सर्व धर्मांना नांदूं देतो.** ह्या भागांतील **अत्यंत धोरणी व राजकारणी पुरुष म्हणून** त्याची ख्याती आहे.

खं. १५ ले. १२३ } (१२८०) { श. १५९१ माघ शु. १
शु. १०७० सावान २९ } { इ. १६७० जाने. १२

खान अजम सिताबखान सरनाईकवाडी किल्ले सातारा वगैरे

ता बालाजी अनंत हुदे. व मोक. मौजे इडमिडे

मौ. इडमिडे येथें सदानंद मठाचे ३० बिघे इनाम आहे. ते पूर्वीप्रमाणें मठाकडे चालविणें.

इं. फॅ. १३ } (१२८१) { श. १५९१ माघ शु. १२
पृ. २५६–७ इ. } मुंबई, गॅरी—लॉर्ड आर्लिंग्टन { इ. १६७० जाने. २३

**औरंगशहानें** धर्मसुधारणेच्या अंध उत्साहानें अनेक **हिंदू देवालयांचा विध्वंस केला** आणि पुष्कळांना मुसलमान होणें भाग पाडलें असून **शिवाजीनें** त्याच्याशीं पुनः युद्ध सुरु केलें आहे. ( The archrebel Sevagee is again engaged in arms against Orangsha, who out of a blind zeal for reformation hath demolished many of the Gentues temples and forceth many to turne Musselmins. ) **औरंग॰नें** शिवाजीचे पुष्कळ किल्ले घेतले असून तो त्याला जेर करीत आहे. **शिवाजीहि** आपल्या बाजूनें कमी तयारी करीत नसून दख्खन हेंच रणक्षेत्र होईल असा संभव आहे.

लं. रा. ए. फारसी. } (१२८२) { श. १५९१ माघ शु. १४
रिया. पृ. ३३५ } खान दि. अशफखान–औरंगजेब { इ. १६७० जाने. २४

**शिवाजीची फौज वऱ्हाड प्रांत लुटीत** आहे. बादशाही प्रांतांतून २० लाख रकम त्यानें गोळा केली. औसा येथील किल्लेदार बरखुरदारखान याजकडून लिहून आलें कीं 'शिवाजीची २० हजार फौज या प्रांतांत आली आहे; मराठे सर्व प्रांत लुटून बदल घेत आहेत. किल्ल्यापासून दोन कोसांवर त्यांचा मुक्काम आहे. मी किल्ल्याची [illegible] चालविली आहे. माझी सर्व जहागीर शिवाजीनें लुटली. मला निर्वाहालासुद्धां

कांहीं साधन नाहीं. बादशहांनीं पैशाची मदत करावी. यावर बादशहा बोलला कीं, 'असे पुष्कळ लोक मराठ्यांनीं लुटले म्हणून पैसे मागत येतील. आम्ही किती कांना असें नुकसान भरून द्यावें ?'

लं. रा. पृ. फारसी. } (१२८३) { श. १५९१ माघ व. २
रिया. पृ. ३३५ } सुरत-औरंगजेब. { इ. १६७० जाने. २७

[ शिवाजीनें सुरतेहून किती रकम नेली तें तपास करून कळवावें असे औरंगजेबानें विचारलें होतें त्याचें उत्तर लिहिण्यांत आलें त्यांतील मजकूर.]

**शिवाजीनें सुरतेंतील** ५३ लक्षांचा व जवळच्या एका खेड्यांतून १३ लक्षांचा मिळून एकंदर ६६ लक्षांचा ऐवज लुटून नेला.

लं. रा. पृ. फारसी } (१२८४) { श. १५९१ माघ व. ६
रिया. पृ. ३३६ } { इ. १६७० फेब्रु. १

शेख सुलेमान यानें औरंगजेबापुढें असें सांगितलें कीं, 'थोडीशी मदत मिळाल्यास **फिरंगी लोक आरमार** तयार करून **शिवाजीचा समाचार** घेण्यास तयार आहेत असें रेमंड नांवाचा फिरंगी व्यापारी म्हणतो.' यावर या मनुष्याची लायकी काय आहे तें सुरतेस लिहून विचारा असा बादशहानें हुकूम केला.

सा. ले. ३५८ } (१२८५) { श. १५९१ फाल्गुन शु.१२
सु. १०७० सवाल १० } कौलनामा फा. मु. व सी. { इ. १६७० फेब्रु. २१

ठाणदार व कारकून कसबे पेठ अथणी ता माहानाड का पेठ मजकूर.

पेठेमधें गास्ति आलंग राखत नाहीं म्हणून दरोडा पडतो. तुम्ही बेशक उदीम करणें. दिवाणचे लोकाकडून गस्ती घालवूं.

फॅ. रे. सुरत भा. ३ } (१२८६) { श. १५९१ फाल्गुन व. ९
पृ. १५२ इ. } सुरत-मुंबई { इ. १६७० मार्च ५

**शिवाजीचें मोंगलांशीं युद्ध** चालू झाल्यामुळें शिवाजीशीं कंपनीच्या नुकसानभरपाईबद्दल प्रेसिडेंटचें बोलणें चालू होतें तें थोडेसें थांबलें. तुमच्याकडे कांहीं अनुसंधान आल्यास कळवावें. परंतु फार उत्सुकता दाखवूं नये. नाहींतर आमचा आब जाऊन तो दिरंगाई करूं लागेल.

सा. १८ ले. ५७ } (१२८७) { श. १५९१
सु. १०७० } उद्देश { इ. १६६९-७०

यास कष्टोजी बिन हिरोजी यास दिलेल्या कौलाचा (सु. १०७०) उद्देश आहे.

स. पू. २८ ले. २५
गु. १०७०

(१२८८)
फर्मान

श. १५९१-...
इ. १६६९-७०..

फर्मान हुमा. वजा. मामलेदार व देसाई मामले बंकापूर.

नवाब हुमायून याचे वेळी पेठ शहापूर मामले बंकापूर येथील देऊळ मोडून मशीद केली व तेथील खिजमत अबदुल मजीद यास दिली होती. ती त्याकडे चालविणे.

मि. डेलन, पृ. ३७
इ.

(१२८९)
उद्गेख

श. १५९१
इ. १६६९

सुरतेला पूर्वी तट नव्हता. शिवाजीच्या भीतीमुळें सुरतेला पक्का तट बांधून नेहमीं पहारा करीत राहणें भाग पडलें आहे.

ऑर्म. मा. १७४
पृ. ३५ इ.

(१२९०)
ऑर्मची नोंद !

श. १५९१
इ. १६६९

शिवाजीचे लोक लूट करीत सुरतेच्या तटाशीं आले आहेत. सुभेदार कर वसूल करीत आहे. तथापि संरक्षणाला पाहिजे त्याच्या अर्ध्यानेंहि त्याचे जवळ फौज नाहीं. सुरादबेग मेच्या आरंभाला चाल करून आला. त्यानें कारभार आपल्या हातांत घेऊन, एका महिन्याच्या आंत शिवाजीच्या लुटरूंना झोडपून लावून, सुरतेंत त्यांच्या लोकांच्या गाड्या भरून आणून त्यांना पुरलें !!

फॅ. रे. सुरत भा. ३
पृ. ५३ इ.

(१२९१)
सुरत कन्सल्टेशन

श. १५९२ चैत्र शु. १
इ. १६७० मार्च १२

शिवाजीनें अलीकडे [मोंगलांवर] अनेक जय मिळवून मुलूख जिंकल्यामुळें सुरतेपासून ६० मैलांपर्यंतच्या टापूंत तो आल्याची बातमी आली; तेव्हां सर्वत्र भीतीनें पळापळी, बंदोबस्त इत्यादि नानाप्रकार सुरतेमध्यें दिसले.

फॅ. रे. मुंबई मा. ६
पृ. ५, ७ इ.

(१२९२)
मुंबई-सुरत.

श. १५९२ चैत्र शु. १०
इ. १६७० मार्च २१

तोफांचे गाडे करण्यासाठीं व [गलबतांकरितां] लागणारें लांकूड आतां शिवाजीच्या ताब्यांत असलेल्या कल्याण-भिंवडीकडून आपल्याला मिळविलें पाहिजे.

शिवाजी वर देशांत गेला आहे. माहुलीला त्याचे सैन्याची पिछेहाट झाली. त्यांत सुमारें १००० लोक पडले. त्याच्या लोकांनीं आमचेपासून जवळच दिसणाऱ्या कर्नाळा नांवाच्या डोंगरी किल्ल्याला वेढा घातला आहे. आपल्या समोरून रक्षणाकरितां फळ्या आणि चिखल यांच्या भिंती बांधीत बांधीत ते तटाशीं जाऊन भिडले आहेत. ह्या फळ्या ते लोक आपल्यासमोर धरतात. थोड्या अवकाशांतच ते हा किल्ला घेतील.

फॅ. रे. मुंबई मा. ६ }
पृ. ८ इ. }

(१२९३)
मुंबई–सुरत.

{ श. १५९२ चैत्र व. ३
{ इ. १६७० मार्च २९

**शिवाजी** कोणाचाहि विरोध न होतां **एकसारखा जिंकीत चालला आहे**. त्यानें **मोंगलांपासून पुरंधर** किल्ला घेतल्याची आज बातमी आली. **कर्नाळा** देखील फार दिवस टिकाव धरणार नाही. दोन दिवसांपूर्वी शिवाजीच्या कल्याणच्या सुभेदाराकडून दोन इसम आमच्याकडून तोफा खरीदण्यासाठीं आले. 'थोड्या दिवसांपूर्वी आलेल्या लोकांना अधिक तोफा देत असतां त्या त्यांनी घेतल्या नाहींत. आतां त्या आम्हीं सुरतेला पाठविल्या. इंग्लंडमधून येणाऱ्या गलबतांतून आल्या तर देऊं' इत्यादि **सलोख्याचीं उत्तरें** आम्हीं त्यांना दिलीं. कल्याणहून इमारती लाकूड आणि शिवाजीनें **पुनः जिंकून घेतलेल्या** मुलखांतून सर्पण यांची आम्हांला जरूर असल्यामुळें असेंच गोडीचें पत्र आम्हीं कल्याणच्या सुभेदाराला लिहिलें. शिवाजी सुरतेकडे गेला नसून आपले डोंगरी किल्ले परत मिळविण्यांत गुंतला आहे असें वाटतें. तथापि तो त्वरेनें हालचाली करीत असल्यामुळें बेसावध राहतां कामा नये!

फॅ. रे. मुंबई मा. ६ }
पृ. ११ इ. }

(१२९४)
मुंबई–इराण.

{ श. १५९२ चैत्र व. ४
{ इ. १६७० मार्च ३०

**शिवाजी पुनः आमचा शेजारी झाला** असून त्यानें आमच्या समोरील किनाऱ्यावरचे बरेच किल्ले **मोगलांकडून** परत मिळविले आहेत. औरंगाबादेच्या **शहाजाद्यानें** (मुअज्झम) त्याला (मोंगली मुलखांत) बोलावून आणिलें व तो त्याला खजीना पुरवतो अशी बऱ्याच जणांची समजूत आहे. **सुरतेच्या लोकांना** भीती वाटून, डच, फ्रेंच व इंग्रज यांनींहि जरी शिपाई ठेवून खबरदारी घेतली आहे तथापि **शिवाजी** स्वराज्यापासून इतका लांब न जातां, त्याच्यावर मोगलांचें एकादें सैन्य चालून येई-पर्यंतचा मधला वेळ आपले गेलेले किल्ले शक्य तितके परत मिळविण्यांत तो घालविणार असें वाटतें. आणि मोंगली सैन्य आतां पावसाळा संपेपर्यंत येणार नाहीं. शिवाजीच्या हालचालीमुळें शेजारच्या मुलखांत अदाधुदी चालली असून जमीनीवरील आमचा व्यापार बंदच पडला आहे. सराफ आणि व्यापारी लोक यांनीं आपली संपत्ती लपवून ठेविल्यामुळें कर्ज मुळींच मिळत नाहीं.

ओ. कॉ. मा. ३१ }
नं. ३४१५ इ. }

(१२९५)
सुरत–कंपनी.

{ श. १५९२ चैत्र व. ४
{ इ. १६७० मार्च ३०

शहाजादा **मुअज्झम** शिवाजीला उत्तेजन देत असून, **औरंग**०नें आपल्या धाकट्या भावाला गादीचा वारस ठरविल्याकारणानें त्याच्या विरुद्ध बंड करून **शिवाजीला** तो मिळणार आहे. शिवाजीच्या हालचाली पाहून या मताला दुजोरा मिळतो.

कारण, आतां तो पूर्वीप्रमाणें चोरासारखा वागत नाहीं. तर राजरोसपणें ३० हजार सैन्यानिशीं जाईल तेथें जिंकण्याचा त्याचा क्रम चालू असून शहाजादा मुअज्जम जवळ असतांनाहि त्याला विरोध करीत नाहीं ! शिवाजीनें मुंबई शेजारचीं कल्याण आणि भिवंडी हीं घेतलीं आहेत. तीं त्याच्याकडेच रहातील तर बरें. कारण, मुसलमानांच्या शेजारापेक्षां शिवाजीचा शेजार अधिक बरा वाटतो. शिवाजीकडून जेराल्ड ऑंजीअरकडे मित्रत्वाचे ६ संदेश आले होते. आणि हें युद्ध उपस्थित झालें नसतें तर त्यानें चांगली भरपाई केली असती. शिवाजीच्या या युद्धामुळें सुरतेला मालाचे दर उतरले असून हातीं पैसा नसल्यामुळें आणि त्याच्या भीतीनें पोवळ्याची विक्री न झाल्यामुळें व्यापारांत मोठी खोट येऊन त्रास वाढला आहे.

फॅ. रे. सुरत मा. ३ } (१२९६) { श. १५९२ चैत्र व. ५
पृ. ५५ इ. } सुरत कन्सल्टेशन { इ. १६७० मार्च ३१

सर्व राज्यांत अतोनात त्रास उत्पन्न झाला असून रस्ते व घाट बंद झाले आहेत. चोर वा दरोडेखोर आणि देशचे राजे शिवाजीचे नांवाखालीं वाटेल तशी लूट करितात.

फॅ. रे. मुंबई मा. १९ } (१२९७) { श. १५९२ चैत्र व. ७
पृ. ४,५,६ इ. } सुरत–मुंबई { इ. १६७० एप्रील २

शिवाजी औरंगाबादेकडे गेला असें म्हणतात. परंतु त्याच्या हालचाली विलक्षण असल्यामुळें आमच्या रक्षणाकरितां मागविलेले शिपाई पाठवावेच.

ऐ. रा. ए. फारसी } (१२९८) { श. १५९२ चैत्र व. १२
रिया. पृ. ३३६ } बातमीपत्र { इ. १६७० एप्रील ७

शिवाजीनें चांदवड लुटलें; आणि तळकोकणचा फौजदार लुधीखान याचा पराभव केला; ही बातमी ऐकून नांदेडचा फौजदार फत्तेजंगखान पळून गेला. बादशहानें हुकूम केला कीं त्या फौजदाराचा 'जंग' हा किताब काढून टाका.

फॅ. रे. सुरत मा. ३ } (१२९९) { श. १५९२ चैत्र व. १४
पृ. ५७ इ. } सुरत–कन्सल्टेशन. { इ. १६७० एप्रील ८

आम्हा येथें बादशहाचा हिंदूंवर चांगला जय झाल्यामुळें आणि सुरतेंत वाटणारी शिवाजीबद्दलची भीती कमी झाल्यामुळें पोवळ्यांची मागणी आली.

ऐ. रा. ए. फारसी } (१३००) { श. १५९२ चैत्र व. १४
रिया. पृ. ३३६ } बातमीपत्र. { इ. १६७० एप्रील ८

पूर्वी अफझलखानाच्या नोकरींत असलेला सिद्दी हिलाल हल्लीं बादशहाच्या

(=औरंगजेबाच्या) नोकरीत आहे. तपासाअंती असें कळतें कीं, हा गृहस्थ येथील दरबाराची कची हकीगत शिवाजीस कळवितो.

लं. रा. ए. फार्सी
रिया. पृ. ३३६
(१३०१)
बातमीपत्र.
श. १५९२ वैशा. शु. ३
इ. १६७० एप्रील १२

पर्वतराव यानें तयार केलेला शिवाजीच्या राज्याचा नकाशा बादशहास दाखविण्यांत आला.

फॅ. रे. मुंबई भा. ६
पृ. १४,१५ इ.
(१३०२)
मुंबई-सुरत
श. १५९२ वैशाख शु. ४
इ. १६७० एप्रील १३

वसईच्या किल्लेदाराला १०१ खंडी आणि शिवाजीच्या कल्याण व आसपासचा मुलुख यांच्या सुभेदाराला तितकाच काथ्या देऊन स्नेह राखणें भाग पडलें. फारंजा, ट्रॉम्बे, आणि चौल येथील किल्लेदार आणि माहीम बंदरांत येणारीं गलबतें यांना दोरखंडांकरितां मिळून पुष्कळ काथ्या द्यावा लागला.

शिवाजीचा मीठाच्या गलबतांचा तांडा या बंदरांत आला आहे. त्याच्या रक्षणाकरितां २५० टनाचें जहाज आणि कांहीं मचवे बरोबर आहेत. डेप्युटी गव्हर्नरानें पूर्वी एकदां त्यांना सवलतीनें वागवून खुद्द शिवाजीच्या मालकीचीं गलबतें होतीं त्यांचेवर आणि रक्षणाकरितां आलेल्या जहाजांवर बंदरी कर घेतला नव्हता आणि आजपर्यंत ते फारंजाहून मीठ आणीत त्या ऐवजीं ट्रॉम्बेहून मीठ नेण्याबद्दल त्यानें त्यास सांगितलें होतें; त्यामुळें शिवाजीच्या आरमारी सेनापतीनें या खेपेला ट्रॉम्बेहून मीठ नेण्याचें ठरविलें. ४०० खंडी मीठ पूर्वी १०० रुपयाला विकलें तेंच आतां ४६ रु. ला दिलें.

रु. ३ ले. १६
इ. १०५० जिल्हेज २
(१३०३)
श. १५९२ वैशाख शु. ४
इ. १६७० एप्रील १३

त्रिंबक भास्कर सुभेदार नामजाद किले पुरंधर प्रति राजश्री शिवाजीराजे याचा दंडवत. किले मजकुराउ तासकरी सखमट बिन बाबूभट व विश्वनाथ भट बिन महादेव भट पाठविले आहेती. यास किलेयावरी घेउनु यापासुनु तासाचे काम घेत जाणे. तुर्त किला तास नाहीं. चालवतील तरी चालउत न चालवितील तरी न चालउत. तासासी गरज नाहीं, हाजीर असोत वा नसोत धर्मार्थच देत जाणे. दरमाहे दामोळी लारी ३० रास हीं छ १ जिल्हेजापासुनु ऐसी प्रमाणें वजावाट करून किलाचे रोखीखावद देत जाणे. तालीक घेऊनु असली तासकरी यास देणे. छ २ जिल्हेज, मोर्तबसुद (बाटोळा शिक्का). मुरु सुद.

फॅ. रे. मुंबई, मा. १९ पृ. ७,९ इ. (१३०४) सुरत-मुंबई श. १५९२ वैशाख शु. ५ इ. १६७० एप्रील १४

**शिवाजी** सुरतेपासून ४० मैलांच्या अलीकडे आल्याची खबर नसतांहि **त्याच्या नांवानेंच** पुष्कळ लोक घाबरून जातात. शिवाजीचा **इंग्रजांवर** विशेष **डोळा नाहीं.** तथापि त्याच्या येण्यानें मुलूख उध्वस्त होऊन व्यापार बसेल. कल्याणच्या सुभेदाराशीं **थातां** चांगलें वागून पुनः मुसलमानांचा तावा झाल्यास **व्यापारी या नात्यानें** त्याच्याशींहि बरें वागण्यास आमची हरकत नाहीं.

फॅ. रे. मुंबई, मा. ६ पृ. १३ इ. (१३०५) मॅथ्यू ग्रे-सार्जंट ॲंडरटन श. १५९२ वैशाख शु. ५ इ. १६७० एप्रील १४

**शिवाजीची** हद्द शेजारीं असल्यामुळें आम्हांला फार जपावें लागतें. आमच्या पुष्कळशा वस्तु त्याच्या मुलखांतून येतात, त्याकरितां त्याच्या अमलदाराशीं आम्हीं सलोख्यानें वागत असलों तरी त्यांच्यावर भरंवसा ठेवतां येणार नाहीं. करितां आपले सशस्त्र लोक मुंबई बेटांत येणार आहेत तसे पाठवूं नयेत. कोणत्याहि तऱ्हेनें अचानक हल्ला कोणालाच करतां येऊं नये याकरितां ही खबरदारी घेतली पाहिजे.

फॅ. रे. मुंबई, मा. ६ पृ. १८, १९ इ. (१३०६) मुंबई-सुरत श. १५९२ वैशाख शु. १२ इ. १६७० एप्रील २१

**शिवाजी** सुरतेपासून १०० मैलांच्या आंत नसला तरी सुरतेकडे तो येईल हें नक्की समजून बंदोबस्त करणें जरूर आहे. कल्याणचे **लाकडाचे व्यापारी** मुसलमान असून ते **ठाणें** आदिकरून पोर्तुगीज मुलखांत पळून गेल्यामुळें लांकूड खरेदी करतां येत नाहीं. त्या बाजूचे परिस्थितींत एकदम बदल होण्याचा संभव आहे. कारण **जुघरला** टेकडीवर **मोंगलांचें मोठें सैन्य** जमा झालें असून थोडयाच दिवसांत कल्याणभिवंडी इत्यादि कोंकणांतील **शिवाजीच्या मुलखावर स्वारी** होईल. थोडे दिवस वाट पाहून तरी खरेदी करणें अवश्य आहे. पण हा [ लांकूड ] माल ठाण्यांतून आणावयाचा तर **वसईचा** ( पोर्तु० ) कॅप्टनची परवानगी घेतल्याशिवाय किंवा ठाण्याला भरमसाट दस्तुरी दिल्याशिवाय आणतां येणार नाहीं.

**मोंगलांचें** सैन्य या बाजूला **कल्याणकडे** आल्यामुळें आणि **शिवाजीचें** सैन्य सांगतात तितकें मोठें नसल्यामुळें, शिवाजीला **माघार** घेणें भाग आहे.

फॅ. रे. सुरत मा. ३ पृ ६३ इ. (१३०७) सुरत कन्सल्टेशन श. १५९२ वैशाख शु. १५ इ. १६७० एप्रील २५

बादशाही सैन्य शिवाजीवर चालून गेलें. आणि **सुरतेच्या** बंदोबस्ताकरितां

बहादुरखान ५०,०० सैन्यानिशीं आला; यामुळें शिवाजीच्या आगमनाची भीति संपली. तेव्हां मुंबईहून आलेलें सैन्य परत पाठवावें.

फॅ. रे. मुंबई, मा. १९ } (१३०८) { श. १५९२ वैशाख व. ९
पृ. १४, १६ इ. } सुरत-मुंबई { इ. १६७० मे ३

शिवाजी कल्याण भिवंडीचा मालक बनला तर परिस्थिति बरीच बदलून जाईल. .... अहमदाबादचा सुभेदार बहादुरखान ५००० फौज घेऊन आला आहे. त्यांतील बरेंच मोठें सैन्य माहुलीला कुमक करण्यास जात असून पुढें इतर मोंगली सैन्याला मिळून मग तें शिवाजीच्या मुलखावर स्वारी करील. बहादुरखान खासा सुरतेलाच कांहीं दिवस रहाणार आहे.

लं. रा. ए. फारसी } (१३०९) { श. १५९२ वैशाख व. १४
रिया. पृ. ३३६ } बातमीपत्र { इ. १६७० मे ८

अहमदनगर, जुन्नर आणि परिंडा या महालांतील ५१ गांवें शिवाजीनें लुटलीं. बादशहानें ही गोष्ट ऐकून घेतली; कांहीं बोलला नाहीं.

फॅ. रे. मुंबई } (१३१०) { श. १५९२ ज्येष्ठ शु. ३
मा. ६ पृ. २३ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७० मे १२

वसईला पुष्कळ गलबतें बांधण्याचें काम चालू असल्यामुळें तेथें लांकूड फार महाग असून मिळत नाहीं. कल्याणकडे चौकशी करावी तर तेथें स्थिरस्थावर झाली नाहीं. कल्याणचा काजी तिकडे जाण्याकरितां निघाला त्याला १५ दिवस झाले. परंतु मोंगली सैन्य घुसरहून खालीं आलें नाहीं यामुळें अद्यापि तो बेटावरच आहे.

आपण व्यवस्था केल्याप्रमाणें बिलिआपट्टण आणि कालिकतहून उत्तम आणि स्वस्त लांकूड पैदा झालें तर आम्हांला आमच्या मिजासखोर शेजाऱ्यांवर विसंबून राहण्याचें कारण पडणार नाहीं. परस्परांच्या सैन्यबळाप्रमाणें कल्याणभिवंडी कधीं मोंगलांच्या तर कधीं शिवाजीच्या हातीं जाऊन त्यांची ओढाताण चालू असल्यामुळें तेथील व्यापाराला स्थिरता येत नाहीं यामुळें ठाण्याच्या पासावर आम्हीं आणू त्या लांकडाशिवाय इतर जिनसांवरील जकात भरण्याचें कारण पडणार नाहीं. जकातदाराची मुदत भरावयास अजून दीड वर्ष अवकाश आहे.

खं. २० ले. २४६ } (१३११) { श. १५९२ ज्येष्ठ व. २
सु. १०७१ मोहर १६ } सुर्दसत म मु व सी. { इ. १६७० मे २६

निलो सोनदेऊ—गंगाजी मुद्गल हवाल० व कार० पर० सुपे

पर० सुपे पांत माहादजी गोसाव्याचा जो इनाम आहे तो पूर्वीप्रमाणें चालविणें. -माजी आम्हास सुपे मोकासा होता. (मुद्रा-श्री संताप। ति चरण परा। यण नीलकंठ। -सोनोजी ना। रायण)

| | | |
|---|---|---|
| -सं. २० ले. २६७<br>-सु. १०७१ | (१३१२)<br>कतबा | श. १५९२ ज्येष्ठ<br>इ. १६७० मे, जून |

अज. दि. ठाणे पर. मंगळवेढे

राया बिन महाल नाईक मेटकरी पर. मज.

शिवाजीचे धुंदलीखाले मार्गे खोळंबला. पंढरपूर, तुळजापूर व बाजे देवस्थाने उठोन गेली. याकरितां मेटाची हासील बुजून गेला. खोती करवत नाहीं. ३० होन -इजारती देऊ.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. मुंबई,<br>मा. ६ पृ. २७१. | (१३१३)<br>मुंबई-सुरत | श. १५९२ आषाढ शु. ४<br>इ. १६७० जून ११ |

शिवाजी मोंगली फौजेप्रमाणें आळशी रहात नाहीं. कारण तो, सूर्य प्रकाशत असतांनाच गवत वाळवतो असें नसून, (संधी साधणें अशा अर्थाची इंग्रजी म्हण) छोट पावसानें सूर्य आच्छादून गेला असतांहि त्याचें काम चालतें! (पावसांत देखील त्याचा उद्योग थांबत नाहीं). मोंगली फौज पावसाळ्याकरितां टेकड्यांच्या आश्रयाला निघून गेल्यानंतरसुद्धां शिवाजीच्या हालचाली चालूच आहेत. त्याच्या लोकांनीं लोहगड आणि फोज हे किल्ले परत मिळवून आठ दिवसांच्या आंत कुर्डूगड (Kerridrew? कुवारीदुर्ग?) घेऊन नुक्ताच माहुलीवर पुनः हल्ला केला. तेथें किल्ल्याच्या तटावरून दगडांच्या माऱ्याखालीं त्याचे दोनशें लोक सांपडले. फिरून एकदां तो आपल्या लोकां-कडून माहुलीवर हल्ला चढवील आणि नंतर त्यांना विश्रांति देईल. भिवंडीला आणि माहुलीच्या पायथ्याशीं दुसरा हल्ला करण्यासाठीं मिळून त्यानें पांच हजार सैन्य जय्यत ठेविलें आहे.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. मुंबई<br>मा. ६ पृ. २८१. | (१३१४)<br>मुंबई-सुरत | श. १५९२ आषाढ व. ६<br>इ. १६७० जून २८ |

१५ जूनला आलेली बातमी:-शिवाजीनें मोंगलांच्या हातून माहुली किल्ला घेतला. कर्नाळ्याशिवाय इतर डोंगरी किल्ले देखील त्याच्या ताब्यात आले. माहुलीची बातमी कळतांच कर्नाळाहि त्याचे हातीं दिला जाईल. याच वेळीं दंडाराजपुरीकडे शिवाजीचें थोडें सैन्य गुंतलें आहे. सर्व सैन्य एकवटून शिवाजी जातीनेंच हल्ला चढवील तर दंडाह गमविण्याची पाळी येईल. गलबतें सामुद्रांत चालू लागतांच सिद्दीकडून

त्याचे कुटुंबरक्षणार्थ अथवा रसदीकरितां मुंबईस बहुधा मागणी येईल, तरी आपली आज्ञा कळवून ठेवावी.

औरंगाबादेहून शहाजाद्याच्या वतीनें दंडाराजपुरीकडे व गोव्याकडे वकील या नात्यानें जाण्याकरितां खोजा अलादिन आला आहे.

फॅ. रे. मुंबई, भा. ६ } (१३१५) { श. १५९२ आषाढ व. १४
पृ. ३१ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७० जुलै ५

शिवाजीनें कांहींच मुलूख घेतला नव्हता तेव्हां सुरतेचे कोकांना जर इतकी भीती वाटत होती तर आतां माहुली आदिकरून सर्व किल्ले त्यानें मोंगलांपासून घेतल्यामुळें ती भीती वाढून सुरतेंत पैसा दुर्मिळच झाला असला पाहिजे.

फॅ. रे. सुरत, भा. ३ } (१३१६) { श. १५९२ आषाढ व. १४
पृ. ७४ इ. } सुरत कन्सल्टेशन { इ. १६७० जुलै ५

देशाची अंदाधुंदीची परिस्थिति आणि औरंगजेब आणि शहाजादा मुअज्झम यांच्यामध्यें भयंकर युद्ध होण्याची साधार वाटणारी भीती, यामुळें आम्हांला आपलें सर्वस्व नीट सांवरून राहिलें पाहिजे.

फॅ. रे. मुंबई भा. १९ } (१३१७) { श. १५९२ श्रावण शु. ३
पृ. २७-२८ इ. } सुरत-मुंबई { इ. १६७० जुलै १०

अपराधी भंडारी हे शिवाजीच्या मुलखांतील असल्यामुळें, आमच्याविरुद्ध शिवाजीच्या कारस्थानांत त्याला उपयोगी पडतील. यास्तव छातीशीं बाळगलेल्या सापांप्रमाणें हे घातक आहेत असें समजून त्यांना कामावरून दूर करावें. पावसाळ्याच्या कुंद हवेंतहि माहुली वगैरे किल्ले घेतल्यानें सुरतेमध्यें शिवाजीच्या नांवाची फारच दहशत वाटते. धन्हाणपूर, औरंगाबाद, मुल्हेर आणि इतर ठिकाणांहून सुरतेवर हल्ला येणार अशा धोक्याच्या सूचना वारंवार येत आहेत. कित्येक वर्षे दंडाराजपुरीवर त्याचें मन खिळलें असल्यामुळें ती घेण्याचा शिवाजी पुनः प्रयत्न करून यशहि मिळवील. तेव्हां चालू युद्धांतील पक्षाचें बलाबल पाहून, कोणाचीहि बाजू न घेतां तटस्थ राहून, संधि येईल त्याप्रमाणें फायदा करून घेण्यास तयार रहावें, हेंच धोरण सिद्दीशीं वागतांना पत्करावें. सिद्दीनें दंडाराजपूर इंग्रजांना देण्याचें बोलणें लाविलें तथापि शिवाजी किंवा मोंगल यांच्या दृष्टीनें तें आपल्यास न पचून अंगांत सामर्थ्य नसतांना विनाशक युद्ध आपल्यावर ओढून घेतल्यासारखें होईल, म्हणून तें स्वीकारूं नये. पुनः ताब्यांत घेतल्यावर तें राखणें हें फार खर्चाचें, आणि निकटचा मुलूख स्वतःचे ताब्यांत नसल्यानें फार धोक्याचें आहे. शिवाजीच्या हातून तो मुलूख [illegible] करितां प्रबळ सैन्य सदैव ठेवावयास

पाहिजे तेंहि आपल्याजवळ नाहीं. त्यांतून दंडाराजपूर ताब्यांत देतांना सिद्दी अटी घालील त्या आपल्यास पुरविणार नाहींत व कंपनीला पसंत पडणार नाहींत. या करितां सुरत आणि लंडन येथून परवानगी येण्याची सबब सांगून सिद्दीला टोलवीत ठेवावें. त्याच्या कुटुंबाचीं माणसें आलीं तर त्यांना एकदम घालवून न देतां मुंबईपेक्षां सुरत किंवा खंबायत शिवाजीपासून अधिक सुरक्षित असल्याचा मित्रत्वानें सल्ला द्यावा.

फॅ. रे. मुंबई, मा. ६
पृ. ३३ इ.
(१३१८)
मुंबई-सुरत
श. १५९२ श्रावण शु. ४
इ. १६७० जुलै ११

माहुली घेतल्यावर तेथें संरक्षणाकरितां १००० लोक ठेवून शिवाजीनें बाकीचें सैन्य काढून नेलें आहे.

सा. ले. ५३
सु. १०७१ रवल १२
(१३१९)
श. १५९२ श्रावण शु. १३
इ. १६७० जुलै २०

माहादाजी गोविंद सुभेदार पर. पुणें-रा. सिवाजी राजेः-मा। संकराजी निलकंठराऊ हुजूर येऊन माल्हूम केले जे आपली इनामती मौजे चांबिली ता। कन्हेपठार पर. मार येथें सेत ।सिवेचे थल पादर देऊल कास टका १ आहे. कारकीर्द दर कारकीर्द चालत आले आहे. माहाराज (शहाजी) साहेबी चालविली आहे. अफजलखानाच्या राजिका आधी साहेबाचे कारकीर्दीस दुमाले चालत आले आहे. हाली माइलेस इनामतीस पैके लावितातो येबावे साहेबी कागद देविला पाहिजे म्हणऊन माल्हूम केले. साहेबींहि आपले कारकीर्दीस चालविले आहे तेणेप्रमाणें दुमाले करणें. पेस्तर फिर्याद येऊ न देणें.

फॅ. रे. मुंबई मा. ६
पृ. ३५, ३६ इ.
(१३२०)
मुंबई-सुरत
श. १५९२ श्रावण व. ६
इ. १६७० जुलै २७

शिवाजीच्या अमलदारांपासून विकत घेऊन वसईच्या कॅप्टननें आम्हांला विकलेलें लांकूड मूळ मुसलमानी प्रजेचें होतें अशी खोजा अल्लादिन याची तक्रार आहे. ... दंडाराजपूरला आतां शिवाजीचा वेढा नाहीं.

ओ. कॉ. मा. ३१
नं. ३४५७ इ.
(१३२१)
कारवार-सुरत
श. १५९२ श्रावण व. १२
इ. १६७० ऑग. २

पावसाळा संपल्यावर मोगल सैन्य काय करतें तिकडे सर्वांचें लक्ष लागलें आहे. मोंगल बादशहानें वकिलामार्फत आदिलशाहाकडे शिवाजी विरुद्ध १२ हजार घोडदळाची कुमक मागितली. न दिल्यास आपलें सर्व सैन्य विजापुरावर रवाना करण्याची त्यानें धमकी दिल्यामुळें, शिवाजीचा स्नेह न तोडतां मोगलाला खूष कसें करावें ? अशी इकडे आड आणि तिकडे विहीर याप्रमाणें परिस्थिति होऊन देसायां-करितां तरी दि. विरुद्ध सैन्य पाठवावें लागेल असें वाटतें.

पाहिजे तेंहि आपल्याजवळ नाहीं. त्यांतून दंडाराजपूर ताब्यांत देतांना सिद्दी अटी घालील त्या आपल्यास पुरविणार नाहींत व कंपनीला पसंत पडणार नाहींत. या करितां सुरत आणि लंडन येथून परवानगी येण्याची, सबब सांगून सिद्दीला टोलवीत ठेवावें. त्याच्या कुटुंबाचीं माणसें आलीं तर त्यांना एकदम घालवून न देतां मुंबईपेक्षां सुरत किंवा खंबायत शिवाजीपासून अधिक सुरक्षित असल्याचा मित्रत्वानें सल्ला द्यावा.

फॅ. रे. मुंबई, मा. ६ } (१३१८) { श. १५९२ श्रावण शु. ४
पृ. ३३ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७० जुलै ११

माहुली घेतल्यावर तेथें संरक्षणाकरितां १००० लोक ठेवून शिवाजीनें बाकीचें सैन्य काढून नेलें आहे.

सा. ले. ५३ } (१३१९) { श. १५९२ श्रावण शु. १३
सु. १०७१ रबल १२ } { इ. १६७० जुलै २०

माहादाजी गोविंद सुभेदार पर. पुणें—रा. सिवाजी राजेः—मा। संकराजी निलकंठराउ हुजूर येऊन माहूम केले जे आपली इनामती मौजे चोविली ता। कन्हेपठार पर. मार येथें सेत ।सिवेचे थल पांढर देऊल कास टका १ आहे. कारकीर्द दर कारकीर्द चालत आले आहे. माहाराज (शहाजी) साहेबी चालविली आहे. अफजलखानाच्या राजिका आधी साहेबाचे कारकीर्दीस दुमाले चालत आले आहे. हाली माइलेस इनामतीस पैके लाविताती येबाबे साहेबी कागद देविला पाहिजे म्हणऊन माहूम केले. साहेबीहि आपले कारकीर्दीस चालविले आहे तेणेंप्रमाणें दुमाले करणें. पेस्तर फिर्याद येऊ न देणें.

फॅ. रे. मुंबई मा. ६ } (१३२०) { श. १५९२ श्रावण व. ६
पृ. ३५, ३६ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७० जुलै २७

शिवाजीच्या अमलदारांपासून विकत घेऊन वसईच्या कॅप्टननें आम्हांला विकलेलें लांकूड मूळ मुसलमानी प्रजेचें होतें अशी खोजा अल्लादिन याची तक्रार आहे. ... दंडाराजपूरला आतां शिवाजीचा वेढा नाहीं.

ओ. कॉ. मा. ३१ } (१३२१) { श. १५९२ श्रावण व. १२
नं. ३१५७ इ. } कारवार-सुरत { इ. १६७० ऑग. २

पावसाळा संपल्यावर मोगल सैन्य काय करतें तिकडे सर्वांचें लक्ष लागलें आहे. मोगल बादशहानें वकिलामार्फत आदिलशाहाकडे शिवाजी विरुद्ध १२ इजार घोडदळाची कुमक मागितली. न दिल्यास आपलें सर्व सैन्य विजापुराकडे रवाना करण्याची त्यानें धमकी दिल्यामुळें, शिवाजीचा स्नेह न तोडतां मोगलाला खूप वर्से